दत्तात्रय धरूनी दार, राखि होउनि चोपदार



नाथगृहाचे मुख्यद्वार

## महाद्वारांतच ! : : :

१९४९ च्या श्रीनाथषष्ठीपूर्वी दीड महिना प्रस्तुत कार्याचे प्रमुख आधार श्री. न्या. मू. **बळवंतराव घाटे** यांची भेट झाली. नाथवाङ्मयाचें प्रेम त्यांना पितृपरंपरेनें लाभलेलें असल्यामुळे श्रीएकनाथांची वाङ्मयमूर्ति घडवावी अशी त्यांची इच्छा होती. शिल्पकार अनेक होते परंतु त्यांच्या जांगजोडासाठीं त्यांना कुणी तरी एक सांगकाम्या हवा होता. अनायासें आम्ही हाताशीं सांपडलों. नाथांच्या दरबारी या ना त्या निमित्ताने प्रवेश लाभावा ही इच्छा आमच्याहि मनांत होतीच. यासाठी उचललेल्या जुवाखाली मान देण्यांत आली. त्याच वर्षी पैठण येथे भरलेल्या **नाथवाङ्मयोपासक मंडळाच्या** १ ल्या स्नेहसंमेलनात **श्रीएकनाथ-दर्शन** प्रकाशित करण्याचे ठरले. त्यासाठी **नाथवाङ्मयोपासक मंडळ पैठण, ज्ञानेश्वर मंडळ अहमदनगर** या दोन संस्थाच्या सहकार्याने **श्री. धुंडामहाराज देगलूरकर** यांच्या अध्यक्षतेखाली पुढीलप्रमाणे एक कार्यकारी मंडळ निवडण्यांत आले.

अध्यक्षः– **श्री धुंडामहाराज देगलूरकर**
चिटणीसः– ,, **न. शे. पोहनेरकर.**
सभासद.– श्री. **बळवंतराव देशमुख वकील.**
,, **नरहरबुवा जहागिरदार वकील.**
,, **बळवंत गिरिराव घाटे.**
,, **र. ह. कोटनीस.**
,, **त्र्यं. गं. धनेश्वर** (नगरप्रतिनिधि)
,, **बाळासाहेब भारदे** ,,
,, **अ. बा. रसाळ.** ,,

वर्षप्रतिपदेच्या शुभ मुहूर्तावर कार्याचा नारळ फोडण्यांत आला. पत्रक काढण्यांत आलें. वृत्तपत्रांतून जाहीर विनंती आणि वैयक्तिक पत्रव्यवहार प्रारंभ झाला. महाराष्ट्रांतील अनेकानेक अभ्यासी विद्वज्जनांना लेखनसहकार्याची प्रार्थना करण्यांत आली. आज चारशे वर्षांपासून महाराष्ट्राला नाथांच्या नांवाची मोहिनी पडलेली आहे. लेखांची आश्वासनें येऊं लागली. नगरकर बांधवांनीहि लेख संपादनांत खूपच प्रयत्न केले. ज्ञानेश्वरदर्शनाच्या प्रकाशनानंतर त्यांनी श्रीएकनाथदर्शनाच्या प्रकाशनाचाहि संकल्प सोडला होता. श्री. केशवराव टेंभुर्णीकर यांनी याच कार्याच्या निमित्तानें एक पत्रकहि काढलें होतें. श्री. केशव-

राव **टेंभुर्णीकर** यांना अकाली निधनाचा योग न घडतां तर त्यांच्या हातून हे कार्य कदाचित् अधिक योग्य प्रकारे तडीस गेले असतें. त्यांचे चिरंजीव **श्री. रं. के. टेंभुर्णीकर** यानी आपल्या पितृपरिश्रमाचे सर्व बाड आमच्याकडे पाठविले. जरी ते अद्यावत् नसले तरी कार्यदिशा ठरविण्यात त्याचा आम्हाला उपयोग झाला हे आम्ही सादर नमूद करतो.

१९५० ची नाथषष्ठी आली सुविख्यात संतसाहित्यसेवक **श्री. ज. स. उर्फ तात्यासाहेब करंदीकर** याच्या अध्यक्षतेखाली **श्रीनाथवाङ्मयोपासक मंडळाचें** स्नेहसमेलन भरले आणि 'दर्शन' प्रकाशनासबंधी निर्णायक विचार करण्यांत आला. हजार बाराशे पृष्ठाचा मोठा ग्रथराज प्रसिद्ध करण्याऐवजी सामान्य मराठी प्रेमिकाना परवडणारे असे तीनशे पृष्ठाचे खड प्रकाशित करण्यात यावे असे ठरलें. नाथवाङमयाच्या सशोधित आवृत्तीचाहि उपक्रम हाती घ्यावा असा निर्णय घेण्यात आला.

सतत एक वर्ष पत्रव्यवहार आणि आठवणी देऊन कां असेना एकूण ८० लेख जमा झाले सर्वांनाच या पहिल्या खंडात स्थान मिळणे अशक्य होते. पुनरुक्ति, जुनेपणा, तोचतोपणा हा कितीकात तरी जाणवत होता. त्यातून नाथवाङमयाच्या अभ्यासकाला १ ल्या खडात नाथाच्या वाङमयाची रूपरेषा लक्षात यावी ही मुळांत कल्पना असल्याने, नाथाच्या प्रत्येक ग्रथाचें परीक्षण करणारेच लेख प्रस्तुत निवडण्यात आले आहेत. आमच्या उद्देशपूर्तींत एक मोठी उणीव राहिली आहे, ती नाथांच्या भागवतावरील परीक्षणात्मक लेखाची.वास्तविक नाथभागवत हाच नाथाचा खराखुरा ग्रथ ! आणि त्यावरील लेखाचीच येथे उणीव भासते ही जाणीव आम्हाला आहे. परतु प्रयत्न करूनहि नाथभागवताचे विवेचन करणारा असा लेख आमच्याकडे आला नाही. अभ्यासकाना अभ्यासाला सवड नि सशय हवी आहे. आणि त्यातून भागवतावर लेख लिहावयाचा म्हणजे साधेसुधे काम नाही. अभ्यासकाचे अभ्यास चालू आहेत, आणि दुसऱ्या खंडांत ही उणीव आम्ही नि.सशय भरून काढू. नाही तरी नाथाच्या वाङमयमहोदधीचे ध्रुवदर्शन म्हणूनच पहिले दोन खड मडळ प्रकाशित करीत आहे. रसिकानी आणि अभ्यासकानी या पहिल्या खडाला प्रोत्साहनाचा सक्रीय आशीर्वाद दिला तर २ रा खडहि आम्ही लवकरच प्रकाशनास घेऊ.

नगर येथील सदस्याच्या परीक्षणातून सव लेख जाऊन आल्यानतर हृदराबादी, **श्री. प्रा. र. म. भुसारी, श्री. डॉ ना गो. नांदापूरकर, श्री. र. मु. जोशी, श्री मु मा घाणेकर, श्री. प्रा वि पां देऊळगांवकर, श्री. कविवर्य यशवंत कानिटकर.** याना, आलेल्या सर्व लेखातून १ ल्या खडासाठी लेखाची निवड करण्याची विनंती करण्यात आली, वैयक्तिक आणि सामुदायिक

अशा वाचनानंतर अजमासें २० ते २२ लेखाची निवड करण्यात आली. शेवटी महाराष्ट्राचे विख्यात संतवाङमयसंशोधक श्री. गुरुवर्य **प्रा. न. र. फाटक** याना हैदराबादी पाचारण करून हा निर्णय अधिकृत करून घेतला.

प्रस्तुत ग्रंथात नाथाचें हस्ताक्षर देण्यात यावे ही फार इच्छा होती. परंतु नाथगृही ते अप्राप्तच राहिले. काशी क्षेत्री नाथाचें वास्तव्य होते म्हणून तेथे श्री. कविभूषण **प्रा. ब ग. खापर्डे,** श्री. पडितराज **राजेश्वरशास्त्री द्रविड** व **श्री. प्रा. देशपांडे** इत्यादि सज्जनानी प्रत्यक्ष परिचय नसताना कार्याचे महत्व जाणून या संबधी प्रयत्न केले. परतु तेथेहि अभावच जाणवला. कदाचित् नाशिक भागात ते असेल. म्हणून तेथेहि श्री. **बळवंत दाजी आगाशे** याना मुद्दाम पाठविण्यात आले परतु तीच निराशा तेथेहि झाली. अबेजोगाईस नाथानी दासोपतास लिहिलेले एकमेव पत्र होते असे समजल्यावरून तेथेहि शोध घेतला. परतु ते सापडले नाही. शेवटी गुरुवर्य **महामहोपाध्याय दत्तो वामन पोतदार** यानी नाथाच्या नातवाचे अस्सल हस्ताक्षर देऊन ही अपेक्षा काही अशी पूर्ण केली आहे.

मुबई मराठी ग्रंथसंग्रहालयाच्या संशोधन शाखेचे प्रमुख **श्री. अ. का. प्रियोळकर** यानी आपल्या सग्रही कानडी लिपीन नाथभागवत असल्याचें कळविले आणि त्यातील एखाद्या पृष्ठाचे छायाचित्र देण्यास मान्यताहि दिली. तसेच त्यानी पाठविलेल्या कानडी लिपीतील आठव्या अध्यायाचे सपूर्ण वाचन करण्यात श्री. प्रा. देऊळगावकर, श्री. प्रा. हेमत कुळकर्णी, श्री. प्रा. रामचद्र पटवारी या तज्ज्ञानी परिश्रम केले हें नमूद करण्यास आनंद वाटतो

अशा कार्यास प्रारभ करणें सोपे असले तरी तें यशस्वी रीतीने शेवटास जाण्यास आर्थिक साहृच मोठ्या प्रमाणात लागते. श्री. न्या. मू घाटे साहेबानी प्राथमिक खर्चाचा बोजा उचलला होता. परतु पुढील कार्य हे एकट्या दुकट्या व्यक्तीचे नव्हते. म्हणून आर्थिक साह्यासाठी हैदराबाद सरकारकडे विनती करण्यात आली. त्या वेळचे प्रमुख नागरी प्रशासक **श्री. बखले** आणि शिक्षण मत्री श्रीमत **राजा धुंडीराज बहादुर** याच्या गुणग्राहकतेने ५००० रु. चे महादान प्रस्तुत कार्यास मिळाले आणि त्याचेच श्रीफल प्रस्तुतच्या १ ल्या खडाच्या रूपाने आज नाथदरबारात पावते करण्यात येत आहे.

नाथवाङमयाची संशोधित आवृत्ति प्रकाशित करण्याच्या कार्यासाठीं म्हणून हस्तलिखिते गोळा करण्याकरिता मराठवाड्यातील कल्याणी, मुदखेड, कन्नड, इत्यादि ठिकाणी **श्री. घाणेकर** प्रभृती मडळी जाऊन आली. नाथभागवत आणि रुक्मिणीस्वयवर व नाथाची स्फुट प्रकरणें यांची काही हस्तलिखिते उपलब्ध झाली. या कार्यांत **श्री. बालस्वामी महाराज कल्याणीकर** आणि **श्री. पं. विष्णुशास्त्री कन्नडकर** यांनीं सक्रीय साह्य केलें हें आम्ही कृतज्ञतापूर्वक नमूद

करितों. मात्र अशा प्रकारचे अनेक प्रयत्न झाले पाहिजेत. हे येथे लिहिण्याची आवश्यकता आहे मराठवाड्यातील या सांस्कृतिक गुप्तधनाच्या खाणी जितक्या अधिक आणि लवकर उघडल्या जातील तितके ते उपयुक्त ठरणार आहे.

महाराष्ट्रातील अभ्यासकांचे लेखनसहकार्य लाभावे ही इच्छा धरून प्रयत्न करीत असतानाच मराठीच्या ख्यातनाम श्रेष्ठाचेहि प्रोत्साहन लाभावे असा प्रयत्नहि करण्यात आला. केवळ पत्रव्यवहाराने **नामदार ग. वा. उर्फ दादासाहेब मावळणकर, नामदार न. वि. उर्फ काकासाहेब गाडगीळ, नामदार बा गं. उर्फ बाळासाहेब खेर, नामदार मा. श्री. उर्फ लोकनायक अणे, नामदार डॉ. बाबासाहेब आंबेडकर, श्रीमंत बाळासाहेब पंत प्रतिनिधि राजेसाहेब औंध** प्रभृतीना विनती करण्यांत आली. आणि नाथांच्या नांवाचा पुण्यप्रताप ! वरील सर्व श्रेष्ठींनी आपापली भावाजुली या सारस्वत महापूजेसाठी सादर केली. **आचार्य विनोबा भावे** आणि **राष्ट्रपति डॉ. बाबू राजेन्द्रप्रसाद** यानी आपल्या आशीर्वादाने त्यावर कळस चढविला. दर्शन ग्रंथातील विद्वान लेखक आणि उपरोक्त सर्व श्रेष्ठीचे आभार मानण्यास आमच्याजवळ शब्द नाहीत. कृतज्ञता पूर्वक उल्लेख करणें यापेक्षा आम्ही अधिक काय करू शकणार ?

मुद्रणास आरंभ झाला. यावेळी अधिक किचकट काम असते ते मुद्रिते तपासण्याचें. परतु **श्री. त्र्यं. द. टिळक, श्री. डॉ. नांदापूरकर, श्री. प्रा. देऊळगांवकर** यानी कसल्याहि सबबी न सागता ते काम परिश्रमपूर्वक आस्थेवाईकपणे पार पाडले यासाठी आम्ही कृतज्ञ आहो.

याचवेळी आर्थिक साहयाची जाहीर विनतीहि करण्यात आली होती. परिचय नसताना **श्री. डॉ. द. वा चोभे** पेन्शनर पुणे यानी १०१ रु. ची देणगी या कार्यास पाठवून दिली. मराठवाडा आणि महाराष्ट्र यात 'अयाचित दानाचें' हेच एकमेव उदाहरण आम्हास लाभले. सारांश तळमळीने कार्य केल्यास श्रीखंड्याची कावड जीवनाचा पुरवठा करण्यास सदैव पाठीशी असते. हा श्रीनाथ कृपेचा जिवंत सदेश यावरून सिद्ध होतो श्री. चोभे याच्या देणगीबद्दल आम्ही कृतज्ञ आहों. प्रति राखून ठेवण्यासाठी ३. रु. पाठवून नावे नोंदविण्याचीहि विनती करण्यांत आली होती त्याप्रमाणे नावेहि आलेली आहेत.

१९४९ ला हाती घेतलेले हे कार्य १९५२ ला सपत आहे. कालावधि तर आहेच हा. परतु या अवधीत 'दर्शन' ग्रंथातील लेखकापैकी **श्रीमंत पंत प्रतिनिधि भवानराव राजेसाहेब औंध** आणि **श्री. वे. नारायणशास्त्री गर्गे.** या दोघांना कैलासवास घडला हें लिहिण्यास आम्हाला अत्यत दु.ख होत आहे.

प्रस्तुत कार्याविषयी उभयतांची आस्था उल्लेखनीय होती. एकाजनार्दनाच्या मगल स्वरूपांत उभयतांना चिर शांति लाभो!

१९४९ ला ज्या संस्थेने हें कार्य हाती घेतले ती संस्था '**नाथ वाङ्मयोपासक मंडळ**' या नांवाची होती. दोन संमेलनें पैठणला पार पडल्यानतर पुढे या कार्याला अधिक व्यापक आणि चिरस्थायी अशा स्वरूपाचें बनवून नाथवाङमय संशोधनाचेंहि कार्य प्रारंभ करावें म्हणून १९५१ मध्ये वरील संस्था आजच्या '**श्रीएकनाथ संशोधन मंदिर**' या संस्थेन विलीन कण्यांत आली. नामांतर झाले तरी कार्य करणाऱ्या व्यक्ति त्याच असतात आजहि संशोधनमंदिराची धुरा तेच **श्री. घाटेसाहेब** उचलून आहेत. अर्थात प्रस्तुतचें आणि या पुढीलहि प्रकाशनें 'श्रीएकनाथ संशोधन मदिर' या सस्थेकडूनच प्रकाशित करण्यात येतील.

महाराष्ट्रांतील विख्यात संतवाङमयसेवक श्री. **डॉ. रा. द. रानडे** यांना लेखाची विनंती करण्यात आली होती. परतु प्रत्यक्ष लेख नसला तरी त्याचा आशीर्वाद दर्शन ग्रथास लाभला याचे श्रेय आमचे मित्र श्री. **डॉ. शं. गो तुळपुळे** यांना आहे हें आम्ही साभार नमूद करतों.

जुबाखाली मान देताना कामातील अडचणींची कल्पना आली नव्हती. जसजसे लेख येऊ लागले तसतशी जबाबदारी वाढू लागली. परंतु अर्ध्या तपासून ज्याच्या प्रोत्साहनाने अशा कामाचा हव्यास वाढीस लाविला त्या गुरुवर्य **श्री. प्रा. न. र. फाटक** याच्या मार्गदर्शनानेच आम्ही हे कार्य तडीस नेऊ शकलो. जेव्हा जेव्हा एखादी अडचण वाटे, तेव्हा तेव्हां अगदी हक्काने आम्ही गुरुवर्यांना तसदी द्यावी आणि त्यानीहि ती प्रेमळपणाने दूर करावी असे कितीदां तरी घडले आहे. प्रस्तुत खडाचे सर्व श्रेय त्याना आहे. औपचारिक आभारानें त्यांच्या मार्गदर्शनाचें मोल करणे वेडेपणाचे ठरणार आहे. मात्र एकच उल्लेख करावयाचा आहे. नाथाच्या वाङमयमूर्तीचा हा सकल्प सपूर्ण सिद्ध होण्यास आता कुठे प्रारंभ झाला आहे. गुरुवर्य फाटकाची मराठवाड्याविषयी आस्था आणि आमच्याविषयीचा स्नेहभाव यांचा विचार करतां आम्हाला अशी खात्री वाटते की सकल्प सोडल्याप्रमाणे श्रीनाथवाङमयाची सेवा अशा यशस्वी मार्गदर्शनानें आम्ही पूर्ण करूं शकूं! गुरुवर्य फाटकांच्या संबधी 'शिष्य स्तेऽहं' या शब्दावांचून आणखी आम्हांस काय लिहितां येणार आहे

हैदराबादच्या '**मराठी मंडळ**' या संस्थेतील विद्यार्थी आणि अध्यापक बधुभगिनीनी प्रस्तुत कार्याचें सास्कृतिक आणि साहित्यिक महत्व लक्षांत घेऊन आरंभापासून अखेरपर्यंत सर्व प्रकारे साहृय केलें हे विशेष रीतीनें नमूद करणें अवश्य आहे. आपल्या स्वनांच्याच जबाबदारीचा हा एक भाग आहे इतक्या

निष्ठेने या कामी '**मंडळाचें**' सहकार्य लाभले यासाठी आम्ही **मराठी मंडळां-तील** सर्व कार्यकर्त्या साहचकाचे अत:करणपूर्वक ऋणी आहो.

तसेच नगर येथील ज्ञानेश्वर मडळाच्या सदस्यानी विशेषत: श्री. दादा-साहेब धनेश्वर, श्री. अ. बा. रसाळ यानी प्रारभी लेख जमविणे, प्रचार करणे यासर्व दृष्टींनीं प्रस्तुत ग्रथ निर्मितीत सहकार दिला याबद्दल आम्ही कृतज्ञ आहों.

अडीच वर्षांच्या या अवधीत अनेकाचे अनेक परिश्रम आम्हाला लाभले. आलेल्या लेखाच्या मुद्रणप्रति करणे, मुद्रणालयाची अतिम मुद्रिते तपासणे या सर्व कामासाठीं आमचे कितीतरी तरुण बधु आणि भगिनी खपल्या आहेत. सर्वांचे नावनिशीवार आभार मानण्यास जागेचे बधन तर आड येतेच, परतु त्याच्या निरपेक्ष सेवेचें मोलहि केल्याप्रमाणे होते यासाठी ज्यानी ज्यांनी आपल्या परि-श्रमानी प्रस्तुत कार्यांत सहकार्य दिले आहे, त्यात्या सर्वांचे आम्ही अत:करणपूर्वक आभारी आहो.

मराठवाड्यात आजवर प्रकाशने अनेक झाली.परतु भारदस्त असे हे पहिलेच प्रकाशन होते. याचे मुद्रणकार्य मराठवाड्यातच व्हावे अशी इच्छा होती. त्या-प्रमाणे येथील '**जयहिन्द**' मुद्रणालयाच्या चालकांनी ही जबाबदारी स्वीकारली आणि चिकाटीने पूर्ण केली. कागदाची महागाईच नव्हे तर दुर्मिळता, यांत्रिक अडचणी, कामगाराची टचाई अशा स्थितींतहि प्रस्तुतचें कार्य श्रीनाथसेवा अशा भावनेनेच त्यानी पूर्ण केल्याबद्दल जयहिन्द मुद्रणालयाचे चालक आणि त्यांचे सहकारी धन्यवदास पात्र आहेत.

सहकाऱ्याचे आभार मानूं नयेत कारण त्यातील एकात्मता बाधित होते असा सकेत आहे, परतु हे लक्षात घेऊनहि श्री **न्या. मू. घाटे** सेशन जज्ज औरगाबाद आणि श्री **सेतुमाधवराव पगडी कलेक्टर** औरंगाबाद याचा उल्लेख अपरि-हार्यतेने करावासा वाटत आहे. घाटेसाहेब तर पहिल्या विनंतीपत्रकापासून या कार्याचे प्रमुख सहकारी आहेतच परतु श्री. सेतुमाधवरावाचे आस्थापूर्ण सहकार्य आणि विद्वत्तापूर्ण मार्गदर्शन नि.संशय अभिनदनीय आहे हे येथे नमूद करणें आव-श्यक आहें.

कार्यभार उचलल्यानतर अनेकाशी सबध येतात व्याप असतो. गर्दी, घाई जाणवते. दोन अडीच वर्षाच्या या जबाबदारीतून आज मोकळे होताना मनावरचा भार हलका होतोच परंतु नाथाच्या सहवासाचा जो मानसिक आनद लाभत होता तो थोडा कमी होणार, याची तळमळहि वाटल्यावांचून रहात नाही सर्वांच्याच अपेक्षा प्रस्तुत प्रकाशन पूर्ण करील असे नाही काहीना त्यात गुण तर काहीं ना दोष हे सापडतीलच. आमच्याकडे यातील कशाचाच वाटा नाही. '**फोडील भांडार धन्याचा हा माल । मी तो हमाल भार वाही ॥**' इतकीच आमची भूमिका आहे.

सहा

रसिकांच्या पुढे नाथसाहित्याचे हें भाणें ओगरिले आहे. त्यात अनेक पक्वान्ने आहेत. प्रत्येकाची रुचि वेगवेगळी आहे. आपापल्या आवडीप्रमाणे साहित्यसेवकानी आणि नाथभक्तानी त्याचा स्वाद घ्यावा. मोठ्या स्वयपाकात एखाद्या वेळी चुकून तिखटमीठ जास्त पडले तरी ही सताघरची समाराधना आहे. नाथाघरच्या या संतपगतीत **'तळल्यावरल्या एकपक्वान्नें'** वाढली जातात म्हणून शेवटी नाथाच्याच शब्दात.

**'याग्रंथा जे आदर करिती । अथवा जे कां उपेक्षिती ।**
**केवळ जे कोणी निंदिती । तेहि आम्हा ब्रह्ममूर्ती सद्गुरुरूपें ॥'**

असे लिहून रसिकाना 'नाथदर्शना'साठी महाद्वार खुले करितो.

**१२८ मराठवाडी**
मूलतान बाजार
**हैदराबाद. द.**

**न. शे पोहनेरकर**
चिटणीस
**श्रीएकनाथ संशोधन मंदिर**

---

# प्रस्तावना

श्रीएकनाथ महाराजांचें चरित्र आणि वाङ्मय याविषयीं अभ्यासी विद्वानांचे लेख मिळवून त्यांचा संग्रह ' श्रीएकनाथ-दर्शन ' या नांवानें प्रसिद्ध करण्याची कल्पना वीस वर्षांइतकी जुनी आहे. वीस वर्षांमागें नेवासे येथें ' श्रीज्ञानेश्वर-दर्शन ' नामक ज्ञानेश्वरविषयक लेख संग्रहाचे दोन खंड प्रसिद्ध झाले. तेव्हांच एकनाथ-दर्शनाच्या संकल्पाची वाच्यता झालेली होती. मध्यंतरीं कांहीं वर्षें हें काम स्थगित होऊन पुन्हां त्याची चारपांच वर्षांमागे जोराची उठावणी झाली व तिचें फळ आज या ग्रंथरूपानें जनतेसमोर आलेलें आहे.

श्रीनाथ-दर्शन प्रसिद्ध करण्याचे ठरल्यावर त्याच्या प्रवर्तकांनीं महाराष्ट्रांतील विद्वानांकडे आपापल्या अभ्यासानुसार लेख पाठविण्याविषयीं विनंतीपत्रें पाठविलीं व हळूहळू बरेच लेख जमा झाले. लेख जमविण्याचें काम दोन ठिकाणीं चाललें होतें. मूळ संकल्पाचा उच्चार ' ज्ञानेश्वर दर्शन ' च्या प्रसंगीं अहमदनगर येथें करण्यांत आला असल्यामुळें त्या शहरांतील संतवाङ्मयाचे अभ्यासी व प्रेमी श्री. दादासाहेब धनेश्वर व श्री. रसाळ प्रभृती मंडळींनीं कांहीं लेख मिळविले आणि हैदराबादचे श्री. न. शे. पोहनेरकर यांनीं पुढाकार घेऊन कांहीं लेख जमा केले. श्रीएकनाथांचें आयुष्य प्रामुख्यानें ज्या शहरात गेलें, त्यांचे कर्तृत्व जेथून लोकांच्या अनुभवास आलें तें पैठण शहर व क्षेत्र हैदराबादच्या निजामशाहींत असल्यामुळें हैदराबादच्या मंडळीला श्रीएकनाथ-दर्शनाचें कार्य आपल्या हातून पार पडण्यांत विशेष औचित्य आहे असें वाटणें कांहींसें स्वाभाविक म्हणावें लागतें. त्यांचा उत्साह पाहून अहमदनगरच्या मंडळींनीं आपल्या जवळचा लेख संग्रह हैदराबादेस उदारपणे पाठवून दिला व तेथें हें काम सुरू झालें. परंतु लेखांच्या बाबतींत कांहीं अडचण वाटूं लागल्यामुळें प्रस्तुत प्रस्तावनालेखकाला हैदराबादच्या मंडळीनें बोलावलें, जे लेख

जमा झाले त्यांतून कोणते लेख निवडायचे हा प्रश्न हैदराबादच्या मंडळींना अडचणीचा वाटत होता. पुष्कळसे लेख आपल्या विनंतीवरून निजामशाही बाहेरच्या नामवंत महाराष्ट्रियांनीं पाठविले असले तरी त्यातील तथ्यातथ्य पाहूं जातां ते छापण्याला अवश्य असणाऱ्या गुणांचे नाहींत व न छापले तर त्या त्या लेखकाची अप्रसन्नता होऊन पुढें त्यांच्या सहकार्याला आंचवण्याची पाळी यावयाची, असा पेंच हैदराबादेच्या मंडळींना पडला व त्याचा निकाल लावण्याची कामगिरी हैदराबादकरांनीं दाखविलेल्या विश्वासाच्या बळावर प्रस्तुत प्रस्तावना लेखकानें यथामति बजाविली आहे. अभ्यासकांना श्रीएकनाथासंबंधीं योग्य ज्ञान मिळेल असे जेवढे लेख आलेल्या लेखांच्या बाडांत आढळतील, तेवढे प्रसिद्ध करावयाचे अशा धोरणानें लेखांची निवड केली. कांहीं लेख त्या त्या लेखकांच्या लौकिक योग्यतेकडे पाहून स्वीकारण्यांत आल्याचें वाचकांच्या ध्यानांत येईल. श्रीएकनाथ–दर्शनाचें साहित्य शक्यतोंवर निजामशाहींतील विद्वानांच्या हातून निर्माण व्हावें ही आकांक्षा या संग्रहाच्या निमित्तानें सफळ न होण्याचा योग असला तरी यापुढें तेथील अभ्यासी व्यक्ति अधिक आत्मविश्वासानें या संबंधांतील कार्यक्षमता निदर्शनास आणतील असा भरवंसा आहे.

हैदराबादच्या होतकरू विद्वानांविषयीं जो भरवंसा मागें व्यक्त केला तो अनाठायी नसल्याचें डॉ. नांदापूरकर व श्री. कानोले या दोघांच्या लेखांचें परिशीलन केल्यास कळून येण्याला हरकत नाहीं. एकनाथांचें ‘ भारूड ’ हा विषय बराचसा क्लिष्ट असतांनाहि डॉ. नांदापूरकर यांनीं त्याचा विस्तीर्ण परामर्श घेऊन त्याचें रहस्य जिज्ञासूंकरितां शक्य तेवढें स्पष्ट केलें आहे. हा लेख विषय विवरणाचा आहे तर श्री. कानोले यांचा लेख संशोधनाचा आहे. एकनाथांनीं भावार्थरामायण सहा कांडें लिहून पूर्णतेस नेलें असा एक पक्ष आहे. पण त्यांच्या युद्धकांडांत एका आख्यानाच्या निमित्तानें हस्तक्षेप करणारा ‘ जयरामसुत ’ किंवा ‘ जयरामात्मज ’ म्हणतो कीं, एकनाथाचें रामायण सात कांडांचें होतें. आज भावार्थरामायणाच्या मुद्रित प्रतीतून सांपडणाऱ्या सातव्या म्हणजे उत्तरकांडाची भाषा

पूर्वीच्या कांडांतील भाषापद्धतीशीं जमत नाहीं. यामुळें तें एकनाथांचें नसावें असा ग्रह करून घेण्याला अवकाश फावतो. एकनाथांनीं युद्धकांडाचे ४४ अध्याय लिहिले व नंतर त्यांची अवतारसमाप्ति झाल्यामुळें त्यांच्या कृपाप्रसादानें अवशिष्ट भाग गावबा नामक शिष्याच्या हातून पूर्ण झाला अशी एक दृढमूल आख्यायिका आहे. श्री. कानोले यांना मिळालेल्या व आजवर अज्ञात असलेल्या उत्तरकांडामुळें एकनाथीरामायणाचें अधिक संशोधन करण्याची आज आवश्यकता उत्पन्न झाली आहे. वऱ्हाड व मराठवाडा या नांवानें ओळखला जाणारा निजामशाहींतील प्रदेश हाच शिवपूर्वकालीन इतिहासांतील महाराष्ट्र असून तो प्रदेश मराठी भाषेतील जुन्या संपत्तीच्या खाणीसारखा आहे. तेथें व्हावें तेवढें संशोधन होऊं लागल्यास आणखी अनेक बहुमोल वाङ्मयरत्नें उजेडांत येऊन मराठी भाषेच्या इतिहासाची संपन्नता निदर्शनास येईल हें श्री. कानोले यांच्या लेखानें ध्यानांत आल्याशिवाय रहात नाहीं. महामहोपाध्याय श्री. दत्तो वामन पोतदार यांना नाथांच्या नातवानें लिहिलेल्या एका पोथीचें पान सांपडलें. तें त्यांनीं अनेक वर्षें आपल्या संग्रहांत जतन करून ठेविलें होतें. त्याचें छायाचित्र या संग्रहांत दाखल केलेलें आहे. नाथांचें चित्र, हस्ताक्षर यापैकीं कोणतीच खूण आज उपलब्ध नाहीं परंतु बापाकडून मुलाला, मुलाकडून नातवाला हस्ताक्षराचें वळण लाभावें असा पूर्वीचा प्रघात असल्यामुळें नातवाच्या हस्ताक्षरावरून आजोबाच्या हस्ताक्षराचें वळण दाखवावें असा म. म. श्री. पोतदारांचा उद्देश असून त्यांच्या लेखांतील इतर पुष्कळसे विचार आजच्या स्थितींत ग्राह्य ठरणारे आहेत. 'अगोदर नाथसंशोधन मागून नाथदर्शन' या म. म. श्री. पोतदारांच्या सिद्धांताला एक प्रकारें श्री. कानोले यांच्या लेखानें पुष्टी मिळालेली आहे. मानवाच्या लेखनकालावरून म. म. श्री. पोतदारांनीं कल्पिलेला नाथांच्या आयुर्मानाचा आराखडासुद्धां विचारप्रवर्तक आहे. या लेखसंग्रहांत नाथाविषयीं चरित्रपर लेख नाहीं. तथापि श्री. कोटनीस यांनी एकदम ध्यानांत न येणाऱ्या श्रीकृष्णदासजगदानंदनंदनाच्या नाथचरित्राची माहिती आपल्या लहानशा लेखांत दिल्यामुळें त्याला श्री. पोतदार, कानोले यांच्या

मालिकेंत बसविणें अवश्य आहे. नाथांच्या मुख्य मुख्य ग्रंथांचें विवेचन निरनिराळ्या लेखांतून केलेलें अभ्यासकांना दिसेल. श्री. गर्गे यांनीं एकनाथांचा पहिला ग्रंथ 'चतुःश्लोकी भागवत' विचारांत घेतला असून नाथांच्या 'रुक्मिणीस्वयंवरांतील' गुणांची चर्चा प्रा. आगाशे यांनीं सविस्तर केली आहे. भावार्थरामायणाचा परिचय श्री. ज. स. करंदीकर यांनीं करून दिला आहे. भारुडाचें विवेचन डॉ. नांदापूरकर यांच्या हातून उतरल्याचें पूर्वीं सांगितलेंच आहे. परंतु भारुडांतील 'जोहार' हा विषय निवडून त्याचें स्पष्टीकरण श्री. अ. बा. रसाळ यानीं लिहिलेल्या लेखांत वाचकांना पहावयाला सांपडेल. 'लोक साहित्यकार नाथ' हा डॉ. तुळपुळे यांचा लेखहि याच विषयावर आहे. नाथांच्या स्फुट काव्याचें दर्शन श्री. ब. ग. खापर्डे यांच्या तद्विषयक सुदीर्घ लेखांत सांठविलेलें आहे. नाथांच्या योगज्ञानाची माहिती त्यांच्या ग्रंथांच्या आधारें श्री. चैतन्यानंद यतींनीं दिलेली आहे. नाथांचा महत्त्वाचा ग्रंथ भागवतएकादशस्कंधावरील टीका हा असून त्यावर एकहि लेख नसावा हें एक प्रस्तुत दर्शनांतील वैगुण्य सहज डोळ्यांत भरण्याजोगें आहे. परंतु त्याचा दोष लेख-संग्राहकांना लावतां येणार नाहीं. नाथांच्या निरनिराळ्या ग्रंथाबद्दल लिहिणाऱ्या लेखकांनीं नाथांच्या भाषाशैलीकडेहि लक्ष दिलें आहे. परंतु नाथांच्या भाषाशैलीचा सांगोपांग विचार प्रा. लागू यांच्या लेखांत असल्यामुळें त्याचा वेगळा उल्लेख करणें उचित व अवश्य आहे. प्रा. लागू हे मराठीमध्यें फारसें लिहीत नाहींत, असा समज आढळतो. तो समज सर्वथैव चुकीचा नाहीं. जें लिहावयाचें तें पूर्ण विचारानें, जबाबदारीच्या जाणिवेनें आणि विषयाच्या प्रभुत्वानें लिहावयाचें असा त्यांचा स्वभाव असल्यामुळें त्यांनीं मराठींत फार थोडें लिहिलें आहे; पण जें लिहिलें आहे तें जिज्ञासूंना मार्गदर्शक व जाणत्यांना मान्य व्हावें असेंच लिहिलें आहे. या नाथदर्शन-संग्रहांतहि त्यांचा 'एकनाथांची भाषाशैली' हा लेख त्यांच्या लेखन-पद्धतीला शोभणारा आहे. प्रा. लागूंनीं नाथांचा एखादा ग्रंथ घेऊन त्यांच्या भाषाशैलीच्या भिन्नभिन्न चित्तवेधक छटा दाखवून त्यांनीं आपला लेख सिद्ध केला आहे व एखाद्या ग्रंथकाराच्या भाषाशैलीचा अभ्यास म्हणजे

काय व तो कसा करावा लागतो याची नीट कल्पना आणून देणारा हा प्रा. लागूंचा लेख आहे. 'नाथांच्या काव्याची बैठक आणि त्याचा उठाव' हा डॉ. वाटवे यांचाहि एक लेख यांत आहे. नाथ होऊन गेल्याला साडे-तीनशेहून जास्त वर्षे उलटलीं असताहि महाराष्ट्रांत त्यांच्या पुण्यस्मरणाचा प्रसंग आल्यास ज्याला शक्य असेल तो प्रत्येक महाराष्ट्रीय मग तो एखादा अगदी सामान्य संशोधक असो, महाविद्यालयांतील प्राध्यापक असो, जुन्या पद्धतीनें संस्कृत शास्त्रांचा अभ्यास केलेला गाढ पंडित असो, गृहस्थाश्रमी असो, संन्यासी असो वा राज्यकर्तृत्वाच्या एखाद्या उच्चासनावर विराजमान असो—कसा अहमहमिकेनें आपली आदरांजली अर्पण करण्याला सरसावतो याची साक्ष पटविणारे सारेच लेख आहेत. ही आदरांजली ज्याच्या त्याच्या श्रद्धेप्रमाणेंच नाथांच्या असामान्य चिरस्थायी थोरवीची दर्शक आहे.

ज्यांनीं लेखांच्या द्वारे श्रीएकनाथदर्शनाच्या उभारणीला हातभार लावला त्याचे आभार मानणें अवश्य आहे परंतु त्यांच्याबरोबर पण थोड्याशा जास्त अगत्यानें श्री. न. शे. पोहनेरकर यांचे आभार मानले पाहिजेत. श्री. पोहनेरकर यांच्या दुर्दम्य चिकाटीच्या उत्साहामुळें हें कार्य शेवटास गेलें असें म्हटल्यास अतिशयोक्ति होण्याचें भय नाहीं. हैदराबादकरांनी श्रीएकनाथदर्शनाच्या रूपानें केलेला उपक्रम अभिनंदनीय आहे. या उपक्रमाच्या यशानें ते याहून अधिक भरीव स्वरूपाचें कार्य करतील अशी उमेद बाळगायला आणि व्यक्त करायला हरकत नाहीं.

मुंबई
दिनांक १८-४-५२

न. र. फाटक

---

राष्ट्रपतींचा पुरस्कार.

यह जानकर बड़ी प्रसन्नता हुई कि एकनाथ संशोधन संस्था की स्थापना औरंगाबाद में की गयी है। श्री एकनाथ महाराज महाराष्ट्र के उन संतों में हैं जिनके जीवन और वाङ्मय का महाराष्ट्र के जीवन पर बहुत बड़ा असर है और आज भी मौजूद है। उनके ग्रन्थों का संशोधन करके प्रकाशित करने का काम बहुत महत्व रखता है और मैं आशा करता हूँ कि संस्था अपने इस सुन्दर प्रयत्न में सफलता पावेगी और उसे सब प्रकार की सहायता लोगों से मिलेगी। यह भी प्रसन्नता का विषय है कि संस्था संतों की वाणी की रक्षा में भी उत्सुक है और प्रकाशित करने का विचार रखती है।

राजेन्द्र प्रसाद

२-६-५४

# डॉ. आंबेडकरांचा संदेश.

*I am happy to know that there has come into existence the* **Eknath Research-Society** *in Aurangabad. In my young days I was very fond of the literary works of the Maharashtra Saints and I can say how great a contribution the reading of this literature can make to the moral rearmament of man I wish the Society every success and can promise all help from the Peoples, Education Society*

*Aurangabad,*
*2-9-1951,*

*B. R AMBEDKAR.*

---

# पुरस्कार : : : :

दक्षिण हैद्राबाद येथील श्रीएकनाथसंशोधन मंडळ या संस्थेच्या मार्फत प्रकाशित होणाऱ्या 'श्रीएकनाथ–दर्शन' या ग्रंथास पुरस्कारादाखल म्हणून चार ओळी लिहिण्यास मला सांगण्यांत आलें त्याबद्दल मी फार उपकृत आहे. या पुस्तकांत श्रीएकनाथमहाराजांचे चरणीं ज्यानीं आपली कुसुमाञ्जलि वाहिली आहे त्या लोकांचीं नांवें पाहिलीं असतां 'मज पामरासी हें थोरपण' कां देण्यांत आलें हेंच मला समजत नाहीं. तथापि या रीतीनें तरी श्रीएकनाथमहाराजाची अल्प सेवा मजकडून होत आहे ही श्रीएकनाथमहाराजाचीच कृपा आहे असें मी समजतो.

सुमारें अठरा वर्षापूर्वीं अहमदनगर येथील वाङ्मयोपासक मंडळानें 'श्रीज्ञानेश्वर–दर्शन' हा ग्रंथ दोन खंडांत प्रसिद्ध केला व आज साधारणपणें त्याच धर्तीवर रचलेला श्रीएकनाथविषयक निबंधांचा संग्रह प्रसिद्ध होत आहे. महाराष्ट्रातील विद्वानांचें लक्ष्य तेथील सत्पुरुषाच्या काव्याकडे अधिकाधिक लागत असून या वाङ्मयाचा अभ्यास आस्थापूर्वक होत आहे ही फारच आनंदाची गोष्ट आहे.

परमार्थाविषयींच्या निरनिराळ्या भ्रामक कल्पनाचे निरसन करून शुद्ध परमार्थाचे स्वरूप समजावून देणे हें महाराष्ट्रातील संतवाङ्मयाचे पवित्र कर्तव्य असून या दृष्टीने पाहता श्रीएकनाथांची कामगिरी विशेष डोळ्यांत भरण्यासारखी आहे. "ज्ञानेश्वराप्रमाणे बुद्धीस थरारून सोडणारी ग्रंथरचना जरी एकनाथानीं केली नाहीं; तुकारामासारखे अत्यंत हृदयस्पर्शी असे अभंग जरी त्यांनीं लिहिलें नाहींत; रामदासाप्रमाणें कर्मयोगित्वाचा बाणाहि जरी त्यानीं पत्करला नाहीं; तथापि प्रपंच व परमार्थ याची विलक्षण सांगड घालून संसारामध्यें असतांच परमार्थ कसा करावा हे एकनाथानें जसें आपल्या उदाहरणानें सर्व लोकांस शिकविलें त्याप्रमाणें दुसऱ्या कोणाहि संतानें शिकविले नाहीं असें म्हटलें असता अतिशयोक्ति होईल

असें वाटत नाहीं." ज्ञानेश्वर व रामदास यांना स्वतःचा असा प्रपंचच नव्हता, व त्यामुळें त्यांनीं प्रपंचपरमार्थाचा समन्वय केला असें आपणास म्हणतां येत नाहीं; नामदेव व तुकाराम हे प्रपंची होते खरें; तथापि हे दोघे परमार्थांत इतके गढून व रंगून गेले होते कीं एका परमेश्वरावांचून दुसरा विषयच त्यांना ठाऊक नव्हता. श्रीएकनाथांची गोष्ट निराळी आहे. प्रपंच व परमार्थ या दोन्हींची विलक्षण सांगड घालण्याचें त्यांचे धोरण त्यांच्या प्रत्येक कृतींत दिसून येतें; व रामदासांनीं म्हटल्याप्रमाणें विवेकयुक्तवैराग्य हे त्याच्या आध्यात्मिक जीवनाचें सार ठरतें. श्रीएकनाथांचे दुसरे वैशिष्ट्य हें की त्यानीं वेदातासारखा अत्यंत कठीण असा विषय समाजाच्या अगदीं खालच्या थरापर्यंत नेऊन पोचविला व या विषयास लोकप्रियता मिळवून दिली. ज्ञानेश्वराची शिकवण काहींशी गूढ व तात्त्विक असल्यामुळें तिचा उपयोग सर्वसामान्य लोकासाठीं होणें कठीण होते. तसेंच त्याची भाषाहि किंचित् अवघड असून अशिक्षिताना तिचा विशेष परिचय नव्हता. म्हणून एकनाथांनीं सर्व समाजास कळेल व पटेल अशा रीतीनें साधी व सोपी मराठी भाषा लिहून भागवतधर्माचे रहस्य उघडें करून दाखविलें. प्रतिभेच्या आकाशांत स्वैरपणें विहार करणारें ज्ञानेश्वराचें तत्त्वज्ञान प्रथम एकनाथानीं सर्वसाधारण जनतेच्या आटोक्यांत आणून दिलें. भक्तीचा संदेश समाजांतील सर्व थरापर्यंत पोचावा या हेतूनें त्यानीं ग्रंथरचनेबरोबर कीर्तनावरहि विशेष भर दिला व अशा रीतीनें आपली वाणी आणि लेखणी या दोन साधनामीं त्यानीं जगदुद्धार करण्याचे व्रत आमरण चालविलें.

एकनाथाच्या चरित्राची व वाङ्मयाची वर दिलेलीं वैशिष्ट्ये प्रस्तुत लेखसंग्रहांतील निरनिराळ्या निबंधातून व्यक्त होताना दिसतील. नामदार श्री. दादासाहेब मावळंकर, नामदार श्री. काकासाहेब गाडगीळ, लोकनायक श्री. बापूजी अणे, मुबईचे पंतप्रधान श्री. बाळासाहेब खेर व आचार्य विनोबाजी भावे याच्यासारख्या कार्यमग्न थोर मंडळींनीं एकनाथाचा आस्थापूर्वक गौरव केला आहे हें पाहून मला विशेष आनंद वाटतो. स्वार्थत्यागपूर्वक समाजकार्य करणाऱ्या वरील विद्वान् मंडळीस एकनाथासारखा पारमार्थिक कर्मयोगी विशेष आदरणीय वाटावा हे साहजिकच

आहे. एकनाथांच्या वाङ्मयाचा परिचय प्रस्तुत 'दर्शना'त बनारस विद्यापीठांतील प्रा. ब. ग. खापर्डे, केसरीकार श्री. ज. स. करंदीकर, उस्मानिया विद्यापीठांतील डॉ. नारायणराव नांदापूरकर व पुणें विद्यापीठांतील डॉ. शं. गो. तुळपुळे वगैरे विद्वानांनीं करून दिलेला असून तो वाचकांस एकनाथांचे मूळ ग्रंथ वाचण्यास प्रवृत्त करील अशी मला आशा आहे. सुप्रसिद्ध अध्यात्मप्रेमी श्री. रघुनाथ हणमंत कोटनीस यांनीं लिहिलेला 'नाथांचें चरित्र' हा लेखहि अभ्यासपूर्ण आहे. सुप्रसिद्ध इतिहाससंशोधक म. म. दत्तो वामन पोतदार यानीं केलेलें एकनाथांच्या हस्ताक्षराविषयींचें अनुमान कुतूहल उत्पन्न करणारे असून लवकरच महामहोपाध्याय नाथभक्तास नाथाच्या हस्ताक्षराचें दर्शन घडवून देतील अशी आम्हांस आशा आहे. सारांश एकनाथाच्या अंतरंगाचे विविध दर्शन घडविणारा हा ग्रंथ स्वागतार्ह असून तो प्रसिद्ध करून एकनाथ संशोधन मंडळाचे चिटणीस श्री. पोहनेरकर यांनीं संतकाव्याच्या अभ्यासकावर मोठाच उपकार केला आहे. या कार्याची प्रेरणा श्री. पोहनेरकर यास मराठवाड्यातील प्रसिद्ध नाथभक्त व न्यायाधीश श्री. बळवंतराव घाटे यांजकडून मिळाली असल्याने ते दोघेहि अभिनंदनास पात्र आहेत. या पुस्तकांतील सर्व लोकाची भक्तिपूर्ण ही सेवा श्रीनाथाच्या चरणीं रुजूं होईल असा मला भरंवसा वाटतो.

मु. नवी दिल्ली,<br>ता. ६-३-५२.

प्रोफेसर **रा. द. रानडे.**<br>एम्. ए. डी. लिट्.

——

# अनुक्रमणिका.







## श्रीनाथदर्शन • • •

आचार्य विनोबा भावे

हें मंडळ नाथांच्या वाङ्मयाची उपासना करणारें आहे. ज्याला वाङ्मयाचा उपासक म्हणतात त्यांत माझी गणना कदाचित् होणार नाहीं. तसें मी कांहीं लिहिलें आहे. परतु नाथांच्या उपासक मंडळीमध्यें माझी गणना लोकांनीं केली, मला बरें वाटलें. नाथांचे ग्रंथ मी थोडे फार पाहिले आहेत. समाजसेवा हीच परमेश्वराची सेवा असें समजून वागणारा मी नम्र भक्त आहे जनताजनार्दनाचा! मला ज्या थोर पुरुषांकडून मार्ग-दर्शन मिळाले किंवा मिळत आहे त्यांपैकी नाथ हे एक आहेत.

ज्ञानेश्वराचे कार्य एकनाथांनीं पार पाडले तसें माझ्या हातून नाथांचें कार्य पार पडो असें सुरवातीला सांगण्यात आले. पण नाथदर्शन, नाथांचें कार्य म्हणजे साहित्यसंशोधन वा प्रकाशन हे असेल तर ते माझे काम नव्हे. तसें मी नाथांच्या चार हजार अभंगांतून तीनशे अभंग निवडून त्यांचें सार '**एकनाथाचीं भजनें**' या पुस्तकात काढलें आहे. या अभंगात नाथांच्या उपदेशाचें स्वरूप उत्तम प्रकारे मांडले गेले आहे अशी माझी समजूत आहे. परंतु नाथांच्या साहित्यसमुद्राचे अवगाहन करून संशोधन प्रकाशन मला करतां येणार नाहीं. तसें करण्याची मला शक्ति नाहीं. परंतु जीवनाचा जो भाग ईश्वराने माझ्याकरतां ठेवला आहे, त्यांत ते बसत नाहीं. कारण साहित्यसेवेपेक्षा जनसेवाच मी पसंत करतो. नाथांची भूमिका तशीच आहे.

**अनासक्ति हा परमार्थ, सत्य हेंच साहित्य.**

नाथांचा एक अभंग आहे :—

> **कनककांता न ये चित्ता। तो परमार्थी पुरता ॥**
> **वाचा सत्यत्वें सोवळी ॥ येर कविता ओवळी ॥**
> **जन तेची जनार्दन। एकाजनार्दनी भजन ॥**

मला हा अभंग लाख मोलाचा वाटतो. परमार्थ, साहित्य, भजन यांविषयीं ज्या रूढ कल्पना होत्या त्या या अभंगांत नाथांनीं सुधारल्या आहेत.

परमार्थ म्हणजे शास्त्रग्रंथाभ्यास, ब्रह्मविचार असें लोक समजतात. परंतु विषयासक्ति आणि अर्थलोभ ज्यानें जिंकला तो परमार्थी! परमार्थांत बुध्दीपेक्षां हृदयाला, जीवनाला स्थान आहे. तीच गोष्ट साहित्याची! ज्यांत कांहीं चमत्कृति आहे, रसांचा विलास आहे, भाषाशैली आहे, तें साहित्य; अशा साहित्याच्या रूढ कल्पना आहेत. परंतु सत्य जेथें प्रगट होते तें साहित्य असें नाथांनीं सांगितलें. सत्यविरोधी साहित्य हें साहित्य नव्हे. युक्लिडच्या भूमितींत प्रास नाहींत, रस नाहीं, सरळ सत्य आहे तें साहित्य आहे. सत्य यथार्थ प्रगट करणें हें साहित्याचें लक्षण आहे. त्याला दुसऱ्या गोडीची जरूर नाहीं. सत्याला स्वतःची अशी गोडी असतेच. नाथांना शीलाची चिंता होती, शैलीची नव्हती; त्यांना भक्ति प्रकट करावयाची होती, शक्ति दाखवावयाची नव्हती; सत्य सांगावयाचे होते, साहित्य लिहावयाचें नव्हतें.

## भक्ति म्हणजेच जनसेवा

भक्तीची गोष्ट तशीच आहे. भजन म्हणजे गायन, वादन, नर्तन नामस्मरण अशी समजूत आहे. अर्थात या गोष्टी वावग्या नाहींत. यांचाहि ठसा चित्तावर उमटतो. तुकारामाची ब्रह्मानंदीं टाळी लागल्यावर तो गात असेल, हांसत असेल, नाचत असेल; पण म्हणून हंसणें, रडणें, नाचणे हाच भक्तीचा प्रकार आहे असें कोणी समजूं लागलें तर त्याला नाटकाचें स्वरूप येईल. तो देखावा होईल, भक्ति होणार नाहीं. भक्ताचें बाह्य वर्णन करतांना चित्रकार जसें चित्र काढतो त्याप्रमाणें कौतुकानें त्याच्या हाव-भावाचें वर्णन केलें जातें, पण त्यामुळें गैरसमज होतो. म्हणूनच गीतेच्या बाराव्या अध्यायांत भक्ताचीं लक्षणें सांगतांना या बाह्य प्रकाराचा उल्लेखहि केला नाहीं. नाथांनीं जनतेची सेवा हेंच जनार्दन-भजन आहे असें सांगितले. या लहानशा अभंगांत ब्रह्मविचार, साहित्यविचार आणि भजनविचार असा त्रिविध विचार आहे.

## नाथांची यशोगंगा

मी पैठणला आलों तें सांगण्यापेक्षां कांहीं पहावें, ग्रहण करावें या वृत्तीने आलों. दोन हजार वर्षांचा या गांवचा इतिहास आहे. इतर माणसें सोडलीं तरी नाथांचें एकटयाचेंच नांव इतकें मोठें आहे, त्यांचें यश इतकें पावन आहे कीं त्याची तुलनाच करावयाची झाली तर ती

गंगेशीं करतां येईल. तसें आज पैठणला काय आहे? जीं पंचमहाभूतें इतरत्र आहेत तशीं येथें आहेत. पुण्यवान व पापी लोक इतरत्र आहेत तसे येथें आहेत. पण सर्वांचीं पापे जिरवून टाकण्याचें यश एकट्या नाथांच्या नांवाचे आहे. त्यामुळें माझ्यासारखे लोक येथें येऊन पावन होऊन जातात. देहानें मी पहिल्यांदाच आलों. पण देहाची संगति ही संगति नव्हे, मनाची संगति खरी. आणि नाथांच्या पावन यशोगंगेमध्यें मी शेंकडों स्नानें केलीं आहेत. तरी पण येथें येऊन तुमच्या सर्वांच्या भेटीनें मला विशेष आनंद होत आहे. ईश्वराची कृपा म्हणून आपल्या मायभूमींत अनेक संत निर्माण झाले. प्रत्ये-काची काही विशेषता आहे. केळी, संत्री, द्राक्ष फळ या नात्यानें मधुर असलीं तरी प्रत्येकाच्या माधुर्याची विशेषता आहे. महाराष्ट्रांतलेच संत घेतले तरी त्यांच्या मालिकेंत नाथांची विशेष जागा आहे. कोणाशीं तुलना करूं नये व तुलना करणें मला आवडत नाहीं. संत्र्याची तुलना केळ्याशीं होऊं शकत नाहीं. तथापि नाथांची विशेषता आहे. आत्मानुभव व परमेश्वरनिष्ठा हा सर्व संतांचा समान अंश आहे. पण त्यांतहि प्रकार आहेत. आत्मा अनंत--गुण व परमेश्वर अनंतशक्तींनीं भरलेला म्हणून आत्म्याचे आकलन व ईश्वर-भक्ति यांचे असंख्य प्रकार झाले तर त्यांत नवल काय?

## जन नोहे, अवघा हा जनार्दन!

एकनाथांचे गुरु जनार्दन, म्हणून ईश्वराला ते जनार्दन मानीत. शंकराचार्यांनींहि भज गोविंदम् या शब्दांत ईश्वर व गुरु यांचा निर्देश केला. ईश्वर व गुरु एक समजून भक्ति करण्याची युक्ति जुनी आहे. पण जनार्दनाला जनतेच्या स्वरूपांत ओळखले विशेषेकरून नाथांनींच! (कोणी चिंतनपर असतो, कोणी वैराग्यपर असतो, पण नाथ सेवापर होते.) एका गुणांत अनेक गुण. पण साधक कोणत्या बाजूनें विचार करतो, कोणती दिशा धरतो, तो रंग एकूण साधनेला चढतो.

नाथांनीं दयाबुध्दीची सेवा हा रंग घेतला. नाथांनीं गुरूची आरती केली. त्यांतहि **अवलोकितां जन दिसे जनार्दन** असें म्हटलें.

**जनीं आहे जनार्दन। तयातें पहावया सांडी अभिमान।** अभिमान सोडल्या शिवाय तुला जनार्दन दिसणार नाहीं. तोंपर्यंत माणसेंच दिसतील. विरक्त-आसक्त, स्वकीय-परकीय, अनुकूल-प्रतिकूल अशा नाना तऱ्हा दिसतील. पण अभिमान सोडल्यावर या सर्वांत परमेश्वराचें स्वरूप दिसूं लागेल.

जनसेवा हीच ईश्वराची सेवा हें प्रतिपादन करणारीं शतशः वचनें नाथ वाङ्मयांत आहेत. **सहज कर्में झालीं तीं ब्रह्मार्पण। जन नोहे अवघा हा जनार्दन।** जनसेवेचीं कर्में सहज ब्रह्मार्पण होतात. अरे बाबा, हे जन नव्हेत नारायण आहे. पण तुझे डोळे फुटले आहेत. इतकेंच नव्हे तर विपरीत आहेत. म्हणूनच तुला नाना गुणदोष आणि उच्चनीच भाव दिसतात. **एकत्वांचि निवतो साधुजन। एका जनार्दनीं बाणली निजखूण।** तेव्हां **जन हेच जनार्दन.** असे लोक ईश्वराला साकार मानवरूपांत भजतात. पण साधुजन आकारनिष्ठ नसतात, प्रकारनिष्ठ असतात. नाथांनीं ही पहिली शिकवण दिली व सेवा ही भक्ति मानली. जनसेवा म्हणजे सर्व प्राणिमात्राची सेवा. आपण भूतदया म्हणजे सर्व प्राणिमात्राची दया एवढा व्यापक अर्थ करतों; पण मानवाची सेवा करण्याचेंहि विसरून जातो. भूतदया हें मोठे नांव आपण घेतलें पण जनसेवा केली नाहीं, शेजाऱ्याचीसुद्धां काळजी केली नाहीं म्हणून तर आपण गुलामींत पडलो.

## सत्याग्रही एकनाथ

जनसेवा हा भूतदयेचा आरंभ आहे. जंतुमात्र माझेंच रूप हा त्याचा शेवट आहे. नाथ काशीहून कावड घेऊन आले व त्यांनीं गाढवावर ती ओतली. त्यांच्या मंगल दृष्टीला गाढवांतच रामेश्वर दिसला, परमेश्वर दिसला. मानवाचें कर्तव्य जनासंबंधीं विशेष असतें म्हणून जनींजनार्दन म्हणावयाचें. सेवेमध्यें अडथळे येतात त्यामुळे साधकावर प्रतिकाराची पाळी येते. तो प्रतिकार शांतीने, अहिंसेने करावा ही गांधींची शिकवण जगजाहीर आहे. महाराष्ट्रांतले कांही लोक म्हणतात ‘ही शिकवण आमच्या परंपरेंत नाहीं.’ ‘जशास तसे’ ही आमची परंपरा. पण त्यांना आपल्या वडिलांची ओळख नाहीं. रेड्यावर मारलेले वळ ज्यांच्या अंगावर उमटले ते ज्ञानदेव, अंगावर थुंकणाऱ्या यवनाला क्षमा करून अनेक स्नानें करून सत्याग्रह करणारे एकनाथ, हे आपले वडील आहेत. आम्ही त्यांचीं मुलें. पण आम्हांस त्यांची ओळख नाहीं. सेवकाला सेवा करतांना अन्यायविरोध करावा लागतो. दबून जाऊं नये, पण दाबूंहि नये, हाच सत्याग्रह. नुकतेंच नाथमंदिर हरिजनांना खुलें झाले हें कळल्याने नाथांना आश्चर्य वाटेल. कारण त्यांनीं तर अंत्यजाचें पोर कडेवर घेऊन त्याचा शेंबुड आपल्या धोतरानें पुसला आहे. नाथांना भाषाप्रेम होतें, भाषाभिमान नव्हता व दीनजनांना मराठी समजत होती म्हणून त्यांनीं मराठी हातीं धरली.

---

# श्रीनाथमहाराजांची कामगिरी ● ● ●

श्री. गणेश वासुदेव मावळंकर
अध्यक्ष, भारतीय लोकसभा

श्रीएकनाथ-दर्शन या नांवाचा एक ग्रंथ श्री. पोहनेरकर प्रसिद्ध करीत आहेत. त्यांत श्रीनाथमहाराजांविषयीं मी एखादा छोटासा कां होईना, लेख लिहावा असा त्यांचा फार आग्रह. श्रीनाथमहाराजांना भक्ति-कुसुमांजलि वहाण्याचा हा योग आहे, असें समजूनच मी थोडें लिहिण्यास उद्युक्त झालों आहे.

मराठी संतवाङ्मयाबद्दल मला फार आदर वाटतो. या सर्व संतांनीं आपापल्यापरी महाराष्ट्रांत कार्य करून जनता जागृत केली व श्रीशिवाजीमहाराजांच्या स्वराज्यस्थापनेचा पाया घालण्याचें काम केलें अशी माझी समजूत आहे. जनतेच्या उत्कट इच्छेशिवाय व सहकार्याशिवाय स्वराज्यप्राप्ति शक्यच नाहीं हें उघड आहे. मुसलमानी अमलाखालीं प्रजा हवालदील झाली असतांना, संस्कृति व धर्म यांचे पायावर जनतेस उभी करून, जनांना स्वराज्याचे सैनिक बनविण्यांत, महाराष्ट्रांतील संतांचा फारच मोठा हात आहे. आपल्या भागवतधर्माच्या प्रचारानें त्यांनीं जनतेची नैतिक भूमिका फारच उच्च केली, सलोखा व संघटण वाढविलीं व समा-जांतील निरनिराळ्या थरांमधील उच्चनीच भाव नाहींसा करून, भगवद्-भक्तीच्या, विठ्ठल नामसंकीर्तनाच्या एका पातळीवर सर्व जनतेस आणून अनेक प्रकारचे जातिभेद, संप्रदायभेद वगैरे असतांहि, जनता एकजिनसी केली आणि परधर्मीय राज्यसत्तेचा प्रतिकार करण्यास तिला कार्यक्षम केली. धर्म व संस्कृति म्हणजे आपले पंचप्राणच अशा समजुतीचा तो काळ होता व परधर्मीय राज्यकर्त्यांची सत्ता म्हणजे धर्मावरील संकट. म्हणून तें प्राणसंकट असें जनतेस वाटत होतें. असो.

पण "विठ्ठल-नामसंकीर्तन" म्हणजे नुसती तोंडाची बडबड नव्हती. त्याचेमागें जीवनाचें एक उदात्त व उच्च असें तत्त्वज्ञान होतें, व तें

आपल्या जीवनांत उतरवून जीवन सार्थक करावें अशी भगवद्भक्तांची आकांक्षा होती. पंढरीच्या वाऱ्या, ज्ञानोबाची पालखी, तुकोबारायाचे अभंग गात गात गांवोगांव जाणारी मंडळी, आपल्या संस्कृतीचा व धर्माचा संदेश खेडोपाडीं पोहोंचवीत होती. महात्माजींच्या दांडी कूचचें आपण सर्व कौतुक करतों. परंतु वारकरी पंथाच्या या वाऱ्यांची किंमत आज आपणांस जरी पटत नसली तरी ज्या काळीं हा प्रचार सुरू होता त्या काळीं त्याची आवश्यकता व महत्व किती होतें हें शब्दांनीं सांगणे शक्य नाहीं, त्याची कल्पनाच केली पाहिजे.

पण हे संत अशी अलौकिक कामगिरी कां करूं शकले? अर्थात् त्यांची रहाणी-करणी साधी, पवित्र, त्यागमय, ममताळू व चारित्र्यमय अशी होती. त्यामुळें त्यांची लोकांवर छाप पडणे शक्य होतें. परंतु तेवढ्यानेंच ज्ञानगंगा खेडोपाडीं पोहोंचवणें त्यांना शक्य नव्हतें. त्यांची सर्वांत मोठी व महत्त्वाची कामगिरी म्हणजे त्यांनीं सर्व भारतीय तत्वज्ञान मराठी भाषेंत आणून सोडलें. त्याची मांडणी साध्या, सरळ व काव्यमय भाषेंत करून लोकांना त्या तत्वज्ञानाची गोडी लावली, व मराठींतून त्यांनीं आपले ग्रंथ लिहिले. याचें जरी आपल्याला फारसें महत्त्व वाटलें किंवा दिसलें नाहीं, तरी पण ज्या काळीं त्यांनीं ग्रंथरचना केली त्या काळची स्थिति पाहतां त्यांनीं एक मोठी क्रांति घडवून आणली यांत शंका नाहीं. त्या क्रांतीचे आद्यजनक श्री ज्ञानेश्वर महाराज असले तरी पण तिचें लोण धडाडीनें पुढें नेण्याचें महत्त्वाचें काम श्रीनाथमहाराजांनीं केलें.

श्रीनाथमहाराज यांनीं आपला भागवत ग्रंथ शके १४९५ पावेतों काशीस लिहिला. हा ग्रंथ काशींत लिहिण्याचें कारण आपण पाहिलें तर त्यांनीं घडविलेल्या क्रांतीची आपणांस जास्त स्पष्ट कल्पना येईल. श्रीनाथांनीं भागवत लिहिण्याचे आधीं पंचाध्यायी लिहिली होती. तिचें पारायण त्यांचा एक शिष्य श्रीकाशीक्षेत्रीं करीत असतां एका विद्वान् कर्मठ शास्त्र्यानें तें पाहिलें. भागवताच्या एकादशावर प्राकृत ओव्या केलेल्या पाहून त्यानें, नाथांच्या या 'अकृत्या' चा पुकारा केला. त्या--वरून काशीक्षेत्रस्थ शास्त्र्यांनीं सभा भरवून ठराव केला, कीं सदर "अकृत्य" करणाऱ्या पैठणकर ब्राह्मणास चौकशीसाठीं बोलावून आणावें व यथान्याय दंड करावा. यावरून नाथ काशीस गेले. तेव्हां त्यांचें वैराग्य, शांति, विद्वत्ता, वक्तृत्व वगैरे गुण पाहून विद्वान् मंडळी चकित झाली.

शास्त्रीमंडळीनें त्यांच्या भागवताची बारकाईनें परीक्षा केली. तेव्हां त्यांना असें आढळून आले कीं त्यांत भगवत्-प्रसाद परिपूर्ण आहे. यावरून काशीकर विद्वान् संतुष्ट झाले, व ग्रंथाची पूर्तता झाल्यावर ग्रंथ पालखींत ठेवून त्यांनीं त्याची मिरवणूक काढली! असो. काशीसारख्या संस्कृत विद्यापीठीं जड-जीवांच्या उद्धारार्थ, प्राकृत भाषेंत ग्रंथ करण्याचा काशीकर पंडितांकडून परवाना मिळविणें ही लहानसहान गोष्ट नव्हे.

मराठी भाषेसंबंधीं नाथांस काय वाटत होतें तें त्यांच्या पुढील ओव्यांवरून दिसून येतेंः—

संस्कृत ग्रंथकर्ते ते महाकवि।
मा प्राकृतीं काय उणीवी ? ॥

नवीं जुनीं म्हणावी।
कैसेनि सुवर्ण-सुमनें ॥

कपिलेचे म्हणावे क्षीर।
मा इतरांचें तें काय नीर ॥

वर्णस्वादें एकचि मधुर।
दिसे साचार सारिखें।

संस्कृत वाणी देवें केली।
प्राकृत तरी चोरापासून झाली ? ॥

असोतु या अभिमान-भुलीं।
वृथा बोलीं काय काज ? ॥

आतां संस्कृता अथवा प्राकृता।
भाषा जाली जे हरिकथा ॥

ते पावनचि तत्त्वतां।
सत्य सर्वथा मानली ॥

संस्कृत वंद्य प्राकृत निंद्य।
हे बोल काय होती शुध्द ? ॥

हाहि अभिमान-वाद।
अहंता शुध्द परमार्थी ॥

देवासि नाहीं वाचाभिमान।
संस्कृत प्राकृत त्या समान ॥

ज्या वाणी जाहलें ब्रह्म-कथन ।
त्या भाषा श्रीकृष्ण संतोषे ॥

★ ★ ★ ★

माझी मराठी भाषा चोखडी
परब्रह्म फळली गाढी

★ ★ ★ ★

श्री नाथांचा भागवत ग्रंथ किती रसाळ आहे हें समजण्यास तो वाचलाच पाहिजे. भाषेचे अलंकार, नित्य व्यवहारांतील अनेक उपमा, कठीण गोष्ट अगदीं सोप्या भाषेंत समजावण्याची हातोटी यांचें वर्णन मी काय करणार? माझेजवळ ग्रंथ बरींच वर्षे होता, पण तो संबंध वाचण्याचें सद्भाग्य इंग्रज सरकारचे कृपेनें मला १९४०–४१ च्या व्यक्तिगत सत्याग्रहाचे कारावासामुळे लाभलें. ग्रंथ वाचीत असतां जणूं काय आपण श्रीनाथमहाराजांचे सान्निध्यांतच आहोंत असें वाटत असे.

श्रीनाथमहाराजांच्या वास्तव्यानें पुनीत झालेल्या पैठणाचें दर्शन घेण्याचा योग १९३८–३९ सालीं आला होता. त्यानंतर अर्धवट राहिलेला ग्रंथ पूर्ण वाचण्याचा योग १९४०–४१ सालीं आला, व त्यांना आदर-सुमनांजलि वाहण्याचा योग आज येत आहे याबद्दल श्रीएकनाथदर्शन ग्रंथाचे संयोजक श्री. पोहनेरकर यांचे आभार मानणें आवश्यक आहे.



# श्रीसंतश्रेष्ठ एकनाथ ● ● ●

न. वि. गाडगीळ
मंत्री—हिंद सरकार.

महाराष्ट्रांतील संतपरंपरेत श्रीएकनाथ यांचें स्थान फार महत्त्वाचें आहे. मराठीच्या वाङ्मयसमृद्धीस जे साहित्यिक मुख्यतः कारणीभूत आहेत त्यांत एकनाथांचा दर्जा फार मोठा आहे. चरित्र व चारित्र्य ह्याहि दृष्टीनें महाराष्ट्रीय संतमंडळींत एकनाथांचें स्थान आदराचें झालें आहे. किंबहुना श्री. पांगारकर यांनीं म्हटल्याप्रमाणे आद्य शंकराचार्य हे जसे संन्यास आश्रमाचे भूषण आहेत, तसेंच एकनाथ हे गृहस्थाश्रमाचे मंडन आहेत. एकनाथांच्या संबंधीं लिहावयाचे म्हणजे एक साधु पुरुष, एक संत, एक ग्रंथकार व एक परमचारित्र्यसंपन्न गृहस्थाश्रमी असें अनेक दृष्टींनीं लिहावयास पाहिजे. कुठल्याहि व्यक्तीच्या चरित्राची समालोचना करावयाची म्हणजे तत्कालीन परिस्थिति किंचित् निरीक्षिल्याशिवाय समालोचना कधींहि पुरी होणार नाहीं. एकनाथांचा जन्म संभवतः इ. स. १५३० ते १५३५ च्या दरम्यान झाला असला पाहिजे. श्री. फाटक यांच्या मतें त्याचा जन्म स. १५३२ मध्ये झाला. एकनाथांच्या जन्माच्या वेळीं मुसलमानांचा अंमल दक्षिणेमध्यें कायम झाला होता व परराज्यांतील सुरवातीचा कडवटपणाहि किंचित कमी होत आला होता असें दिसतें. श्री एकनाथांचे पैठण हें शहर निजामशाहींत होतें व त्या राज्यांत अनेक हिंदू कमीजास्त प्रमाणांत अधिकारावर होते. परकीय राज्याचा परिणाम देशी संस्कृतीवर कसा होत गेला याचे प्रत्यंतर एकनाथांच्या कृतितेंत ठिकठिकाणीं दिसून येतें. ज्ञानेश्वरांपासून एकनाथांपर्यंतच्या २५० वर्षांत हिंदूंची स्थिति अनेक दृष्टींनीं अधोगतीला गेलेली होती. धर्माचें प्रेम कमी झालें होतें असें नाहीं. तथापि हिंदूंच्या रक्तांत जुळवून घेण्याची जी वृत्ति आहे तिचें बीज ह्याहि कालांत दिसून येतें. मुसलमान धर्मांतील अनेक प्रकार आपल्या धर्मांत व आचरणांत घेऊन हिंदूंनीं आपल्या संस्कृतीला व्यापक केलें होतें असें म्हणणें प्राप्त आहे. ही गोष्ट खरी आहे की एकनाथांच्या काळांत जुलूम-

-जबरदस्तीचीं उदाहरणें सुरवातीच्या काळा एवढीं नव्हतीं, तथापि एकनाथांच्या अंगावर मुसलमानानें थुंकावें, यांत नाथांच्या सहनशीलतेपेक्षां मुसलमानांचा मगरूरपणाच अधिक दृष्टोत्पत्तीस येतो हें खरें आहे. तात्पर्य, एकनाथ ज्या काळांत जन्मले त्या काळांत मराठी साहित्यिकांना अगर संतांना उघडपणे धर्मप्रचार करण्याइतकी परिस्थिति प्राप्त झाली होती हें उघड आहे.

एकनाथांच्या वाङ्मयांत तत्कालीन असे पुष्कळ उल्लेख आहेत. विशेषतः एकनाथकृत '**भावार्थ रामायणांत**' ही गोष्टस्पष्टपणें दिसून येते. एकनाथांनीं किती तीर्थक्षेत्रे पाहिली, किती प्रवास केला व त्यांचें तत्कालीन परिस्थितीचें ज्ञान किती व्यापक होते याची माहिती भावार्थरामायणांत विशेषपणें दिसून येते. बाराव्या वर्षी घर सोडून ते गुरुगृही गेले व तेरा वर्षे अध्ययन करून स्थान स्थान तीर्थक्षेत्रें करून पैठणास परत आले. या तेरा वर्षांत त्यांनीं जो विविध अनुभव मिळविला त्याचें प्रतिबिंब त्यांच्या वाङ्मयांत दिसून येतें. तत्कालीन संस्कृतीला अनुसरून लेखन, वाचन, प्रवचन, कीर्तन या उद्योगांत त्यांचा काळ जात असे. श्रीएकनाथ यांच्या चरित्रामध्यें जी विशिष्ट गोष्ट दिसून येते ती ही कीं, ज्याप्रमाणे त्यानी उपदेश केला त्याचप्रमाणें त्यांचे वर्तन होतें. त्या काळांत महाराना घरीं भोजन घालणें, त्यांचा सत्कार करणें या गोष्टी निश्चितपणें पापमय समजल्या जात होत्या. " देव सर्वत्र आहे," असें नुसतें म्हणणे सोपें आहे; परंतु त्याप्रमाणें वर्तन करणें हें एकनाथांइतके कोणीहि दाखविले नाहीं. ज्याला सामान्यपणें चमत्कार म्हणतात असें कांहीं त्यांनीं केले नसतें तरी ज्या तऱ्हेनें त्यांनी समाजांतील विषमता कमी करण्याचा प्रयत्न केला, ती पाहतां त्यांनीं खरोखर चमत्कारच केला असे वाटतें. जन्मानें मनुष्य प्रतिष्ठा मिळवूं शकत नाहीं. मनुष्य हा येथून तेथून सारखाच आहे. ब्राह्मण महार चोर साव श्रीमंत गरीब स्त्री पुरुष या सर्वांशीं त्याची वागणूक साधुत्वाची असल्यामुळें त्यांची असाधारण अशी प्रतिष्ठा होती. जीवनमुक्तीचीं जीं लक्षणें गीतायोगवासिष्ठादि ग्रंथांत आपण पाहतो त्यांचा प्रत्यक्ष धडा श्रीएकनाथांच्या आचरणांत दिसून येतो. ही आचरणश्रेष्ठता एवढ्या मोठ्या प्रमाणांत महाराष्ट्रांतील अन्य संतांमध्ये दिसून येत नाहीं. स्मृतिशास्त्रांमध्यें वर्णाश्रममूलक भेद तर स्पष्ट आहेत आणि तसें सांगणाऱ्यांचा अपमान न करतां, प्रत्यक्ष व्यवहारांत हा भेद नाहींसा करणें हें ज्या भक्तिमार्गानें एकनाथांनीं केलें त्या भक्तिमार्गाची थोरवी खरोखरच अवर्णनीय आहे. आपल्या प्रयत्नानें व आपल्या शुद्ध चारित्र्यानें ज्या

थोड्या व्यक्तींनीं महाराष्ट्रसमाजाला क्रांतिकारी वळण लावलें त्यांत एकनाथ हे प्रमुख होते. मूलतः पुराणांत धर्म कांहीं कां असेना, पण त्याच्यापेक्षां अधिक उदात्त अशा वातावरणांत जनतेला नेऊन उपनिषदांचे 'सर्व भूतांचे ठायीं एकता आहे' हें ध्येय, एकनाथांनीं कार्यान्वित केलें. किंबहुना श्री. फाटक यांनीं म्हटल्याप्रमाणें ध्येयासाठीं भेदशून्य एकजूट, निदान तिची आवश्यकता ह्या महाराष्ट्र समाजाला त्यांनीं पटविली. एकनाथ यांनीं मुसलमान आक्रमणास तोडीस तोड म्हणून साहित्यामध्यें चांगलेंच उत्तर दिलेलें आहे. हिंदू-तुर्क-संवाद-प्रकरणांत मूर्तिपूजेसंबंधीं वादविवाद घडल्याप्रमाणें दिसून येतो:—

> **आम्हांशीं म्हणतां पूजिती पत्थरें । तुम्ही कां मुडद्यावरी ठेवितां चिरे।**
> **दगडाचे पूजितां हाजिरे : पीर खरे ते माना ।**
> **केवळ जें कां मेलें मढें : त्याचीं जतन करतां हाडें**
> **फूल गलफ पत्थर यावर चढे : ऊर तो पुढें तुम्ही जाळां ।**

अशा तऱ्हेचा आक्रमक हल्ला त्यांनीं मुसलमान धर्मावर चढविल्याचें दिसून येतें. मुसलमानांच्या प्रत्येक धार्मिक समजुतीवर त्यांनीं अशा तऱ्हेचे कठीण प्रहार केलेले आहेत. तथापि असा एवढा हिंदू धर्माचा पाठीराखा असतांना सुद्धा हिंदूंच्या वर्तनांत फार मोठा फरक पडला, असें दिसून येत नाहीं. उलट हिंदूधर्म म्हणजे अनेक देवांचें कुरण व त्यांत मुसलमानी पीर व फकीर यांची भर पडली, यापेक्षां अधिक कांहीं झाल्याचें दिसून येत नाहीं. इतकेंच नव्हे तर बौद्धांचा छळ ब्राह्मणांनीं केला म्हणून देवाला मुसलमानांचा अवतार घ्यावा लागला अशीहि कल्पना त्या काळीं निघाली होती असें दिसून येतें. ज्या संस्कृतीशीं अगर ज्या तत्त्वाशीं मुकाबला करतां येत नाहीं त्याच्याशीं जुळवून घेणें ही जी हिंदू समाजाची वृत्ति आहे तीच ह्या बाबतींत पुन्हा एकदां दिसून येते. हिंदूंमध्यें मूर्तिपूजेचें बंड हें कोणत्या थराला पोंहचलें होतें याचें वर्णन एकनाथांनीं अनेक ठिकाणीं केलें आहे :

> **म्हणतीं देव मोठे मोठे : पूजिताती दगड गोटे ।**
> **जीत जीवा करुनी वध : दगडा दाविती नैवेद्य**

अशा अर्थाचें एकनाथांचे अनेक अभंग आहेत. हिंदूंची अवनति किती झाली होती याचा थोडासा परिचय खालील अभंगांत दिसून येतो :—

> **बाबल मलकाची पूजिती गदा : वर्षां फकीर होती एकदां ।**
> **मग झोला होतां धंदा : खाती मलीदा हिंदू तुर्कांचें घरकडे कीं**

मुसलमान धर्माच्या या संस्कृति पसरण्यामागें त्यांचें राज्यबल होतें ही गोष्ट खरी आहे, तथापि हिंदूंची अनुचित कचखाऊ संस्कृति हीहि तितकीच ह्या अधःपाताला जबाबदार आहे असें म्हटलें पाहिजे. हिंदूधर्माचें पुनरुज्जीवन करण्याचें क्रान्तिकारक कार्य एकनाथांनीं निःसंशय सुरू केलें. तथापि हिंदूधर्मांतील ही परधार्जिणेपणाची व स्वाभिमानशून्य, जुळवून घेण्याची प्रवृत्ति अद्याप पर्यंत गेलेली नाहीं.

नाना देवता, नाना संप्रदाय यांचा सुळसुळाट असल्यानें हिंदूंची अवनति झाली, याची जाणीव एकनाथांना नव्हती असे नाहीं. जनता योग्य मार्गदर्शनाच्या अभावीं अशीच अज्ञानांत वागत होती. एकनाथांच्या काळीं जरी हिंदूंच्या मूर्ति, त्यांचीं मंदिरें, तीर्थक्षेत्रें यांच्यावरील आक्रमण कमी झालें होतें तरी जी गोष्ट मूलतःच सुधारावयास पाहिजे होती, ती झाली नाहीं. उलट मूर्ति फोडली गेली तरी पुन्हां स्थापावी, भ्रष्ट झालेलें तीर्थ शुद्ध करून घ्यावें, अशा तऱ्हेची वृत्ति समाजांत दिसून येत होती. समाजाचे जे नेते त्यांना आपलें खरें कर्तव्य समजलें नव्हतें. गांवगुंडी व अन्य खटपटी करण्यामध्यें आपला मोठेपणा आहे असे या वर्गानें मानलें. आणि अन्य समाज निरक्षर असल्या कारणानें जी प्रगति व्हावयास पाहिजे होती, जो साक्षात्कार व्हावयास पाहिजे होता, तो हि समाजाला झाला नाहीं. एकनाथांनीं आपल्या परीनें पुष्कळच प्रयत्न केला. ब्राह्मणांना हटकलें, जोहार प्रकरणांत तर त्यांची चांगलीच हजिरी घेतली. तथापि फारसा परिणाम झाला असें म्हणतां येणार नाहीं.

एकनाथांचें वाङ्मय हें संत-वाङमय आहे व त्या काळाच्या परिस्थितीला अनुसरून असेच आहे. आत्मसाधनाचे खरें लक्षण म्हणजे एकात्मदृष्टि, या गोष्टीवर त्यांनीं विशेष भर दिलेला आहे. जग व आत्मा यांतील भेद नष्ट झाले म्हणजे व आत्मसाक्षात्कार झाला म्हणजेच मोक्ष ही शिकवण स्पष्टपणें दिसून येते. तथापि देव-भक्त हा भेद मोडल्यानंतर भजन त्याचप्रमाणे कर्म कां करावें, याचे उत्तर नाथांनीं अनेक दृष्टांतांच्या साह्यानें उत्कृष्ट दिलेलें आहे. यात्रा करून यात्रेकरू जर घरीं आला तर यात्रेचें श्रेय शिल्लकच राहतें, अमृत प्याल्यानंतर अमृत संपलें तरी पिणाराचें अमरत्व कायमच राहतें, त्याचप्रमाणें देवाच्या प्राप्तीचें साधन जें भजन, तें साक्षात्कारानंतर शिल्लक राहतें. स्वात्मसुख हें शरीराची निश्चेष्टता, तटस्थता अगर निष्क्रियता नव्हे.

**जेथें अभिमान समूळ तुटे : तेथें चिन्मात्र पहाट फुटे ।**
**निरभिमान निरवधि : तेची अखंड समाधी ।**

अशी समाधीची व्याख्या त्यांनीं केली आहे. आत्मसाक्षात्कारानें शरीर नव्हे तर चित्त स्थिर व समाधिस्थ झालें पाहिजे. आणि तसें झालें म्हणजेच तो पुरुष हें योगाचें कोडें समजूं शकतो.

ब्रह्म व माया या बाबतींत प्रत्यक्षाची उपेक्षा होते म्हणून परब्रह्माच्या भोंवतालीं मायेनें आवरण टाकून ती थांबविली आहे अशी सुंदर कल्पना एकनाथांनीं उभी केली आहे.

अग्नि देवाचें मुख पण त्यावर माणसें हातपाय शेकतात, थुंकतात. सृष्टींतील सर्व पदार्थांची उपेक्षा प्रसंगानें माणसें करतात आणि हें सर्व परब्रह्माचें स्वरूप असून सुद्धां होतें, म्हणून

**तैसी परब्रह्माच्या अभक्तीं – अवघ्यां होती अधोगति ।**
**ते चुकविली निश्चिती – माया देवीं ।।**

असें म्हणून या गोष्टीला एक सुंदर स्वरूप दिलें आहे.

मुक्ति व मोक्ष म्हणजे वर सांगितल्या प्रमाणे साक्षात्कार होणें आहे. मृत्यूनंतर मुक्ति ही कल्पना कशी चुकीची आहे हें खालील अभंगांत दाखविलें आहे :—

**मेल्यामागें मुक्ति – ते श्वानसूकरादि मरती ।**
**मेल्यामागें ब्रह्मप्राप्ति – हे जै सत्य मानावी युक्ति**
**तै जे जे प्राणी मरती – ते तें मुक्त होती अनायासें ।।**

असा बिनतोड कोटिक्रम केला आहे.

हें सर्व साक्षात्काराचें ज्ञान केवळ ग्रंथवाचनानें होत नाहीं. त्याला सद्गुरूचा उपदेश पाहिजे. निव्वळ देवभक्तीनें हि होणार नाहीं. जे अनुभव व दिव्यदृष्टी काष्ठपाषाणादिकाचे देव देत नाहींत ते अनुभव सद्गुरु व संत देत असतात. संतांच्या विभूति धर्मासाठीं अवतार घेतात व जगाला सदुपदेश द्यावा हा त्यांचा उद्देश असतो.

**जै धर्माची वाट मोडे । अधर्माची शीग चढे ।।**
**तै आम्हां येणें घडे । संसारस्थिती ।।**
**नाना मतें पाषांड । कर्मठता अति बंड ।।**
**तयाचें ठेचणें तोंड । हरिभजनें ।।**

समाजामध्ये याप्रमाणें पाखंड माजलें, अधर्म वाढला म्हणजे संत व साधु आपल्या वर्तनाने व उपदेशाने समाजाला मार्गावर आणीत असतात. ही गोष्ट संत असल्यामुळें, देवधर्माच्या संदर्भात केली जाते. आणि हिंदूसमाजाची रचना सर्वस्वी धार्मिक कल्पनेत असल्या कारणाने तत्सम तंत्र संतांनीं वापरलें असल्यास आश्चर्य मानण्याचे कारण नाहीं. आणि सर्वसामान्य जनतेला आपला उपदेश समजो,खरा धर्म समजो, ह्याच दृष्टीनें देशी भाषेतून धर्मोपदेश करण्याचा जो पायंडा ज्ञानेश्वरानें पाडला, जी पाऊलवाट त्यांनीं पाडली तिचा विस्तार एकनाथांनीं करून तिला राजरस्याचें रूप दिलें.

एकनाथांच्या अध्यात्म- ग्रंथांत भागवत व अन्य ग्रंथांत रुक्मिणी--स्वयंवर हे दोन ग्रंथ विशेष उल्लेखनीय आहेत. एकनाथांची प्रतिभा रुक्मिणीस्वयंवरांत फारच व्यापक स्वरूपाची आहे व ह्या रुक्मिणीस्वयंवर काव्यांतहि नाथांनीं अध्यात्माचा रंग खेळवलेला आहे. रुक्मिणीचें वर्णन करतांना नाथ म्हणतात.

**मुखामाजी दंतपक्ती जैं ओंकारामाजी श्रुती ।**
**एकाअंगीं भिन्नपणीं जीवशिव वाढिन्नले दोन्हीं ।**
**तेणें झाली व्यंजनस्तनी कुचकामिनी कुचभारें ।**
**विद्या अविद्या पांखें दोन्हीं आच्छादिले दोन्ही स्तनीं ।**
**वाटले त्रिगुणाचे कसणी कृष्णावांचोनी कोण सोडी ?**

रुक्मिणीस्वयंवरामध्यें त्या काळची लोकस्थिति काय असेल याचें अधिक चांगलें प्रमाण दिसून येतें. लग्नांतील पक्वान्नें, आतिषबाजी, त्याच--प्रमाणें पराभव झाल्यानंतर लोक कसे वागतात, याचें वर्णन या सर्व गोष्टी तत्कालीन समाजाचा जो अनुभव त्यांना आला होता त्याचेंच प्रतिबिंब आहे. तसेंच रुक्मिणीला तिच्या जावेनें केलेला उपदेश हाहि त्याच प्रकरणांत येतो.

एकनाथांचा भागवत ग्रंथ हा त्यांच्या सर्व कृतीमधील श्रेष्ठ कृति आहे. भागवतामध्यें सर्व अध्यात्मविषयांचा प्रपंच केला आहे. तथापि देवाची भक्ति हा भागवताचा एक मुख्य सिद्धांत आहे व भागवत हें सामान्य जनतेसाठीं त्यांनीं लिहिलें आहे ही गोष्ट स्पष्ट आहे:—

**शब्दापुढें ज्ञान धावें ओवीपुढें अर्थ पावे ।**
**जें जें जीवीं विवंचिलें तें तें आवघें ग्रंथार्थ होय ।।**

हा आत्मविश्वास नाथांनीं प्रगट केला आहे.

**श्री भागवत आणि भाषा मऱ्हाटे हें बोलणें नवल वाटे ।**
**पूर्वी नाहीं ऐकलें कोठें ॥**

अशी त्यांची भूमिका आहे.

**पावोनी चतुश्लोकीचे ज्ञान ब्रह्मा झाला ज्ञानसंपन्न ॥**
**करितां सृष्टीचें सृजन तिळभरी अभिमान बाधेना ॥**
**त्या ज्ञानाची रसाळ कथा मऱ्हाठेया सांगेन आतां ॥**

असें म्हणून ग्रंथाला सुरवात केली आहे.

भागवत ग्रंथ लिहिण्यास आपल्याला प्रेरणा कशी झाली याचें वर्णन त्यांनीं खालील श्लोकांत केलें आहे.

**एकांतीं आणि लोकान्तीं थोर साक्षेप केला सन्तीं ॥**

सदरहू ग्रंथ लिहिण्यास आपल्याला भगवंतानें साहाय्य केलें आहे ही गोष्टहि त्यांनी सांगून टाकली आहे. ग्रंथ मराठींत लिहिला म्हणून ज्याप्रमाणें ज्ञानेश्वराचे काळीं जुना पंडित वर्ग नाराज झाला होता, तोच पूर्वग्रह नाथांच्या वेळीं होता असें दिसून येतें. दोन्हीं भाषा, मराठी व संस्कृत ह्या सारख्याच योग्यतेच्या असून ज्याप्रमाणे गाईचा रंग कसाहि असला तरी दुधाचा रंग बदलत नाहीं, त्याचप्रमाणें अर्थ हि बदलणार नाहीं. सबंध ग्रंथांत अध्यात्माचा प्रपंच केला आहे. शरिराच्या त्रिविध अवस्थाचें वर्णन आठव्या अध्यायांत अत्यंत उत्कृष्ट असें दिलेले आहे. जुन्या कवींच्या वृत्ती-प्रमाणें नाथांच्या स्त्रीयविषयक कल्पनांही या अध्यायांत दिसून येतात. स्त्रियांना ब्रह्मज्ञानाचा अधिकार नाहीं ही गोष्ट त्यांनी स्पष्ट केली आहे. तथापि कांहीं स्त्रिया अपवादहि असू शकतात, याचीहि त्याना जाणीव असल्यानें, ज्या स्त्रिया

**सद्गुरुप्राप्तीची अतिआर्त काया वाचा चित्त जीवित ।**
**कुरवंडी करूनि सांडित परमार्थार्थ सद्भावे ॥**

अशा स्त्रियांना अधिकार आहे हेंही त्यांनीं नमूद केलें आहे. देवाला शरण जात, लोकोद्धार करीत करीत, आयुष्य सार्थकीं लावावें ही संतांची शिकवण अनंत कालापासून चालत आलेली आहे, तथापि पुन्हा पुन्हा तीच संन्ताना सांगावी लागते हेंहि तितकेंच खरें आहे. आणि या दृष्टीनें त्या त्याच कल्पना काव्यरूपांत आल्या आहेत. निरनिराळ्या घटनांचें वर्णन निरनिराळे उपमा दृष्टांत देऊन हाच उपदेश संतांमागून संतांनीं केलेला

आहे. व्यवहारामध्यें आश्रमव्यवस्था ही कशी विपरीत प्रकारानें दिसून येतें याचें सुंदर वर्णन एकनाथांनीं केलें आहे. उपदेशक तर इतके असतात कीं कोणाचें मानावें हा प्रश्न उत्पन्न होतो. परमार्थांत मतामतांचा गलबला भांबावून सोडणारा आहे.

**एक तांबडे बोडके । एक ते केवळ मुडके ।**
**एक तीर्थाटणें रोडके । एक ते मुके मौननिष्ठ ॥**
**ऐशा नानापरींच्या व्युत्पत्ति । साधक शिणती नेणों किती ॥**

या परिस्थितीत भक्तियोग व सत्संग याशिवाय दुसरा मार्ग नाहीं हा सिद्धांत नाथांनीं काढलेला आहे. वेदान्ताचा अभ्यास म्हणजे विहिरींतून पाणी काढायला

**मोट नाडा बैलजोडी अखंड झोडतां आसुडी ।**
**येतां जातां ओढाओढी ॥**

अशी खटपट करावी लागते. एवढें करूनहि लाभ अल्पमात्र. उलट भक्ति ही

**सरितेचा पाट । एक वेळ केल्या वाट ।**
**अहर्निशीं घडघडाट । चालती लोट जीवनाचे ॥**

याप्रमाणे आहे.

भागवतामध्यें भक्तीचें स्वरूप म्हणजे सत्संगति, सच्छास्त्रश्रवण सद्गुरुप्राप्ति, कीर्तन व नामस्मरण असें आहे. यमनियमादिकांचा विचार पण भक्तीमध्यें आहे. सांख्य, योग, नित्यानित्यविवेक, धर्म, तप, त्याग, श्रौतस्मार्तकर्म ,व्रतेंवैकल्यें, यज्ञ इत्यादि गोष्टी करण्याचें नाथांनीं वर्णन केले असून देवप्राप्ती अगर साक्षात्कार त्यांनीं होत नाहीं असा सिद्धांत मांडला आहे. पुष्कळ वेळां ज्याला लौकिक भाषेंत विटंबना म्हणतात यावरून अशी ही टीका केलेली आहे. उदाहरणार्थ

**अनतव्रतें व्रती झाला । दोरा पांठीं देव बांधिला ।**
**शेवटीं अनंतातें विसरला । देवो हारविला हातींचा ॥**

भक्तिमार्गाचें श्रेष्ठत्व वर्णन करतांना नाथ म्हणतात, संत म्हणजे परमेश्वराचें स्वरूप आणि परमेश्वर, ज्याप्रमाणें कृपण धनावरच आसक्त असतो, त्याचप्रमाणें आपल्या भक्तावर तो राहतो. संत म्हणजें सचेतन

परमेश्वर, प्रत्यक्ष पुरुषोत्तम, प्रत्यक्ष चालतें बोलतें परब्रह्म. खरा गुरु कसा असावा याचें वर्णन पुढील ओवींत आहे.

**"शब्दज्ञानें पारंगत जो ब्रह्मानंदें सदा डुल्लत ।**
**शिष्यप्रबोधनीं समर्थ," असा तो असला पाहिजे.**

आतां शिष्यासंबंधीं बोलतांना नाथ सांगतात: तो निर्भय असावा, अर्थजिज्ञासु, द्रव्याविषयीं उदासीन, समदृष्टि व स्वदृक् (स्वतंत्र दृष्टीचा) असावा. त्यानें ज्ञानाभिमान धरूं नये. परमार्थाच्या सर्वांगीण ज्ञानाची उत्सुकता म्हणजे अर्थजिज्ञासा त्यांत असावी. जेथें जेथें उत्तम गुण असतील ते मानावे अशी त्याची वृत्ति असली पाहिजे. नामाचा महिमा अनेक दृष्टींनी एकनाथांनीं वर्णिला आहे. नाम हें व्यक्तीसाठीं, कीर्तन हें समुदायासाठीं आहे. कीर्तनाचें वर्णन करतांना त्याचा प्रभाव किती आहे हें सांगतांना नाथांची प्रतिभा अति उच्च कोटीला पोंहचली आहे. कीर्तनानें यमलोक ओस पाडला, जपतपाना निराश करून सोडलें, यमनियमांना उपवास करण्याची पाळी आली, योगाभ्यास मरायला टेकला. कीर्तनानें वैकुंठपीठ हर्षानें डोलूं लागलें व शंकर तांडवनृत्याला प्रवृत्त झाला. कीर्तनाचा परिणाम :

**नाशिलीं जगाचीं सर्व दुःखें । अवघें विश्वचि हरिखें ।**
**भरिले महासुखें उचंबळत ॥**

त्याचप्रमाणें किष्किंधाकांडात नामस्मरणाविषयीं बोलतांना नाथ म्हणतात,

**नामापाशीं भुक्ति-मुक्ति । नामापाशीं यशकीर्ति ॥**
**नामापाशीं विजयप्राप्ती । कर्मनिर्मुक्ती हरिनामें ॥**

नामस्मरण हें हरिकीर्तनाप्रमाणें अखंड असलें पाहिजे व मनुष्य मुक्त झाल्यानंतरहि त्यानें तें सोडतां कामा नये. त्याने जर तें सोडलें तर त्याची स्थिति खालील सुंदर कल्पनेंत नाथांनीं वर्णन केली आहे.

**मुक्तपणाच्या विलासा । वनिताअधरीं सुवर्णफांसा ।**
**पडोनि मुक्त आलें नासा । रामपरेशा न भजोनी ॥**

ज्याप्रमाणें मोतीं आपण मोकळे आहो असें मानतें, पण खरोखरीच तें स्त्रीच्या नाकांतील सुवर्णफांसांत सांपडलेलें असतें; त्याप्रमाणें हा अभिमान नसावा, ही उत्कृष्ट कल्पना यामध्ये आहे.

भागवतधर्मांचें थोडक्यांत स्वरूप म्हणजे, त्यांत योग अगर कर्म आड येऊं शकत नाहीं. भागवतधर्माचरण हा कल्याणाचा सुलभ व सोपा मार्ग आहे. ज्ञानी व अज्ञानी या दोघांनाहि सुलभ असणारा हा मार्ग. "अिंद्रियें कोंडितां येत नाहींत, विषय सांडितां येत नाहीं," यासाठीं आत्मनिवेदन, भक्ति, श्रवण आणि कीर्तन हें करूनच मुक्ति मिळवावयाची. जेथें मन आणि बुद्धि ब्रह्मार्पण केली जाते तेथें ती ढळत नाहीं व तिथें खरी समाधी आपण मानली पाहिजे. भक्ति म्हणजे परब्रह्माशीं मीलन, मायेचें तेथें कांहीं चालत नाहीं. भागवत धर्माचें मुख्य प्रमेय म्हणजे भक्ति, त्यांत ज्ञान व वैराग्य यांचाहि समावेश होतो.

**भक्ति म्हणजे सर्वांभूतीं । सप्रेम भजनयुक्ति ॥**
**प्राप्ति म्हणजे अपरोक्ष स्थिति । भगवत्स्फूर्ति अनिवार्य ॥**

भक्ति, धर्माचरण याप्रमाणे नाथांनी या श्रेष्ठ ग्रंथांत निरूपिलें आहे.

श्रीएकनाथांचा परमार्थविषयक साहित्यिक विस्तार फार मोठा आहे. त्या सर्वांचा प्रपंच या ठिकाणीं करणे शक्य नाहीं. संस्कृत न जाणणारा जो बहुजन समाज त्यांत ते मिळून मिसळून वागत असल्यानें त्याला समजेल, उमजेल व वर्तनांत उमटेल असें साहित्य सोप्या व साध्या भाषेंत निर्माण करून त्यांनीं ज्ञान व भक्तीचा उपदेश केला आहे. दांभिकापासून सावध, शाब्दिका-पासून दूर असा त्यांत इषारा आहे. ग्रंथरचना, प्रवचन, कीर्तन, उपदेश इत्यादि मार्गांनीं अवनत झालेल्या हिंदू समाजांत चैतन्य आणण्याचा त्यांचा प्रयत्न खरोखरच स्पृहणीय आहे. ते संत व सद्‌गृहस्थ असे होते. किंबहुना प्रपंचांत राहून त्यांनीं लोकांना सन्मार्ग दाखविण्याचा प्रयत्न केला. एकूण समाजाला पुढें आणण्याचा प्रयत्न करणारांमध्यें एकनाथांचा दर्जा सर्वश्रेष्ठ आहे. कोट्यवधि प्रजा जिला योगमार्ग झेंपणार नाहीं, ज्ञानमार्ग पेलणार नाहीं, अिंद्रियनिग्रह होऊं शकत नाहीं, अशीला भागवत धर्माचा उत्कृष्ट मार्ग नाथांनीं दाखवून समाजाला उपकृत केलें आहे.



# श्रीएकनाथ महाराज • • •

श्री. माधव श्रीहरि अणे
राज्यपाल, बिहार प्रांत

प्रतिष्ठान अथवा पैठण हें भारतवर्षातील अत्यंत प्राचीन शहर. वैदिक संस्कृतीच्या उत्कर्षापकर्षाच्या इतिहासाशीं पैठणच्या उदयास्ताच्या वृत्तान्ताचा निकट संबंध आहे. एके काळीं प्रतिष्ठान हे भारतीय संस्कृतीच्या प्रतिष्ठेचें स्थान होतें. आजही प्रतिष्ठानच्या परिसरांत भारतीय गतवैभवाचें अनेक अवशेष संशोधकास मिळतील..

पाटलीपुत्र, उज्जयिनी आणि प्रतिष्ठान हीं तीन प्राचीन शहरें चंद्र-गुप्त, विक्रमादित्य आणि शालिवाहन यांच्या नांवाशीं निगडित असलेलीं भारतवर्षाच्या राजकीय व सांस्कृतिक इतिहासांत चिरस्मरणीय राहतील. परचक्रापासून व परकीय संस्कृतीच्या आक्रमणापासून भरतखंडाचे संरक्षण करणारे प्रतापी पुरुष व पंडित या ठिकाणीं निर्माण झाले व त्यांच्या प्रता-पानें आणि पांडित्यानें भरतखंडाची यशःपताका आकाशांत उंच उडत राहिली. उत्तर भागांत गंगेच्या तीरावरील पाटलीपुत्र, मध्य भारतांत नर्मदेच्या पंचक्रोशींतील उज्जैन आणि दक्षिण भारतांत गोदावरीच्या तीरावरील प्रतिष्ठान हे तीन, भरतखण्डाच्या उज्वल सांस्कृतिक प्रासादाचे खंबीर आधारस्तंभ होते. म्हणूनच या शहरांच्या नांवांचा उच्चार कानीं पडतांच प्रत्येक भारतवर्षीयाच्या अंतश्चक्षूसमोर भरतवर्षाच्या संस्कृतीचा हजारो वर्षांच्या इतिहासाचा चित्रपट उभा राहतो.

प्रतिष्ठान अथवा पैठण हें केवळ विदर्भ व महाराष्ट्र या देश--विभागांस भूषविणारें शहर नसून सर्व हिंदुस्थानास ललामभूत असलेलें अखिल भारतीय नगर आहे. विदर्भ व महाराष्ट्र यांत तर पैठण शब्द एके काळीं सभ्यता, पांडित्य व सद्भिरुचि यांचा वाचकच बनला होता.

आजही स्त्रियांनीं वापरायच्या उंची रेशमी साडीला विदर्भांत "पैठनी" म्हणतात. वरपक्षाकडून वधूचा गौरव व सन्मान "पैठनी" देऊन करण्याची चाल आजही विदर्भांत प्रचलित आहे. "पैठनी आदर" हा शब्दप्रयोग एकदां शिष्टाचाराच्या उत्कृष्ट आदर्शाचा वाचक होता. कालान्तरानें त्याचा उपहासपर उपयोग व्हावयास लागला. "पैठनी आदर" या शब्दांनीं व्यक्त होणाऱ्या उन्नत ध्येयदृष्टीचा लोप होऊन त्या ठिकाणीं जी उपहासवाचकता उत्पन्न झाली ती पैठणच्या उत्कर्षाचा ऱ्हास व अपकर्षाचा प्रादुर्भाव यांचेंच द्योतक आहे. काशी, अवन्ती, पैठण, कांची हीं विद्यापीठें हजारो वर्षे संस्कृतिसंगोपन व संवर्धनाचीं कार्यें करीत राहिलीं. प्रस्तुत कालांत काशीलाच काय तें सांस्कृतिक विद्यापीठ असलेलें दृष्टीस पडते. बाकीच्या ठिकाणीं विद्या लोकांच्या कंठांतून जाऊन दंतकथांतच येऊन बसलेली आढळते असें मोठ्या कष्टानें म्हणावे लागते.

उपरिनिर्दिष्ट विद्यापीठाचा जो इतिहास उपलब्ध होऊं शकतो त्याचें मनन करीत असतां एक दोन विचार प्रामुख्यानें सुचतात. पूर्वी संस्कृतिसंगोपनाचें कार्य संस्कृतज्ञांकडून संस्कृत भाषेंतूनच होत गेलें. परंतु पुढे संस्कृतबरोबर प्राकृत भाषांतूनही हें कार्य व्हावयास लागलें. जैन वाङ्मय हें संस्कृत व प्राकृत या दोन्हीं भाषांतून लिहिलें गेलें. त्याचप्रमाणें प्राकृतमधून शास्त्रीय व साहित्यिक अशा उभयविध ग्रंथांची निर्मिति होऊं लागली. पुढें प्राकृत ही संस्कृतप्रमाणेंच सामान्य जनतेस दुर्बोध होत चालली व तिच्या ऐवजीं निरनिराळ्या प्रादेशिक भाषा प्रचारांत येऊं लागल्या. तेव्हा पंडितानीं आपल्या संस्कृतिसंवर्धनाचे कार्यांत ह्या भाषांचा उपयोग करावयास सुरवात केली.

ज्या वेळीं ज्ञानगंगेस अपरंपार पूर येऊं लागला व त्यामुळें तिचा प्रवाह संस्कृत भाषेनें मर्यादित झालेल्या पात्राच्या थड्या टाकून बाहेर इकडे तिकडे सैरावैरा वाहूं लागला त्यावेळीं त्याबाहेर वाहणाऱ्या प्रवाहास प्राकृत व प्रादेशिक भाषांच्या पाटांतून मोठ्या कौशल्यानें वहावयास लावून सर्व भरतखण्डांतील धार्मिक व सांस्कृतिक भावनांचें पोषण व वर्धन ज्या संस्कृतिउपासकांनीं केलें त्यांच्या सेवेचें यथार्थ वर्णन शब्दांनीं करतां येणें शक्य

नाहीं. संस्कृतोद्भव आणि तत्सम व तत्प्रचुर ज्या प्रादेशिक भाषा आहेत यांतून इ. स. ११–१२ व्या शतकाच्या पूर्वीपासूनच वाङ्मयनिमतीच्या कार्याचा थोडा बहुत उपक्रम झाला असावा असें वाटतें. या उपक्रमाचा इष्ट परिणाम झाला तो हा की संस्कृतिसंवर्धनास्तव शारदोपासनेचें कार्य पूर्वी ज केवळ पंडितवर्गाकडूनच होत होतें तें या काळांत ब्राह्मणेतरांकडून हि व्हावयास लागलें; आणि संस्कृतीचा जिव्हाळा अगदीं समाजांतील उपेक्षिल्या गेलेल्या वर्गापर्यंत देखील जाऊन पोहचला. ही संस्कृतिसेवा, सामान्य जनतेंत भगवद्‍भक्तीची आवड व तदनुषंगिक दैवी संपत्ती व परमार्थाविषयी आदर निर्माण करण्याच्या रूपानें प्रायः होत होती. अशा संस्कृतिसेवकांविषयी समाजातील सर्व दर्जाचे लोकांस वर्ण–जाति-निरपेक्ष अतिशय पूज्य बुद्धि व आदर वाटत असे. जी योग्यता ज्ञानेश्वरांची तीच नामदेवाची, तीच चांगदेवाची, तीच गोरा कुंभाराची, तीच सावता माळ्याची, सजन कसायाची आणि चोखामेळा महाराची. भगवद्भक्तांत उच्चनीच श्रेणी नसे. वर्णजातीमुळे त्यांना लहानमोठे समजणे हा अधम-पणा समजला जात असे. वर्णाश्रम धर्माचे परिपालन करणारे लोक भगवद्भक्ताच्या ठिकाणी वर्णदृष्ट्या श्रेष्ठकनिष्ट भाव मानीत नसत. एखाद दुसराहि कर्मठ याविरुद्ध तक्रार करणारा झालाच नाही असें मी म्हणत नाही. काही असे लोक झाले ही गोष्ट संतचरित्रे वाचताना दृष्टीस पडते. पण असे लोक एकंदर अपवादात्मक होते. त्यांच्या विषयीं सामान्य जनतेत आदर नसून तिरस्कारच असे हे त्या संबंधीचे जे उल्लेख येतात ते लक्षपूर्वक वाचले असतां कळून येण्यासारखे आहे.

विदर्भ, कोसल, महाराष्ट्र या प्रदेशातून प्रादेशिक भाषातून संस्कृति--प्रसाराचे व भक्तिज्ञानवैराग्याच्या प्रचाराचे कार्य श्रीमुकुंदराज, ज्ञानेश्वर, चक्रधर वगैरे संतश्रेष्ठांनी सुरू केलें. त्याच्या प्राथमिक अवस्थेंतच परचक्राचें संकट या प्रदेशावर आलें. उत्तर हिंदुस्थानाप्रमाणे विंध्याद्रि, सातपुडा व आजिंठा यांच्या पट्ट्यांतील आणि नर्मदा, तापी, गोदावरी व कृष्णा यांच्या तीरांवरील प्रदेशांत यवन सत्तारूढ झाले. त्यामुळे संस्कृतिप्रसाराच्या कार्याचा वेग कांहीं अंशीं कमी झाला.

अल्लाउद्दीन खिल्जीच्या काळापासून यवनांचीं निरनिराळीं राज्यें या प्रदेशांत स्थापन झाली. त्याचा प्रतिकार करण्यासाठीं विजयानगरासारखी हिंदूराष्ट्रें निर्माण झाली. पण तालिकोटच्या संग्रामांत दक्षिणेंतील हिंदू सत्तेचा विध्वंस झाला व सर्वत्र यवनी सत्तेचा करडा अंमल सुरू झाला. अशा या काळांत ज्ञानेश्वरादिकांनी सुरू केलेल्या भागवत धर्माचें पुनरुज्जीवन करण्याचें कार्य आवश्यक होतें; व तें करण्यास पैठण येथें श्रीएकनाथ महाराज सिद्ध झाले. त्यानीं यवनी सत्तेचा करडेपणा व कडवेपणा स्वतः अनुभविला होता. समाजांतील यच्चावत् लोकाची स्थिति पूर्णपणें त्याहळली होतीं; व लोकांची अंतःकरणे धर्मप्रवण होऊन त्यांत दैवी संपदेची जोड झाली तरच समष्टीच्या उद्धाराचा मार्ग निघेल हे त्यांच्या लक्षांत येऊन चुकले होतें. त्यासाठीं त्यांनी ज्ञानेश्वरीच्या अभ्यासाची प्रथा सुरू केली. ज्ञानेश्वरांच्या समाधींत अजान वृक्षाची मुळी समाधिस्थ ज्ञानेश्वर महाराजांच्या गळ्याभोंवतीं विळखलेली आहे असें स्वप्न त्यांना पडलें. ते आळंदीस गेले व समाधीच्या आंत घुसलेल्या झाडाची मुळी कापून काढून समाधिस्थ ज्ञानेश्वरमहाराजांचा गळा त्यांनी मोकळा केला. ही कथा एकनाथ महा-राजांचें चरित्र वर्णन करताना साधुसंतांनीं सांगितली आहे. देव परोक्षप्रिय असतात म्हणून त्यांच्या कथाहि परोक्षपर वाक्यांतून वर्णिल्या असतात. ज्ञानदेव हेहि देवासारखेच. तेव्हां त्यांच्याहि कथेंत परोक्षप्रियतेचें बीज असले तर त्यांत आश्चर्य करण्यासारखें कांहीं नाहीं. श्रीज्ञानेश्वरींतील मार्गाच्या प्रचारांत जीं अज्ञान (अजान)- जन्य व दुराग्रहमूलक विघ्नें येत होतीं त्यांचें निराकरण करण्याचा त्यांनीं उद्योग केला. शुद्ध ज्ञानेश्वरी लोकांस उपलब्ध करून दिली व त्याच मार्गानें लोकांस भक्तिज्ञानवैराग्याचा उपदेश करण्याचा त्यांनीं स्वतः उपक्रम केला. स्थगित ज्ञानगंगेच्या निर्मलो-दकास प्रवाहित करण्याचें काम श्रीएकनाथमहाराजांनीं केलें; व तें यशस्वी रीतीनें त्यांनीं यावज्जीव चालविलें; व पुढें तें कार्य करणाऱ्या निश्चयी शिष्यांची व अनुयायांची परंपरा त्यांनीं निर्माण केली. या सर्व इतिहासाचें ही कथा एक उत्कृष्ट रूपक आहे असें मला म्हणावेसें वाटतें.

विदर्भांत व महाराष्ट्रांत जो भक्तिसंप्रदाय आहे त्याचें एक वैशिष्ट्य आहे. या संप्रदायाचें उपास्य इतर वैष्णवसंप्रदायांप्रमाणें श्रीविष्णु अर्थात

भगवान श्रीकृष्ण हेच आहेत. पण याचें अधिष्ठान श्रीकृष्णचरित्रापेक्षां श्रीकृष्णाच्या उपदेशावरच मुख्यतः आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं भगवद्गीतेवर व्याख्यानरूपाने लिहिलेली भावार्थदीपिका ही या संप्रदायाची जननी आहे. म्हणूनच वैकुंठवासी गुलाबराव महाराज ज्ञानेश्वरीस 'माऊली' म्हणत. या माऊलीचा प्रेमपान्हा पिऊन 'मराठीयाच्या बोलीस' ज्ञानभक्तीचे बाळसे आलें. पण त्यास योग्य काळीं वैराग्य-व्रताचरणाची दीक्षा देण्यासाठीं श्रीमद्भागवतांतील एकादशस्कंधांतील भगवंतानें भक्त-श्रेष्ठ उद्धवास केलेल्या उपदेशाची शिक्षा एकनाथमहाराजांनीं आपला सुप्रसिद्ध भागवत ग्रंथ रचून दिली. रणांगणावर अर्जुनास केलेला उपदेश आणि निर्याणाचे पूर्वी प्रायोपवेश करते वेळी उद्धवास केलेला उपदेश हेच मराठी भागवतसाप्रदायाचे दोन आधारस्तंभ आहेत. कांहीं वैष्णवसांप्रदायांत श्रीकृष्ण व राधा यांच्या प्रेमलीलांचे महत्त्वच वर्णिलेले असून त्यांपैकी कांहीं सांप्रदायातून 'गोपींची भक्ति' हाच आदेश समोर ठेवण्यांत आला आहे व "मधुर भक्ति" हा उपासनेचा प्रकार स्वीकारण्यात आला आहे. महाराष्ट्रांत व विदर्भातहि श्रीकृष्णाच्या गोकुल--वृंदावनांतील बालक्रीडांचें महत्त्व यथाप्रमाण मानण्यांत येतें. राधाकृष्णाच्या प्रेमाची महाराष्ट्र संतकर्त्यांनीहि मोठी बहारीची पण सखोल अर्थानें भरलेली वर्णनें लिहिलीं आहेत. किंबहुना भगवंताचा कोणताहि उत्सव किंवा नवरात्र "ललित" होऊन दहिहंडीचा प्रसाद वाटल्याशिवाय समाप्त होतच नाहीं. तथापि ललितें सांप्रदायिक भगवदुत्सवास शोभा देणारे अलंकार आहेत. संप्रदायाचा प्राण, गीता व भागवतांतील एकादशस्कंधांतील ज्ञानोपदेश हाच आहे. एकनाथमहाराजांनीं श्रीज्ञानेश्वरांनी लावलेल्या ज्ञानभक्तीच्या रोप्यास एकनाथी भागवत लिहून आळे तयार केले व उद्धवोपदेशाचे जीवनानें तें भरून तें रोपटें वाढीस लाविलें.

हें वेदान्त शास्त्रांतील बंधमुक्त होण्याचे आणि परमार्थप्रवण बन--ण्याचें रहस्य आबालवृद्धांस, स्त्रीशूद्रान्त्यजादि अनधिकारी समजलेल्या वर्गास सुलभ व्हावें म्हणून एकनाथानें "भारूडा" सारख्या स्फुट व गद्य काव्याची रचना केली. समाजाच्या जीवनाचीं जितकी प्रमुख अंगें त्यांना माहित होती त्यांपैकीं बहुतेक धंद्यांच्या लोकांस त्याच्या त्याच्या व्यवसायाच्या सुंदर

रूपकाचें द्वारे अध्यात्मज्ञानाच्या सिद्धान्तांची ओळख पटवून देण्याचें काम या भारूडांनीं केलें आहे. अजूनहि त्या भारूडांतील काव्यमय गद्यें ललिताचे प्रसंगीं निरनिराळ्या व्यवसायी लोकांचीं सोगें आणून म्हणून दाखविण्यांत येत असतात. एकनाथमहाराजांनीं याप्रमाणे ज्ञानोपासना करून "ब्रह्मविद्येचा मराठीच्या नगरीं सुकाळ करून सोडला."

ज्ञानेश्वरएकनाथादि संतांनीं पुरस्कृत केलेल्या भागवतसंप्रदायात सगुणोपासना, गुरुभक्ति इत्यादि तत्वांचे महत्त्व असलें तरी त्या संप्रदायानें शांकरअद्वैतसिद्धांत व तदंतर्गत मायावाद मान्य केला होता. मध्वाचार्यांचा द्वैतवाद अथवा रामानुजाचार्यांचा विशिष्टाद्वैतवाद किंवा वल्लभाचार्यांचा शुद्धाद्वैतवाद याचा त्यांनी अंगीकार केला नाहीं.

श्रीज्ञानेश्वरएकनाथतुकाराम इत्यादि संतशिरोमणींनीं जो भागवत-संप्रदाय प्रवृत्त केला त्यांतील तिसरे वैशिष्ट्य हरिहरांत अभेद मानणे हे होय. श्रीमद्भागवतांत या अभेदाचें महत्त्व अनेक ठिकाणीं वर्णन केलेलें आहे.

"शिवस्य हृदयम् विष्णु, विष्णोश्च हृदयम् शिवः"

हा सिद्धान्त मराठी संतसंप्रदायात सर्वसंमत आहे. त्यामुळें तैलंग कर्नाटक व तामिळनाड या प्रदेशांत जो शैववैष्णवात विरोध दृष्टीस पडतो तो विदर्भ व महाराष्ट्र या प्रदेशात नाहीं. एकाच घरांत देवीचीं, शिवाचीं व विष्णूचीं व्रतें व नवरात्र सारख्याच भक्तिभावानें करण्यांत येतात. शारदीय नवरात्रांत देवी व बालाजी आणि शिवरात्रीचे नवरात्रांत श्रीशंकर याची उपासना एकाच घरात नव्हे तर एकच व्यक्ति सारख्याच निष्ठेनें करीत असत. ही समदृष्टि एकनाथादि संतांनीं आपल्या ग्रंथोपदेशानें व आचरणानें स्पष्ट करून महाराष्ट्रीय भागवतसांप्रदायात एक प्रकारची व्यापकता निर्माण केली. शेवटीं श्रीएकनाथाच्या महत्वासंबंधानें आणिक एक महत्वाचा उल्लेख करणें मला अवश्य वाटतें. वाङ्मयनिर्माणकर्त्यांत कांहीं प्रतिभा--संपन्न व प्रासादिक लेखक एक दोन अत्युत्तम ग्रंथांची रचना करणारे उत्पन्न होतात व ते त्या उच्च व श्रेष्ठ कृतीमुळेंच अजरामर होतात. पण ते एखाद्या विशिष्ट विचारांच्या लेखकगणाचे प्रवर्तक किंवा मूळ पुरुष अथवा कुळपुरुष बनत नाहींत. एखाद्या सपाट मैदानी प्रदेशांत एखादी

उंच टेकडी सुळ्यासारखी तीन चार हजार फूट उंच गेलेली कधी कधी दृष्टीस पडते त्याचप्रमाणे ते प्रतिभासंपन्न लेखक केवळ आपल्या लौकिकानें व सर्वांत सुंदर ग्रंथाच्या महत्वानें जगतात, उच्च कोटीस पोचलेले दिसतात. याच्या उलट कांही प्रतिभाशाली ग्रंथकर्ते एखाद्या विशिष्ट लेखनशैलीचे व प्रतिपादनशैलीचे प्रवर्तक ठरतात व त्यांच्या शैलीचें अनुकरण करणारे व अनुवाद करणारे अनुयायी त्यांना प्राप्त होतात. हे आपल्या अनुयायांपेक्षां अधिक उदात्त व उत्तुंग असले तरी त्यांच्या अनुयायांच्या कृतीचें उंच शिखरांचें एक भव्य वलय त्यांच्या भोंवती निर्माण होऊन त्यांची शोभा व महिमा वृद्धिगत करीत असते. श्रीएकनाथमहाराज हे असे एखाद्या कुलपर्वताप्रमाणें वाङमयांत आपल्या अनुयायांच्या श्रेष्ठ कृतींनी शोभून दिसतात. त्यांच्या लेखनशैलीचा संप्रदाय त्यांच्या समक्ष व त्यांच्या मागें चालवून ज्यांनीं "एकनाथदर्शना" चा प्रचार मोठ्या आस्थेनें केला अशांत श्रीमद्भागवतांतील दशमस्कंधावर 'हरिवरदा' नांवाचा टीकारूप ग्रंथ लिहिणारे कृष्णदयार्णव, सप्तशतीवर प्राकृत ओवीबद्ध टीका लिहिणारे उत्तमश्लोक, यांचा मी प्रामुख्यानें उल्लेख करूं इच्छितो. त्याचप्रमाणें कृष्णदास मुद्गल, एकनाथांचे नातु कविश्रेष्ठ मुक्तेश्वर, भावार्थरामायणाच्या उत्तरार्धाचे लेखक संत गावबा व ठाकुरदासबावा हे सर्वजण आपण एकनाथमहाराजांच्या काव्यपरंपरेंतील आहोत व एकनाथांच्या काव्यांपासून आपणांस कवित्वाची स्फूर्ति झाली असें सांगतात. एकनाथी प्रतिपादनशैलींत संतत्व, विद्वत्व व कवित्व यांचा पवित्र त्रिवेणीसंगम दृष्टीस पडतो. म्हणूनच एकनाथदर्शन हें वाचकांच्या कायिक, वाचिक व मानसिक पापांचें क्षालन करून त्यांच्या ठिकाणीं भक्तिज्ञानवैराग्याचें बीजारोपण करील व त्यांना त्रिविध तापांतून मुक्त करून जन्ममृत्यूच्या फेऱ्यांतून वांचविण्याच्या मार्गाचें दिग्दर्शन करील अशी माझी श्रद्धा आहे. श्रीएकनाथमहाराजांचें हें अल्प विवरण पुरें करण्यापूर्वी मयूरकवीच्या शब्दांनीं "प्रभुरूप शांतिजलधि" एकनाथमहाराजांस "भावें वन्दन करून" वाचकांचा निरोप घेतों.

---

# श्रीएकनाथदर्शनाची आवश्यकता ● ●

श्री. बा. गं. खेर,
पतप्रधान मुबई.

ज्ञानेश्वरांनीं भागवतधर्माची मुहूर्तमेढ उभारल्यानंतर महाराष्ट्रांत संतांची एक परंपरा निर्माण झाली आणि तिच्या कार्यानें ईश्वरभक्तीच्या क्षेत्रांतून तेव्हा, आणि आता व्यवहारांतूनहि, जन्मजात भेदभावांची हकालपट्टी करण्याची जी एक मोठी समाजक्रांति घडून आली आहे तींत एकनाथाचे कार्य फार श्रेष्ठ आहे.

एकनाथ हे एक विद्वान भक्तिमार्गी संत होते. किंबहुना त्यांच्या आधीं शास्त्रमर्यादित विद्वत्ता आणि हृदयाधिष्ठित भक्तिमार्ग यांचा जो लढा चालू होता त्याची सांगड एकनाथ जिवंत असतांनाच त्यांना थोर मान देऊन, समाजानें घालून टाकली, असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाही. त्यांच्या विद्वत्तेची साक्ष त्यांच्या रामायण आणि भागवत या ग्रंथांवरून पटतेच, परंतु त्याशिवायहि निरनिराळ्या स्थळीं त्यांनीं केलेले तत्त्वज्ञानांचे उल्लेख, कथानिरूपण करतां करतांच वेदांतांतील योजलेलीं सार्थ व सुंदर रूपकें, यांवरून आणि 'हस्तामलक' 'स्वात्मसुख' 'शुकाष्टक' 'आनंदलहरी' वगैरे स्फुटप्रकरणांवरूनहि प्रतिभा आणि पांडित्य हीं दोन्हीं त्यांच्या ठिकाणीं किती मोठ्या प्रमाणांत वास करीत होतीं याचा प्रत्यय येतो. परंतु एकनाथांचें श्रेष्ठत्व यांतच आहे कीं, त्यांनीं आपल्या पांडित्याचा उपयोग "बहुजनहिताय, बहुजनसुखाय" केला. **श्रीभागवत आणि भाषे मऱ्हाठें । हें बोलणें नवल वाटे । पूर्वी नाहीं ऐकिलें कोठें । अभिनव मोठा मिठावा केला ।। माझें आवडवाणें बोलणें । कलाकुसरी कौतुक नेणें ।।**

सर्वसामान्य जनांची मऱ्हाठी भाषा, सामान्य लोकांत रूढ असणारीं प्रकरणें आणि भारुडें, परंपरेनें समाजदेहांत मुरलेल्या रामायण-भागवतांतील लोकप्रिय कथा आणि कथानकें यांचा त्यांनीं पुरस्कार केला

आणि तो पुरस्कार केवळ ग्रंथ, कीर्तनें आणि आख्यानें एवढ्यापुरताच मर्यादित ठेवला नाही, आचरणांत उतरविला. "यद्यपि शुद्धं लोकविरुद्धं नाकरणीयं नाचरणीयं" या सोयीच्या तत्वाचा त्यांनीं अंगीकार केला नाहीं. निंदा, अपवाद, छळ, गैरसमज, प्रसंगीं शारीरिक क्लेशहि सहन करून कर्मठपणाचा तत्कालीन गडडा मानल्या गेलेल्या ब्राह्मण जातींत जन्मलेल्या या संतानें, उन्हांत व्याकुळ झालेल्या गाढवाला गंगेचें पाणी पाजून, महाराच्या पोराचा शेंबूड काढून, वेश्येच्या घरीं जाऊन, ब्राह्मणभोजनाचें अन्न महारांस वाढून तत्त्व आणि आचार, प्रपंच आणि परमार्थ यांचा उत्कृष्ट समन्वय घालून दिला. त्याचा परिणाम तत्कालीन समाजावर क्रांतिकारक रीतीनें झाला असला पाहिजे. एरव्ही नंतरच्या पन्नास वर्षांतच स्वराज्य-संरक्षणासाठीं ब्राह्मण, प्रभू, मराठे, महार आणि मुसलमान यांना एकत्र आणण्याच्या शिवाजीमहाराजांच्या योजनेला एवढें सुलभ यश कदाचित लाभलें नसतें. एकनाथांचें हें कार्य किती बिकट होतें याचा प्रत्यय त्याचा प्रत्यक्ष मुलगा हरिपंडित यानें, त्यांना सतत केलेल्या तीव्र विरोधावरून नीट येतो.

अशा रीतीनें एकनाथांनीं "विष्णुमय जग, वैष्णवांचा धर्म, भेदाभेदभ्रम, अमंगळ" असें केवळ तोंडानेंच म्हणून न थांबतां कृतीनेंहि मनुष्य व पशु ब्राह्मण व चांडाळ, स्त्री व पुरुष, यांत एकच परमात्मा वास करून राहिला आहे आणि त्याच्या साक्षात्काराचें सुलभ साधन भक्ति हेच आहे, ती करीत असतांना व्यवहाराचा त्याग न करतां तो परमार्थभावानें करावा हें सिद्ध करून भागवतधर्माचें एक मोठेंच कार्य केलें. आज आपण अशा परिस्थितींत आहों कीं जींत आपल्याला या समताधिष्ठित भागवतधर्माची फार आवश्यकता आहे. कोणी तरी ऊर्ध्वबाहु होऊन उच्चैःस्वरानें या धर्माचें रहस्य सांगण्याची व "स्वे स्वे कर्मण्यभिरतः संसिद्धिं लभते नरः" असें बजाविण्याची वेळ आलेली आहे. अशा वेळीं एकनाथदर्शनाचें महत्त्व केवढें आहे हें सांगण्याची आवश्यकता नाहीं. या ग्रंथानें एकनाथांच्या तत्त्वाचा प्रसार आणि वाङ्मयाची आवड समाजांत निर्माण झाली तर तें फार मोठें कार्य होणार आहे.

---

# श्रीएकनाथांचें अवतारकार्य ●●●

कै. श्रीमंत भवानराव श्रीनिवासराव पंडित,
पंत प्रतिनिधी, बी. ए., सी. बी. ई.,
राजेसाहेब औंध.

ज्याप्रमाणें शंकराचार्यांचा अवतार योग्य वेळीं होऊन ढिल्या पडलेल्या भारतीय संस्कृतीच्या नौबती पुन्हां झडूं लागल्या त्याचप्रमाणें श्रीएकनाथ महाराजांच्या अवतारकार्यामुळें महाराष्ट्रांत चैतन्यशक्तीचा उदय झाला, माउली ज्ञानेश्वरमहाराजांनीं संस्थापित केलेल्या भागवतधर्ममंदीर--चळवळीला सप्तरंगांचा प्रकाश मिळाला.

श्रीएकनाथांचें अवतारकार्य महाराष्ट्राच्या दृष्टीनें अत्यंत मोलाचें आहे. शिवबांच्या महाराष्ट्राच्या आणि तुकोबांच्या भागवतधर्ममंदिराच्या कळसउभारणीच्या पार्श्वभूमीला श्रीएकनाथ कारण आहेत यांत तिळमात्र शंका नाहीं.

महाराष्ट्राची पावन मनोभूमि श्रीएकनाथांनीं तयार केली. मुक्तेश्वर रामदास, शिवबा, तुकाराममहाराज यांनीं त्याच महाराष्ट्रमनोभूमींत पेरणी, मशागत करून महाराष्ट्राचें 'आनंदभुवन' बनवलें. ज्या वेळीं महाराष्ट्रांत स्वराज्याची आणि भागवतधर्ममंदिराच्या कळसाची उभारणी झाली त्या वेळीं समर्थ रामदास म्हणाले, "आतां स्नान संध्या करायला भरपूर पाणी झालें." याचा अर्थ मनाच्या पावनतेसह आपापलें कर्तव्यकर्म करण्यास महाराष्ट्र मुक्त झाला.

महाराष्ट्राच्या वनवासांतून कर्तव्यशक्तीचा उदय होण्यास एकनाथांचें अवतारकार्य उपयोगी पडलेलें आहे. आजच्या जगाला, भारताला, आणि महाराष्ट्राला सध्यांच्या दारुण अवस्थेंतून आपली सोडवणूक करून घ्यायची असेल तर एकनाथांच्या रोकडया आणि विशाल विधायक मार्गाचा अवलंब करावा लागेल. "नामाचेनि बळें तरीजे संसार" असें निवृत्ति-

-नाथांनीं नाथसंप्रदायगुह्य, श्रुतीसारख्या विचारांत सांगून ठेवलें. या नाथ-
-गुह्यसंदेशाची संगती ज्ञानोबांनीं लावली; आणि तिचा प्रसार नाथांनीं
आपल्या आध्यात्मिक शक्तीनें केला.

संत भानुदासाच्या दिव्य वंशांत नाथांचा जन्म झाला. ते स्वतःच सांगतात, "**मी जन्मलों धन्य वंशीं । म्हणोनि हरिभक्ति आम्हांसी । संत सोयरे निज सुखांसी । वंश कृष्णासी निरवला ॥**" (रुक्मिणीस्वयंवर.) श्रीएकनाथांसारखे अवतारी संत जन्माला यावे लागतात, ते जन्मत नसतात. बालपणापासूनच आपण कशाकरतां जन्माला आलों, हें ध्यानांत धरून त्यांची आपल्या अवतारकार्याला सुरवात असते.

वयाच्या १३ व्या वर्षी देवगडास गुरुगृहीं जाऊन नाथांनीं जनार्दन स्वामींच्यापासून आपल्या अवतारकार्यास आरंभ करून गुरुजींचा महा-
-प्रसाद आणि आज्ञा मिळविली.

प्रपंच आणि परमार्थ जुळणें शक्य नाहीं असा जो गैरसमज होता तो घालवून, नाथांनीं आपल्या घरीं ऐहिक आणि पारमार्थिक साम्राज्य निर्माण केलें. नाथांचें गृहसौख्य आणि आध्यात्मिक महानंद अभ्यासिला म्हणजे त्यांची भव्यता आणि दिव्यता कळून आल्याखेरीज रहात नाहीं. भागवत संतांनीं निवृत्तिवादच शिकवला या अज्ञान समजुतीला नाथांचें जीवनचरित्र आणि अवतारकार्य योग्यपणे उत्तर देण्यास समर्थ आहे.

"Home is sweet – and only sweet – where there's one we love to meet!" "Home is where the heart can bloom, where there's some kind lip to cheer it!"

या इंग्रजी कवीला जें गृह हवे आहे, ज्याची त्याला तहान आहे, अगदीं तसेंच नाथांचें गृह आणि त्यांतील सुख होतें!

नाथांच्या घरून आला अतिथी कधींही उपाशी पोटीं परतला नाहीं. बौद्धिक, अध्यात्मिक, आणि व्यावहारिक तृप्ति नाथांच्या घरीं होत असे. त्याची पाणपोईच त्यांनीं उभारली होती. "कोणीही या आणि तृप्त व्हा," असें त्यांचें महाराष्ट्राला आणि भारताला आव्हान होतें. नाथांचा गृहस्थाश्रम अनुपम्य आहे. जगातील कोणत्याहि प्रेषिताच्या घरीं असा

संगम घडून येणें शक्य नाहीं. नाथांच्या घरांतला कण न् कण सुखी, ईश्वरभक्त, आणि रामनामानें प्रेरित होता. " **नलगे जावे वनांतरां। सुखें येतो घरा नारायण,** " याचे प्रात्यक्षिक म्हणजे नाथांचा गृहस्थाश्रम आणि त्यामधील पारमार्थिक वैभव त्यांनी उघडे वैकुंठपीठ पैठणला आणले होतें.

" अद्वय भजनें अखंड स्मरणे वाजवि करताली " , या भागवत-साधनेची राजधानी पैठण होती. ज्ञानेश्वरी, भागवत, रामायण, महाभारत, या ग्रंथांतील दिव्य तत्त्वज्ञानाचा प्रसार नाथांनीं महाराष्ट्राच्या कानाकोपऱ्यांतून केला. ज्ञानदेवाच्या समाधीनंतरचे उरलेलें महत्कार्य एकनाथानी पुरे केले. ज्ञानोबांच्या ज्ञानेश्वरीचा अवतार म्हणजेच एकनाथ असे वाटल्यावांचून रहात नाहीं.

नाथांचे भागवत आणि रुक्मिणीस्वयंवर हे दोनच ग्रंथ जगाला शांतीची साधना देण्यास समर्थ आहेत. श्रीज्ञानदेवाच्या अद्वय तत्वज्ञानाचा बिंदू न् बिंदू या दोन ग्रंथांतून उतरलेला आहे. सारेच वाङमय त्यानें ओथंबलेले आहे. पण या दोन ग्रंथांतून त्याचे स्पष्ट प्रतिक पहाव-यांस सांपडतें.

रुक्मिणीस्वयंवर तर अनुपम्य ग्रंथ आहे. ते मराठी भाषेतील एक श्रेष्ठ महाकाव्य आहे. कालीदासाच्या शाकुंतलानें जगाला मोहिनी घातली. जगांतील पंडित शाकुंतल घेऊन नाचलें त्याचप्रमाणे रुक्मिणीस्वयंवर आहे. नाथभागवताची तर योग्यता श्रेष्ठच आहे. जगताला मानवधर्माची आठवण करून देण्याची शक्ति त्यामध्यें आहे. जगांतील सर्व विद्यापीठांतून हा ग्रंथ अभ्यासिला गेला तर भावी जगाचे डोळे खाडकन् उघडतील, हजारों वर्षांची धुंदी साफ धुऊन निघेल. महाराष्ट्राच्या घराघरांतून नाथवाङमयाचा प्रसार आणि अभ्यास झाला तर महाराष्ट्राची मनोभूमि पुन्हा एकदां पावन होईल. २० हजार ओवीसंख्येचा हा ग्रंथ म्हणजे अध्यात्मज्ञानाचें हृदय आहे.

नाथांच्या चाळीस हजार ओवीसंख्येच्या भावार्थरामायणांत नाथांच्या अशा २५ हजार ओव्या आहेत. नाथांचें रामायण म्हणजे मराठी भाषेतील रामायणाचा अवतारच आहे. चतुःश्लोकी भागवत, शुकाष्टक,

स्वात्मसुख, आनंदलहरी, गीतासार, आनंदानुभव, अभंगगाथा, भारुडें, इत्यादि अमोलिक ग्रंथांतून नाथांनीं आपल्या अवतारकार्याची सिद्धी साठ-वलेली आहे.

ज्ञानेश्वर, एकनाथ, मुक्तेश्वर, रामदास, छत्रपति शिवबा; यांनीं महा-राष्ट्राचीं उज्वल अभ्युदयमूर्ति घडवली. चार-पांचशे वर्षांच्या अवधींत या-संतसत्पुरुषांनीं महाराष्ट्राच्या आत्म्याची उंची वाढवली. "Kingdom of God is within you" "तुझें आहे तुजपाशीं" "सर्वांभूतीं भगवत्-भाव" या भागवत तत्त्वज्ञानाचा जयजयकार म्हणजेच नाथांचें अवतारकार्य.

अभ्यासकर्त्याला नाथांच्या अवतारकार्यावर विशाल चिंतन करतां येईल. त्याचा जीवनसंदेश महाराष्ट्रानें आपल्या अंगीं मुरवून घेतला तर स्वतःचा उद्धार, स्वतःच्या मायभूचा उद्धार आणि जगदुद्धार या गोष्टी अवश्य साधतील.

श्रीएकनाथांच्या अवतारकार्याचा घराघरांतून प्रसार होऊन महा-राष्ट्राचा उद्धार व्हावा, अर्जुनासारखा मोहित महाराष्ट्र नाथांच्या अवतार-कार्यानें खडबडून जागा व्हावा अशी आमची जगदंबेच्या चरणीं नम्र प्रार्थना आहे.

॥ श्रीजगदंबार्पणमस्तु ॥

———

# नाथदर्शनच कां ? ● ● ●

श्री. फूलचंद गांधी,
आरोग्य-मंत्री हैदराबाद राज्य

'श्रीनाथदर्शन' प्रकाशित करण्याचें ठरलें. मराठवाड्यांत श्रेष्ठ संतांची व संतवाङमयाची विपुल निर्मिति झाली. परंतु या संतांची आणि संतवाङमयाची महति व आदर वाटूनसुद्धां त्या वाङमयाच्या उद्धाराकरतां अनेक कारणांमुळें आतांपर्यंत आम्हांला कांहींच करतां आलें नाहीं. गेली राजवट पुष्कळ अंशीं यास जबाबदार असली तरी आपल्या समाजाची उदासीनताहि एक प्रबल कारण आहे हें निश्चित. कालमानपरत्वें मराठवाड्याची मागासलेली स्थिति लक्षांत घेऊन धर्म, भाषा, समाज आणि शिक्षण यांच्या वाङमयीन अभ्युदयासाठीं येथील अभ्यासू वर्ग सिद्ध झाला व त्यानें श्रीनाथदर्शनाचें अत्यंत महत्त्वपूर्ण असें काम हातीं घेतलें हें निःसंशय कौतुकास्पदच नव्हे तर अभिमानास्पद होय.

मराठी वाङमयाच्या मानेभोंवतीं पडलेला आत्मविनाशी 'विस्मृतीचा' विळखा प्रस्तुतच्या श्रीनाथदर्शनानें सुटून जावो हीच माझी नाथचरणीं प्रार्थना आहे.

'नाथदर्शना' सारख्या ग्रंथांत लिहिण्याचा माझा अधिकार नाहीं. परंतु चिटणिसांच्या आग्रहामुळें व नाथांच्या सेवायज्ञांत एखादें दूर्वादल समर्पण करण्याचें भाग्य लाभतें आहे या श्रद्धेमुळें यथामति दोन शद्ब लिहिले आहेत. या लिखाणाचें सर्व श्रेय श्री. पोहनेरकर यांनाच आहे.

साहित्य, धर्मसेवा आणि ईश्वरभक्ति या गुणांत नाथांचा अधिकार मोठा होता हें सर्वांना विदितच आहे. या गुणांशिवाय 'सत्य आणि शांति' या दिव्य तत्त्वांचा स्वैर विलास त्यांच्या जीवनांत पहावयास मिळतो. "बोले तैसा चाले," ही मराठीच्या साहित्यिक परंपरेची दिव्य कसोटी आहे. गुरु

मार्गानें ठसलें आणि अनुभवाला पटलें कीं आचाराचा विडा उचलून तत्त्व-निष्ठेनें ती पैज जिंकायची हा नाथांचा बाणा ! 'सर्वांभूतीं परमेश्वर' ही अतिमानवता चित्तांत ठसल्यावर अस्पृश्याचें पोर काय, राणू महार काय, आणि वेश्या काय ! तिथें भेदाभेद नाहीं. जनतेच्या जीवनाशीं एकरूप होऊन आयुष्याच्या शेवटच्या क्षणापर्यंत सत्य, शांति आणि प्रेम यांची आचारनिष्ठ तपस्या चालू ठेवणें एक महादिव्य आहे.

आजच्या मतामतांच्या गलबल्यांत, भाषाधर्मांच्या संघर्षांत नाथांच्या जीवनांतील सत्य, शांति आणि प्रेम यांचा संदेश जनतेनें पुन्हा एकदां ऐकण्याची व आचरण्याची आवश्यकता आहे. आम्ही आपली जुनी मराठी विसरत चाललों. तींत असलेला जिव्हाळा आपणांस पचवितां आला नाहीं. श्रीनाथदर्शनानें हें कार्य होईल असें मला खात्रीनें वाटतें.

व्यवहार, धर्म, परलोक कोणत्याही क्षेत्रांत नाथांच्या जीवनाचा हाच दिव्य संदेश आपण सर्वांनीं आचरणांत आणावयाला हवा आहे. आदर्श गृहस्थ म्हणून, आचारनिष्ठ कर्मयोगी म्हणून, क्रियावान् वेदान्ती म्हणून कोणत्याही दृष्टीनें नाथांचा अधिकार मोठा आहे.

सध्यांच्या विस्कळित परिस्थितींत जनतेच्या योग्य मार्गदर्शनासाठी नाथांसारख्या महानुभावांच्या वाङमयाची अत्यंत आवश्यकता आहे. या सर्व दृष्टींनीं पाहतां श्री. पोहनेरकर आणि त्यांचे सर्व सहकारी यांचा हा उपक्रम राष्ट्रीय ऐक्याला व भाषेच्या अभिवृद्धीला पोषकच होईल अशी मला आशा आहे, म्हणूनच ही फुलाची पाकळी या अपेक्षित ग्रंथांत गोवण्याकरितां वाहिली आहे.

---

# नाथदर्शन आणि महाराष्ट्रांतील थोर पुरुषांत नाथांचें स्थान ●●●

श्री. शिवाजी नरहर भावे,
सत्याग्रहाश्रम, वर्धा.

१. महाराष्ट्रांतल्या थोर पुरुषांमधील नाथांचें स्थान सांगणें ही कांहीं सोपी गोष्ट नव्हे. त्यासाठीं श्रीशंकराचार्यांनीं म्हटल्याप्रमाणें कवीची "क्रांतदृष्टि" पाहिजे; "शिवो भूत्वा शिवं यजेत्" अशी थोर योग्यता पाहिजे. ती योग्यता आणि दृष्टि नसली तरी लुळ्यापांगळ्या पायांनीं कां होईना नाथदर्शनाला जाण्यामध्यें कोणत्याहि तऱ्हेचा दोष नाहीं. "My master as I saw him," या भगिनी निवेदितांच्या दृष्टीप्रमाणें आपणहि आधीं नाथाचें स्थान नक्की करून थोडक्यांत त्यांचे दर्शन घेऊं.

२. भारतवर्ष ही थोर पुरुषांची किंवा संतांची भूमि मानली जाते. वस्तुतः प्रत्येक देश ही संतांचीच भूमि आहे. आजपर्यंत अनेक देशांत हजारो राजे, अधिकारी आणि साम्राज्यें झालीं; परंतु या सर्वांची कोणत्याहि देशांत शाश्वत छाप पडलेली दिसत नाहीं. संतांची सत्ता मात्र लोकांच्या हृदयावर अव्याहत चालत आलेली आहे. प्रत्येक देशाची ही स्थिति आहे, तर भारतवर्ष संतांची भूमि मानण्यांत स्वारस्य काय? "दुर्लभं भारते जन्म" असें कां म्हणावयाचें? या प्रश्नांना उत्तरें आहेत. इतर कोणत्याहि देशाच्या संस्कृतीपेक्षां भारतवर्षाची संस्कृति प्राचीन आणि तशीच अव्याहत चालत आलेली आहे. त्यामुळें पुरातन अनुभवाचा सांठा इतर देशांपेक्षां भारतवर्षांत अधिक आहे. त्यामुळे येथल्या लोकांना त्या सांठयाचा उपयोग करण्याची सहजपणेंच अधिक संधी मिळते, आणि त्या संधीचा लाभ घेऊन भारत-वर्षांत संतांची इतर देशाच्या मानानें अधिक निपज होते. भौतिक शोधांच्या बाबतींत पाश्चात्य देश भारतवर्षाच्या शेंकडों पट पुढें निघून गेले आहेत, तरी संतांच्या बाहुल्याच्या दृष्टीनें कोणताहि देश भारतवर्षाची बरोबरी करूं

शकला नाहीं, याचें कारण हेंच. लहान मुलांपेक्षां वृद्धांना अनुभव जास्त असतो; त्यांतलाच हा प्रकार आहे. या दृष्टीनें उत्तर हिंदुस्थानांतला नाभा-जीचा किंवा महाराष्ट्रांतला महिपतीचा संतचरित्रपर ग्रंथ, हे आपल्या देशांतील संतचरित्राचे आविष्करण करणारे अत्यल्प आणि पुष्कळच अपूर्ण प्रयत्न म्हटले पाहिजेत.

३. या भारतवर्षांतील संतमालिकेंत महाराष्ट्रानें कांहीं थोडीथोडकी भर घातलेली नाहीं. याचेंहि कारण महाराष्ट्राजवळ पुरातन अनुभवाचा सांठा अधिक आहे हेंच होय. आर्यलोक उत्तर ध्रुवाकडून उतरत उतरत भारतवर्षांत आले, हे लोकमान्याचे मत आता जवळजवळ सर्वमान्यच मानलें जातें. आर्यलोक इतके दूर आल्यामुळें त्यांनी आपली परमोच्च संस्कृति जिवाप-लीकडे जपून ठेविली. परंतु भारतवर्षांत आल्यानंतर उत्तरेकडच्या भागांत वारंवार आक्रमणें होऊन आर्यांची परमोच्च संस्कृति दक्षिणकडे अधिक सुरक्षित राहिली. उत्तरेकडच्या लोकांत आचार, विचार, उच्चार, पोषाख प्रत्येक बाबतींत अनेक स्थित्यंतरें झालीं. पाणिनी "म्लेच्छ् अस्पष्टे शब्दे" हा धातु देतो. त्यांत निव्वळ अस्पष्ट उच्चारानेच तो म्लेच्छत्व प्रतिपादन करतो. ह्यावरून भारतीयांचा आचारविचारउच्चारावर केवढा कटाक्ष असेल तें दिसून येतें. आजहि महाराष्ट्रीयांचे उच्चार इतरांच्या मानानें — विशेषतः ब्राह्मणांचें — अधिक स्वच्छ आहेत; आचारविचारहि वैदिक पूर्वसंस्कृतीची छटा तुलनेनें ज्यास्त दाखवितात. उत्तमांतली उत्तम संस्कृति घेऊन उत्तरेकडून जी मंडळी आली, तिचें दक्षिणेकडचें शेवटचें टोंक म्हणजे महाराष्ट्र. महाराष्ट्राखालींहि द्रविड देशांत आर्यसंस्कृति पसरली. परंतु द्रविडांची भाषा, त्यांचा पोषाख, आहारविहार मूलतःच भिन्न असल्या-मुळें त्यांना वैदिक संस्कृतीचा सांठा महाराष्ट्राप्रमाणें पूर्णतः आपल्यांत समावून घेतां आला नाहीं. तरी उत्तर हिंदुस्थानापेक्षां आर्यसंस्कृति द्राविडा-मध्येंहि अधिक प्रमाणांत दिसून येते. महाराष्ट्रांत संतमालिकेचें आधिक्य असण्याचें हें कारण आहे. याचा अर्थ असा नाहीं कीं, भारत-वर्षांतील इतर प्रांतांत संत कमी झाले. द्राविड प्रांतांत तर आचार्यांची तेजस्वी परंपरा निर्माण झाली. तथापि निवृत्ति — ज्ञानदेव — सोपान — मुक्ताबाई — एकनाथ — नामदेव — तुकाराम — रामदास ही जी एकसारखी,

एकधोरणी मालिका आणि तिचा नैतिक आध्यात्मिक आणि एकंदर जीवनविषयक परिणाम, तो बऱ्याच अंशाने महाराष्ट्राच्या बाबतींत अपूर्व म्हणावा लागेल यांत शंका नाही.

४. जगांतील थोरपुरुषांत भारतवर्षाचें सर्वश्रेष्ठ स्थान, आणि भारतवर्षांत संतांच्या बाबतींत महाराष्ट्राचें विशिष्ट स्थान, ह्याचें कारणांसह किंचित् दिग्दर्शन झालें. आतां महाराष्ट्रांतील थोर पुरुषांत नाथांचे स्थान, पहावयाचें. थोरपुरुषांचे प्रकार चार -

(१) विभूतिमत्त्वानें.
(२) साधुत्वानें.
(३) सिद्धत्वानें.
(४) प्रचारकत्वानें.

एक किंवा अनेक अलौकिक गोष्टी ज्या व्यक्तीच्या ठिकाणीं उठून दिसतील ती व्यक्ति विभूतिमत्त्वाने थोर. जगांत जे जें कांहीं हितकारक, नीतिपोषक असेल त्या गोष्टीचा अगदीं साध्या तऱ्हेनें, कोणालाहि अनुकरण करतां येईल असा मार्ग ज्या व्यक्तीच्या ठिकाणीं प्रामुख्यानें दिसेल, ती व्यक्ति साधुत्वानें थोर. नैतिक, आध्यात्मिक व एकंदर जीवनशास्त्राचे सिद्धांत जिच्या ठिकाणीं जन्मतःच परिणत झालेले दिसतील ती व्यक्ति सिद्धत्वानें थोर. सिद्धांत, साधुता इ. गोष्टींचा विशेष तऱ्हेनें प्रचार करण्याची जिची भूमिका ती व्यक्ति प्रचारकत्वानें थोर.

५. थोर पुरुषांचे असे चार वर्ग पाडले तर महाराष्ट्रांत ज्ञानेश्वर हे सिद्धत्वानें थोर ठरतात. ते स्वयंसिद्ध आचार्यांसारखे भासतात. त्यांच्यांत विभूतिमत्त्वहि असामान्य होतें. त्यांच्या ज्ञानेश्वरीच्या प्रचारानें असामान्य प्रचारकत्व सिद्ध होतें. त्यांच्या साधुत्वाविषयीं तर बोलावयासच नको. परंतु ह्यांत त्यांचें वैशिष्टय नाहीं. **मोटकी देहाकृति उमटे । आणि निजज्ञानाची पहाट फुटे । सूर्यापुढें प्रकटे । प्रकाश जैसा ॥** ही त्यांची सिद्धदशा हेंच त्यांचें वैशिष्टय. मोरोपंतांची ती प्रचंड पाऊण लाख कविता, भाषा वाकविण्याचें तें सामर्थ्य, ती शब्दशक्ति पाहून मन थक्क होतें. या बाबतींत त्यांचें विभूतिमत्त्व तेव्हांच कबूल करावें लागतें. म्हणजे त्यांत साधुत्व नव्हतें अगर

थोरपणाचे इतर प्रकार नव्हते असें नाहीं. पण काव्यविभूतिमत्त्व हेंच त्यांचें वैशिष्टय. तुकारामाच्या त्या साधनांच्या नाना अवस्था, ते थेट हृदयाला भिडणारे अभंग, त्यांची, '**भले तरी देऊं कासेची लंगोटी । नाठाळाचे काठी देऊं माथा.**' ही विशिष्ट वृत्ति पाहिली म्हणजे ते जरी साधु होते, तरी त्यांचीं साधनें सहज अनुकरणीय नव्हतीं हें तेव्हांच लक्षांत येतें. तीच गोष्ट समर्थांची. समर्थांचें वैशिष्टय त्यांच्या प्रचारकत्वाच्या भूमिकेंत आहे "ज्ञान्याचा एका आणि नाम्याचा तुका" ही म्हण प्रसिद्ध आहे. तींत बराच अर्थ आहे. नामदेवाच्या उलट परंतु अनुकरणीय साधनेची तुकाराम ही परिणति आहे. याच्या उलट ज्ञानेश्वरांच्या सिद्धांताची एकनाथ ही सर्वसुलभ व सर्वानुकरणीय अशी साधना आहे.

(१) **जीवनचे अनुभवसिद्ध सिद्धांत = ज्ञानेश्वर**
(२) **जीवनसिद्धांतांची अनुकरणीय साधना = एकनाथ**
(३) **जीवनसिद्धांतांची उत्कट एकांतिक साधना = नामदेव तुकाराम**
(४) **जीवनसिद्धांतांचा प्रचार = रामदास**

अशी ही साखळी आहे. ह्या सर्व प्रकारानी महाराष्ट्राचे खरें जीवन बनलेलें आहे. ह्यांत विरोध कोठेंच नाहीं. उलट परस्परपूरकता मात्र परिपूर्ण भरली आहे. ज्ञानेश्वरांच्या सिद्धांतास नाथाच्या सुलभ साधनमार्गानें पूरकत्व आलें आहे तर नाथांच्या साधनेंतील सरळ, नागर उपवनाला नामदेवतुकारामांनी अरण्यातल्या निर्द्वंद्व शोभेची जोड आणून दिली आहे. या सिद्धांतसाधनेचा प्रचार करण्याचा हव्यास समर्थांना लागलेला आहे. अशा तऱ्हेचें महाराष्ट्रांतल्या संतपरंपरेचें हें वैशिष्टय, ही सांखळी, ही परस्पर-पूरकता, अन्यत्र इतक्या प्रमाणांत पहावयास मिळत नाहीं.

६. एकंदर महाराष्ट्रांतल्या थोर पुरुषांत, संतमालिकेंत नाथ कोठें बसतात हें पाहिलें. नाथाच्या चरित्राच्या अगदी वरवरच्या स्थूल बाबींवरुनहि हें नाथांचें स्थान सहज लक्षांत येण्याजोगें आहे नाथांचें आयुष्य ब्रह्मचर्य, गार्हस्थ्य, वानप्रस्थ, अशा सर्वसामान्य धाटणीनें चाललेलें दिसतें. हरिजनांना भोजन, गाढवावर तीर्थोदक, अंत्यजाचे मूल कडेवर घेणें इत्यादि त्यांच्या आयुष्यांतल्या गोष्टींवरून त्यांची लोकसेवेचीं साधनें किती उपयुक्त किती साधीं, किती अनुकरणीय होतीं तें दिसून येतें. नाथांचा मुख्य ग्रंथ

म्हणजे भागवताच्या एकादशस्कंधावरील टीका. भगवत्‌गीता आणि भागवताचा एकादशस्कंध ह्यांतला फरकहि ज्ञानेश्वर आणि नाथ यांच्या फरकासारखाच आहे. गीतेंत वैदिक धर्माचे सर्व सिद्धांत साररूपानें आलेले आहेत. एकादशास्कंदांत सिद्धांतांपेक्षां साधनांचा भाग अधिक आहे, हें वरवर पहाणाऱ्याच्याहि लक्षांत येईल. नाथांची भूमिका ज्ञानेश्वरांप्रमाणें सिद्धाची नसल्यामुळें त्यांनीं स्वाभाविकच आपल्या भूमिकेप्रमाणें एकादश-स्कंदावर टीका लिहिली. नाथभागवतावर ज्ञानेश्वरीची इतकी छाप असूनहि नाथांच्या भाषेंत अतिशय साधेपणा आहे. साधुत्व आणि साधेपणा ह्या अविभाज्य वस्तु आहेत. सर्वांना अनुकरणीय अशा साधुतेची भूमिका असल्यामुळे अपरिहार्यपणें नाथांची भाषा अगदीं साधी बनली आहे. नाथ कांहीं कमी विद्वान होते असें नाहीं. नाथांनीं आपले ग्रंथ मराठींत लिहिले त्याचें तरी कारण काय? मराठी भाषेच्या अभिमानामुळें त्यांनीं आपले ग्रंथ मराठींत लिहिले, असेहि कित्येक म्हणतात. पण वस्तुस्थिति तशी नाहीं. लोकांची सरळ साधी भाषा म्हणून त्यांनीं मराठींत लिहिलें. ते जर बंगाल किंवा गुजराथमध्यें असते तर त्यांनीं बंगाली किंवा गुजराथीहि लिहिले असतें. नाथांनीं हिंदींत लिहिलें आहे, त्याचेंहि कारण हेच. हिंदुस्थानभर सर्वसामान्य हिंदी समजतें, म्हणून त्यांनीं हिंदींतहि कांहीं रचना करून ठेवली.

नाथांचे महाराष्ट्रांतील थोर पुरुषांतील महत्त्वाचें स्थान पाहिल्यानंतर आतां त्यांचें अगदीं थोडक्यांत दर्शन घेऊं. **'एवं पाहतां चहूंकडे । तुझेंचि स्वरूप जिकडे तिकडे'** (नाथ भाग० १३७) हा वैदिक धर्माचा सर्वत्र भगवद्व्याप्तीचा प्रथम सिद्धांत नाथांनीं सतत डोळ्यापुढें ठेवला होता. ह्यामुळे **"जें जें देखती जे जे ठायीं । तें तें तुजवांचूनि आन नाहीं । ऐसा सर्वत्र चरण पाहीं । ठायींचा ठायीं पूजिला ॥"** (नाथ भाग० १३८) मनुष्य-पशु गरीब-श्रीमंत, सुष्ट-दुष्ट, स्पृश्य-अस्पृश्य कोणताहि विचार न करतां, भूतमात्रांची अहिंसामय मार्गानें सेवा करण्याचा दुसरा सिद्धांत त्यांनीं जीव-नांत उतरवला. भूतमात्राची सेवा करूनच नाथ थांबले नाहीत. **"जो जो जयाचा घेतला गुण । तो तो म्या गुरु केला जाण ॥ गुरूसी आलें अपारपण । जग संपूर्ण गुरु दिसे ॥"** (नाथ भाग० १४१) हीं

नाथांनीं सर्वांपासून बोध घेण्याची दृष्टि ठेवली. हा बोध घेऊन, पूर्वसंतांच्या ग्रंथांचें त्यांनीं परिशीलन केलें. तद्वारा कीर्तनप्रवचनादींच्या साधनांनीं त्यांनीं लोकशिक्षणाचेंहि कार्य केलें. भजनपूजन, ध्यानधारणा, जपअनुष्ठान इत्यादि साधनद्वारे त्यांनी भक्तीचीहि उपासना केली.

(१) सर्वत्र भगवद्‌व्याप्तिदर्शन = आत्मचिंतन
(२) भूतमात्राची अहिंसामय मार्गानें सेवा = कर्मयोग
(३) ज्ञानग्रहण = गुरुदर्शन
(४) लोकशिक्षण = शिष्यवात्सल्य
(५) भक्ति = सर्वोद्धारसाधन

— नाथाचे हे पंचविध दर्शन आणि महाराष्ट्रांतील थोर पुरुषांमधील त्याचें विशिष्ट स्थान पाहिले म्हणजे स्वाभाविकपणेंच भागवतांतील पुढील उद्गार उदित होतो :—“यानास्थाय नरो राजन् न प्रमाद्येत कर्हिचित् धावन्निमील्य वा नेत्रे न स्खलेन्नपतेदिह ॥ [ भाग. २/३५ ]”

— — —

# श्रीएकनाथांचा पहिला ग्रंथ ● ● ●

श्री. वे. शा. सं. नारायणशास्त्री गर्गे,
पाथर्डी, जिल्हा नगर.

श्रीमद्भागवत, एकादशस्कंध, नवमस्कंध, रामायण आणि श्रीकृष्ण-चरित्रादि आध्यात्मिक प्रकरणें इ. गीर्वाण भाषांतर्गत गूढ वाङ्मय महाराष्ट्रीय संतांच्या ध्येयानुसार "**तेणें(एकनाथें)आबाळ सुबोधें। ओवीयेचेनि प्रबंधे**" **मऱ्हाठी भाषेंत** अवतरवून सुलभ आणि सकलोपयोगी केलें. या थोर कामा-मुळेंच देशी भाषेला ऊर्जितावस्था प्राप्त होऊन भागवतधर्मीय भक्तिमार्गाचें लोण जातगोताचा भेद न ठेवितां अगदीं वरच्या थरापासून खालच्या थरांत जाऊन पोंचलें. अशा प्रभावी आणि विशाल वाङ्मयनिर्मितीचा 'श्रीगणेशा' नाथांनीं केव्हां, कोठें, कसा केला असेल? इत्यादि प्रश्नांचा उलगडा नाथांच्या तीर्थयात्रेंतील एका प्रसंगावरून होतो. तो प्रसंग नाथांनीं चतुश्लोकी भागवताचे शेवटीं, ओव्या १०१८ ते १०२४ यांत वर्णिला आहे. त्याचा सारांश 'सद्गुरु जनार्दनस्वामी आणि शिष्य एकनाथ हे देवगिरीहून तीर्थयात्रा करण्यास निघाले. अगोदर नासिक त्र्यंबकेश्वर हीं क्षेत्रें पहाण्याच्या हेतूनें प्रवास करीत असतां वाटेंत चांदवड गांवीं चंद्रभट्ट नामक ब्राह्मणाकडे हे उभयतां गुरुशिष्य एक रात्र वसतीस राहिले. चंद्रभट्ट हे आपले घरीं रात्रौ नित्यनियमें चतुश्लोकी भागवतावर स्वतः सुश्राव्य पुराण सांगत. त्या पुराणश्रवणाची संधी त्या गुरुशिष्यांना अनायासें मिळाली. तें पुराण ऐकून जनार्दनस्वामींना परमसंतोष वाटला आणि "**तेणें स्वानंदें गर्जोन। श्रीमुखें स्वयें जनार्दन। बोलिला अतिसुखावून। हें धर्णी गुह्यज्ञान देशभाषा** ॥ [च. भा. टी. १०२१]" त्या आनंदाच्या भरांत नाथाला उद्देशून जनार्दन उद्गारले, तुम्ही चतुश्लोकी भागवतावर मऱ्हाठी भाषेंत सुलभ आणि सुंदर अशी टीका लिहावी. हें गुर्वाज्ञेचे बोल कानीं पडतांच नाथांनीं त्याच वेळीं टीकारचनेचा संकल्प केला. नाशिकास

पोंचल्यावर नजीकच्या पंचवटीक्षेत्रांत त्यांनीं टीकारचनेस प्रारंभ केला. गुरुकृपेनें प्रबंधरचनेची स्फूर्ति आणि प्रतिभा प्राप्त होऊन नाथांनीं मराठी टीकेच्या ओनाम्याचा पहिला धडा आपल्या गुरुजीकडून येथेंच घेतला व ती चतुःश्लोकीभागवतटीकारूपानें तेथील वास्तव्यांत पूर्ण करून दाखविला. पंचवटींतील श्रीराममंदिरात जनार्दन प्रमुख श्रोत्यांपुढें स्वकृतटीकेवरून एकनाथ पुराण सांगूं लागले.

प्रवासांतील त्रास, तीर्थविधींची दगदग, नित्यकर्माची खटपट अशा अनेक अडचणींच्या परिस्थितींत असतांहि नाथांना ग्रंथरचनेचा सारखा निदिध्यास लागला असावा.ते स्वतःसांगतात कीं " **नित्यकर्म करितां ज्ञाण। ग्रंथींचें दिसे दिव्यज्ञान। मागें घालूनिया संध्यास्नान। ग्रंथार्थ पूर्ण प्रगटे पुढां ॥** " १०२८ (च. भा. टी.) जागृतींत, स्वप्नांत, ध्यानीं, मनीं चतुःश्लोकी टीकेचा विषय कोंदाटला होता.नित्यकर्माचाहि विसर पडण्या इतकी त्या विषयाशीं तन्मयता झाली तेव्हांच चतुःश्लोकीभावार्थाचें पहिलें सुंदर फळ त्यांच्या पदरीं पडलें हें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. श्रीव्यासप्रणीत भागवत स्कंध २ अध्याय ९ यांतील श्लोक ३२ तें ३५ या चार निवडक श्लोकांस **चतुःश्लोकी भागवत** म्हणतात. समग्र भागवताचा तात्विक निष्कर्ष चतुःश्लोकींत आलेला आहे. कोठे कोठे ३२ ते ३८ असे सात श्लोक घेऊन त्या सप्तश्लोकीस चतुःश्लोकी मानण्यांत येते, तर कोणी ३१ ते ३७ या सात श्लोकांचा तींत समावेश करितात. त्यात आरंभीचा १ व शेवटचे २ मिळून ३ श्लोक उपक्रमोपसंहारात्मक धरल्यास उर्वरित चतुःश्लोकी रहाते, ती मुख्य विषय होय. तींतही कांहीं सांप्रदायिकांनीं विवक्षित अर्थसंगतीस्तव मुळांतील श्लोकानुक्रम बदलला आहे. या चार किंवा सात श्लोकांपुरती टीका लिहून नाथ थांबले नाहींत. त्यांनीं स्कंध २ अध्याय ९ सबंध ४५ श्लोकांवर एकंदर १०३६ ओंव्यांची रचना केली; तींत चतुःश्लोकीवर १४० व सप्तश्लोकीवर ३५० ओंव्या आहेत. ४ किंवा ७ श्लोकींवरील ओंव्यांचें सरासरी प्रमाण प्रत्येकीं ३५ ओव्या पडतें. बाकी ३८ श्लोकांच्या सरासरीचें प्रमाण १८ पडतें. या अवांतर श्लोकांपेक्षां चतुःश्लोकींवरील नाथभाष्य विशेष भारदस्त आणि चित्ताकर्षक झालें आहे. त्यांत नाथांच्या प्रासादिक, ओजवती वाणीचा प्रभाव दिसून येतो. भा. स्कं २ अध्याय ९ हा चतुःश्लोकीच्या सांगोपांग

टीकेनें विस्तारिला आहे. त्यामुळें चतुश्लोकी या नांवानें सबंध ९ वा अध्याय ओळखला जातो. "**चतुश्लोकीचा मथितार्थ । तो हा प्राकृत ग्रंथ**" "**चतुश्लोकी गुह्यज्ञानार्थ । परमार्थें आथिला ग्रंथ**" । असें नाथांनीं अध्याय ९ व्या शेवटीं नमूद केलें आहे. यावरुन चतुश्लोकी व्याख्येची महती अध्याय ९ मध्यें सर्वत्र व्याप्त झाल्याचे निश्चित होतें.

भारतीय संस्कृतीच्या वाङमयक्षेत्रांत सारसंग्राहक किंवा मूलतत्वात्मक असे चार संख्येच्या समूहानें केलेले अनेक गट दिसून येतात. भारत, भागवत, इतिहास, नाटकादिकांतून अशा सांकेतिक चौकडयांची अनेक उदाहरणें दाखवितां येतील. चार वेद, चतुःसूत्री, चातुर्वण्य, चतुश्लोकीभागवत, चतुश्लोक भारत, सावित्रिस्तोत्र, पुरुषार्थचतुष्टय, देहचतुष्टय, विष्णुसहस्त्रनामांतील चतुर्वैशिष्ट नामें '**चतुर्मूर्तिश्चतुर्बाहुश्चतुर्व्यूहश्चतुर्गतिः**'। '**चतुरात्मा चतुर्भावश्चतुर्वेदविदेकपात्**' ॥ इ. इ. प्रत्येकाविषयीं विचार करण्यास येथें स्थलावकाश नसल्यामुळें, त्यांचा नामनिर्देशकरून चतुश्लोकी भागवताच्या अनुसंधानाकडे वळूं. '**यो ब्रह्माणं विदधातिपूर्वं**' '**ब्रह्मादेवानां प्रथमं संबभूव**' (मुंडक) परमेश्वरानें सृष्टि-उत्पत्तीपूर्वीं प्रथम ब्रह्मदेवास सृष्टि उत्पन्न करण्यासाठीं निर्माण केलें असें वरील श्रुतींत म्हटले आहे. तसेंच '**आदि कल्पाचिये आदीं । एकार्णव जलामधीं । ब्रह्मा झाला जड मूढ बुद्धि । सृष्टि सर्जन विधि स्मरेना** ॥ (एकनाथ च. भा. ३२ ) अशा कर्तव्यशून्य अर्थात मोहग्रस्त विधात्यास '**प्रपचनिर्माणविधिःकथंभवेत्**' सृष्टिनिर्माणकर्म कसें करावें ' तें कळेना. विरंचीची ही मूढावस्था ज्ञानेश्वरांनीं स्पष्ट सांगितली आहे '**पैं सृष्टीच्या उपक्रमा । पूर्वीं गा वीरोत्तमा । केला ऐसा ब्रह्मा । एकला होता** ( ज्ञानेश १७।२३७ ) '**मज ईश्वरातें नोळखे । ना सृष्टिही करूं शके ।**' या मूढावस्थेत त्यास ईश्वराची ओळख नव्हती. सृष्टि करण्यास असमर्थ असतां एकाएकी '**एकार्णवीं निकट जाण । व्यक्षरवचन (तपतप) द्विवार ऐके** ॥ [च. भा.] त्या परिव्याप्त जलाशयांतून तप तप, अशा दोन अक्षरी शब्दानें दोनदां आवाज झालेली ती दिव्य जलवाणी ब्रह्मदेवानें ऐकिली. त्या विध्यर्थक परमेश्वरी आदेशावर विश्वासून '**सतपोतप्यत**, ब्रह्मदेव तप करिता झाला. याप्रमाणे प्रदीर्घ काल '**सतपस्तप्त्वा सर्वं इदं असृजत**' [ श्रुति ], तपश्चर्या करून जगदुत्पत्ति

करिता झाला. त्या तपःसामर्थ्यानें भगवान आदि नारायण **प्रसन्न होऊन** ब्रह्मदेवाला सगुण निर्गुण स्वरूपांत त्यांनीं दर्शन दिलें व आपलें **परम** गुह्य ज्ञान उपदेशिलें. तें तात्विक ज्ञान व्यास **महर्षींनी** भा. स्कं. २ अध्या ९ श्लो. ३२ ते ३५ यांत चार श्लोकांनीं ग्रथित **केलें.** "**तें हें चतुःश्लोकी भागवत । स्रष्टयासी सांगे श्रीभगवंत**" ॥ ( च. भा. ४३० ) **असे** हरिविरिंचीसंवादात्मक चतुश्लोकीभागवत **म्हणून** अनेकवार उल्लेख आहेत. तथापि ह्यांत उभयतांचीं **प्रश्नोत्तरें नसून** केवळ भगवंतमुखीचा **ब्रह्मदेवांस** तो आदेश आहे. त्यांतील ज्ञान, शास्त्रीयज्ञान, विज्ञान, निस्त्रैगुण्य, सत्, असत्, एकमेव ऋत, सत्य, भक्ति, माया, प्रविष्टा-प्रविष्ट, कार्यकारण, अन्वयव्यतिरेक इ. आध्यात्मिक शास्त्रीय संज्ञा सोप्या मऱ्हाठी भाषेत पहाणें असेल तर नाथकृत चतुश्लोकी भागवतावरील **टीकेंत** पहावयास मिळतील. श्रीमद्भागवत ग्रंथ, भागवत सांप्रदाय ( भक्ति ) **यांचा** नित्य समवाय संबंध असतो. "**तें हें कल्पादि भक्ति मियां । भागवतमिषें ब्रह्मया । उत्तम म्हणोनि धनंजया । उपदेशिली.** ( ज्ञानेश्वरी ) या **ओवींत** भागवतग्रंथरूपानें कल्पारंभीं ब्रह्मदेवास भगवंतानीं परमभक्ति **उपदेशिली** असें ज्ञानेश म्हणतात. यावरून श्रीभागवताच्या **बीजभूत चतुःसूत्रींत** ( चतुश्लोकींत) भक्तीचा संबंध यावयास पाहिजे तसा तो कोठे दिसत **नाहीं.** परम गुह्य ज्ञानाचाच उपदेश स्पष्ट दिसतो. परंतु ही कमतरता **नाथांनीं** चतुश्लोकींतील चौथ्या श्लोकावरील '**अन्वयव्यतिरेकाभ्याम्**' या **पदाच्या** व्याख्येंत पूर्णपणे भरून काढिली. "**ऐशिया अन्वयस्थिति । भावें करितां भगवद्भक्ति । मी परमात्मा सर्वभूतीं । भजता माझी प्राप्ति मद्भक्ता-सुगम** ॥ ( च. भा. ५८५. ) '**अन्वय स्थितीच्या भक्तीपरतें । मज भाव नाहीं पढियंते** ॥ ' इ. ( च. भा. ५८९ ) अशाप्रकारे भक्ति - ज्ञानाचा **समन्वय** नाथांनीं चतुश्लोकींत चातुर्यानें केला आहे. जिचें नारदशांडिल्यांनीं "**सापरानुरक्ता ईश्वरे**" असें सूत्र ओविलें. जिला ज्ञानेशांनीं "**आम्हीं** ( भागवत ) **आपुली भक्ति । परम म्हणों**" म्हणून कुरवाळिलें, **तीच श्रेष्ठ-**तम भक्ति. च. भा. श्लो. ३० यांत "**सरहस्यंतदंगंच**" या **पदांचा** चतुश्लोकींत चौथ्या श्लोकांत पुन्हां पूर्वी संदिग्ध ठेविलेली **भक्ति** '**तोचि श्लोकार्धे**' ( अन्वय व्यतिरेकाभ्याम् ), एकनाथांनीं विषद **केली.**

याप्रमाणें चतुश्लोकींत आणि श्रीभागवतांत आमूलाग्र जे ज्ञानप्रधान भक्तितत्त्व निर्दिष्ट केले आहे, तेंच एकनाथांनीं देश भाषेत मोठया आवडीनें वाखाणिलें आहे. त्याचा किंचित् मधुर स्वाद येथें घ्यावयाचा आहे. मुळांतील मर्म सहज समजण्याइतकें सुलभ नाहीं. रचनेसंबंधीं नाथांनीं स्वानुभव सांगितला आहे. तो.—

"**श्रीभागवत आणि भाषे मराठे। हें बोलणें नवलवाटे। पूर्वी नाहीं ऐकिलें कोठें। अभिनव मोठें धिटावा केला**" (च. भा. ९.८५०) व्यास महर्षींनीं **चतुश्लोकीची अगाधपदें। दशलक्षणें शुद्धे वर्णिली.** त्या श्रीभागवताचे रहस्य मराठी भाषेत अवतरविणे हे विशेष नवलाचे कृत्य पूर्वी कोणी कोठे केल्याचे ऐकले नाही. नाथाचे हे म्हणणें खरे आहे. कारण श्रीभागवतावर ज्या कांहीं मराठी टीका आहेत त्या नाथोत्तर कालीन असल्यामुळें सांप्रदायिक दृष्टया नाथकृत चतुश्लोकीभागवतटीकेस अग्रेसरत्व येत आहे. सद्गुरू कृपेनें नाथांनीं अभिनव धिटावा करून आपला पहिला प्रयत्न यशस्वी करून दाखविला. तोच श्रीभागवताचा मराठी भाषेतील पहिला अवतार मानण्यास हरकत नाहीं. त्याचे इत्थंभूत सौंदर्य मुळांतूनच पाहिले पाहिजे. येथे चतुश्लोकीच्या पदापुरते नाथोक्त भाष्य संक्षेपतः घ्यावयाचे आहे. ग्रंथारंभीं इष्ट देवतेचें नमनपूर्वक ध्यान करण्याचा शिष्टसंप्रदाय आहे. तदनुरूप चतुश्लोकीच्या दिग्दर्शनापूर्वी नारायणाचें मंगल ध्यान येथें संग्रहिलें आहे. भगवंतांनी ज्या सगुण रूपाने प्रगट होऊन ब्रह्मदेवांस ज्ञानोपदेश केला, त्यास सृष्टिकर्मास प्रवृत्त केले. प्रथमच विरंचीस प्रगटिलेल्या वंदनीय व सशक्तिक ध्यानाचे महत्त्व विशेष होय. तें ध्यान :—

**किरीटिनं कुंडलिनं चतुर्भुजं पीतांबरं वक्षसि लक्षितं श्रिया अध्यर्हणीयासन मास्थितं परंवृतं चतुःषोडश पंच शक्तिभिः॥**

[भा. स्कं. २ अ. ९] मस्तकी मुगूट, कानांत कुंडले अशा त्या चतुर्भुज पीतांबर धारी भगवन्मूर्तीच्या *वक्षस्थळी श्री [लक्ष्मी] असून ते श्रेष्ठ प्रतीच्या आसनावर अर्धांगीसह विराजमान असलेलें, समीप भागीं श्रीच्या २५ शक्ति [प्रकृति, पुरुष, महत्, अहंकार असे ४ मनासह दशेंद्रियें व

* 'श्रीयो निवासो यस्य उरः' (श्री भागवत) भगवंतांनीं श्रीलक्ष्मीला हृदयावर स्थान दिल्याचा श्री भागवतांत उल्लेख आहे.

पंचतन्मात्रा मिळून १६ आणि पंचमहाभूतें ५ ] जगत्कार्यार्थ सज्ज आहेत असे तें प्रकृतिपुरुषात्मक ध्यान ब्रह्मदेवानें पाहिलें. नाथांनीं तें सालंकार सायुध अशा थाटानें वर्णिलें आहे. या भगवद्रूपांत " **सृष्टि कार्यकारण ब्रह्मा। आपण स्वयें देखे।**" पण तें देखणे स्थूल दृष्टीचें होतें, म्हणून कार्यकारणातीत असें निजस्वरूप चतुश्लोकीच्या पहिल्या श्लोकात वर्णिलें आहे. श्लोक (१) **अहमेव समेवाग्रे नान्यद्यत्सदसत्परम् ॥ पश्चादहं यदेतच्च योऽवशिष्येत सोऽस्म्यहम् ॥** भा. स्कं. २ अध्याय ९ श्लोक ३२. वरील श्लोकाचा नाथभाष्याधारे सारांश :– आदि नारायण म्हणतात, बा विरंची, नित्य, शुद्ध, बुद्ध, उत्पत्तिस्थितिलयविरहित असे माझे आत्मस्वरूप कसें तें तुला सांगतो ते नीट श्रवण कर.

'**सृष्टीपूर्वी मी निजरूप। शुद्ध ब्रह्म निर्विकल्प। स्वानंदकंदस्वरूप। पूर्णत्वें पूर्ण अमूप** ॥ च. भा. ४४२ **पूर्वी म्हणावयाचें लक्षण। नसतां सत् असत् कारण। मी परमानंदें परिपूर्ण। या नांव जाण सृष्टीपूर्वी** ॥ ४५०. **सत् म्हणिजे सूक्ष्ममूळ। असत् म्हणिजे नश्वरमूळ। या अतीत मी निर्मळ। या नांव सृष्टीपूर्वी** ॥ ४५१ ॥ **यापरी सृष्ट्याकारें। असी जे मियां श्रीधरें। तोचि सृष्टीनंतरे उरे। स्वरूप साचोकारें चिन्मात्र माझें** ॥ ४७३ सारांश :- **मीचि एकु असुळे विसुळु। मीचि एकु सकळीं सकुळु। मीचि एकु सूक्ष्म स्थूळु। हें स्वरूप प्रांजळु परियेसी॥ ४४१ ॥** सृष्टीच्या उत्पत्तीपूर्वी स्थूलसूक्ष्म असें दुसरे कांहीं नसून मीच एक ( आत्मा ) होतो. सृष्टीच्या उत्पत्तीनंतरच्या स्थितीत आणि तिच्या लयानंतरदेखील मीच एकीएक स्वरूप ऊर्वरित असतो. उत्पत्त्यादि भिन्न विकार हे मायाकार्य केवळ भासमान अतएव मिथ्या होय. त्या मायेचें स्वरूप चतुश्लोकी भागवत श्लोक २ यात वर्णिलें आहे.

श्लोक (२) **ऋतेर्थं यत्प्रतीयेत न प्रतीयेत चाऽऽत्मनि ॥ तद्विद्या दात्मनो माया यथा भासो यथा तमः ॥ (३३)**

टीका – '**मी परमात्मा जो अधिष्ठान। त्या मज सत्यार्थातें न देखोन। जें जें देखिजे द्वैतभान। तें तें माया जाण विरंची** ॥ ( ४९२ )

---

ह्या श्लोकात 'सदैव सौम्येदमग्रमासीत्' 'एकमेवाद्वितीयम' 'नासदासीन्नोसदातीत्तदानीम्' 'पूर्णमेवावशिष्यते' इ. श्रुति वाक्यानुवाद आहे.

**निज आत्मयाचेनि विसरें। जें जें देखों लागे दुसरें। ते माझी माया निज निर्धारें। जाण साचोकारें विधात्या ॥** ४९४ ॥ **सूर्य जेव्हां न देखणें। तेव्हां तम वाढे प्रबळपणें। सूर्य जे काळीं देखणें। तेव्हां तमाचें जिणें नाहींचि होय ॥** ४९८ ॥ **देह लक्षितां मिथ्या छाया। स्वरूप लक्षितां मिथ्या माया। हें सत्य जाण विधातया। छाया माया समान ॥** ५१८ ॥

**एवं निजात्मप्राप्तीविण। नव्हे निजमायानिर्दळण। ते आत्मप्राप्तीलागी जाण। सद्गुरुचरण सेवावे ॥** ५१९ ॥ सत्यार्थक अद्वैत असा मी परमात्मा, त्या मला न जाणता द्वैतरूप मिथ्या जगद्‌भामास सत्य मानणें हीच माझी माया. ती प्रकाश आणि तदभावें भासणाऱ्या अंधकाराप्रमाणें मिथ्या होय. ती कधीं झालीच नाही वंध्यासुताप्रमाणे तिचें काल्पनिक वृत्त नाथांनी वर्णिलें आहे. त्यात मायेची उत्पत्ति, तिचें कार्य, मिथ्यत्व आणि निरास इत्यादि मुद्यांचा सुबोध विचार केला आहे. यानंतर चतुश्लोकीच्या तिसऱ्या श्लोकावरील टीकेस आरंभ करिताना श्रोत्यास नाथ इशारा देत आहेत की, ' **आतां पुढील निरूपण। भूतीं प्रविष्ट अप्रविष्टपण। स्वयें सांगे नारायण। सावधान अवधारा ॥** ५३२ ॥

श्लोक (३) **यथा महांति भूतानि भूतेषूच्चावचेष्वनु ॥ प्रविष्टान्यप्रविष्टानि तथा तेषु न तेष्वहम् ॥** ३४ ॥ भा. स्कं. अध्याय ९.

यावर नाथटीकेचा भावार्थ :— **येथें महाभूतें जैसीं। उच्च नीच देहासरसीं ॥ प्रवेशलीं दिसती कार्येसीं। कारण स्थितीसीं अप्रविष्ट ॥** ५४१ ॥ **तैसा मीहि याचि परिपाठीं। जगीं प्रवेशलों कार्यदृष्टी। कारणरूपें मीच सृष्टी। मज प्रवेशावया शेवटीं ठाव कैंचा ॥** ५४२॥ **येथ [1]कार्य म्हणिजे तें काये। औट हातामाजीं गवसूनि ठाये। मानी मी इतुकाचि आहे। या नांव पाहें कार्य म्हणिजे ॥** ५४६ ॥ **कार्य म्हणिजे ते ऐसें। [2]कारण तूं म्हणसी कैसें। जेणें मी निजात्मा दिसे। अद्वैतविन्यासें अप्रविष्ट ॥** ५४९ ॥

आतां अनेकीं एकत्व परिपूर्ण कसें तें नाथ सांगतात :—

" **पोळी आंतील गव्हाशीं। सबाह्याभ्यंतरीं कणीक जैशी। तेवीं मी सृष्टिकार्यासी। प्रवेशूनि पूर्णत्वेसी अप्रविष्ट ॥** ५५८ ॥ या श्लोकांत

१–देहात्म बुद्धि, अहंकार हें माया कार्य. २–आत्मैक्य मात्र अद्वैत स्थिति हें कारण.

मायाब्रह्मैक्य वेगळ्या उपपत्तीनें सांगितले आहे. भगवद्गीतेंत ज्याप्रमाणें “ **मत्स्थानिसर्वभूतानि न चाहं तेष्ववस्थितः । नच मत्स्थानि भूतानि** ” ( गीता – अध्याय ९ ) याप्रमाणेच चतुश्लोकीतील तिसऱ्या श्लोकांत ‘ **प्रविष्टान्यप्रविष्टानि,** ’ असें भगवन्मुखींचें कोडें आहे. तें नाथांनीं वरील श्लोकाच्या टीकेंत उकलून दाखविलें आहे. ज्याप्रमाणें जगांतील जडचैतन्यात्मक सर्व लहानसान वस्तूंत पंचमहाभूतांचा प्रवेश असलेला दिसतो, पण तत्त्वतः त्यांचा प्रवेश झालेला नसतो; कार्यरूपानें तीं प्रविष्ट दिसतात, पण कारण म्हणजे आत्मस्वरूपांत तीं मूळचींच असल्यानें व आत्मरूप व्यापक असल्यानें तीं अप्रविष्टहि आहेत; तद्वत् व्यापकत्वें मी जगांत प्रवेशलों असें वाटतें तें कार्यदृष्टीचा खेळ असून कारणदृष्ट्या मीच व्याप्यव्यापक म्हणून अप्रविष्टहि आहे. आत्मस्वरूप ‘ **एकमेवाद्वितीयम्** ’ कसें तें शेवटीं पुरणपोळीच्या गोड दृष्टांतानें सांगून नाथांनीं श्रोत्याची आवड गोड केली. त्यांना धालेपणाचे ढेकर येत असतील. तो अनुभव आपणांस कसा यावा ? तो येण्यासाठीं ‘ **अन्वयें करावी माझी भक्ति । व्यतिरेकें माझी स्वरूपस्थिति** ’ प्राप्त होणारी असल्यामुळें अन्वयव्यतिरेक हा महत्त्वाचा विषय न्यायप्रक्रियेनें पुढील श्लोकव्याख्येंत नाथ सोडून दाखविणार आहेत.

( श्लोक ४ ) **एतावदेव जिज्ञास्यं तत्त्वजिज्ञासुनाऽऽत्मनः ॥**
**अन्वयव्यतिरेकाभ्याम् यत्स्यात् सर्वत्र सर्वदा ॥ ३५ ॥**

**तत्वजिज्ञासी तत्वज्ञानें । अन्वयें सर्वत्र मज भजणें । व्यतिरेकें मज जाणणें । अविकारपणें तें ऐक ॥ ५७७ ॥ अन्वय जाणणें जयातें । वस्तूपासूनि तत्वें समस्तें । उपजतीं तद्रूप निश्चितें । कार्यकारणत्वें अभिन्न ॥ ५७९ ॥ कारणापासोनि कार्य अभिन्न । या नांव अन्वय जाण । कार्य मिथ्या सत्य कारण । तें व्यतिरेक लक्षण विधातया ऐक ॥ ६०० ॥ ऐशिया अन्वयस्थिति । भावें करितां भगवद्भक्ती । मी परमात्मा सर्व भूतीं । भजतां माझी प्राप्ती । मद्भक्तां सुगम ॥ ५८५ ॥**

तिसऱ्या श्लोकटीकेंत प्रविष्टाप्रविष्टाची व्याख्या केली ती समजून घेऊन जिज्ञासूनें मीच ( आत्मा ) सर्वत्र निरंतर भरून राहिलों आहे असें अन्वयानें जाणावें. कारणापासून कार्य अभिन्न तसें आत्मतत्त्वापासून जगत् अभिन्न; ब्रह्मच सर्वत्र हा अन्वय. कार्य मिथ्या, कारण सत्य म्हणजे जगत् (प्रकृति) कार्य मिथ्या असून आत्मवस्तु कारण तीच सत्य हा व्यतिरेक. अन्व-

यांत वस्तुविषयक यथार्थ ज्ञान घ्यावयाचें असतें. व्यतिरेकांत अन्यथाज्ञानाचें निराकरण करावें लागतें. प्रमेयसिद्धीच्या या दोन पद्धति आहेत. दोन्हीं पद्धतींनीं जी इष्टसिद्धि होते ती निरपवादनिश्चित असते '**एकमेवाद्वितीयम्**" या श्रुतिवचनांत '**एकमेव—एकच (ब्रह्म) असणें हा अन्वय.** अद्वितीय—दुसरें नाहीं हा व्यतिरेक. वेदांतशास्त्रात अन्वयव्यतिरेक म्हणजे अनुवृत्ति आणि व्यावृत्ति ह्या नावानी सांगितल्या आहेत. पूर्वावस्थेप्रमाणें उत्तरावस्थेंत असणे यास अनुवृत्ति (अन्वय) आणि पूर्वावस्थेप्रमाणें उत्तरावस्थेत नसणे यास व्यावृत्ति (व्यतिरेक) म्हणतात. संतवाङ्मयांत अन्वयव्यतिरेकाविषयीं स्वतंत्र ग्रंथ आहेत. नाथानी चालू टीकेंत अन्वय-व्यतिरेकाचें सांगोपांग स्वरूप शास्त्रीय पद्धतीनें सुलभ करून दाखविलें; इतकेंच नव्हे तर ह्या अन्वय पद्धतीनें सद्भावपूर्वक भक्ति केल्यास मी परमात्मा भाविकांना सहज प्राप्त होतो, असें भागवतधर्मांतील भक्तिरहस्य सांगितलें. त्याचा उपसंहार करतेसमयीं नाथ म्हणतात, "**ऐसें सांवळेनिसुंदरें। बुद्धिबोधें प्रबोधचंद्रें। सांगितलें ज्ञान नरेंद्रें। कृपाउपेंद्रें प्रजापतीसीं** ॥ ५६३ ॥ ही ओवी ज्ञानेश्वराच्या "**ऐसें सावळेनि परब्रह्में। तेणें भक्त काम कल्पद्रुमें। बोलीलें आत्मारामें। संजयो म्हणे**" या ओवीशीं सादृश्यानें पहाण्याजोगी आहे. चतुश्लोकी भागवतांत अनेक ओव्यांतून श्रीज्ञानेश्वर-विचाराच्या कल्पना प्रादुर्भूत झालेल्या दिसतात. श्लोक ३५ [४] यावरील टीकेंत शेवटीं नाथ म्हणतात, "**ऐसें गुह्यज्ञान पुरुषोत्तमें। निष्काम कामकल्पद्रुमें। स्वमुखें सांगितलें आत्मारामें। कृपा संभ्रमें स्वयंभूसी** ॥ ६२८ ॥ ३० व्या श्लोकातील "**ज्ञानं परमं गुह्यम्**" या पदावर उपक्रम करून त्याच गुह्य पदावर वरील ओवींत उपसंहार केला. यावरून येथे चतुश्लोकीचें व्याख्यान नाथानीं पूर्ण केल्याचें स्पष्ट होत आहे. त्याचें अगदी मरासरी केलेलें दिग्दर्शन श्रीएकनाथदर्शनात समाविष्ट व्हावें. ह्यांत "**न्यून तें पुरतें। अधिक तें सरतें। हें करोनि घ्यावें तुमतें। विनवितु असें** ॥" याप्रमाणें श्रीज्ञानेशोक्तीनें याचकांस विनम्र भावें विनंति करून प्रस्तुतचा लेख श्रीनाथचरणीं अर्पणमस्तु.

———

# नाथांचें रुक्मिणीस्वयंवर • • •

श्री. प्रा. य. र. आगाशे, एम्. ए.

प्राचीन मराठी काव्यात स्वयंवरकाव्य अत्यंत लोकप्रिय आहे. महदंबा, नरेंद्र, भास्कर, कवीश्वरव्यास इत्यादि महानुभाव कवि, ज्ञानदेव, नामदेव, एकनाथ इत्यादि भक्तिसंप्रदायाचें प्रवर्तन करणारे कवि, ज्या सामान्य लोकांना बालबोध धर्माची आणि मोक्षाची भूक लागली होती अशा आबालवृद्धांच्या समाधानाकरितां नावीन्यपूर्ण देशभाषेंतून लेखन करीत होते आणि धर्मनीतीच्या सुंदर तत्त्वानीं प्रकाशमान होणाऱ्या रामायण–महाभारत–भागवतातील कथाचे समरसतेच्या नवनवीन उन्मेषांनीं अखंड निरूपण करीत होते; त्या वेळचीं देवालये, त्यांत सर्वांच्या लाभाकरितां चाललेलीं हरिकीर्तनें, प्रवचनें, भजनें, भगवद्गीतादि ग्रंथांची देशभाषेंतील निरूपणें, ही सर्व व्यापक लोकशिक्षणाचीं प्रभावी अंगे होतीं. राजाश्रय आणि लोकाश्रय या दोहोंच्या आधारे कार्य करणारी ती एक समर्थ अशी धर्मसंस्कृतीच्या शिक्षणाची, संगोपनाची आणि संवर्धनाची राष्ट्रीय योजना होती, असें समजण्यास हरकत नाहीं. या कार्याचा बराच मोठा भाग आपल्या आख्यानकवींनीं उचलला होता. भारतीय संस्कृतीनें ज्यांचा पिंड पोसला होता अशा जनतेला भारतभागवतांतील वैचित्र्यपूर्ण कथांविषयीं आकर्षण वाटावे यात आश्चर्य नाहीं. प्रेम आणि पराक्रम यांच्या वर्णनांत शृंगार आणि वीर यांचा आविष्कार या नवलकथांतून सरस रीतीनें झालेला दिसतो. त्यांतहि स्वयंवरकथा म्हणजे सर्वांवर सर्वकालीं मोहिनी घालणारी प्रेमकथा आणि वीरकथा होय. या स्वयंवरकथामध्यें राम-सीता, नल-दमयंती, कृष्ण-रुक्मिणी, अर्जुन-द्रौपदी यांचे स्वयंवरप्रसंग अत्यंत अद्भुतरम्य असल्यामुळें त्यांवर अनेक प्राचीन मराठी कवींनीं अनेक वेळां काव्यरचना केली व त्यांत आपलें व्यक्तित्व ओतलें. विषय एक होता तरी ज्ञानेश्वर-नामदेवांच्या काळीं तें एक प्रकारें प्रकट झालें, एकनाथांच्या वेळीं किंवा

मुक्तेश्वरांच्या रचनेंत तें भिन्न स्वरूपांत दिसलें आणि सामराज, रघुनाथ पंडित, वामन, नागेश, विठ्ठल व शेवटीं मोरोपंत या पंडितकवींच्या आख्यानकाव्यांत तें वैदग्ध्यानें नटलेलें होतें.

## राजकीय पार्श्वभूमि व संतकवि

यादवकालीन मराठीच्या वेळीं जी सामाजिक परिस्थिति होती तिजहून भिन्न अशी एकनाथकाळीं होती. यादवसम्राटाचें वैभव उत्कर्ष-बिंदूला पोंहचून लोकांचें जीवन विलासी झालें होतें. व्रतवैकल्यांची संख्या बेसुमार फुगली होती. सांसारिक कामनांच्या परिपूर्तीकरतां विविध देवतांचें आराधन आणि पूजन, तन्निमित्त काम्य कर्मांचें आणि विधींचें आचरण यांतच सर्व पुरुषार्थ सामावला होता. अशा भोगपरायण जीवनपरिपाठी-मध्यें यादवराजांचें पौरुष आणि पराक्रम यांचा उत्कर्ष थांबला होता. याप्रमाणें सत्त्वहीन व आत्मबलहीन झालेल्या सुखासीन समाजावर जेव्हां उत्तरेकडून यवनांची धडक बसली, तेव्हां तो स्वतःचें संरक्षण करण्याला असमर्थ ठरला आणि दक्षिणेंत यवनांची राजवट चौदाव्या शतकापासून चालू झाली ती निर्वेधपणें ३०० । ४०० वर्षें चालली. अस्मानी सुलतानींचें युग सुरू झालें. त्याचें वर्णन पुढें रामदासांनीं केलें आहे. तें हृदयद्रावक आहे. अशा बदलत्या परिस्थितींत आपला धर्म, आपली संस्कृति जिवंत राखणें, त्या पराक्रमहीन जिण्यामध्यें भव्य अर्थकामाचें संपादन अशक्यप्राय असतां धर्ममोक्षाकडे लक्ष देऊन निदान आत्म्याचा अपलाप होऊं न देणें हें मोठें कार्य तत्कालीन विवेकवंतांपुढें — प्राचीन मराठी कवींपुढें होतें. संतकवींनीं निवृत्तिपर आत्मोपदेश करून समाजास निर्वीर्य बनविलें आणि केवळ हरिभजनाच्या मार्गाला लावलें हें म्हणणें तत्कालीन सामाजिक व राजकीय परिस्थितीचा विचार करतां योग्य नव्हे, असेंच दिसून येईल. ज्यांत अर्थकामांचा धर्माशीं योग्य रीतीनें मेळ घातलेला आहे, अशा वर्णाश्रमधर्माचें उल्लंघन करावें, पुरुषार्थाची उपेक्षा करावी, असें त्यांनीं सांगितलें नाहीं. परंतु आधिभौतिक पुरुषार्थ त्या वेळीं निःसत्त्व झाला होता व त्याचें पुनरुज्जीवन केव्हां व्हावयाचें तर ते धर्मबल आणि आत्मबल यांच्याच आधारावर आणि धर्मसंस्कृतीच्या जागरूकतेमुळें होणार होतें. म्हणून याच दोन गोष्टींवर आपल्या संतकवींनीं भर दिला इतकेंच. नवीन साम्राज्याचें उत्थान कर-

ण्याचा तो समय नव्हता आणि शहाजीशिवाजीपर्यंत तो आलाहि नाहीं. या विवक्षित रीतीनें त्यांनीं आपलें समाजधारणेचें कार्य केलें. त्यामुळें भारतीय संस्कृतीची ज्योति दक्षिण भारतांत विझून गेली नाहीं. आपल्या प्राचीन मराठी कवींनीं — संतकवींनीं आणि धर्मकवींनीं — विश्वात्मबुद्धीचें तत्त्वज्ञान आणि रामायण, भारत, भागवतांतील कथांच्या द्वारे ज्ञान, भक्ति, कर्म, यांचें, तत्कालीन परिस्थितीचें मर्म ओळखून, निरूपण केलें. जनतेला जनतेच्या भाषेंत जनतेची ओळख करून दिली. त्यांची श्रद्धा, आत्मदृष्टि, जिवंत राखली, उज्ज्वल केली. तीच धर्मनिष्ठा पुढें सतराव्या शतकांत राष्ट्रीय संघटना आणि स्वराज्य यांच्या उभारणीला उपयोगी पडली.

## यादवकालीन मराठी काव्याचें अध्यात्मप्राधान्य

राजकीय दृष्ट्या विघटित झालेल्या समाजाचें आंतरिक ऐक्य साधण्याकरितां आणि त्यासाठीं त्याचें आत्मबल टिकविण्याकरितां मुकुंदराज, ज्ञानदेव, नामदेव, एकनाथ, इत्यादि कवींनीं आपल्या काव्यरचनेंत अध्यात्म, तत्त्वज्ञान, भक्ति, सात्त्विक आचरण, चित्तशुद्धि, विश्वबंधुत्व आणि भूतदया इत्यादि विषयांना प्राधान्य दिलें. भारतभागवतांतील नीतिसुभग कथा सांगत असतांहि त्यांत अध्यात्माचें विवेचन त्यांनीं यथावकाश केलें. जो धर्म आणि जें अध्यात्म आतांपर्यंत संस्कृत भाषेच्या गव्हरामध्यें गुरफटून राहिलें होतें, त्याच्या शुद्ध बालबोध स्वरूपाचा साक्षात्कार देशभाषेंत व्हावयास पाहिजे होता. या दृष्टीनें विचार केल्यास मराठी भाषा आणि वाङ्मय यांच्या विकासाचा आणि उत्कर्षाचा ग्रंथ बरोबर लागतो. 'भूतीं भगवंत' अशी व्यापक समतेची भावना उत्पन्न करणारें वेदान्त तत्त्वज्ञान व त्यावर आधारलेली डोळस भक्ति यांचीच शिकवण समाजाला इष्ट होती. दत्तश्रीकृष्णादि पंचकृष्णांच्या अवतारकथा, महानुभावांनीं मराठी भाषेंतच लिहिण्याचा कटाक्ष ठेवून वत्सहरण, रुक्मिणी-स्वयंवर, शिशुपालवध, इत्यादि काव्यांतून गाइल्या; आणि चक्रधरोक्त सूत्रपाठ, दृष्टांतपाठ, उद्धवगीता इत्यादि ग्रंथांतून जीव, जगत्, प्रपंच, परमेश्वर याचें तत्त्वज्ञान महाराष्ट्र भाषेंत ग्रथित केलें; त्याचप्रमाणें मुकुंदराज, ज्ञानदेव, नामदेव, एकनाथ इत्यादि कवींनीं जीवपरमात्म्याचें ज्ञान म्हणजेच

अध्यात्म आणि त्यावर आधारलेली सगुणभक्ति याचा पुरस्कार विवेकसिंधु, परमामृत, भावार्थदीपिका, अमृतानुभव, नामदेवांचे अभंग आणि एकनाथांनी रचलेला भागवतग्रंथ, त्यांचे भावार्थरामायण, आणि रुक्मिणीस्वयंवर या ग्रंथांमध्यें दिसून येतो आणि या वाङमयकृति तत्कालीन सामाजिक, राजकीय जीवनाच्या पार्श्वभूमीवर स्पष्टपणें उठून दिसतात. आपणाला यापैकीं एकाच ग्रंथाचा — नाथांच्या रुक्मिणीस्वयंवराचाच — फक्त विचार करावयाचा आहे. भक्तिज्ञानाचा सुंदर उन्मेष हाच अशा भक्तिकथांचा विशेष होय. केवळ आधुनिक दृष्टीनें पाहिल्यास अशा ग्रंथांतील अध्यात्माचें प्रामुख्य किंबहुना कवीच्या अध्यात्मदृष्टीचा अट्टाहास आपणांला अप्रस्तुत व अनाकर्षक वाटण्याचा संभव आहे. परंतु पाश्चिमात्य वाङमयपरिचयानें आज आपणांमध्ये उत्पन्न झालेली वाङमयसौंदर्याची दृष्टि आणि कसोटी सहाशे वर्षांपूर्वीच्या वाङमयाला लावणें हे फारसें शास्त्रोक्त ठरणार नाहीं. त्यापेक्षां या वाङमयाचा अभ्यास करताना तत्कालीन सामाजिक — राजकीय जीवनाकडे आपलें लक्ष्य ढळूं न देणारी समरसतेची दृष्टिच आपणाला अधिक फलदायी होईल.

## प्रस्तुत लेखाचें उद्दिष्ट

नाथांच्या रुक्मिणीस्वयंवराचें सर्वांगीण समालोचन प्रस्तुतच्या अवकाशांत अशक्यच आहे. या स्वयंवरकथेंत आख्यानकाव्याची सर्वांग-सुंदर कलाकृति निर्माण करीत असता त्यांत अध्यात्माचा धागा सर्वत्र कसा खेळविला आहे हे दाखविण्याचें या लेखाचें मुख्य प्रयोजन आहे. त्याच्या उत्तरार्धात अध्यात्मदर्शनाबरोबरच कृष्ण-रुक्मिणीच्या विवाहाचा सोहळा नाथांनीं अत्यंत बारकाईनें सर्व परंपरागत विधि आणि कुलाचार यांचें तपशीलवार निरूपण करून वर्णिल्यामुळें एकनाथकालीन विवाहविषयक सामाजिक धार्मिक आचारांचे दर्शनहि सामाजिक आचारांच्या अभ्यासकाला आकर्षक वाटेल.

## रुक्मिणीस्वयंवरांतील अध्यात्मदर्शन

नाथांचें रुक्मिणीस्वयंवर हें आख्यानकाव्य असलें तरी त्यात अध्या-त्माच्या बैठकीचें—जीवशिवाच्या भेटीचें व ऐक्याचें—निरूपण साक्षेपानें केलेलें आहे. भक्तिभाव आणि नववधूच्या अंतःकरणांतील प्रेमाचीं आंदोलनें यांचें व इतर विविध काव्यगत व्यक्तींच्या रागद्वेषादि मनोभावनांचें

अत्यंत सहृदयतेनें वर्णन करून कृष्णरुक्मिणीच्या स्वयंवरकथेत नाथांनीं कितीही काव्यसौंदर्य ओतलें तरी श्रीशंकराचार्यप्रणीत वेदान्तातील जीव-शिवाच्या अद्वैताची व निराकार निर्गुण परमात्म्याची कल्पना ते केव्हाही दृष्टिआड होऊं देत नाहीत. **एकमेवाद्वितीयम् । नेह नानास्ति किंचन । तत्त्वमसि ।** इत्यादि स्वयंप्रकाश सम्यक्-ज्ञानरवीच्या आधारानेंच, आत्म-निवेदनात जिचा उत्कर्ष होतो, अशी भक्तिभावनेची चंद्रिका नाथांच्या काव्यांत आपली प्रसन्न दीप्ति पसरीत आहे. शास्त्रपरिपूत सूक्ष्मदर्शी बुद्धीला अनेकांतून एकाकडे जाणें हें क्रमप्राप्तच असते. नामरूपामुळें विविध प्रकारें नटलेल्या जगाच्या मुळाशीं एकत्वानें व्यापून राहिलेल्या परतत्त्वाचा विसर ज्ञान्याला केव्हाहि पडत नाहीं. ही ज्ञानदृष्टि नाथांनीं आपल्या काव्यप्रपंचात सर्वत्र जागरूक ठेविली आहे. तथापि ज्याचा इंद्रियास आणि तद्रूपजीवी संकल्पविकल्पात्मक मनाला भेदरूपानें अनुभव येतो, ज्यात जीव आणि जगत् या गोष्टी पृथग्रूपानें भासतात अशा या विश्वप्रपंचामध्ये पुनः एकत्वाचा आणि अद्वैताचा प्रत्यय कसा येईल याची-या हरपल्या श्रेयाची-जीवाला हुरहुर लागते. हे लक्षात घेऊन अद्वैतपर्यवसायी सगुण भक्तीचें मनोहर चित्रण नाथांनी रुक्मिणीच्या भक्तिकथेत केलें आहे. संसारांतील सुखदुःखांनी विकल झालेल्या चित्ताला ज्ञानौदार्यसंपन्न परमेश्वराविषयीं तन्मयतेनें प्रेम वाटूं लागल्यास निश्चल शांति आणि आत्मसमाधान लाभूं शकतें हें या रूपककथेचें प्रयोजन आहे. आरंभी आरंभीं भक्ताची भूक दुहेरी असते. सगुण व साकार अशा परमेश्वराचें ठिकाणीं प्रेम वाटावें, पुढें भक्तिभावना जसजशी प्रगत आणि उत्कट होईल त्या मानानें ज्ञानचक्षूचें उन्मीलन होऊन आपला प्रेमविषय विश्वव्यापी आहे, तेव्हा तो आणि आपण वस्तुतः एकच आहो असा आत्मसाक्षात्कार व्हावा, आणि सगुण भक्तीचें पर्यवसान अद्वैतात व्हावें असें त्यास वाटूं लागतें. या दोनही आंतरिक ऊर्मींचा सुंदर समन्वय एकनाथांनीं प्रस्तुत रुक्मिणीस्वयंवरांत केलेला आढळतो.

## कृष्णरुक्मिणीजन्म

वसुदेवदेवकीच्या ठिकाणीं श्रीकृष्णाचा जन्म झाला, त्याबरोबरच ज्या योगमायेनें परमात्मा आच्छादलेला आहे ती कृष्णशक्ति रुक्मिणी भीमक

आणि शुद्धमती यांचे पोटीं अवतरली. सूर्याबरोबर दीप्ति किंवा सुवर्णाबरोबर कांति असावी त्याप्रमाणें दोनही तत्त्वतः अभिन्न. राजा भीमक हा मूर्तिमंत विवेक व त्याची पत्नी शुद्धमती म्हणजे देहधारिणी श्रद्धा. विवेक आणि श्रद्धा यांचे ठायीं चिच्छक्तीचा उदय व्हावा यांत नवल कोणतें ? राजसभेंत भीमकाजवळ रुक्मिणी बसली असता कीर्तिनामक ब्राह्मणानें श्रीकृष्णगुणाचें वर्णन केलें. नरेंद्राच्या रुक्मिणीस्वयंवरांत कल्याणकीर्ति भाटानें आपल्याबरोबर आणलेल्या किन्नराकडून असें गुणवर्णन केलें आहे. एकनाथांच्या काव्यांत पहिल्या प्रसंगांतील श्रीकृष्णाच्या रूपगुणाचें वर्णन तसेंच भरघोस आहे. सगुण श्रीकृष्णाच्या वर्णनांत सर्वत्र निर्गुण निराकार परमात्म्याच्या 'एकमेवा-द्वितीय' स्वरूपाचा विसर पडलेला नाहीं. परमात्मा आत्मतृप्त आहे, परंतु आपल्या मायेच्या योगानें तो लीलाविग्रह धारण करतो, निदान नामरूपा-त्मक सृष्टि अज्ञ संसारी जीवाला तशी भासते. त्या मायेपलिकडेच जाण्या-साठीं ज्ञानमार्ग भक्तिमार्ग इत्यादिकांची प्रवृत्ति आहे.

## कृष्णस्वरूपवर्णन

विश्वांतील नामरूपाचें संपूर्ण सौंदर्य कृष्णरुक्मिणींच्या शरीरांत एकवटलें होतें. कृष्णाचें श्यामलरूप फार मनोहर होतें. इंद्रनीलाचें रत्नतेज पिळून सांवळी कृष्णतनु ओतली होती. त्याच्या अंगुली या सुनील आकाशाला आलेल्या कळ्याच होत ! अंगुलींना असलेलीं नखें या जणू चंद्रलेखा ! कृष्णचरणांतील अमृताच्या लोभानेंच त्या आकाश सोडून आल्या, असें व्यतिरेक अलंकारानें रुचिर झालेलें वर्णन नाथांनीं केलें आहे. कृष्णचरणांतील भूषणांचा ध्वनि वेदघोषापेक्षांहि सुंदर; सोहंभावाचा गजर करून पायांतील नूपुरें मुमुक्षूचें आळशी मन जागृत करीत होतीं. गळ्यांत मुक्तांची (मोतीं मुक्त असा श्लेष) माळा होती तीं कोठें उत्पन्न झालीं होतीं ? ज्ञान आणि वैराग्य या शुक्तिसंपुटामध्यें ! पायांपर्यंत लोंबणारी वनमाला ही जनविजनाचें समत्व दाखवीत होती. गळयांतील वैजयंती निर्मळ आत्मशांतीचें निदर्शन करीत होती. पहिल्या प्रसंगांतील हें श्रीकृष्ण-वर्णन जसें शांतशृंगाराची अद्भुतरम्यता प्रकट करतें, तसेंच एकनाथांच्या काव्यकलेचा उत्कर्ष दाखवितें यांत संशय नाहीं ! अर्थात् तें मुळांतच वाचलें पाहिजे.

## रुक्मीकृत कृष्णनिंदा

ज्या अंतःकरणांत विवेकश्रद्धेचे अधिष्ठान आहे तेथें चिरभक्तीचा उदय व्हावा हे स्वाभाविक. परंतु तेथून चित्तमल उत्पन्न करणारे षड्-विकार व अनेकविध विकल्प सर्वथा नाहींसे झालेले असतात असें नाही. रुक्मीच्या मनांत कृष्णद्वेष होता. विवेकी भीमकानें आणि श्रद्धायुक्त शुद्धमतीनें रुक्मिणी कृष्णाला द्यावी असे योजिलें. परंतु रुक्मीला तो विचार मानवला नाही. तो कृष्णनिंदा करूं लागला. परंतु सद्वस्तूचा विद्वेष मालिन्य न आणता तिचें सत्वच प्रकाशित करतो. रुक्मी म्हणाला, 'कृष्णाचें ठिकाणी कोणता गुण आहे? कोणतें रूप आहे?' त्यानें जी कृष्णनिंदा केली तीच वाग्देवतेनें स्तुतिरूप केली. जो निर्गुण निराकार परमात्म्याचा अवतार त्याचे ठिकाणी रूपगुण नसणे हा त्याचा गौरव. परंतु द्वेषविकृत बुद्धीला त्याचे सत्यस्वरूप कसे कळणार? एकनाथांनी रुक्मीच्या भाषणाचें श्लेषसुंदर ग्रथन केलें आहे. "**सखा मारिला अहं मामा। तो काय आम्हा धड होईल ॥ एक म्हणती नंदाचा। एक म्हणती वसुदेवाचा। ठाव नाहीं बापाचा। अकुळी साचा श्रीकृष्ण॥ मुळीच नाही जन्मपत्र। कवण जाणे कुळगोत्र। कृष्ण नव्हे जी स्वतंत्र। भक्तपरतंत्र सदाचा ॥ प्र. २—४**" तसेच, "कृष्ण शद्बात कोठेच सांपडावयाचा नाही. (कारण तो शद्बातीत आहे.)

## रुक्मिणीपत्रिका

त्याचा वाङ्‌निश्चय आणि शद्बनिश्चय व्हावा कसा? तेव्हा रुक्मिणी शिशुपालाला द्यावी हें उत्तम." हे ऐकून रुक्मिणी दचकली. सद्बुद्धीच्या आड येणारे कामक्रोध, विवेकाच्या मार्गांत अडथळा आणणारे गर्वमद किंवा स्वधर्माच्या आचरणांत व्यत्यय आणणारा आळस मुमुक्षु जीवाला कसा रुचेल? म्हणून मोठा विचार करून रुक्मिणीनें निजभावाचा सुदेव ब्राह्मण कृष्णाकडे पत्रिका देऊन पाठविला. त्या पत्रिकेंतील सात श्लोक म्हणजे नाथांच्या दृष्टीनें मोक्षमार्गाला उपकारक असे उपाय, भाव, आर्ति, कीर्ति, विवेक, निश्चय, निजभक्ति हे होत. सुदेवाची आणि श्रीकृष्णाची भेट झाली. पत्रिकेतील उत्कृष्ट भक्तिभावानें त्याचे अंतःकरण सद्गदित झालें. तिच्या

हाकेला धावून जाण्याचें श्रीकृष्णानें ठरविले. एकनाथ म्हणतात, " **जया हृदया जैसा भावो । तयासी तैसा भेटे देवो । भीमकी कृष्णमय पहा हो । उठिवला देवो सत्वर ॥ प्र. ४ - ६८** " इकडे रुक्मीच्या दुराग्रहा-पुढे भीमकाचें काही चालेना. " **भीमक वश झालापुत्रासी । जेसा विवेक महा मोहासी । कन्या नेमिली शिशुपालासी।जीवी कृष्णासी हे द्यावी।।प्र. ५-१६**"

## रुक्मिणीची कृष्णचिंता व उत्कंठा

रुक्मिणीपुढें फारच बिकट प्रसंग उभा राहिला आणि तिचे मन सर्व प्रकारे कृष्णचिंतेनें व्याप्त झाले. रुक्मिणीच्या अधीर अंतःकरणाचीं आंदोलनें नाथांनीं अत्यंत कुशलतेनें रंगविलीं आहेत. शेकडो संशय तिच्या मनात उभे राहिले. नाथानी या संशयरत्नमालेचे ग्रथन फार सुदरपणे केलें आहे. रुक्मिणी म्हणते, "मी त्याची भार्या होईन असें म्हटले तर ते श्रीकृष्णाला कसें रुचेल ? तो म्हणेल, ही मजवर वशीकरण तर नाही ना कारणार? स्वतःची अशी मनःप्रवृत्ति नसताना त्यात विलोभन उत्पन्न करून ही मला पाहिजे तशी नाचविणार तर नाहींना? म्हणूनच कृष्ण अजून येत नसावा ! "

याप्रकारें कृष्णतन्मयता होऊन रुक्मिणी सर्व शरीरभाव जणु विसरून गेली. उन्मनी अवस्थेंत ती विहार करीत होती. " **आळविल्या कानी नायके । थापटिलियातें न वचके । देह व्यापिलें यदुनायकें । शरीरसुखें विसरली ॥ प्र. ५ ६५.** " अत्यंत सहृदयतेनें, हळुवारपणे या तदात्मवृत्तीचे अष्टसात्विक भाव नाथांनीं वर्णिले आहेत. " **लीलाकमल घेतां हाती । कृष्ण-चरण आठवती । नयनी अश्रु जी लोटती । कृष्णप्राप्तीसाठीं ॥ प्र. ५-६७.** "

रुक्मिणीची अधीरता, उत्कंठा, असहायता, तिचे उकसाबुकशीं रडणें, तिचा गहिंवर, तिची विकलता, यांचे वर्णनांत लोकप्रसिद्ध प्रेमभावनेच्या सूक्ष्म छटांचें चित्रण आहेच, परंतु अध्यात्माच्या बैठकीवर त्याला एक निराळेंच सौंदर्य आलें आहे. रुक्मिणी अंबिकापूजनाला चालली, परंतु ती कांहींच बोलत नव्हती. " **कृष्णचरणीं जडलें मन । यालागीं वाचे पडले मौन । दृढ लागलें अनुसंधान। सहजस्थिति चालली ॥ प्र. ६-६९.** " आत्मसाक्षात्कारासमवेत ज्याप्रमाणें अहिंसादिकांचा आपोआप उद्भव होतो त्याप्रमाणें रुक्मिणीबरोबर तिच्या मैत्रिणी चालल्या होत्या. रुक्मिणीनें

अंबिकेची स्तुति केली. ती तिच्या तन्मयतेच्या चित्तवृत्तीला अनुरूपच होती. "**शिवा तुझेनि शिवपण। जीवा तुझेनि जीवपण। देवा तुझेनि देवपण। निजकारण तूं माये॥ प्र ६-१५**"

## रुक्मिणीचें सौंदर्यवर्णन

सातव्या प्रसंगात नाथांनी भीमकीहरणाचें वर्णन केले आहे. कृष्ण-रुक्मिणीच्या वर्णनात नाथांच्या वाग्वल्लरीला कल्पनाकुसुमाचा केवळ बहर येतो. भावार्थदीपिकेतही ज्ञानदेवांनी कृष्णवर्णनात आपले काव्यसर्वस्व ओतलें आहे. रुक्मिणीला कृष्णभेटीची उत्कंठा लागून राहिली होती. ती कशी दिसत होती? "**श्रीकृष्णभक्तीलागी देखा। नवविधा भक्तीसी आंवांका। तैशा नवरत्नमुद्रिका। भीमकन्यका लेइलीसे॥ प्र. ७-१.**"

हें अध्यात्मदर्शन तिच्या संपूर्ण वर्णनांत अनुस्यूत आहे.

**माहीं स्रष्टयानें सृजिली। कृष्णप्रभावें रूपा आली। वरवेपणासी गे चढली। साकारली सौंदर्यें॥ गगन शून्यत्वा उबगलें। कृष्णभेटीसी उदित जाहलें। भीमकीमस्तकासी आलें। निरालंबें शोभत॥ मस्तकींचे नील कुंतल। तेचि नभ अति सुनील। तळी मुखचंद्र निर्मल। भीमकीमुखीं उगवला॥ चंद्र क्षीण कृष्णपक्षीं। म्हणे हा पूर्वील माझा बंधु कीं। म्हणूनी कळवळली भीमकी। निजमुखीं धरियेला॥ भीमकीमुख निष्कलंक। क्षयातीत पूर्ण शशांक। कृष्णपक्षीसी सम्यक्। भीमकीमुखीं उगवला॥ चंद्र संपूर्ण पौर्णिमा एकीं। एरवी क्षयवृद्धि त्या लोकीं। तो सदा भीमकीमुखीं निजात्ममुखीं परिपूर्ण॥ . . भीमकी थोर कपाळाची। कृष्णदेवें ते दैवाची। निढळीं प्रभा श्यामेची। तेचि कस्तूरी मळवट॥ . . श्रीकृष्णरंगे सुरंग। अहेवपण तिचें अभंग। तेचि कुंकुम पै चांग। मुखचंद्रीं चंद्रमा॥ नभीं इंद्रधनुष्यरेखा। तैसा भांगीं शेंदुर देखा। भुलवावया यदुनायका। मोहिनीमुखा पूजियलें॥ ना ते सरस्वती वोघी। आली कृष्णभेटीलागी। जीवशिव हांसळीया दोहीं भागीं। मुक्तलगीं तटस्थ॥ जैसीं नक्षत्रें नभमंडळीं। तैसी मुक्त मोतियांची जाळी। लेईलीसे भीमकबाळी। लेणे बेल्हाळी शोभत॥ . . दृश्य देखतां शिणले नयन। धणीचें घ्यावया कृष्ण दर्शन। एकचि होऊनि देखणेपण। भीमकीलोचना पैं आलें॥ पाहावया घनसांवळा। कृष्ण-श्यामता आली बुबुळा। आंसावली दोहीं डोळां। सबाह्य देखणें सम-**

**दृष्टी ॥ कृष्ण देखावया निधान । नयनीं सूदलें अंजन । सोगयाचें (सूरमा) झळंबपण । कटाक्षबाण पिसारे ॥ ..... मुखामाजी दंतपंक्ति । जैशा ॐकारामाजि श्रुती । चोंकींचे चौरी झळकती । सोऽहं अस्मि सोलिव ॥ .........पूर्वीं क्षीरसिंधूची बाळा । नेसली क्षीरोदक पाटोळा । तों तो पाहावया घनसांवळा । कांसे लागला क्षीराब्धि ॥ माझी कन्या हे गोरटी । झणी कोणाची लागेल दृष्टी । म्हणोनि घालितसे कंठीं । रत्नमाळा क्षीराब्धि ॥ प्रकृतिपुरुषा पडली मिठी । तैसें बिरडें कांचोळिये दाटी । कृष्ण सोडिल जगजेठी । आयांवायां न सुटेची ॥. ... कृष्ण पाहावया लोभें उठी । आले आडवे केश सलोभ दृष्टी । करून ऐक्याचिये मुष्टी । सुमनें वीरगुंठी बांधिली ॥ ....... निजभावें पाहे गोरटी । तंव घनश्याम पाहे दृष्टीं । लाजावृत्ती झाली उफराटी । तंव जगजेठी पावला ॥ ..... काळ सावधान ह्मणत । सूर्य लग्नघटिका पहात वियोग अंतःपट सोडित । भावार्थ ह्मणत ॐपुण्या ॥ भीमकी पाहे कृष्णवदन नयनीं गुंतले नयन । दोहींचा एक झाला प्राण । पाणिग्रहण जीवशिवां ॥** प्र. ७ (५-६७) "

नाथांच्या वाक्‍शैलीची कोमलता आणि मधुरता येथें उत्कर्षानें दिसत आहे. सौंदर्यवर्णनांत योजिलेल्या उपमाउत्प्रेक्षांचे कौतुक करावें, कीं श्लेषाचें माधुर्य गावें, कीं सर्वच वर्णनाला प्रकाशित करणाऱ्या अध्यात्म दृष्टीचें सौंदर्य वर्णावें ? शांतशृंगाराची अद्भुतरम्यता (Devotional Romance) ही प्राचीन मराठी काव्याचा एक अलंकार आहे. अद्वैत-भक्ति ही आपल्या कवीच्या समग्र जीवनाला व्यापून राहणारी, अंतःकरणाला पटलेली निःसीम निष्ठा होती. त्या समरसतेचे उन्मेष आपल्याला जसे संतकाव्यांत दृष्टीस पडतात तसे अन्यत्र कोठें दिसणार ?

## युद्धप्रसंग

रुक्मिणीनें कृष्णाला माला अर्पण केली. तो तिला रथांतून घेऊन चालला. रुक्मी, शिशुपाल, जरासंध, यांचा अचानकपणें तेजोभंग झाला. त्यांनीं युद्ध सुरु केलें. यापुढील युद्धवर्णनांत वीररसाचा आविष्कार तितकाच मनोहर आहे. त्यांतही यथावकाश अध्यात्माचा धागा खेळविला आहे.

मोक्षमार्गाचें साधन करणाराच्या अंतःकरणांत ज्याप्रमाणें महामोहाचें अवडंबर माजावें त्याप्रमाणें शत्रुपक्षीयांचें सैन्य चाल करून आलें. त्याला

श्रीकृष्णाच्या आत्मज्ञानाचे संवगडी असे जे यादव त्यांनीं परतून तोंड दिलें. मानवी अंतःकरणांत दैवी आणि आसुरी संपत्तीचा सदसत्प्रवृत्तीचा कलह कसा माजतो हें प्रकृत युद्धप्रसंगाच्या द्वारे सूचित केलें आहे. "**जैसे अहंकाराचे दुर्ग। तैसें आलें चातुरंग। भीतरी वीर अनेग। कामक्रोधादि खवळले प्र. ८-३२**" पुढें विदूरथ आणि अक्रूर यांच्या युद्धांतही एकनाथ म्हणतात, "**गुप्त होती वासनासुरी। हाणों धाविन्नला उरावरी। स्वानुभवची भाली खरी। वीरें निर्धारी विंधिली**" **प्र. ९-२८**" दहाव्या प्रसंगांत जगजेठी बलरामाचें हलयुद्ध वर्णिलें आहे. त्यांत बलरामानें नांगर या आयुधानें जरासंधाच्या सैन्यात कसा अनर्थ उडवून दिला याचें वैचित्र्यपूर्ण वर्णन आहे. "**महावीरां घालितां घावो। अशुद्धें डवरिला बलदेवो। तेणें शोभत महाबाहो। रणभैरव ड्रुलत ॥... घायें मारित महावीर। भडभडा वाहे रुधिर। लोटला अशुद्धाचा पूर। नदी दुस्तर उलथली ॥ प्र १० (८०-८२)**"

येथें रणनदीचें रुपक मोठे पल्लेदार आहे. **प्र. १० ( ८३-९३ )** "**नदी वाहतां दुथडी । झाल्या प्रेतांच्या दरडी । वोढणे कमठपृष्ठी गाढी। गजकुरवंडी महाग्राह ॥ बाबर झोटिया केशजाळ। तेचि नदीमाजी शेवाळ मगर सुसर महाविशाळ। शिरें विक्राळ वीरांचीं इ. घायीं उडालें शिरकमळ। ठाकूनि गेलें ध्रुवमंडळ। पद न पवेचि अढळ। उतावीळ परतलें ॥ देह अर्पितां श्रीकृष्णासी। चारी मुक्ती होती दासी। म्हणोनी आलें कृष्णचरणासी। निजसुखासी पावलें ॥ घायीं उडालें शिर एक। ठाकूनी गेलें सत्यलोक। ब्रह्मसदन नावडे देख। कृष्णसदना परतलें ॥ देखोनि श्रीकृष्णाचें मुख। धिक्कारिला सत्यलोक। ब्रह्मसदन वांछिती मूर्ख। परमसुख हरिचरणीं ॥**

घावासरसें दुसरे एक शिर वैकुंठापर्यंत वर गेलें परंतु ती एकदेशी गति न आवडून तें मुरडून हरीकडे आलें! कृष्णनाथाला सोडून आम्ही सलोकतेचा स्वीकार करूं इच्छीत नाहीं, आपल्याला वैकुंठही नको, असें म्हणून त्यानें हरिचरणीं मस्तक ठेवलें! अंतराळीं मस्तक उडालें असतां यावरील मुकुटरुपी अहंकार खालीं पडतांच तें परत भूतलावर न पडतां हरीजवळ प्राप्त झालें! युद्धाकारणें वीरांना निजमोक्ष फावला :--

**' अधिकारियां मोक्षभावो । द्यावयालागीं कृष्णदेवो । मिष भीष्मकीच्या विवाहो । रणीं निर्वाहो मोक्षाच्या ॥ ९९ ॥ प्र. १० "**

## रुक्मीचा पराभव

यादवांचा विजय झाला. जरासंधाने शिशुपालास राजनीतीचा सल्ला दिला. काल अनुकूल येईपर्यंत शांत रहावें. हे पाहून रुक्मीचा क्रोध अनावर झाला. तो कृष्णाला उद्देशून निंदाप्रचुर भाषण करूं लागला. त्यातही अध्यात्माचा ध्वनि आहे :-

**"जन्मोनीया यादववंशीं । कुलगोत्राशीं नाश करिसी । बुडविलें नामरूपासी । जाति तुजपाशीं पैं नाहीं ॥ १२ – ९३ "**

ही व्याजोक्ति जुनीच आहे.

## रुक्मिणीचा विषाद व बलरामाचा उपदेश

कृष्णानें रुक्मीचा पराभव केला. त्याचा शिरच्छेद न करतां पांच पाट काढून त्याला रथाला बांधलें. त्यामुळे रुक्मिणीला फार वाईट वाटलें. बलरामानें त्याला मुक्त केले. लोकदृष्टीनें हा अपराध झाला असें तो श्री कृष्णास म्हणाला. त्यानें रुक्मिणीची समजूत घातली. कृष्णचरणप्राप्ती झाली असतां हा विषाद आणि विषमभाव काय कामाचा ? अर्जुनविषादयोगासारखाच हा रुक्मिणीविषादयोगाचा प्रसंग औचित्यपूर्ण आहे. बलराम रुक्मिणीला तत्त्वोपदेश करतो त्यात शांकरवेदान्ताचेंच प्रतिपादन आहे. जीवानें देहबुद्धीच्या पार जावें.

**"तये देहबुद्धीचें लक्षण । सुहृद दुर्हृद उदासीन । त्रिविध त्रिगुण नकरी मन । देहाभिमान नुपजवीं .... नाना आलंकारीं कनक । तैसा सर्वांभूतीं आत्मा एक । हेंचि नेणोनियां मूर्ख । एकासी अनेक म्हणताती ॥ प्र १२ – ( ५० – ५३ ) "**

येथें नाथांच्या अध्यात्माचें संपूर्ण दर्शन घडतें ( ५० – ८३ ). तें विस्तारभयास्तव देता येत नाहीं. कनक आणि अलंकार, सूर्यबिंब आणि अनेक घरांत पडलेलीं त्याचीं प्रतिबिंबे, एकाकार आकाश आणि घटमठामध्यें त्याला आलेले विविध आकार, आकाशाप्रमाणें अलिप्त असें परमात्मस्वरूप, सूत्रधाराने धरलेलें खांबसूत्र आणि त्याने होणारा अचेतन पुत-

ळयांचा नाच, केवळ लोकदृष्टीला चंद्राचे ठिकाणीं दिसणाऱ्या कलाचें विविधत्व, त्याची क्षयवृद्धि, इत्यादि लोकप्रसिद्ध दृष्टांतांच्या द्वारे नाथानीं एकच प्रमेय मांडलें. तें असें--

**"चंद्रीं चंद्र यथास्थिति। जैशा कळा तुटती वाढती। तैसा आत्मा सहजस्थिति। नाश उत्पत्ति देहासी ॥ प्र. १२ – ७४"**

बलराम वडीलपणें रुक्मिणीस म्हणतो, 'संसारभ्रमामध्ये गुंतू नको. तूं परमात्मपदाला पोहोचली आहेस. शोक मोह याची बाधा जीवाला आत्मज्ञानाच्या पूर्वी व्हावी. नंतर तिला अवकाश नाहीं. अशा स्थितीत दृश्य, द्रष्टा व दर्शन, ध्येय, ध्याता, व ध्यान यास अवसर नाहीं.

**"तुटला बोल खुटलें मौन। चैतन्य घन श्रीकृष्ण। उरलें चिन्मात्र स्फुरण। तेंही मायिक तूं जाण ॥ प्र. १२ – ८२"**

हा बलरामाचा तत्त्वावबोध ऐकून रुक्मिणीच्या मनाचा विषाद नष्ट झाला. तिचे चित्त पूर्ववत् कृष्णमय झालें. "**नाठवती भाव दीर। वृत्ति झाली तदाकार। ब्रह्मरूप चराचर। देखे सुंदर निजबोधें ॥ प्र. १२ – ८७.**"

आतापर्यंत दोन विभागाचें अध्यात्मदृष्टीनें समालोचन झालें.रुक्मिणीहरणापर्यंतचा एक विभाग, प्रसंग १ ते ७, त्यानंतर युद्धवर्णनाचा दुसरा विभाग प्रसंग ८ ते १३. या दोनहि विभागांत अध्यात्माची दृष्टि कशी खेळत आहे याचें दिग्दर्शन केलें. तेराव्या प्रसंगातील बलरामकृत रुक्मिणीप्रबोध अद्वैत वेदान्ताच्या दृष्टीनें लक्षणीय आहे. अद्वैतभक्तीची पार्श्वभूमि त्यामुळे सुस्पष्ट होईल. मराठी काव्यांत वेदान्त तत्त्वज्ञानाचे इतके सुबोध, प्रसन्न-मनोहर निरूपण इतरत्र क्वचितच सापडेल. संस्कृत भाषेंतील गहन आशय इतक्या साध्या मराठी भाषेत व्यक्त करणें हा नाथांच्या सिद्धसरस्वतीचा विजय आहे.

## विवाहविषयक लौकिक आचार.

यानंतर १४ ते १८ प्रसंगांमध्यें सामाजिक धार्मिक लग्नविधीचें विस्तारानें वर्णन केलें आहे. तेथेंहि अध्यात्माचे दर्शन अखंडपणें घडत आहे. ही केवळ बुद्धीची कसरत आहे असें म्हणण्याचें धाडस करवत नाहीं. मेघदूतांतील विरहदु:खित यक्ष सर्व सृष्टि ज्याप्रमाणे कामुकाच्या दृष्टीनें

पाहात होता व त्यामुळें पूर्वमेघांतील सृष्टिवर्णनाला एक प्रकारची भाव-मधुरता आली आहे त्याच प्रमाणे (उदाहरण थोडें विसंवादी आहे!) नाथांची दृष्टि अध्यात्मानें उजळल्यामुळें त्यांच्या अगदीं लौकिक वर्णनांतही अध्यात्माचे पडसाद स्वाभाविकपणें ऐकूं येतात. त्याच्या दृष्टीला सर्व काही परमात्मपर दिसतें. कोणत्याही प्रापंचिक वा लौकिक घटने वा अर्थ ते अगदीं सहज अध्यात्मपर लावूं शकतात. याचें कारण पाहूं जातां एकनाथांची संसारामध्येंहि जागरूकपणे वावरणारी परमार्थदृष्टि. त्यांनी प्रापंचिक गोष्टींचा अनादर केला असें नाही, परंतु त्यांला अध्यात्माचें अधिष्ठान देऊन यशस्वी गृहस्थाश्रमांत प्रपंचपरमार्थाची एकरूपता साधली. त्यामुळेच मूळ ग्रंथातील 'वेदोक्तविधिना' किंवा 'विधिवत्' एवढ्याच पदांच्या आधारे श्रीकृष्ण रुक्मिणीच्या विवाहाचे सोहाळे त्यानी मोठ्या बारकाईनें आणि सहृदयपणें पुढील पांच प्रसंगांत वर्णिले. नाथांच्या स्वयंवरकथेचें सौंदर्य दुहेरी आहे. कृष्णरुक्मिणीच्या प्रेमकथेचें आणि वीरकथेचें रससौंदर्य आबालवृद्धांना मिळावे या लोकहितदृष्टीनें आख्यानकवीची भूमिका कोठेही सुटूं न देतां त्या समग्र कथेमध्यें अध्यात्मदर्शनाचा सुंदर प्रकाश सर्वत्र खेळविला आहे व अध्यात्मदृष्टीची जागरूकता राखली आहे. या पुढील भागांत विवाहविधींतील सामाजिक आचाराचा परामर्श प्रामुख्यानें घ्यावयाचा आहे.

भीमक राजानें विनंती केली, 'श्रीकृष्णा, पराक्रमानें भीमकी हरण करतांना तुला अर्धक्षणहि लागला नाही. परंतु माझे हातून विधियुक्त कन्यादान व्हावें आणि तूंहि विधिपुरःसर पाणिग्रहण करावें अशी माझी इच्छा आहे. चार दिवस माझ्या आदरातिथ्याचा तूं स्वीकार कर.' समारंभपूर्वक रुक्मिणीला वरावें असें कृष्णालाहि वाटलें. रुक्मिणीलाहि लग्न सोहाळा पाहिजे होता. श्रीकृष्णानें ज्येष्ठ भ्राता बलराम यास तशी विनंति करावी असें सुचविलें. भीमकानें सर्व सामुग्री आपल्या नगराहून मूळमाधव क्षेत्राला आणली. द्वारकेला मूळ पाठवून देवकीवसुदेवादि सर्वांना बोलावलें व द्वारकेहून मोठें वऱ्हाड निघालें. जीवशिवाचा लग्नसोहाळा, तेव्हां त्यांत सर्व देव सामील झाले.

## गणमातृका

सर्वांच्या पुढें अग्रपूजेचा अधिकारी गणेश उंदरावर बसून निघाला. त्याबरोबर अष्टमातृकाहि होत्या. त्यांचें वर्णन मोठे गंमतीचें आहे. इंद्राणी

हत्तीवर बसून निघाली. चामुंडेचें वाहन घुबड, वाराही डुकरावर बसली होती, वैष्णवी गरुडावर आरूढ झाली होती, कौमारीचें वाहन मोर आणि माहेश्वरीचें वृषभ. सरस्वतीचें वाहन हंस. वृश्चिकवाहिनी विंचवावर बसली होती. वऱ्हाडणींनीं थट्टा आरंभिली. 'विंचवावर बसलेली रोडक्या अंगाची ही चंडिका कोण ? ही मकरमुखा इथें आली कशाला ?' त्याही हंसूं लागले. 'यांना मागे राहवा आणि वऱ्हाड पुढे जाऊ द्या' असें म्हणाले. गणमातृका कोपल्या. गणेशानें विघ्न उत्पन्न केलें. गाडे धडाधड मोडूं लागले, रथाचे घोडे पंगु झाले. वऱ्हाड पुढें चालेना. कोपलेल्या अष्ट मातृकानी शीतज्वर उत्पन्न केला. दुर्गेनें महामारी पसरली. वऱ्हाड स्थगित झाले. कृष्णाच्या लक्ष्यात आलें की स्त्रियांनीं 'हा ढेरपोटया कोण' अशी गणपतीची थट्टा केली; म्हणून हा सर्व अनर्थ झाला आहे. त्यानें गणपतीला साखरेचे मोदक दिले, त्याचे स्तवन केले. आलेलें विघ्न नाहींसे झालें. वऱ्हाड मिरवून गर्जत चालू झाले. महामातृकाची मंडपांत स्थापना केली.

गणांचा पति आणि गणमातृका यांच्या वैचित्र्यपूर्ण स्वरूपाची चिकित्सा पुराणकोविदांनीं करावी.

## जामातृ पूजा

भीमकानें जामातृपूजा केली. शुद्धमतीनें पाणी घातले. भीमकानें जावयाचे पाय धुतले. शुद्ध सत्त्वाचे विरजांबर – स्वच्छ वस्त्र – श्रीकृष्णास दिले. चिद्रत्नाचे अलंकार अर्पण केले. शुद्धमतीनें कृष्णवदन पाहिलें.

**"मुकुट कुंडलें कौस्तुभ माळा। झळकत पीतांबर मेखळा। देखोनीया घनसांवळा। दोहीं डोळा निवाली ॥ प्र १४ – ९०"**

दृष्ट लागेल म्हणून इटीमिठी घेतली. लिंबलोण उतरलें. कृष्ण-चरणाला हळद लावली. तेव्हां शुद्धमतीची 'मीतूं' उपाधिच गेली आणि वृत्ति चिद्रूप झाली. सर्वांस वस्त्रेंभूषणें दिली.

## रुखवत

रुखवताची तयारी झाली. शुद्धमतीनें भक्तिपूर्वक कृष्णाची प्रार्थना केली. त्रिगुणांच्या तिवईवर ताट मांडलें. नऊ जणींनी ( म्ह. नवविधा

भक्ति ) रुखवताचे पदार्थ वाढले. जे त्यावेळीं कृष्णाचे पंक्तीला बसून समाधान पावले, त्याची क्षुधा सदा शांत झाली. तेथें भावार्थाची ताटें झळकत होतीं. ती स्वानंदानें भरलेली असून कोठें ओतावीं हेंच कळेना. हावभावाच्या फोडण्या देऊन स्वानुभवाच्या भाज्या खाणीवा, खुडीवा, तोडिवा-तयार केल्या होत्या. कांहीं शिजविल्यामुळें गोड लागत होत्या, कांहीं लवण-युक्त, कांहीं आळणीच, परंतु स्वरसानें रुचकर होत्या. कांही आंतबाहेर आंबट, कांहीं तुरट, कांहीं कडवट, अशी तोडलीं होतीं. त्यातील कांहीं हिरवी करकरीत, कांहीं पिकलेली, कांहीं गाठाळलेली कचकचीत अशी होतीं. अनेक कोशिंबिरी वाढल्या होत्या. तोंडात घालतां अशा तिखट लागत कीं नाकातोंडातून धूरच निघे! कुसमुसून कपाळच पिटावे लागे. पुढे अनेक भोज्य पदार्थांचे वर्णन आहे. त्याचेच अनुकरण सामराजादिकांनीं केलेलें आढळतें. या पदार्थांच्या याद्या काव्यदृष्टीनें चमत्कारिक वाटतात. परंतु सामाजिक जीवनाच्या अभ्यासकाला त्याचे महत्त्व विशेष वाटेल. भीमकी पतीला प्रिय व्हावी म्हणून शुद्धमतीनें सांडग्या केल्याच नाहीत. तिला वृद्धाचार माहीत होता. सामाजिक जीवनात लौकिक समजुतींचें स्वगत महत्त्व असतें. परंपरागत आचार त्यात चिरस्थायी झालेले असतात. त्यांची उपपत्ति लावणें ही एक संशोधनाची बाब आहे. शेवया, पापड, पुरणपोळ्या, रसमागरींच्या क्षीरधारिया, सुकुमार इडूरिया, सफेत फेण्या, खांडवी, मांडे, फळांच्या शिखरिणी इ. विविध भाज्या पदार्थ तेथे होते. निदान एकनाथकाली यांचा प्रचार होता हे निःसंशय. अत्यंत बारीक सोज्वळ तांदळाचा भात केला असून सोऽहंभावाच्या ओगराळ्यांतून भाव-बळाने भरून खालीं एकहि शीत पडूं न देता वाढला होता. वरण होतें. लेह्य, पेय, चोष्य, खाद्य, पदार्थ, रोटीपोळी, पक्वान्ने यांची ताटे भरली होती. नव जणींना वाढण वाटले. चौघींना पूर्ण केलें (नवविधा भक्ति आणि चार मुक्ति याची सूचना.) तेथे अतृप्त कोण राहील?

प्रसंग १५. वऱ्हाडाचें भोजन यथेच्छ झाले. यादव तृप्त झाले. ब्राह्मणांची शेंडी तडतडली. त्याना धोतरे सैल करावी लागली. नाथाची विनोदबुद्धिहि जागृत आहे!

## उष्टवण

या पुढील विधि उष्टवण. रुखवताचें भोजन झाल्यानंतर श्रीकृष्णानें उष्टवणाकरता आपली आगठी ठेवली. (आपणाकडे विडयात रुपया घाल-ण्याची पद्धति आहे.) शुद्धमतीला फार आनंद झाला की आपली कन्या मोठी भाग्याची. तिचा हात कृष्णमुद्रेनें भूषित होणार. याप्रमाणे रुखवत, उष्टवण होऊन सूर्योदयीं मंडपांत जाण्याची वेळ झाली. शुद्धमतीने उष्टवण भीमकीच्या हातीं दिलें. तिनें तो कृष्णप्रसाद मस्तकीं धारण केला. तो सेवन करीत असतां तिला समाधिसुखहि थोडें वाटलें. तिनें कृष्णमुद्रा बोटांत घातली. घटकेघटकेला झेगटाचा (वाद्यविशेष) आवाज होत होता. ज्याला निज (आत्म) कार्याची तांतडी आहे त्यानें वेळ साधली पाहिजे. मायेच्या ध्यानानें निर्गुणत्व सोडून परमात्मा सगुणरूपधारी झाला होता.

## रुक्मिणीचा प्रसाधनविधि

रुक्मिणीला देण्याकरतां अनेक अलंकार सिद्ध होते. विरजाबर, (स्वच्छ वस्त्र) चैतन्यरत्नांची भूषणें, माळ, पदक इत्यादिकांस अध्यात्माची शोभा होती. कृष्णानें आपल्या मंडपांत फलसंभार विस्तारला होता. अहंकाराचे धान्य भरडलें, मोहममतेचा कोंडा काढला आणि अशा सोज्वळ डाळीची परडी श्रद्धेनें भरली होती. विवेक चाळणीने चाळून शुभ्र स्वच्छ कणीक आणली होती. तिची निजगोडी (आत्मानंद) अपूर्व होती. गुणांवाचूनच (दोऱ्याशिवाय) श्रीकृष्णानें फुलांची माळ व जाळी रूक्मिणीकरिता तयार केली. बुद्धीचे ठिकाणीं विवेक मिळवावा त्याप्रमाणे धणे, हळद, इ० सौभाग्यद्रव्यांत जिरे मिळविलें. सूक्ष्मतंतु घेऊन श्रीकृष्णानें कृष्णमणि ओवला आणि रूक्मिणीकरिता भव्य गळसरी तयार झाली. पुष्कळ रसाळ ऊस आणले. आश्चर्यकारक फळे आणलीं. यादवांना वस्त्रें भूषणें देऊन शृंगारले. बहुमोल लेणीं, लुगडीं, धारण करून वऱ्हाडणी निघाल्या—**चारी बारा सोळाजणी। चौघीजणी तयापुढें** (प्र. १५-३२) म्ह. चारीवाचा, सोळा कळा आणि चार मुक्ति. श्रद्धा शांती प्रमाणें सुभद्रा रेवती त्यांत शोभत होत्या. जीविताचें सार्थक होण्याचा समय आला असें

समजून भीमक श्रीकृष्णाला सामोरा गेला. मंडपांत सद्भावपूर्वक, सुकुमार व मृदु आसने घातलीं होतीं. गाद्या, पडगाद्या, ओठंगणे, मृदोलिया, टेकून बसण्यासाठीं मऊ लोड तक्क्ये होते. वऱ्हाडणी आल्या. नवरीला शृंगारून आणलें. तिचे तेज मंडपभर पसरलें. सर्वत्र भीमकीच भासूं लागली. कारण ते निजरूपाच होतें. स्वरूपाचा ठसा सर्वत्र उमवून श्रीकृष्णालाहि तिनें वेड लावलें. दोघेहि एकमेकांना सहजयोग्य होतीं. येथें रुक्मिणीचें सौंदर्यवर्णन नाथांनी केलें आहे. त्यात अगांवर घालण्याच्या विविध अलंकारांची नावे दिली आहेत. ती जिज्ञासूंना लक्षणीय वाटतील. नाथाच्या वर्णनात रुक्मिणीच्या अंगप्रत्यंगाचें सौंदर्य अधिक, का तेथें घातलेल्या अलंकाराची शोभा अधिक हें मूळ काव्य वाचूनच कळेल.

**"माथां मोतिलग जाळी। झळके फरातळीं हांसळी। मिरवे भांगटिळा कपाळीं। तेज झळाळी तानवडां॥ नेसली क्षीरोदक पाटोळा। त्यावरी रत्नांची मेखळा। सुनील कांचोळी वेल्हाळा। लेइली अंगीं मोतिलग॥ नाकींचें झळकत सुपाणी। तेणें शोभतसे रुक्मिणी। शोभा आली बाहुभूषणीं। रत्नकंकणीं कळाविया॥** ( अ० १५-५९ )'

लग्नघटिका जवळ आली. वसुदेवानें उठून भीमकीचें पूजन केलें. प्रथम गणपतिपूजा करावयाची ती त्यानेंच कृष्णचरणाला वंदन केले.

रुक्मिणीनें मायावस्त्राचा त्याग करून श्रीकृष्णवासाचा अंगिकार केला. तिला बाहेर आणून वसुदेवापुढें बसविलें. पुरोहित भीमकाला म्हणाले 'वराला मूळ पाठवा' सर्व यादव भीमकीचे गुणवर्णन करीत आले.

## तेलवण.

आदिकुमारी- आदिमाया दुर्गा आली. व तिनें कृष्णाला तेल लावलें व कंकण बांधलें. तिची संभावना करण्याचें सामर्थ्य एका कृष्णाचेच होतें. तिचा महिमा इतरांना कसा कळणार? वाद्यें वाजूं लागली. भीमकाने वराचे स्वागत केले व त्याला समचौरंगावर बसविले. सर्वांच्या नेत्रांचे पारणे फिटले. शुद्धमतीनें कृष्णाला तेलवण आणले. सुखशेवयांचे लाडू आणले. त्याची गोडी कृष्णालाच माहीत! सोलीव विवेकाचे तिळाचे लाडू होते. देहात्मवादी चार्वाकांचा ग्राम्यपणा हेंच कोणी टरफल काढून

टाकून चारोळ्यांचे सुंदर लाडू श्रद्धासाखरेनें वळून आणले होते. खसखशीचे लाडू, कमळाच्या बियाचे लाडू, ज्याला वरून वैराग्याचे काटे होते पण आंत अमृताचे साठे होते, असे सुंदर फणसही आणले होते ! वरून सुंदर दिसणारी परंतु आत आवट अशी बोरें, सत्तेचा गोड गूळ घालून व बोरांच्या बिया फोडून त्याचे लाडू केले होते. कृष्णाकरता तेलवणे आणली. त्यात द्वद्वपण फुटून तुटून गेले होते.रजोगुणात ती तळली होती. शुद्धमतीनें कृष्णाला वांकडे कानवले वाढले. वस्त्रेभूषणें अर्पण केलीं.

## मिरवणूक

वराची मिरवणूक निघाली. शुद्ध सत्त्वाच्या शुभ्र घोडयावर कृष्ण बसला होता. वाद्यांचा गजर व मंत्रोच्चार सुरू झाला. स्वेदरोमांचादि अष्ट सात्त्विक भाव हेच जणू घोडा धरून दोनही बाजूंनी चालले होते. आत्मबोध हेंच छत्र होतें. कृष्णवदन पाहण्यासाठी स्त्रीपुरुषाची गर्दी झाली. कृष्णानें ज्यांचा त्याग केला होता त्या अष्टसिद्धिरूप नाचणी (नर्तिका) चपलतेनें नाचूं लागल्या आणि प्राकृत लोक त्या नृत्यालाच भुलले. कृष्णानें चैतन्यरूप बुक्का लावला. तो भाविकांना परमार्थी वाटला. मोठ्या आवडीनें सुरंग विडे वाटले. जो मागें राहिला त्याला त्या विडयाचा रंग कसा चढणार? श्रीकृष्ण पूर्ण सत्त्वरूप असल्यामुळें त्याला पाहण्याकरितां विवेकाच्या काठीने दृश्याचा गलबला मागें मारला गेला. वैष्णव त्या समारंभांत निजबोधाच्या नादांत, अहंभाव सोडून सोऽहंवृत्तीनें नाचत होते. कृष्णाबरोबर चाललेल्या सुवासिनी म्हणजे शांति, क्षमा, दया, उन्मनी स्थिति, या सुखासनावर बसल्या होत्या. सर्वांनीं निजबोधाच्या अक्षता कृष्णमस्तकावर टाकल्या. कृष्णाचे निजभक्त होते त्यांस अनुरूप आसनें दिली होती. एकाला सलोकतेचा घोडा तर दुसऱ्याला समीपतेचा रथ, तिसऱ्याला सरूपतेचा हत्ती तर कोणाला सायुज्यतेची अंबारी!

## दारूकाम

मिरवणुकीबरोबर दारूकामहि होतें. त्याच्या लौकिक शोभेचें वर्णन जसें सुंदर आहे तसेंच त्याच्या अध्यात्मतेजाचेंहि आहे.

रजतमाचें औषध मारून अग्नियंत्र तयार केलें होतें. कांहीं चतुर कृष्णापुढें गंमत करून दाखवीत होते. ते ममतारूप हवाई फुलबाज्या लावीत असून त्या आकाशात उडून विझल्यानंतर परत येत होत्या. अनेक प्रकारच्या दारूकामाचीं फुलें पडत असून स्त्रियांना तीं खरींच वाटली परंतु ती केवळ राख होती. अतिलोभाच्या चिचुंद्र्या ज्या ठिकाणीं पडल्या तेथें उरीशिरी जाळून टाकीत! अतिलोभी जीवाची स्थिति याहून निराळी ती काय होणार? क्रोधाचे भुइनळे उडून त्यातून भडभडा ज्वाळा निघत होत्या. कामाचे हातनळे, उडविताना ते कसे धरावे हे नकळल्यामुळे जीव पोळून निघत होता! अति कठीण असा अग्नि देऊन अहंकाराचे बाण सोडले तेव्हां जीव दचकून पळूं लागला. मदमत्सराच्या धुराचा कल्लोळ उठला. डोळे झांकून गेले. देहबुद्धीचे भय पार नाहीसें झाले. मग स्वानुभवाच्या हत्तींनी उठाव केला अहंकाराचा धूर नाहींसा करून ते डौलाने डुलत होते. चंद्रज्योतीनीं निजतेज प्रकट केलें. जेथें अंधार नाहीं अशा ठिकाणीं चांदण्याच्याही पलीकडे कृष्ण होता! तेथें पसरलेलें तेज अलौकिक होतें. दोहोबाजूंनीं अनेक ओवाळण्या येत होत्या. कृष्ण पदोपदीं त्याग, वस्तुदान करीत होता.

## कपटहत्ती

इतक्यांत कृष्णापुढें एक कपट महामोहाचा हत्ती आणून उभा केला. त्याची कळ कोणास माहीत नव्हती. सर्वांच्या मनांत भीति उत्पन्न झाली. त्याचें बळ अफाट; त्याला कोण पुरें पडणार? अहंकारामुळें तो मत्त हत्ती गर्जना करीत सर्वत्र धांवत होता.जे भिऊन पळत त्यांच्यामागे हा महामोहाचा हत्ती अधिक लागे. ते जितके मागें सरत तितके सारे अंधकूपांत पडत. पुनः बाहेर पडण्याचें नांव नको! सर्वच भिऊन पळूं लागले. कृष्णानें सेवकाला खूण केली आणि लाथेनें हाणून त्या हत्तीचा कपटवेष मोडून काढला. भवरूपी गज ही गोष्ट वाईट आहे अशी ज्याची बुद्धि चोखंदळ झाली आहे, त्याला संसाराचे भय मानण्याचें कारण नाहीं.

## मधुपर्क व शुभमंगल

चतुर्विध मुक्ति या दासी पूर्ण कलश घेऊन महाद्वारीं उभ्या होत्या. जेथें शुद्धभाव होता तेथें कृष्ण उचित पदार्थांचें दान करीत होता. श्रद्धा,

शांति विरक्ति याही तेथें सेवातत्पर होत्या. जें जें त्यांनीं मागितलें त्याहून अधिक श्रीकृष्ण देत होता. महाद्वारांतून कृष्ण आंत गेला. समतेच्या पलंगावर बसवून श्रीकृष्णाला मधुपर्क झाला.त्याला अर्घ्य दिले.पाद्याकरतां तीर्थ आणलें होतें ते त्रिगुणत्रिवेणीच्या पलिकडचें-चैतन्यप्रभारुपी मणिकर्णिकेचें होतें. मूळमाधव क्षेत्रामध्ये ते अजून कदबतीर्थ आहे. कृष्णानें एकदांच सर्वापोशन केलें. त्रिवार आचमन केलें नाहीं ब्रह्मसूत्र, पीतांबर, अनेक प्रकारचीं भूषणें देऊन दधिमधु हातावर घालतांच मेहुणे म्हणाले, "कृष्णा लाजूं नका, गोकुळांत तुम्हांला ही संवय झालेलीच आहे." हस्तक्षालन झालें. जेथें श्रीकृष्णाचे पाऊल पडावयाचे तेथे पायघडया घातल्या. कृष्ण कौतुकानें लग्नाला चालला. भीमकी निजपति वरण्यासाठी गौरीहर पूजीत होती. कृष्णापुढें अंतःपट होता. हे बोलणें तत्त्वतः खरे नव्हें, परंतु श्रोत्यांनी नाथांना सांगितलें कीं आतां विस्तार करूं नका, लग्न निश्चितपणें लागूं दे! नाथांनीं श्रोत्याना वंदन केलें. लग्नघटि भरून सुमुहूर्त सावधान झालें!

ॐ पुण्याहंची मिठी पडली. त्या शुभवेळी द्वैतभावाची गांठ सुटून दृष्टीपुढून अंतर पट दूर झाला. दृष्टी हरीवर स्थिर झाली. कृष्णानें भीमकीच्या मस्तकावर अक्षता घातल्या. कृष्णाचे मस्तकावर अक्षता टाकीत असता भीमकीला सर्वत्र, सभोवती, आतबाहेर कृष्णच दिसूं लागला! ती चोहींकडे अक्षता घालूं लागली. उपाध्ये म्हणाले "हिला वेड लागले. कृष्ण नीटपणें ओळखता येत नाहीं. ही संसारात कशी नांदणार!"

कृष्णानें प्रकृति पाहिली. कंकणाकरतां शुद्ध धागा घेतला. एकच तंतु दुखंड केला. त्याला त्रिगुण वळण दिलें. अर्धा स्त्रीच्या नावाचा, अर्धा पुरुषाच्या. एकाचेंच द्वैत झालें. कंकण कृष्णाचे हातीं बांधलें. रुक्मिणी मायेचें वधूवस्त्र (अष्टपुत्री) सोडून पीतांबर नेसली. सोडलेले वस्त्र लोभी उपाध्यानीं नेलें. त्यावरून ते एकमेकात भांडू लागले.

## विवाहहोम इत्यादि

या प्रमाणे जीवशिवाला गाठी पडली. विवाहहोमाकरतां कृष्ण बोहल्यावर चढला. "नोवरीला कडेवर घ्या" असें म्हणून लहानथोरांनीं त्याला वेढलें. नवरीला हातीं धरताच स्त्रिया म्हणाल्या, "श्रीपति प्रकृतीनें वेढून

गेला, स्त्रीपाशांत अडकला!" कृष्णानें विचार केला, 'या प्रकृतीचें माझ्या बरोबर असणे निश्चित आहे. उगाच लाज कशाला? ही मला प्राणाप्रमाणें प्रिय आहे. प्रपंच्याच्या अलिकडे हिच्यामुळेंच सर्व नाम रूपात्मक जगत् अस्तित्वात येते. माझ्यावाचून ही एक पाउल ही पुढे जाणार नाहीं. तेव्हां वडिलांचे म्हणण्याप्रमाणें करावें हें उचित.' कृष्णानें नवरी अलगत उचलून बोहल्यावर ठेवली. सर्व स्त्रीपुरुष विनोदानें हसले.

विवाहहोम, सप्तपदी, पाणिग्रहण, प्रदक्षिणा वगैरे सर्व विधि झाले कान पिळण्याला मेहुणे भिऊं लागले. कारण त्याना रुक्मीची काय गत झाली होती, ते माहीत होतें! वस्त्रभूषणें देऊन कृष्णानें मेहुण्यांचा गौरव केला. वरमाय देवकीला बोलावणें गेले. पदोपदी पायघडया घातल्या. देवकीला मोठया समारंभानें आणलें. शुद्धमतीनें तिचे पुजन केलें. देवकीनें कृष्णरुक्मिणीचा जोडा पाहिला व निंबलोण उतरलें. सुनेला मांडीवर बसवून देवकीनें भंवऱ्याकळस हा अलंकार घातला. हळदीला मूळ पाठविलें. अनेक सुवासिनींमध्यें शांतिही प्रमुख होती. सुभद्रा ही करवली जणू उन्मनीच होती!

## नांव घेणें, हळद लावणें इत्यादि

नांव घेऊन कृष्णाचे पाय मागावे, तेंव्हा भीमकीला मोठा विचार पडला. श्रुतीला हि ज्याचें नामरूप कळत नाहीं, त्याचें नांव काय घ्यावें? इतक्यांत गो म्हणजे इंद्रियें, त्यांचा नियंता या अर्थाचें 'गोपाळ' हें नांव घेणें योग्य असें तिला वाटलें. 'वेगी पाय द्या गोपाळा' असें रूक्मिणी म्हणाली. कृष्णाला चटकन् खूण पटली. रूक्मिणीनें कृष्णाच्या अंगाला पुनःपुनः हळद लावली. त्याचे अंग अत्यंत निर्मळ. कृष्णचरणाचे ठिकाणीं रूक्मिणीला तीनही लोक दिसले. त्याच ठिकाणीं तिला आत्मरूपाचें दर्शन झालें. ती विकळ झाली. आईनें चटकन् धांवून तिला कडेवर घेतलें. नंतर बिरडें फेडण्याचा सोहळा झाला. ज्याच्या कृपावलोकनानें सर्व संसारबिरडे सुटतें त्याला वडिलांचें वचन मानणें कठिण नव्हतें. रुक्मिणीला हळद लावण्याचे वेळीं, "कृष्णानें नाव घ्यावें" असें रेवती म्हणाली. कृष्ण म्हणाला, "मला नांवरूप दिसतच नाहीं. नामरूपात्मक जगाची

व्यवस्था रुक्मिणीची ( प्रकृतीची ) आहे." तो म्हणाला, 'हे रुक्मिणीदेवी! तूंच सर्व मायारूप आहेस! माझ्यापेक्षां तूंच बरवी!' हें ऐकून सर्वांना हंसूं आलें. कृष्णानें रुक्मिणीला हळद लावली. तो रुक्मिणीचा दास झाला. नाथ म्हणतात, "**जैसा जैसा भक्तभावो। तैसा देवो होतसे॥**"

## पदवंदन

रुक्मिणी भावार्थाच्या अक्षता घेऊन कृष्णाच्या समचरणीं मस्तक ठेवूं लागली, परंतु सख्यांच्या वक्रदृष्टीमुळें तिला लाज वाटूं लागली. तेव्हां कृष्णानें समचरण चुकविले. आपण नमन चुकूं द्यायचें नाहीं, असा अभिमान रुक्मिणीनें धरला, परंतु ललाटीं कृष्णचरण लागतना. अभिमानामुळें तिला हिपुटी व्हावें लागलें. रुक्मिणीच्या जीवाला मोठी तळमळ लागली. ती स्फुंदूं लागली. उद्धवाला वाईट वाटून तो म्हणाला, 'देवा, भक्ताचा विनोद का करतोस? तिला चरणीं मस्तक ठेवूं दे!" उद्धवाच्या वचनावर निष्ठा ठेवून आणि लज्जा सोडून तिनें वंदन केलें आणि तिला समचरणाची भेट झाली. अहं सोहं गाठी सुटल्या. तिला परत उठण्याचेहि भान राहिलें नाहीं. "**खुंटला शब्द तुटले मौन।** चैतन्यघन समचरणाचा स्वानुभव घेत असतां तिची विषयदृष्टि नाहींशी झाली. सर्व सृष्टि आत्मानंदानें कोंदून गेली. ज्ञातृ, ज्ञेय, ज्ञान, ही त्रिपुटी हरपली. देह विदेह तिला आठवेना. ती कृष्णसाम्याला पावली.

आतां रुक्मिणी भानावर कशी येते याची सर्वांना काळजी पडली. एकच कोलाहल झाला. कृष्णहि तन्मयता पावला होता. तो तिला सावध करण्याचें विसरुन गेला. देवदेवी एक झालीं. कोणी कोणाला शुद्धीवर आणावें? कृष्णानें आत्मज्ञानाचे बळानें भीमकीला सावध केलें. दोघांचा जीवशिवभेद मंद झाला होता. आपणावाचून रिता ठाव त्याना दिसत नव्हता ती दोघें ऐक्यभावांत सावध झालीं. मायेनें ( आईनें ) लिंबलोण उतरलें. ऐक्याच्या बोहल्यावर वधुवरें शोभत होतीं. त्यांच्या पदराला गांठी दिल्या. चैतन्यचोर श्रीकृष्ण आत्मदृष्टीने अंतःकरणांतील संशयग्रंथी सोडतो, तेथें विनोदाला अवसर कोठला?

## आंबा शिंपणें

आंबा शिपण्याकरितां श्रीकृष्णरुक्मिणीला बरोबर घेऊन निघाला. येथें अध्यात्मपर सुंदर रूपक आहे. ॐकार हें त्या वृक्षाचें दृढमूळ, सुनील वृक्ष, अर्धमात्रापर्यंत वाढला. आगमनिगम ही त्याची पानें. वैराग्यरूप मोहर त्याच्यावर आला होता. श्रद्धारूप जीवनानें त्याचें पोषण होत होतें. मुमुक्षुभ्रमर त्यावर रुंजी घालीत होते. स्वानंदवसंत प्राप्त झाल्यामुळें वृक्ष नित्यनूतन दिसत होता. संतकोकिळ मौन सोडून आत्मबोधानें टाहो करूं लागले. इतर सर्व फळें येऊन गेल्यावर आम्रवृक्षाला फळें येतात हें खरे, परंतु त्याच्या रसास्वादानें पोटाची आटी नाहींशी होते. आत्मरसानें जो मुरलेला आहे त्याचेच सज्जन सेवन करतात. आंबा शिपण्याकरिता श्रीकृष्ण गेला. कुकुमाच्या वाटीनें प्रकृतिपुरुष त्या ठिकाणीं आंबा शिंपीत होते. त्यामुळें जगाचा आम्रवृक्ष विस्तारला. रुक्मिणीच्या हातांतील वाटी रिकामी होईना, कारण कृष्ण पूर्ण दृष्टीनें ती पहात होता.

## ऐरणीपूजन, वंशपात्रदान

तिसरे दिवशी तेलवण. चवथे दिवशी वाणपालट, म्हणजे नवीं वस्त्रें नेसावयास देणे. शुद्धमति ऐरणी पूजनाविषयीं दक्ष होती. व्याह्यांचा गौरव करताना भीमकानें त्याला कृष्णासमान मानले. वेदोक्त विधीनें कृष्णाला वंशपात्र दान केले. त्याचे मस्तकावर सोज्वळ ज्ञानदीपाचा प्रकाश पडला होता. “**भीमकें मांडिलें विंदान। भवऐरणी संपादन। कृष्णासी वंशपात्र दान। विधि विधान वेदोक्त॥ वंश विस्तारला सुरेख। सोळा कळांचे सोळा करक। प्रकृति स्वभाव सुपल्या देख। ज्ञानदीपें सोज्वळ॥** (प्र. १६ – १६०)”

## धेंडानृत्य

यापुढें १७ व्या प्रसंगांत धेंडानृत्याचे - एका ‘मतीच्या लोकाचाराचें वर्णन आहे.

---

[ऐरणीदान लग्नात वरातीच्या पूर्वी वेळूच्या परडीत (झालीत) कणकेचे दिवे लावून त्यात उमामहेश्वराची पूजा करून तें पात्र वरमातेस देतात वंशवृद्धीकरता वरमातेस वंशपात्राचे दान. महा शब्दकोश नाथाच्या वर्णनात ऐरणीपूजनाचा संबंध व्याह्याशी दिसतो वंशपात्रदान कृष्णाला केले असे सांगितले आहे.]

श्रोत्यांनीं नाथांना कौतुकानें विचारलें, "कृष्णाला कोणीं नाचविलें नवरीला कोणी नाचविलें?" वधू ज्या दिवशीं वराच्या घरीं जाते त्या दिवशीं वधूवरांस कडेवर घेऊन त्यांवर कुलदेवतांचा आशीर्वाद मागण्यासाठीं मनुष्यें नाचतात. हा कुलाचार सध्यां शहरांत कोठें दिसून येत नाहीं. खेडयांत हा प्रचार अजूनहि असण्याचा संभव आहे. या घेंडानृत्याचें वर्णन एकनाथांनीं सविस्तर केले आहे. त्यांचे वेळीं हा कुलाचार उत्कर्षानें चालू होता असें दिसतें.

वधूवर पक्षाचे दोघेजण कांस घालून रणांगणावर आले, आणि सभेकडे पाहून खुणा करूं लागले. आत्मस्वरूप परमेश्वराला खांद्यावर घेऊन ज्यानें नाचविलें तो घेंडा बोध हा होय. देहाभिमानानें नोवरी खांद्यावर घेतली आणि नाना छंद कुसरी दाखवून, द्रुद्रुताल सांभाळून भवस्वर्गामध्ये भोवरी दिली (गरगरा नाचला). कृष्णाला नाचवून आनंदमुद्रा मिळाल्यामुळें अमरत्व प्राप्त झालें. अधिक मागण्याचें कारणच उरलें नाहीं. ओंवाळणीच्या वेळीं त्रिगुणांचें वस्त्र टाकून देण्यास कृष्णभक्त नेहमीं तयार असतात; परंतु नवरीकडे ओंवाळणी चालली तेव्हां तेथें मागणें संपेना. विषयसुख अपार, अभिलाष सुटणार कसा? नाथ म्हणतात, "नऊ ठिकाणीं तडकलेलें देहवस्त्र, अजून मुक्त झाले नाहींत त्यांनीं टाकलें पाहिजे; परंतु लोभ सुटत नाहीं!" कृष्णाला घेऊन नाचलां नाचतां बोध दमला. परंतु अभिमान नवरीला खांद्यावरून उतरीना. नवरी घेऊन दूर पळूं लागला. जितका अभिमान कोंडावा तितका तो जोरानें उसळी मारतो! त्याला संतांनीं उपाय केला. सोऽहं बुद्धीला आणतांच अभिमानानें नवरीला खालीं ठेवलें. नंतर निजनवरीला खांद्यावर घेऊन कृष्णानें स्वानंदपुरःसर नृत्य केलें. ते कसें? पहिल्या तालाचे वेळीं लाथेनें अकार हाणला, उकार, मकार, यांच्या माथ्यांवर श्रीकृष्णानें पाय ठेवला. नृत्य करतांना मोठ्यानें उसळी मारून वैकुंठ कैलासाच्याही वर शून्यापलिकडे चिदंबरांत नृत्य केलें! आपणांहून नवरी उंच करावी, नवरीहून आपण उंच व्हावें, क्षणांत खालीं, क्षणांत वर! असें नाना प्रकारे नृत्य केलें. पाहतां पाहतां नवरानवरी एक दिसूं लागली. जीव आणि शिव ही भेदभाषा संपली. केवळ निजसुखानंद

राहिला. याप्रमाणें जर आपण एकरूप राहिलों तर सर्व जीव शिवपणाला मुकतील असा विचार करून श्रीकृष्णाने नवरी खांद्यावरून उतरवली.

धेंडानृत्य हा ग्रामीण कुलाचार कोणत्या प्रकारचा होता आणि त्यांतील नृत्याचा भाग कसा कुशलतेचा होता ही गोष्ट पुरातत्व जिज्ञासूला मोठी कौतुकाची वाटेल. त्यांतील अध्यात्माचें दर्शन मुमुक्षूकरतां आहे.

## तळी नाचविणें

धेंडानृत्य झाल्यावर तळी आणली. तळी म्हणजे नारळ, केशर घातलेलें देवतेला ओवाळण्याचें ताट. ती फलपुष्पांनीं सुंदर दिसत होती. त्यांतील ज्ञानदीपाचा प्रकाश सर्वत्र पडला होता. तळी अनुभवाच्या हातीं दिली. तो वंदन करून म्हणाला, लवकर कुलदेवतांचीं नांवें सांगा. मी कौतुकानें नाचवीन.' नवरीकडील कुलदेवता, माया, ममता, कल्पना व कामाक्षी या माजघरांत खेळत होत्या. "**वासना देवी सकळी। बाळा बगळा मुंगी मेळी। मारको मेसको मैराळी। उच्छिष्ट चांडाळी भाणाची ॥** प्र. १७–३५" आशातृष्णा या मुळापासून आमच्या कुळांत तशीच निंदा-देवी, मोहममता, लोभरूपी वेताळ, क्रोध हाच झोटिंग, या सर्वांचीं नावें सांगितलीं गेलीं. परंतु तीं रंगप्रविष्ट होईनात! अनुभवाने त्यांना वाटेला लावले, आणि तो उगा राहिला. "**कृष्णपक्षीं अलोलिक। अवघें कुलदैवत एक। नाचतां अनुभवाचें कौतुक। पडलें ठक सकळिकां ॥** प्र. १७–३९"

## उदर शिंपणें

शुद्धमतीने हातांत दुधातुपाची वाटी घेतली. देवकीच्या पुढें भीमकीला बसवून उदर शिंपलें. शुद्धमती देवकीला म्हणाली, 'तुमची कूस धन्य! कारण तेथें हृषीकेशीचा जन्म झाला" तिच्या चरणाला स्पर्श करून रुक्मिणीला मिरविलें. दोघांही मातापित्यांनीं नवरीला हातांनीं धरून तिला यथानुक्रमें यादवांचे मांडीवर बसविलें. भीमकाला गहिंवर आला उकसा बुकशी स्फुंदत त्यानें कृष्णचरणाला मिठी घातली. लज्जा सोडून शुद्धमती श्रीपतींच्या पायीं लागली; आणि रुक्मिणी स्वहस्तें देऊन तिनें वैकुंठपतीचा लाभ करून घेतला! सर्व स्त्रीपुरुषांच्या डोळ्यांतून अश्रू आले. ते म्हणाले, "रुक्मिणी मायेकडे पाहूं नको. कृष्णावर प्रेम

बसल्यानंतर मायामाहेराची खंती करूं नको. शुद्धमती वरमायेच्या पायांला कळवळयानें वेळोवेळा लागली. आणि डोळयात आसवे आणून म्हणाली, ‘भीमकीचा प्रतिपाळ करा.” ती भीमकाला म्हणाली, ‘मलाच भीमकी-बरोबर आंदण द्यावें. मी कृष्णाची दासी होईन. त्यांची चरणसेवा करीन.’ भीमक म्हणाला, ‘आपण सर्वस्वच श्रीपतीला अर्पण केलें आहे. आतां विकल्प नको. भाव आणि विश्वास हे दोघे भीमकीला आंदण दिले आहेत. ते कृष्ण सेवेला अहर्निश सादर राहतील. किती झालें तरी मातेचें हृदय तें! तें वात्सल्यानें हेलावल्यावांचून कसें राहील.?

वसुदेव उग्रसेन यांनी भीमकाला भोजनाचें आमंत्रण केलें. परंतु तो कृष्णाला म्हणाला, ‘भीमकीला पुत्र झाला म्हणजे तुझ्या पंक्तीचा लाभ मला दे.”

## वरात व गृहप्रवेश

वरात निघाली. भीमकाला निरोप दिला. तो स्वनगराला निघून गेला. द्वारकेंत वधूवरांचा गृहप्रवेश समारंभ झाला. त्याचें अत्यंत सुंदर वर्णन नाथानी केले आहे. कृष्णरुक्मिणी हत्तीवर बसून निघाली. बरोबर यादव होते. गवाक्षांत स्त्रियांची गर्दी झाली. दारोदार दिवे लागले. त्यावेळीं वेश्या आणि संन्यासी यांची भंडपघसणी झाली. विटाळ झाला म्हणून संन्याशानें वेश्येला रागानें लाथ मारली! वेश्येची वृत्ति तदाकार झाली होती. ती हसून कपाळ पिटून म्हणाली, “संन्यासीबुवा, तुमचा क्रोध सुटला नाही; तुम्ही उगाच दंड कांसोटीची विटंबना करीत आहां. तुम्हांला आत्मदृष्टि मुळींच नाहीं. मी सर्वांभूतीं समता मानतें. उगाच तुम्हीं भगवीं वस्त्रें नासून टाकलीं! तुमच्या ठिकाणीं शांति नाहीं . श्रीकृष्ण परमात्मा दृष्टीला पडला असतां विटाळ मानतां त्या अर्थी तुम्ही अंधच आहां!”

या कथेच्या द्वारें नाथांना भक्तिमार्गाचें खरे उदार स्वरूप सुचवा-वयाचें होतें असें मानावयास हरकत नाहीं.

वधूवरें महाद्वाराजवळ आलीं. त्यांवरून लिंबलोण उतरलें. सुभद्रेनें भाताची मूद ओवाळून टाकली. कृष्ण पुढें चालला. दासी पूर्ण कलश घेऊन आल्या. त्यांना वस्त्रभूषणें दिलीं.

## भाणवसाचा लग्नविधि

या पुढें भाणवसाचा लग्नविधि वर्णिला आहे. भाणवसा म्हणजे चुलीच्या मागील दगड, माती, चुना यांचा ओटा. लक्ष्यार्थानें स्वयंपाक घर. गृहप्रवेशाच्या वेळीं हा विधि करतांत. नवरीचे बापाकडून नवऱ्याचे घरीं पंचवीस मडकीं पाठविलीं जातात.

भाणवसाला मोठी शोभा आली होती. परंतु तेथील कृत्रिम लक्ष्मी कृष्णाला पाहून लाजली; व तिनें आपलें खरे रूप प्रकट केलें. भीमकीनें लक्ष्मीला पाहिलें तेव्हां दोनहीं रूपें आपलींच असें तिला दिसून आलें. वधूवरांना भाणवसावर बसवून ब्राह्मणांनी लक्ष्मीपूजन केलें. वाटी परमामृतानें भरून देवकीनें ती सुनेच्या ओठीं लावली. वृद्धाचार गोष्टी बोलली. तिनें विचारलें, "सूनबाई, आनंदी आहेस ना?" भीमकीनें उत्तर दिलें "परमानंदानें मी तृप्त झालें आहे, तुमच्या सेवेला हरिचरणीं प्राप्त झालें आहे."

बलरामाची पत्नी रेवती हिनें भीमकीच्या हातीं भाणवसाची निरवानिरव केली आणि तिला उपदेश केला. "कृष्णनाथाला वरून तूं आलीस तेव्हां आतां देणें घेणें, सर्व प्रकारे स्वच्छता ठेवणें, इत्यादि सर्व कार्यचिंता तुला वाहिली पाहिजे. कामक्रोधाचे उंदीर सर्व ठिकाणीं पोखरतील. त्यांचे कपाळीं तोंडीं पाथर घातली पाहिजे!

कणीक कशी चाळावी, पुरणपोळ्या, लाडू कसे करावे इत्यादि गृहिणीला आवश्यक अशा सूचना नूतन वधूला दिलेल्या आहेत. त्यांतही अध्यात्माचा सुगंध आहेच.

"**कणीक चाळावी असगट। पाखडून सांडावें कसपट। होईल परिपाक चोखट। पूर्णपोळया सिद्धलाडू॥ कृष्ण भाणवसा त्रिशुद्धी। अष्टमहासिद्धी नवनिधी। तेथे तूं वागावें अतिबुद्धी। जीव उपाधी** सांडूनी प्र. १८-५२" रुक्मिणीनें रेवतीला सांगितलें, "बाई जें जें तुम्हीं शिकविलें तें तें माझ्या हिताचेंच आहे." रेवतीला हें ऐकून आनंद झाला.

याप्रमाणें द्वारकेंत गृहप्रवेश झाला. घरोघरीं आंनदीआनंद होऊन आकाशांतून देवांनीं पुष्पवृष्टि केली आणि मोठा जयजयकार झाला.

एकनाथ म्हणतात, "हें स्वयंवरकथेचें निरूपण म्हणजे जीवशिवाचें लग्न. हा अर्थ अवधानपूर्वक पाहिल्यानें सात्त्विकांना समाधान लाभतें. या कथेची गोडी इतकी आहे कीं तिच्या योगें जीवशिवाच्या गांठी सुटतात; आणि लगोलग निजलाभप्राप्ति होते.

नाथांनीं हा ग्रंथ वाराणसी क्षेत्रीं मणिकर्णिकेच्या तीरीं रामजयंतीला शके १४९३ (इ. स. १५७१) चैत्र मासीं पूर्ण केला.

या स्वयंवरकाव्याचे समालोचन प्रामुख्यानें अध्यात्म दृष्टीनें केलें आहे. काव्यकथेच्या विविध प्रसगांतून अध्यात्माचा धागा कसा खेळविला आहे हीच गोष्ट प्रत्येक प्रसंगाचा सारांश देऊन वाचकाना सादर करावयाची या पलिकडे या लेखाचा अन्य हेतु नाही. आख्यानकाव्य या दृष्टीनें वर्णनकथनांत नाथानी दाखविलेले कौशल, प्रतिभेचें स्वातंत्र्य, भव्य आणि सरस कल्पनांचें सौंदर्य, त्यांच्या ओघवती प्रसन्न मनोहर वाणीचे माधुर्य, शद्बचित्र उभे करण्याची हातोटी, कृष्णरुक्मिणीच्या वर्णनात त्यांच्या वाणीला येणारा बहर, त्यांच्या अगदीं शारीरिक रूपसौंदर्याच्या वर्णनांतही नाथांनीं दाखविलेली सहृदयता व कोमलता इत्यादि बाबतींत जातिवंत कवित्व आणि महाकवीचे वैदग्ध्य यांचा जो सुंदर विलास दिसून येतो त्याचा परामर्श घेणें हें एका स्वतंत्र लेखाचे कार्य आहे. त्याचप्रमाणें या लेखाच्या उत्तरभागांत ज्या अनेक लौकिक विवाहविधीचें विस्तारानें वर्णन केलें आहे, त्यांची सामाजिक व धार्मिक इतिहासाच्या दृष्टीनें चिकित्सा करण्यासाठी महाभारतरामायणकाल, स्मृति, धर्मशास्त्रें यांचा मागोवा घेत थेट गृह्यसूत्रें व वेदकाल येथपर्यंत जाणें व आजपर्यंत लौकिक आचारांच्या रूपानें जे दृढमूल होऊन राहिले त्या त्या विधींचें कालपरिस्थित्यनुरूप विकासवैचित्र्य पाहणें या गोष्टी शास्त्रीय दृष्टीला मोठ्या उद्बोधक वाटणाऱ्या आहेत. परंतु त्यांकडे सध्या दूरतःच पाहून हा लेख संपविणें प्राप्त आहे.

---

# श्रीएकनाथांचें स्फुटकाव्यदर्शन ●●●

**श्री. बळवंत गणेश खापर्डे,**
कविभूषण, काशी.

## प्रास्ताविक

"एकनाथांचे अभंग" असा माझा विषय म्हणून मीं प्रथम 'श्रीएकनाथ-दर्शन-मंडळा-स दिला होता. पण नंतर, श्रीनाथांच्या अभंगांचें विवेचन करण्यास त्यांच्या सर्वच स्फुट काव्याचे विवेचन करणें भाग आहे असें आढळून आल्यावरून, तसें करण्याचें ठरवून, मीं त्याप्रमाणें माझ्या त्या लेखाचा मथळा बदलून घेतला आहे.

तसेंच, ह्या लेखांत मी पुढे जें काय लिहिणार आहे तें सर्व फक्त श्री नाथांच्या स्फुटकाव्याच्याच आधारे लिहिणार आहें; त्यांच्या दुसऱ्या कोणत्याहि लेखनाचा उपयोग ह्या लेखात मी करणार नाहीं, अथवा नाथांच्या अन्य एखाद्या लेखनात व त्या स्फुट काव्यांत कोठें कांहीं फरक असलाच तरी त्याचा परिहार किंवा समन्वय करण्याचा प्रयत्नहि मी करणार नाहीं, किंवा त्यांच्या स्फुट काव्यावरून निघणाऱ्या सिद्धान्ताच्या अथवा अनुमानांच्या पुष्टयर्थ त्यांच्या कोणत्याहि अन्य लेखनाचा ह्यांत कोठेंहि उपयोग करणार नाहीं. फक्त त्यांच्या स्फुट काव्यांवरून जें काय व जसें काय दिसतें तेंच तेवढें केवळ मी येथें देणार आहे. कारण, माझा विषय तेवढाच आहे; व त्याचा ह्याहून अधिक व्याप वाढविणें कोणत्याच दृष्टीनें इष्ट नाहीं.

"श्रीएकनाथ-दर्शन" ह्या पुस्तकांत हा निबंध अन्तर्भूत होणार आहे. 'दर्शन' शब्दाचे तीन अर्थ आहेत. एक, तत्त्वज्ञान; दुसरा, पाहणें; व तिसरा, दाखविणें. ह्या तिन्ही अर्थी हा श्लिष्ट शब्द ह्या ग्रंथाच्या संपादकांनीं ह्या ग्रंथाच्या नांवांत वापरला आहे अशी माझी समजूत आहे, व त्या तिन्ही अर्थीच मींहि तो निबंधांत वापरला आहे.

श्रीनाथांचें स्फुट काव्य ह्या विषयावर लिहितांना अगदीं पहिली मोठी अडचण उभी राहते ती ही कीं, श्रीएकनाथांची संशोधनपूर्वक प्रसिद्ध केलेली व संपूर्ण असलेली अशी विश्वसनीय गाथा दुर्दैवानें अद्यापि छापली गेलेली नाहीं. नाथांच्या स्फुट काव्यांच्या म्हणून छापलेल्या तीन गाथा आतांपर्यंत माझ्या पाहण्यांत आल्या आहेत; व आणखीहि कदाचित् एखाद-दुसरी त्यांची गाथा कोठे तरी प्रकाशित असेल; पण मला अधिक पाहण्यास मिळाल्या नाहींत, व प्रयत्न करून विकतहि मिळाल्या नाहींत; व ज्या तीन गाथा उपलब्ध झाल्या त्यांत परस्परांत पुष्कळ फरक आहे! त्यामुळें काय खरें व मूळचें हें निश्चित कळत नाहीं. अशा स्थितींत कोणती तरी एक गाथा प्रमाण मानून काम चालवणें भाग आहे; व अशा कामाला मला माझ्या स्वतःजवळ असलेली गाथाच तूर्त प्रमाण मानून चालणें हेंच एक सर्व दृष्टींनीं सोयीचें असल्यामुळें, श्री. रावजी श्रीधर गोंधळेकर ह्यांनीं प्रसिद्ध केलेली गाथाच मी ह्या लेखांत आधारास घेऊन चालणार आहे. नाथांची विश्वसनीय गाथा मराठींत नसावी ही फार दुर्दैवाची गोष्ट आहे; व ही उणीव कोणी, अथवा श्रीएकनाथ-दर्शन-मंडळच, पुढें मागें भरून काढील तर फार चांगले होईल. अस्तु.

श्री. गोंधळेकरांनीं आपल्या गाथेंत नाथांच्या सर्व फुटकळ काव्यांचे दोन भाग पाडलेले आहेत, म्हणून ह्या लेखांत पुढें स्थलनिर्देश करावयाचा असतां प्रथम भागाचा व नंतर क्रमांकाचा निर्देश केला आहे. पण त्यांतहि आणखी एक गोष्ट लक्षांत ठेवावयास पाहिजे. गोंधळेकरांच्या ह्या गाथेंत दुसऱ्या भागांत क्रमांकाचा छापतांना फारच गोंधळ केलेला आहे. ते आंकडे सबंध वाचून दुरुस्त करून घेतल्याशिवाय मी पुढें देत असलेल्या क्रमांकांवर तें तें लिखाण सांपडणार नाहीं.

नाथांच्या पुढील सर्व अवतरणांतील विरामचिन्हें, अर्थ सहज कळावा म्हणून, मीं घातली आहेत. कठिण वाटणाऱ्या शब्दांचे अर्थ त्यांच्याच पुढें मी कंसांत दिले आहेत.

(खंड पहिला)

# श्रीनाथांचें आध्यात्मिक दर्शन

## अवतार होते काय?

श्रीनाथांसारख्या पूर्ण पदाला पोहंचलेल्या, इतकेंच नव्हे, तर क्वचित् एखाद्या अवतारी पुरुषाप्रमाणेंहि बोलून जाणाऱ्या, महापुरुषासंबंधानें लिहिणें किंवा बोलणे हें सोपें काम नाहीं. श्रीनाथांना जगतांतील आपल्या कार्याची पूर्ण ओळख व जाणीव होती. ते स्पष्टपणें म्हणतात, "**धर्माची वाट मोडे। अधर्माची शीग चढे। तैं आम्हां येणें घडे। संसारस्थिति॥ आम्हां कां संसार येणें?। हरिभक्तिनामस्मरणें। जड जीव उद्धरणें। नामस्मरणेंकरूनी॥ सर्व कर्म ब्रह्मस्थिति। प्रतिपादाव्या वेदोक्ति। हेंचि एक निश्चितीं। करणें आम्हां॥**" (१.२८). ह्यातील पहिली ओवी म्हणजे तर भगवद्गीतेंतील "यदा यदा हि धर्मस्य." ह्या भगवंतांच्या प्रसिद्ध उक्तीचें मराठी भाषान्तरच भासतें; पण हे नाथांचे स्वतंत्र व कळकळीचे उद्गार आहेत हें विसरतां कामां नये. नाथांनीं स्वतःला महार किंवा जागल्या कल्पून, पूर्ण वेदान्ताच्या अर्थानें भरलेले, आठ दहा तरी "जोहार" लिहिले आहेत. त्यांपैकीं एकांत ते म्हणतात, "**दोघे कारभारी जोडयाचे। मोकाशी म्हणविती सृष्टीचे। वस्तीकर (राहणारे) वरल्या गांवींचे। खबर घ्यावया खालील गांवठाण्याचे। मज रवाना केलें कीं जी मायबाप॥**" (२.११३). अशा विधानें ज्यांनीं निधडया छातीनें केलीं त्याची स्वतःच्या जीवितकार्याविषयीं पूर्ण खातरी होती, ह्यांत काय संशय आहे.? आणि असा संशय एखाद्या बाताडया व्यवहारी माणसाविषयीं बाळगताहि आला असता; पण श्रीनाथासारख्या पूर्णत्वाला पोहंचलेल्या पुरुषाविषयीं असा संशय घेतांच येत नाहीं. नाथ

## पूर्णत्वाला पोहंचलेले पुरुष

होते, ह्याविषयीं शंभर पुरावे आहेत. अर्थात प्रस्तुतसारख्या एखाद्या निबंधांत ते सर्वच्या सर्व देतांहि येणार नाहींत. पण तरी, नाथ ह्या विषयीं अगदीं स्पष्टपणें काय सांगतात हें अगदीं अवश्य पाहण्याजोगें

आहे. नाथ म्हणतात," **आतां आम्ही सहजची थोर। ब्रह्मा विष्णु महेश्वर। परब्रह्म ओंकार। परात्पर जगदात्मा॥ आम्ही सहजचि स्वतःसिद्ध। जागृति सुषुप्ति साध्य। तुर्या निसाक्षिणी बोध। अति अगाध उन्मनी॥ ते उन्मनी परात्पर। निर्गुण जो निराकार। तुर्या तिचा आकार। एका जनार्दनी सगुण साकार देह झाला॥** (१. ७८७) **नमो सद्‌गुरुराया दीनाच्या वत्सला।** त्या आपल्या महत्वाच्या आणि त्याच अभंगात एकनाथ महाराज सांगतात, **सद्‌गुरुराजानें केली मज कृपा। ब्रह्मानंद सोपा केला मज॥ ...काय सांगू मज सुख वर्णवेना। जेणें मी-तूं-पणा मावळला॥ मावळला आतां जगदंधकार। सकळ संसार पारुषला** (नाहीसा झाला)॥ **पारुषला मज सकळ द्वैतभाव। दिसे भावाभाव ब्रह्मरूप॥ ब्रह्मरूप जग व्यष्टि** (व्यक्ति) **हे समष्टि** (विश्व)। **भासे कृपादृष्टीं सद्‌गुरूच्या॥ सद्‌गुरूच्या कृपें हरपे जीवाशिव। ब्रह्म एकमेव अद्वितीय॥ अद्वितीय ब्रह्म प्रत्यक्ष हें दिसे। दृष्टि समरसे तदाकार॥ . .... मावळली मज द्वैताद्वैतक्लृप्ति। सुखें सहज स्थिति भोगितसों॥ . ब्रह्मसुखें झालों मी सदा संपन्न! ब्रह्म परिपूर्ण अनुभविलें॥ अनुभविलें ब्रह्म अंतरसबाह्य। जग ब्रह्ममय झालें दिसें॥ झालें दिसें ब्रह्म चतुर्दशलोक। शुद्धाशुद्ध विवेक नाहीं जेथें॥ नाहीं जेथें द्वैताद्वैत ते उपाधि। ते सुखीं समाधि दासा** (मला) **झाली॥ ..एका जनार्दनी गुरुपदीं मस्तक। ठेवुनी सम्यक्** (खरा, पूर्ण) **ब्रह्म झाला॥** (१ ९७८). तसेंच आणखी हा पुढील अभंग पहाः— **जनार्दनें कृपा केली। वृत्ति ब्रह्माकार झाली॥ ... ... मन मनपणा हरपलें। तन्मय होऊनिया ठेलें॥ चित्त चिंतना विसरलें। चैतन्यरूप होऊनि ठेलें। निश्चयरूप जे का बुद्धी। परब्रह्म ते निरवधि॥ अहंपणें अहंभाव। तोचि झाला देवाधिदेव॥ ... जे जे क्रिया घडे अंगीं। ते ते ब्रह्मरूप जगीं॥ ....समष्टि— व्यष्ट्यात्मक जग। तें हें परब्रह्म अभंग॥ एका जनार्दनी भाव। एकनाथ झाला देव॥** (१ १४१२). यापेक्षां स्पष्ट आणखी माणसानें कसें सांगावें? आणि आपल्या स्फुट काव्यांत त्याच दोन-तीन ठिकाणीं श्रीनाथांनीं आपल्याला परमपद प्राप्त झाल्याचे सांगितलें आहे असें नाही. त्यांनीं तें इतक्या ठिकाणीं सांगितलें आहे की, त्यांतील अवतरणे तरी कोठील कोठील, कोणती कोणती, व किती द्यावीत म्हणून भांबावल्यासारखें होतें. किंबहुना, मला परमपद प्राप्त झालें आहे, हें विधान इतक्या निश्चितपणें व इतक्या वारंवार, ठासून करणारा इतका धाडसी लेखक सर्व जुन्या—

नव्या गद्य–पद्य मराठी वाङ्मयांत तरी श्रीनाथांशिवाय दुसरा दिसत नाहीं. बहुतेक संतकवींच्या काव्यात किती तरी पश्चात्तापात्मक, आणि अद्यापि ध्येय कसें हातीं येत नाहीं म्हणून लागलेल्या तळमळीनें उसळून तोंडांतून बाहेर पडलेली रसरशीत भावनापूर्ण, अशी रचना आढळून येते. पण नाथांच्या ह्या उदंड स्फुटकाव्यरचनेचें आश्चर्य हें आहे की, हिच्यांत ह्या दोन्ही प्रकारची रचना एकत्र करूनमुद्धां ती मुष्किलीनें हाताच्या बोटांवर मोजण्याइतकीच भरल्यास भरेल, इतकी थोडी आहे ! **अवघेंचि त्रैलोक्य आनंदाचें आतां !** ॥ ( १.२ ) ही नित्य ब्रह्मस्थितींत, आनंदाच्या सहज-समाधींत धुंदपणे डोलत राहण्याची वृत्ति, हीच मुळीं नाथांच्या ह्या सर्व स्फुटकाव्यरचनेच्या मुळाशी असलेली बैठक आहे. ‘जिसने पाया उसने छुपाया’ अशीच बहुधा आध्यात्मिक अनुभवांच्या बाबतींत स्थिति आढळून येते. पण दयाघन नाथ तसे नाहीत. त्यांनी आपल्याला काय सांपडलें, दिसलें, अनुभवाला आले, तें शब्दाच्या फाटक्या कपड्यांत जितकें म्हणून आवळून बांधतां येईल तितके बांधून, आपले सर्वस्व म्हणून, ते गाठोडें जगताला मोकळ्या मनानें दान करून टाकलें आहे. **कठोपनिषद** सांगतें, **आश्चर्यो वक्ता कुशलोऽस्य लब्धाऽऽश्चर्यो ज्ञाता कुशलानुशिष्टः** ॥ (२.७) म्हणजे, “( ह्याचें, आत्म्याचें ज्ञान ) सांगणारा एखादाच असतो. त्यांतून ह्याचें चांगलें ज्ञान प्राप्त झालेला क्वचितच सांपडावयाचा. ( कारण ) ह्याविषयीं पूर्ण ज्ञान असलेल्या ज्ञात्यानें उपदिष्ट असा ज्ञाता एखादाच आढळतो.” म्हणून श्रीनाथांचीं हीं वचनें बिनमोलच वाटतात. त्यामुळे, कांहीं वाचकांचा रोष, आणि त्यांनी दिलेले सर्व दोष, सहन करण्याला मन तयार करून, जगतांत क्वचितच डोळ्याना वाचावयास मिळणाऱ्या आणि उभ्या जन्मांत एखाद्याच भाग्यवंताला एखाद्याच वेळीं कानांनीं ऐकावयास मिळणाऱ्या अशा दुर्मिळ स्वरूपाच्या कांही महत्त्वाच्या नाथवचनांचा मी येथे संग्रह करण्याचें ठरविलें आहे. अशीं श्रीनाथांचीं आणखीहि पुष्कळ वचनें आहेत. आपल्याला काय

## स्थिति

प्राप्त झाली आहे, हें श्रीनाथ पुढील शब्दांत स्पष्ट सांगतात :—
**एका जनार्दनी भेटला पांडुरंग ।** ( १.६ ) **अवघा जगीं विठ्ठल उभा ।**

... जिकडे पाहें तिकडे दिसे ।...... एका जनार्दनी एकु । विठ्ठल अवलोकी लोकु । (१.७). एका जनार्दनी मागे दान । थिता ( लयाला ) नेलें जीवपण । शेखीं ( शेवटी ) वेंची शिवपण । केलें निजसुखसंपन्न ॥ ( १.१५९ ) एकहि साधन न करी, परि तो ( स्वतः नाथ ) बळेंचि मातला फुका रे । आपपर देहीं कांहींच नेणे, रायासी म्हणे तो ( स्वतः नाथ ) रंका रे ॥ ..... आपण जैसे पूर्ण तैसें एका ( एकनाथाला ) जनार्दनीं केलें रे ॥ ( १.१८१ ). पहाला ( उजाडला ) तो दिन हरिखाचा आम्हां । सर्वां भूतीं अभिन्न सदा देखों श्रीरामा ॥ (१.३२६). एका जनार्दनी गुरुरूपीं दृष्टि । दिसे सर्व सृष्टि परब्रह्म ॥ ( १.३७९ ) म्हणे एका जनार्दनी । राम दिसे जनीं वनीं ॥ ( १.३८० ) ब्रह्म परिपूर्ण अनुभविलें । ( १ ३८१ व ९७७ ) तो देखिला वो तो देखिला । सबाह्य अंतरीं व्यापुनिया राहिला ॥ (१ ३८४). पहाता पहातां मन नाहींसे जालें । एका जनार्दनी केलें मज ऐसें ॥ ( १.३८७). सर्व भावें दास झालों मी उदास । तोडिला मायापाश जनार्दनें ॥ माझें मज दावियलें, माझें मज दावियलें । उघडें अनुभविलें परब्रह्म ॥ ( १.३९१ ). एका जनार्दनी मज हा अनुभव । जनार्दनें देव दाखविला ॥ ( १.४२६ ) आशा केली तें पावलों । एका जनार्दनी धन्य जालों ॥ ( १.४६५ ). जनार्दनाचा एका रंगला चरणीं । निज रंगीं रंगोनी मिळोनि गेला ॥ ( १.५६६ ). एका जनार्दनी प्रकाश संपूर्ण । सर्व नारायण बिंबलासे ॥ (१.७६१). तेथें वेदासी बोबडी । अनुभवीं पैलथडीं । एका जनार्दनी गोडी । नित्य घेतसे ॥ ( १.७८६). निरालंबी विश्रांति । पूर्ण एका जनार्दन स्थिति । अखंड भोगिताती । जनार्दन कृपे ॥ (१.८२५). एका जनार्दनी तुर्या । सोऽहं ते दैवी माया । साक्षित्वें जाण असे श्रोतियां । सांगितलें ॥ ( १.८३५ ). इच्छिलें पावलों, इच्छिलें पावलों । इच्छिलें पावलों संतसंगें ॥ ( १.१२०७ ). येणें जाणें खुंटलें क्रियाकर्म ठेलें । मज माझें भेटलें आत्मरूप ॥ त्यागूं तें काय भोगूं तें काय। सर्व ब्रह्मरूप पाहें कोंदाटलें ॥ क्रिया, कर्म, धर्म, निखळ ( केवळ ) परब्रह्म । त्यागु भोगु तेथें निवळ भ्रम ॥ (१.१३५८). मानस मंथोनी पावलों पार। ( १.१३७३ ). एका झालासे तल्लीन परब्रह्मीं ॥ ( १.१४१३ ). एका जनार्दनी वेरझारी खुंटली देखा ॥ ( १.१४८० ). जनार्दनांनीं मला उघड दाखविलें देवा । ( १.१७१० ). दाखविलें देवा देहींच । (१.१७११). प्रभुराज माझा स्वामी गुरुदेव । दिला अनुभव शुद्ध भूमि ॥ शुद्ध भुमि केली पेरी ज्ञानबीज । परब्रह्मी सहज मज नेलें ॥ नेलें गुरुरायें मज निरंजनीं । ज्या श्रुति लाजूनी म्हणे न इति ॥ इतिकर्तव्यता सरलीसे दासा ।...... तिघां देहांतूनि सोडविलें मला । ...... नाहीं

**मजलागीं द्वैत तें राहिलें। ब्रह्म तें उरलें एक मज ॥** (२ ११२) **द्वैताचा लेश उरला नाहीं। सच्चिदानंदरूप प्रत्ययास येऊन। समाधान पावले ॥** ( २.१३८ ). **एका जनार्दनी कांडण कांडितां। ब्रह्म-सायुज्यता प्राप्त झाली ॥** ( २.१६९ ). **एका जनार्दनी कांही नाही उरलें द्वैत ॥** (२ १७०). अशा ह्या स्थितींत नाथाना

## अनुभव.

काय आले ? खरी गोष्ट अशी की, **इंद्रियांवीण आहे गोडी। तेथींचा स्वादु कोण काढी ? ॥** (१ ८१). पण तरी ते वर्णन करतात की, तेथील अगदीं पहिली "गोडी" ह्या अनुभवाची आहे की, ईश्वर सर्वसाक्षी आणि सर्वव्यापक आहे. ... **कैसी खेळूं लपंडाई। अनंत लोचन तुझे देहीं** (देही)। **डोळे झाकावे कवणे ठायीं। तुझें सर्वांग देखणें** ( दृष्टीने युक्त **पाहीं रे ॥**" ( १.१६४ ) . ही ईश्वराच्या सर्वव्यापकत्वाची श्रीनाथाची दृष्टि अखेर येथवर जाऊन पोहोचली कीं, रावणाच्याहि शरीरांत नाथाना रामच दिसूं लागला ! **ब्रह्म धरुनी मुंगीवरी** (पर्यंत)। **राम व्यापक चराचरीं। तो रावणाचेही शरीरीं। इंद्रियव्यापारीं नांदत ॥** (१.४०३) कोणत्याहि नीचाच्या ठिकाणी सुद्धा त्यास ईश्वरच दिसे. **सर्वां भूतीं देव वसे। नीचा ठायीं काय नसे ?। नीच कोठोनी जन्मला ?।** (१ १७९४) इतकेच नव्हे, तर सर्वांच्या अधःपाताला कारण झालेलें जे "मन ओढाळ गुरूं" ( मोरोपंत ), त्या मनाच्या त्या अधःपातकारी आवेगात सुद्धां श्रीनाथांना ईश्वरच दिसूं लागला ! **मनाच्याहि वेगु दिसताहे सवें गुप्त माजीं** (आत) **उभा देवो ॥** ( १.११५ ) हें नाथाचें मत अन्ततः खरे आहेच. पण किती उच्च व सूक्ष्म हा विचार आहे ! ईश्वराच्या सर्वव्यापित्वाचा साक्षात्कार त्यांना पुढे इतका तीव्रत्वानें व प्रत्यक्षत्वानें होऊं लागला की, ते म्हणूं लागले, **पूजा करूं तरी पूजे नाहीं ठाव। करूं तरी पूजा कवणाची सांगा। देवावीण जागा रिती कोण ? ॥** ( १.१७१९ ) त्यास असें दिसूं लागलें की, **जनीं नारायण। अवघा भरला जनार्दन ॥ . . सर्वां ठायीं नारायण।** ( १.१२०० ). **सागरीं जे जे उपजे लहरी। तैसा व्यापक श्रीहरि ॥ जन तोचि जनार्दन।** ( १.१८८३ ). **साकर दिसे परि गोडी न दिसे। ते काय त्यावेगळी असे ? ॥ तैसा जनीं आहे जनार्दन। तयातें पहावया सांडी अभिमान ॥ कापुरा अंगीं परिमळु गाढा। पाहतां**

**उघडा केवि दिसे ? ॥ पाठ पोट जैसें नाहींच सुवर्णा । एका जनार्दनी यापरिं जाणा ॥** (१.१२४). [पुष्कळांची समजूत अशी असते कीं, 'जनता जनार्दन' हा अलीकडला, नवीन, व देशभक्तीच्या व लोकशाहीच्या कल्पना आम्ही पाश्चात्यांपासून शिकल्यानंतर (-हीहि कल्पना चुकीचीच आहे-) उत्पन्न झालेला शब्द आहे. पण तो मूळ श्रीनाथाचा शब्द आहे, व आमच्याकडील जुना शब्द आहे, हे ह्यावरून ध्यानांत येईल. असो.] ही दृष्टि उत्पन्न झाल्यावर नाथ लोकांस विचारूं लागले, "**कासियासी तपा धावा । जवळीं असत शेजे** ( शेजारी ) **गांवा ॥ राम जवळी चुकले । जपें तपें भांबावले ॥ तीर्थी नाहीं क्षेत्रीं नाहीं । जवळी असतां भ्रांति पाही ॥ असतां सबाह्याभ्यंतरीं । नाहीं म्हणुनी दैन्य करी ॥ ज्यालागिं सैरा हिंडे । तोचि तया मागें पुढें ॥**" ( १८७ ) सर्व विश्व सचेतन आहे हा साक्षात्कार, आणि त्यामुळें उत्पन्न झालेला दयाभाव, ही दोन्ही श्रीनाथांच्या ठिकाणीं किती कमालीच्या सूक्ष्मतेला पोहोंचली होती, हें पुढील अभंग वाचला असता ध्यानात येतें:—

**भजन चाललें उफराटें । कवण जाणे खरें खोटें ॥ जवळीं असतां देव । भक्ता उपजला संदेह ॥ सचेतन तुळशी तोडा । वाहाती अचेतन दगडा ॥ बेला केली तडातोडी । लिंगा लाखोली रोकडी ॥ अग्निहोत्राचा सुकाळ । शमी-पिंपाळासी काळ ॥ तिन्ही देव पिंपळांत । अग्निहोत्रीं केला घात ॥ मुख बांधोनी बोकड मारा । म्हणती सोमयाग करा ! ॥** (१.१५३). त्याचप्रमाणें हेहि नाथाचे उद्गार फारच लक्षात घेण्यासारखे आहेत:— **जळ स्पर्शों जातां स्नानीं । तंव चिन्मात्र भासे जीवनीं ॥ ......अंगत्व मुकलें अंगा । स्नानें सोवळी जाली गंगा ॥ एका जनार्दनी मज्जन । सकळ तीर्थं जालीं पावन ॥** ( १. १३५२ ). हा नाथांचा पूर्ण ब्रह्मअनुभवानें उत्पन्न झालेला आत्मविश्वास, पावित्र्यभाव, व अनुभव होय. ह्याच चेतनाचेतनाच्या भावनेनें नाथ विचारतात, **सचेतनीं द्वेष अचेतनीं पूजा । भक्ति गरुडध्वजा केंवि पावे ? ॥** ( १. ४१ ). ह्या वरील उताऱ्याचा अर्थ असा नव्हे की, नाथ जप, तप, तीर्थ, पूजा, अग्निहोत्र, यज्ञ, इत्यादि सर्वांच्या विरुद्ध होते. ह्यांच्या विरुद्ध ते नव्हते. पण ह्यांच्या आत जें तत्त्व आहे व जें सत्य आहे तें त्यांतून निघून गेल्यास मात्र त्यांस ह्या गोष्टी फोलच वाटत होत्या, हे त्यांच्या लेखनावरून अगदी उघड आहे. तसेंच, त्यांचा ईश्वराच्या सर्वव्यापित्वाचा अनुभव व तज्जन्य सचेतन — अचेतनाचा

तरतमभाव, ह्याच गोष्टी येथें लक्षांत घ्यावयाच्या आहेत. ह्या मुद्याविषयीं कांहीं विवेचन ह्या निबंधांत पुढें येणारच आहे. असो. ईश्वराच्या सर्वव्यापित्वाच्या अनुभवाबरोबरच श्रीनाथांस हेंहि भान झालें की, कर्ता करविता परमेश्वरच आहे; मी नव्हे; इतकेच नव्हे, तर **माझें मीपण नाहीं स्वतंत्र** (१.३१७). **अहं-महिषासुर भेदिला जिव्हारीं । नामें दो अक्षरीं निर्दाळिला ॥** ( १ १३५ ). असें देवानें केलें असें ते सागतात. आणि मग तर ह्याच्याहि पुढें जाऊन नाथांस हा साक्षात् अनुभव आला की, मीच स्वतः परमेश्वर-रूप आहें. नाथ म्हणतात, **आतां कैसेंनी पूजूं देवा । माझी मज होतसे सेवा ! ॥ अन्न, गंध, धूप, दीप । तेंही माझेंचि स्वरूप ॥ एका जनार्दनी करी पूजा । तेथें पूज्य पूजक नाहीं दुजा ॥** ( १. १३५५ ). हाच अनुभव जवळजवळ ह्याच शद्वांत, किंवा शद्वाच्या थोड्याशा फरकानें, नाथांनी एक दोन नव्हे, तर आणखी आठ ठिकाणीं आपल्या स्फुट काव्यांत वर्णन केला आहे ! ( १.१०४,१७९,१८०,१८७,८६१,१३५६,१३५७ व १८०५ ). अशा एकंदर झालेल्या ह्या नऊ ठिकाणांशिवाय दहाव्या ठिकाणीं ह्याविषयींच लिहिताना तर नाथांनीं ईश्वराशीं झालेल्या ह्या तादात्म्यभावनेचे परमोच्च शिखर गांठलें आहे. त्यांना तेथें म्हणावयाचें आहे की, 'ईश्वराची भक्ति कर.' पण परमेश्वर व मी एक, हा अनुभव मग त्याच्या इतका रोमारोमांत भिनला होता की, 'ईश्वराची भक्ति कर' म्हणण्याऐवजी 'आत्म्याची भक्ति कर' असेंच म्हणण्याचा विचार त्यांच्या मनांत आला; आणि आत्मा म्हणजे 'मी'. म्हणून, 'आत्म्याची भक्ति कर' असें सांगण्यासाठी 'मी-ची' भक्ति कर, असें त्यांस म्हणावयाचें होतें. पण त्यांनी 'मी-ची' भक्ति कर असें म्हणण्याऐवजी सरळ 'माझी भक्ति कर' असा प्रयोग करून टाकला आहे ! तो त्यांचा आश्चर्यकारक अभंग असाः—
**साक्षात्कार होता । साच बद्धता नुरे तत्वतां ॥ माझा होतां अनुभव । कल्पनेसी नुरे ठाव ॥ माझे देखतां चरण । संसारची नुरे जाण ॥ माझी भक्ति करितां । दोष नुरेचि सर्वथा ॥ सर्वां ठायीं मी वसें । एका जनार्दनी भेद नासे** ॥ (१.१८७०) नाथांचा आत्मसाक्षात्कार आणखी चढत व गहिरा होत चालला. **शुद्ध ब्रह्म ज्ञानांचा घडा ।** येथून सुरुं होणाऱ्या लांब अभंगांत नाथ स्पष्ट सांगतात कीं, "आत्मा मी" हा सर्व विश्व आहे ! आणि त्याचें ह्या अभंगभर वर्णन करतात ( १.७८४ ). हा अभंग इतका

सुंदर आहे की,तो इतका लांब नसता तर सबंधच येथे दिला असता.ह्याशिवाय आणखी एका जागीं (१.८४८) ते पुनः तोच भाव तशाच पण थोडया वेगळया रीतीनें वर्णन करतात. आता ह्या अवस्थेंत नाथ आत्मा व ईश्वर ह्यांचा अभेद अनुभवण्याच्या अशा परमोच्च कोटीला पोहोचतात की, कर्ता करविता कोण आहे हें सांगतांना ते मुळीं 'आत्माराम,' 'पंढरीनाथ' 'नारायण सर्वसाक्षी'. हे सर्व शब्द एकाच अभंगांत अगदी समानार्थक म्हणूनच वापरतात (१.२९४). तसेंच, ह्या स्थितींत उचंबळून ते स्वतःचे (आत्म्याचे) वर्णन शुद्ध परब्रह्माच्या पुढील संस्मरणीय शब्दात करतात:–

**जेथें निरसोनी द्वैत म्हणताती अद्वैत । त्याहुनी अतीत स्वरूप माझें ॥ तें मी लक्ष्याहि लक्ष्य पराचेंही पर । जेथें वेदशास्त्रें लाजोनी गेलीं ॥ गिळोनी अज्ञान निखळ** (शुद्ध) **म्हणती ज्ञान । उभयांहुनी भिन्न स्वरूप माझें ॥ सच्चिद्आनंद प्रतिपादिती वेद । ह्याहुनी अगाध स्वरूप माझें ॥ निरसुनीया कर्म म्हणती परब्रह्म । याहुनी उत्तम स्वरूप माझें ॥ माया आणि ममत्व निरसूनी शुद्ध सत्त्व । सत्त्वाचें निजसत्त्व स्वरूप माझें ॥ जेथें पद** (ब्रह्म) **आणि पिंड** (व्यक्तित्व) **अभिन्न अखंड । त्याहुनी उद्दंड स्वरूप माझें ॥ जेथें शुद्ध आणि शबल म्हणताती केवळ । त्याहुनी निर्मळ स्वरूप माझें ॥ ब्रह्मस्फुरण स्फूर्तीचि कारण । याहुनी परतें जाण स्वरूप माझें ॥ एका जनार्दनी एकपणा अतीत । चित्ताचें अचिंत्य स्वरूप माझें ॥** (१.३६१). मीच परमेश्वर आहें, मीच सर्व विश्व आहें, मीच अद्वैताच्याहि पलीकडे व वर आहें, ही जी उच्चतम अंतिम अनुभव वर्णन करण्याची पद्धति श्रीनाथांनी ह्या जागीं स्वीकारली आहे, हाच छांदोग्योपनिषदांत सांगितलेला (७.२५.१) "अहंकारादेश" होय. असो. हें विलक्षण पण परम सुंदर वर्णन आता ह्याच्या पलीकडे जाणेंच शक्य नाही. हा अभंग नाथांच्या अत्युत्तम अभंगापैकी म्हणून गणण्यास कांहीच हरकत नाही. पण ह्या स्थितींत, नाथ सागतात; व्यष्टीचा मुळीं 'मी'-च नाहीसा होतो ! **माझें मीपण मजमार्जी निमालें । एकाऽनेक सकळ सहजी सहज जालें ॥** (११२७). **माझें मीपण पाडिलें वोस । ..... मीपण जालें वाव** (व्यर्थ) **॥** (१.८४९). पण मग आतां व्यवहार कसा चालतो ? नाथ सांगतात, आता इंद्रियें 'वर्ततात' (गीता); ईश्वरच माझ्या द्वारें काम करतो; मी कांहींहि करीत नाहीं. "......**देह प्रारब्धें वर्तेला । काया**

**वाचा, मनें आपुला । व्यापार करताती ॥** (१.८५२). **तें** ईश्वरास म्हणतात, **मर्दुनी शंखासुरा हानें वागविसी कलीवरा** (शरीराला)। **तेंवि निवटोनी** (नाहीसा करून) **अहंकारा माझ्या वागविसी शरीरा॥ येथें नवल नव्हे पाहा हो । माझा देहची वागवी देवो ॥ ... कर्म, कार्य, कर्तव्यता । माझेनि नांवें तूंचि आतां॥ एका जनार्दनीं निजात्मता। कर्म करून नित्य अकर्ता ! ॥** (११३८३). किती परमोच्च कोटीची ही स्थिति ! ही गीतेंत व सर्व वेदान्त ग्रथात वर्णिलेली अत्युच्च स्थिति श्रीनाथास प्राप्त झाली होती हे ह्यावरून स्पष्ट आहे.

ह्याच अत्यंत थोर अनुभवाची इतर सर्व बाजूंनीहि केलेली वर्णनें त्याच्या लेखनांत विपुल आढळतात. उदाहरणार्थ, ते म्हणतात, आत्मा सर्व एक आहे (१.८५३, १७७३, १७७४), व आत्म्यात सर्व एकच आहे (१.७६७) हा छांदोग्योपनिषदांतील (७.२५.२) 'आत्मादेश' होय. ह्या आत्म्याचे स्वरूप कसें आहे हें बौद्धिक दृष्ट्याहि नाथांनीं अगदीं वेदान्ताच्या परिभाषेंत तीन अभंगांत विशद करून वर्णिलें आहे (१.१८५०, १८५१, १८५२), व आत्मा व ईश्वर, जीव व शिव, हे अगदीं एक आहेत असें प्रतिपादन केलें आहे (१.१२६, १८५३). आणि हा सर्व अनुभव मनुष्याला 'हृदयींच' येतो असेंहि त्यांनी बजावून ठेवलें आहे (१.१७३१, १७३२, १७३३). येथे मनुष्याच्या आध्यात्मिक अनुभवाची परम सीमा झाली; व म्हणून हें वर्णन आता मलाहि येथेच संपविणें भाग आहे. पण कोणी ह्यावरून आपली अशी कल्पना करून घेऊं नये की, नाथांनी आपले फक्त हेच, इतकेच, व ह्याच प्रकारचे, आध्यात्मिक अनुभव आपल्या स्फुट काव्यात वर्णन केले आहेत. त्यांनीं आणखीहि पुष्कळ, व पुष्कळ प्रकारचे, अनुभव वर्णिले आहेत, व जीं अवतरणें मीं दिलीं आहेत ह्याच अर्थाची व हेच अनुभव वेगवेगळया तऱ्हेनें वर्णन करणारीहि त्यांचीं अनेक अवतरणे मला विस्तारभयास्तव, फार मन आवरून, सोडावी लागलीं आहेत. मी ह्या विषयाची एक ठोकळ रूपरेषा मनाशीं आंखून, तिच्यासाठीं आवश्यक असलेलीं कांही निवडक वचनेंच तेवढीं येथें घेतली आहेत; व असेंच ह्या लेखात पुढेंहि करावें लागणार आहे. नाथांसारख्या ज्या सत्त्वशील पुरूषांचा सहज उच्चारलेलाहि शब्द, आणाभाका घेऊन

त्रिवार उच्चारलेल्या "मुरब्बी व्यवहारी" माणसाच्या शब्दापेक्षां शतपट जास्त विश्वसनीय असतो, त्यांनीं इतक्या वारंवार, इतक्या निश्चितपणें, व इतक्या स्पष्टपणें, जें घडलें म्हणून सांगितलें, ते घडलें असलेंच पाहिजे, ह्यांत तिळप्राय संशय नाहीं. ह्यावरून श्रीनाथांचा स्वतःचा थोर आध्यात्मिक अधिकार ज्याप्रमाणें दिसून येतो, त्याचप्रमाणें, आमच्या पूर्वजांनीं फार प्राचीन काळापासून ह्याच बाबीचीं करून ठेविलेलीं वर्णनें किती खरीं व बरोबर आहेत, हेंहि दिसून येतें. कारण श्रीनाथासारख्या निःस्पृह, शान्त, व सत्त्वशील, सन्तांचाहि अनुभव हुबेहुब तसाच आहे. त्याचप्रमाणें, हे सर्व अनुभव खरे आहेत, कल्पना नव्हेत, ह्याचीहि, व्यर्थ संशय घेणारांस ह्यावरून खातरी पटावयास पाहिजे. असो. पण येथवर केलेल्या वर्णनावरून असा भास उत्पन्न होण्याचा संभव आहे कीं, नाथ हे आत्मानुभवी होते पण निव्वळ निर्गुणोपासक होते. पण तसें खरोखरीं नाहीं. आमच्याकडील इतर संतांप्रमाणेच, सगुणोपासनेचीहि किंमत कळावी इतके ते दूरदर्शी व विचारीहि होते. इतकेंच नव्हे, तर त्यांसहि, इतर संतांप्रमाणेंच, सगुणोपासनेचीं विलक्षण गोडी होती. किंबहुना, छंदच होता असें म्हटलें तरी चालेल. जो कोणी न समजतां त्याचे सगुणोपासनापर अभंग इत्यादि वाचील त्यास श्रीएकनाथ सगुणोपासनेंत इतके रंगून गेलेले व गर्क झालेले दिसतील कीं, नाथांस सगुणोपासनेच्या पलीकडे कांहीं दिसतें तरी की नाहीं, आवडतें तरी की नाहीं, माहीत तरी आहे कीं नाही, ह्याचाच क्षणभर प्रश्न पडेल. पण नीट विचारपूर्वक वाचलें असता श्रीनाथांची ह्या बाबतींतील भूमिका तात्काल विशद होईल; आणि ती तशी करून घेणें हें नाथाचे पुढील सर्व विचार कळण्यासाठीं आवश्यक असल्यामुळें आता आपण प्रथम त्या प्रश्नाकडेच वळूं.

## सगुण, निर्गुण

श्रीनाथांनींहि, श्रीतुकाराम इत्यादि संतांप्रमाणेंच, पंढरीच्या व श्रीविठ्ठलाच्या माहात्म्याच्या वर्णनाचे एक नव्हे, दोन नव्हे, शेकडो फार जिव्हाळ्याचे अभंग केले. त्याप्रमाणें राम, कृष्ण, दत्त महालक्ष्मी, मारुती,

मल्हारी, दशावतार, ह्यांच्या व इतर देवदेवताच्या वर्णनाचेहि अनेक अभंग त्यांनीं केले आहेत.

श्रीकृष्णक्रीडा तर त्यांनी नाना प्रकारें वर्णिली आहे. 'बाळक्रीडेचे अभंग,' 'काल्याचे अभंग,' म्हणून कृष्णपर अभंगाच्या त्याच्या मालिकाच्या मालिका आहेत.पण श्रीनाथांनी त्या त्या अभंगात किंवा पद्यात कोणत्याहि देवतेचें नांव घातलेलें असलें, तरी त्या देवतेचें किंवा अवताराचें ते पुष्कळ वेळ तसेंच एकच प्रकारचें, वर्णन करतात. अनेक वेळ ते म्हणतात, मला श्रीदत्त जनीं वनीं दिसतो; अनेक वेळ म्हणतात, मला श्रीराम जनीं वनीं दिसतो; अनेक वेळ श्रीकृष्णासंबंधानेंहि ते असेंच म्हणतात; अनेक वेळ आपले गुरु श्रीजनार्दनस्वामी ह्यांच्या विषयीहि ते हुबेहुब असेंच सांगतात; व श्रीमहालक्ष्मी विषयींहि पुन: थेट तेंच म्हणतात. इतकेंच नव्हें तर "स्वर्ग, मृत्यु, पाताळ," ह्या अभंगात तें श्रीविठ्ठलाचें **अंबा उभी कर ठेवुनी कटीं यो ॥** असें चक्क देवी म्हणून वर्णन करतात. (१.४०९) श्रीविठ्ठलाला प्रेमानें 'विठाई," "विठाबाई" अनेक संतानी, व नाथांनीहि अनेक वेळ म्हटले आहे; पण त्याला साक्षात् देवीच दुसऱ्या कोणीहि म्हटल्याचें पाहण्यांत नाहीं ! आणि श्रीविठ्ठलाशिवाय दुसऱ्या कोणत्याहि देवावर ह्याप्रमाणें प्रेमभक्तीच्या आवेगात व उद्रेकात स्त्रीत्वाचा व मातृत्वाचा आरोप दुसऱ्या कोणी केल्याचेंहि पाहण्यात नाहीं. पण नाथांनी मात्र श्रीकृष्णाला, श्रीरामाला, व ज्ञानेश्वरांनाहि, सरळ 'कृष्णाबाई,' 'रामाबाई,' व 'ज्ञानाबाई,' म्हटलें आहे ! (२.२३०, व १.१३३१) इतकेंच नव्हे, तर "महालक्ष्मी" हेंच नांव असलेल्या आपल्या दोन वेगळाल्या कवितांत, व "मरीआई" ह्याहि कवितेंत, श्रीनाथ "मच्छाई," "कच्छाई," "वराहाई" व "मच्छे," "कच्छे," ह्याप्रमाणें दहाहि अवतारांना, स्त्रीरूप व मातृरूप देऊन टाकतात ! व हे दहाहि अवतार, श्रीविष्णूनें नव्हे तर महालक्ष्मीनें घेतले, अशी अगदीं नवी कल्पना पुढें मांडतात ! (२.११८ व १३३) 'एकादशस्कंधव्याख्यान' लिहिणाऱ्या श्रीनाथांस पुराणाचें ज्ञान इतके कमी होतें काय? आणखी मौज ही कीं, ह्याहि महालक्ष्मीचें वर्णन ते पुन: "निर्गुण," "निराकार," "आदि मूळ," "अनादिसिद्ध," असेंच करतात !

नाथांच्या ह्या "घोटाळा करून सोडणाऱ्या" वृत्तीची मजल ह्याच्याहि पलीकडे परधर्मापर्यंत सुद्धां जाऊन थडकते ! "ख्याल किये मच्छलीवाले" ह्या आपल्या पद्यांत ते ईश्वराला, एक वेळ व चुकून नव्हे, तर दहावीस वेळ, चक्क "महंमद" ह्या नांवानें, व मग ह्याच्याहि पुढें जाऊन गोविंद महंमद ह्या जोडनांवानेहि, संबोधितात. !! (१.९६५). ह्या सर्व वर वर दिसणाऱ्या घोटाळयाचें श्रीनाथाच्याच शद्वांत उत्तर द्यावयाचें म्हणजे, **आत्मत्वाचे ठायीं सर्व एकाकार। नाहीं नारीनर भेद भिन्न॥ वर्णाश्रम धर्म, ज्ञाति, कुळ, गोत। एकाकारीं होत आत्मतत्त्वीं॥** १.७६७ आणिहीच श्रीनाथांची सर्वत्र व कायमची पाहण्याची दृष्टि असल्यामुळें ते तोंडी येईल त्या कोणत्याहि देवाच्या, देवीच्या, अवताराच्या, गुरूच्या, स्वधर्मी व परधर्मी नावाचा उपयोग करीत असताना तें नांव निव्वळ उपलक्षण म्हणून, केवळ एक दर्शक चिन्ह म्हणून, वरवर वापरीत असतात; व त्यांची खरी दृष्टि मात्र आंतून नेहमीं, विश्वाच्या मुळाशीं असलेल्या अन्तिम शाश्वत सत्-तत्त्वावरच किंवा आत्मतत्त्वावरच असते, असें म्हणणे भाग येतें. म्हणूनच, **कृष्णमूर्ति होय गे, कळों आली सोय गे। प्राणाचाहि प्राण पहातां सुख सांगूं काय गे॥** (१.१५८) असे उत्कट सगुणभक्ति-प्रेमानें ओथंबलेले कळवळयाचे अनेक उद्गार काढणारे नाथ, शान्तिब्रह्म म्हणून नांवाजलेले नाथ, प्रलयंकर रुद्राप्रमाणें खवळून तीन ठिकाणी म्हणतात, सोन्यारुप्याचे देव आम्ही ठेचूनिया खाऊं ! (१.९६४, २.१६४, व २.१६५; पैकीं शेवटल्यात 'ठेचूनियाच्या ऐवजीं 'मोडूनिया शद्व आहे, येवढाच फरक.) "बाहुलें" हेच मुळी नाव देऊन नाथानीं मूर्तिपूजेवर एक पद केलें आहे. व "ह्या जनांसि लागले वेड" हें त्याचे पालुपद केलें आहे! त्याचा नमुना पाहा:—

**एक तांब्याचें बाहुलें केलें ! पाट मांडुनी वरीं ठेविलें। वस्त्र अलंकारीं गुंडाळिलें। मना आलें तें नांव ठेविलें॥ ह्या जनांसि लागलें वेड॥** आणि त्यानंतर सबंध पूजाविधीची थट्टा केली आहे! (२.२४६). ही झाली धातूंच्या देवांची गति; आतां दगडी देवांची काय विल्हेवाट लागत आहे ती पहा:- **देव दगडाचा, भक्त मेणाचा !॥...... खरेपणा नाहीं देवाचे ठायीं। भक्त अभाविक पाहीं। दोन्ही एक।। एका जनार्दनी ऐसे देव-भक्त-पण**

**निलाजरे जाण उमयतां ॥** (१.१२०१) **म्हणती देव मोठे मोठे पूजितातीं दगड गोटे ॥ .. जन भुलले मूर्खपणें ॥** (१.१६१६). नाथांचा दगडी देवांवर इतका राग कां, व त्यांस पाहिजे काय होते, हे, पुनः एकदां दगडी देवांवर घसरण्यापूर्वी, त्यांच्याच तोंडून निघून गेलेलें आहे, तें पुढील अभगांत फार लक्षांत घेण्याजोगें आहे :— **येउनी नरदेहा भूतांतें पूजिती। परमात्मा नेणती महामूर्ख ॥ दगडाच्या देवा सेंदुराचा भार। दाविती बडीवार पूजनाचा ॥.. .. आपण बुडती देवा बुडविती। अन्तकाळीं होती दैन्यवाणे ॥ एका जनार्दनी येलिया देवा। जो पूजी गाढवासम होय॥** (१.१६२०. हे उद्गार वाचले म्हणजे नाथ किती कोपले आहेत हें दिसून येतें. पण हा कोप नाहीं. शांतिब्रह्म-नाथांना कोप कोठला? ही त्यांच्या जीवाची तळमळ आहे. स्वतःला पूर्ण ब्रह्मसाक्षात्कार झाला असल्यामुळें त्यांना लोकाच्या अज्ञानाची अतिशय कींव येई. ते म्हणतात, **भक्त रागेला तवकें** (फार रागावला)। **देव फोडोनी केले कुटके** (तुकडे) ॥ **कटकट मूर्ति मागुती करा। मेण लावुनी मूर्ति जडा ॥ न तुटे, न जळे, कांहीं न मोडे। त्या देवाचे केले तुकडे ।॥ रांडवा म्हणती, अगे आई। कैसा देव फोडिला बाई ?॥ जवळींच शुद्ध असतां देवो। भक्तांसी पडला संदेहो ॥ शालिग्राम शुद्ध** (निव्वळ) **शिळा। हारपलिया उपवास सोळा!॥ चवदा गांठींचा बांधिला दोरा। तोहि अनंत नेला चोरा** (चोराने)। ॥ **अनंतासी अंतु आला!। भक्ता तेथें खेदु जाहला!॥** (१.१०९). ह्या अभगांत त्यांच्या अन्तःकरणाच्या तळमळीचें कारण स्पष्टपणें व्यक्त झालें आहे. श्रीपांडुरंगाचे इतके निस्सीम भक्त असलेले, व स्वतः सगुणोपासनेचा पूजाअर्चादि सर्व आचार कडकपणें पाळणारे नाथ मूर्तिपूजेच्या किंवा सगुणभक्तीच्या विरुद्ध होते असें म्हणण्याचे धाडस वेडयाशिवाय किंवा त्यांना ढोंगी मानणाऱ्या नास्तिकाशिवाय, दुसरा कोण करील? पण नुसतें सगुण व साकार, व त्याचे सतरा सोपस्कार, येवढेंच मुळींच पुरेसें नाहीं, असेंच त्यांस वाटत होतें, व हेंच त्यांस म्हणावयाचें आहे. ते स्पष्ट सांगतात, **प्रतिमा देव ऐसा ज्याचा भाव। न करी निर्वाहो अंगोअंगीं ॥ असतां सर्वत्र बाहेरीं अंतरीं। संपुष्टाभीतरीं म्हणे देव ?॥ तेचि** (येवढीच) **हे द्वारका, तेचि हे पंढरी। सर्वत्र न धरी तोची भाव ॥ तीर्थयात्रा करी देव असे क्षेत्रीं। येर काय सर्वत्रीं वोस पडलें?॥**

**पुण्य क्षेत्रीं पुण्य, अन्य क्षेत्रीं पाप ॥ नवल संताप कल्पनेचा ॥** (१.१६०५). सगुण-निर्गुणोपासनेंत नडतें कोठे, हें श्रीनाथांस पुरतें माहीत होतें. ते परमेश्वरास आपली अडचण सांगण्याच्या निमित्तानें सर्व लोकांचीच अडचण सांगतात, **तुज सगुण जरी ध्यावों, तरी तूं परिमित होशी। तुज निर्गुण जरी ध्यावों, तरी तूं लक्षा न रिघसी !** (१.१४५). ह्याचा निवाडा ते करतात तो असा. त्यांचे म्हणणें असें कीं, मूर्तिपूजा पाहिजेच, सगुणभक्ति व सगुणोपासना पाहिजेच, पण ती कशा करतां? तर, **निर्गुणाची प्राप्ति सगुणाचे योगें।** म्हणून. ह्या अपल्या अत्यंत प्रख्यात व फार महत्त्वाच्या अभंगात नाथ पुढें सांगतात, "**नलगे ध्यान प्रौढी, योग, याग, तप। ज्ञानाचिया बापें ज्ञातें न ये!**" मग पाहिजे तरी काय? **पाहिजे समता सर्व भूतीं भाव। मुंगी आणि राव सार-खेची ॥ एका जनार्दनी हेची हातवटी। देवा ! तुझी भेटी तरिच होय ॥** (१. ७८०). नाथानीं ह्याठिकाणीं एक प्रकारे आपल्या मताचें, मार्गाचें, आचरणाचें व संप्रदायाचें, सारच सांगून टाकलें आहे. आणि त्यातच सगुण-निर्गुणाचा हि निवाडा झाला आहे. पण ह्याप्रमाणे जर वृत्ति व वागणूक असेल, तर मात्र मग, नाथ आपल्या एका हिंदी पदात सांगतात, **सगुन निर्गुन समान दिखावे।** ( १ ३२० ) हें 'समान दिखावे' म्हणजे काय, हें नाथ हिंदु-तुर्क-भांडण ह्या आपल्या कवितेत स्पष्ट सांगतात,

**थिजलें विघुरलें** (विरघळलेले) **तूप एक। तैसें सगुण--निर्गुण एकत्व देख ॥ तुम्ही प्रतिमेचा करतां द्वेष। परम मूर्ख अविवेकी ॥** ( २.९५ ). थोड्याच वेळापूर्वी मूर्तिपूजेवर स्वतः इतके घसरलेले नाथच आता हें असें उलट बोलत आहेत ! ह्याचा अर्थ एकच, की, सगुण हें निर्गुणाचे प्रतीक आहे, ही दृष्टी कायम असल्यावर सगुण—निर्गुण ही दोन्ही त्यांच्या मते एकच आहेत. ही दृष्टि मात्र असलीच पाहिजे. ती नसली, तर मग मात्र तें, वर दिल्या प्रमाणें मूर्तींची व केवळ औपचारिक बाह्य सगुणोपासनेची थट्टा उडवतात व त्या दोहोंचाहि धिक्कार करतात. नाथांत स्वानुभवाने ही दृष्टि नखींबोटीं खिळली होती. म्हणूनच ते श्रीरामचंद्राचें ........ **राम। पूर्ण परब्रह्म निष्काम ॥ असें वर्णन करतात.** (१.१९६) श्रीविठ्ठलाचेंहि परब्रह्माचे प्रतीक म्हणूनच वर्णन नाथांनीं अनेक जागीं करून ठेवलें आहे तें ह्यामुळेंच. ( १.१९०,

२४१,६१२,६१४,६४०,९३२,१४७९ इ० ). एका जागीं तर त्यांनीं श्रीविठ्ठलाचें आपादमस्तक ध्यानच मुळीं सबंध निर्गुणाच्या भाषेंत वर्णिलें आहे तेंहि ह्यामुळेच. ( १.६३ ). इतकेच नव्हें, तर ह्याच्याहि पुढें जाऊन **काशीक्षेत्रं शरीरं** इत्यादि म्हणणाऱ्या श्रीशंकराचार्यप्रमाणे, नाथानींहि आत्मानुभवांत रंगून, **काया ही पंढरी आत्मा हा विठ्ठल। नांदतो केवळ पांडुरंग॥** असें वर्णन करून ह्या सगुण–निर्गुणवर्णनातील व निर्णयांतील अखेरची मजल गांठून टाकली आहे. ( १.९६८ ). अर्थात् येथें ह्या विषयाचा निवाडा संपला.

## द्वैती कीं अद्वैती ?

पण ह्या उपर्युक्त सगुण–निर्गुणाच्या प्रश्नाचा आणखी एका दृष्टीनें विचार करता येईल. नाथ द्वैती कीं अद्वैती, ह्या प्रश्नाचा निकाल लावला कीं नाथ निव्वळ भक्तिमार्गी कीं निव्वळ ज्ञानमार्गी, म्हणजेच निव्वळ सगुणभक्त की निव्वळ निर्गुणभक्त, ह्याचा एका दृष्टीनें आपोआपच निकाल लागेल. म्हणून त्याहि दृष्टीनें विचार करून टाकूं. द्वैताद्वैतांच्या दृष्टीनें नाथ आपल्या स्फुट काव्यांत काय म्हणतात तें पाहा. ते म्हणतात, "**राहतें एक, जातें दोनपण। तेथेंचि नाहीं पा देखणें॥ एकचि एक बोलता रे साचें। एक नाहीं तेथें अनेक कैचें ?॥ अनेकीं एक निर्धारितां पाहीं। मुळीं मन ठेवुनिया ठायीं॥ राहतें, जातें, दोन्हीहि वाव। एका जनार्दनी एकचि भाव॥** (१.१२०) एकीकडे ते सांगतात, अनेकांत एक पहा. येथें अर्थात् 'अनेक' गृहीत धरलेलें आहे. पण लागलीच पुढें सांगतात., **एका जनार्दनी एकचि भाव** ह्याचा अर्थ काय? दुसऱ्या एका जागीं नाथ सांगतात, **द्वंद्वामाजीं समाधि** ( ऐक्य ) **रे** । ( १.३१ ). म्हणजे पुनः द्वैत असून अद्वैत आहेच? त्याचा निवाडा कसा करावयाचा? त्याचा निवाडा नाथच करतात.:– **द्वैतेंचि चालो अक्षयीं भक्तियोग**' (पण) **स्वप्नींहि मानसातें नातळो** (न शिवो ) **द्वैत** ॥ हें किती परस्पर विसंगत वाटतें ! पण नाथ लागलीच सांगतात, **संग अद्वयानंदवेधें। नावडो अन्य भोग** । मला अद्वयानंदाशिवाय दुसरा भोगच न आवडो ! पण हें भक्तींत (द्वैतांत) होणार कसें ? निव्वळ भक्तींत (द्वैतांत) पूर्ण

ज्ञानानुभव (अद्वैत) नाहीं; व निव्वळ ज्ञानांत (अद्वैतानुभवांत) भक्ति (द्वैत) नाहीं! नाथ सांगतात, हें कसें होणार तें मी सांगतो. ऐक, **अक्रियत्वची वाढो सक्रियारूप बोध॥ पाहतां विश्व मातें निजरूप दाखवी। सत्कथाश्रवण कर्णीं पीयूष चाखवी॥.. हें दान पावलें आत्मया पांडुरंगा हें दान पावलें व्यापका अंतरंगा॥** (१.१६९). क्रिया आणि अक्रिया एक होऊन जावोत. विश्व पाहिलें की तें सबंध मला आत्मरूपच दिसो, किंवा तसें तें तूं मला दाखव (हें अद्वैत) पण त्याबरोबरच, विश्वाचें अस्तित्व मीं जमेस धरलें असतांना (हें द्वैत) सत्कथापीयूष (भक्ति) मला चाखावयास मिळो. ह्याचा अर्थ उघड आहे. श्रीनाथांस दोन्ही पाहिजेत. पूर्ण आत्मानुभवहि (ज्ञानहि, अद्वैतहि) आपल्या पूर्णत्वासाठीं पाहिजे, व जेव्हा वरून "रवाना केले" जाऊं व "जड जीव उद्धारणें" म्हणून "येणें घडे" व "संसारस्थिति" येऊं, व जेव्हा द्वैत गृहीत धरूच चालावें लागेल, तेव्हां तेथें त्या त्या द्वैताचें परममांगल्य म्हणून मग भक्तिच पाहिजे. मग ह्यापेक्षां श्रेष्ठ तेथें दुसरें कांहीं नाहीं. म्हणजे नाथांस ज्ञान व भक्ति हीं दोन्ही पाहिजेत. त्यांस अक्रिया व क्रिया ह्याहि एकरूप व्हावयास पाहिजेत. **(कर्मण्यकर्म यः पश्येत् अकर्मणि च कर्म यः – गीता).** कर्माविषयीं नाथांचे विचार मी पुढें देणारच आहें. कर्महि श्रीनाथांस हवेंच आहे. ह्याचा अर्थहि उघडच आहे. नाथ मुक्ताप्रमाणें केवळ ज्ञानात (निर्गुणांत) विलीन होऊन जाऊं इच्छीत नाहींत, किंवा अज्ञ भक्ताप्रमाणें आचारभक्तीलाच (सगुणालाच) सर्वस्व मानून बसत नाहींत. म्हणूनच त्यांची पुढें दिलेली भक्तीची व्याख्या अखेर ते ज्ञानोत्तरभक्तीसारखी का करतात, हें त्यावरून कळून येईल. आणि ह्याप्रमाणें अद्वैत व द्वैत ह्यांचा देहलीदीपन्यायानें ते समानच अनुभव घेऊं इच्छितात ह्याचा अर्थच हा की, ते केवळ मुक्तहि होऊं इच्छीत नाहींत, व केवळ व्यवहारी अज्ञहि राहूं इच्छीत नाहींत; तर जीवन्मुक्त होऊन राहूं इच्छितात. म्हणूनच त्यास सगुण व निर्गुण हीं दोन्हीं पाहिजेत, हेंच अखेर ठरलें.

## मार्ग व साधन.

आता ह्यापुढे प्रश्न असा की, ह्याप्रमाणें जो सगुण--निर्गुण परमात्मा वर्णन केला तो प्राप्त कसा व्हावयाचा. ज्याप्रमाणें परमात्म्याचें सगुण

निर्गुण अशा दोन्ही स्वरूपांत नाथांनीं वर्णन केलें, त्याचप्रमाणें त्याच्या प्राप्तीकरतांहि, आपल्याकडील इतर साक्षात्कारी पुरुषाप्रमाणेंच नाथानींहि 'सगुण' व 'निर्गुण' म्हणजे बाह्य व आन्तरिक, दृश्यस्वरूपात्मक व अदृश्य-स्वरूपात्मक, असे दोन्ही प्रकारचे मार्ग सांगितले; व ह्यांतहि, ईश्वरस्वरूपा-प्रमाणेंच, आन्तरिक स्वरूप हा प्राण आहे, व बाह्य स्वरूप हा त्याचा निव्वळ देह आहे. दोन्ही पाहिजेत, दोन्ही जरूर आहेत; पण तरी आन्त-रिकासाठीं बाह्य आहे, बाह्यासाठीं आन्तरिक नाहीं, असा तेथल्याप्रमाणेंच, तरतमभाव येथेंहि आहेच. ह्याहि ठिकाणी नाथ पुन: तेच सांगतात कीं, जेथें मूळ आतील तत्त्व किंवा साधन नष्ट झालें, तेथें बाहेरचे सालपट किंवा टक्कर हें निव्वळ आहे.

इतर सर्व थोर पुरुषांप्रमाणेंच नाथहि सांगतात की, साक्षात्.

**अनुभवावांचूनी। कोरडी ती कहाणी ब्रह्मज्ञान॥** (१.१५९४). निव्वळ शब्दज्ञानानें किंवा बाह्याचारानें ईश्वर किंवा आत्मा कधीहि प्राप्त होणार नाहीं. **ब्रह्मज्ञानासाठी वेद शास्त्रपुराण। करितां श्रवण नातुडेचि (प्राप्त होत नाहीं.)॥ नातुडेचि कदा गीता-भागवतीं। वाचितांहि पोथी जन्मवरी॥ द्वारका, पट्टण, वाराणसी। करितां तीर्थाटनासी प्राप्त नोहे॥ प्राप्त नोहे गुरुमंत्रतंत्र घेतां। शब्दज्ञान कथिता प्राप्त नोहे॥** (१.७६). इतकेंच नव्हे, तर नाथ म्हणतात येथें साक्षात् **वेदहि** काम देत नाहीं! ......वेद **परिसोनी न तुटे द्वैत**॥...... **बोधु। नाहीं तंव न कळे वेदु॥** (१.६२). **वेद तो घोकीतां चढे अभिमान। नाडेल तेणें जाण साधन तें॥ शास्त्र, मत, वाद, कासया पसार।**..... **पुराण सांगतां मन वेडावलें। निंदूं जें लागलें आणिकांसीं (दुसऱ्यांना)॥ ग्रंथ पढावे तरी आयुष्य क्षणेक। व्यर्थ खटपट करूनी काई (काय)?॥** (१.२०६).नाथ ह्याच्याहि पुढें जातात! **वेद तो कल्पिक, शास्त्र तों शाब्दिक। पुराण सकळिक वाष्काळचि॥** (१.७६५) ह्यापेक्षा जास्त कडक टीका ती काय असावी? पण ही **अश्रद्धेची** टीका नाहीं. अनुभवा-वांचून हें सर्व व्यर्थ आहे, येवढेच सांगण्याचा त्यांचा मुद्दा आहे. ह्याच कारणानें **अग्निहोत्रहि** त्याच वाटेनें गेलें आहे! **अग्निहोत्राचा सुकाळ। वडा-पिंपळासी काळ!॥ तिन्ही देव पिंपळांत। अग्निहोत्रीं केला घात!॥** (१.१५३). ही त्यांची टीका मागें ह्या लेखांत निराळ्या एका संदर्भांत

उध्दृत केलेलीच आहे. ह्याच दृष्टीनें तीर्थांवर टीका तर नाथांइतकी कोणीहि केली नसेल. ते म्हणतात, **वाराणशीक्षेत्रा नाश आहे।** ( १ १२५२ ), ते तुला काय उद्धरणार? **केलें काय तुवां जाऊनिया तीर्थी। ? सर्वदा विषयार्थी भुललासी॥ वरीं दिससी शुद्ध, अंतरीं मलिन। तोंवरी हें स्नान व्यर्थ होय ॥ शांति, क्षमा, दया, नाहीं पैं अंतरीं। वाय वेरझारीं कष्ट केले ॥** ( १.२९५ ) **तीर्थपर्यटण कासया करणें।** मुख्य गोष्ट ही आहे, **मन शुद्ध होंण आधीं बापा ॥ . . . मन शुद्ध जालिया गृहीच देव असे। भाविकासी दिसे बैसल्या ठायीं ॥** (१.५९९) नाथास दया येते. ते म्हणतात, **हृदयस्थ आत्माराम नेणती। मूर्ख ते फिरती तीर्थाटनीं ॥** (१.६०९). मग खरे तीर्थाटण कोणते? **शुचिर्भूत शुद्धमति। ईश्वर मानी सर्वांभूतीं। तो सर्वदा वसे तीर्थी। तीर्थे वसे त्यांच्या संगें ॥........ काम, क्रोध, लोभ, तृष्णा या। स्पर्श न करिती जयाची काया। एका जनार्दनी पायां । तीर्थें वंदितीं तयाच्या।** (१.९७३). **इंद्रियें नेमाचे आसनीं। नित्य माधुर्य बोले वाणी। अहंकार ज्याचिये ध्यानीं। संचरे ना सर्वथा ॥ तो सकळ सृष्टीचा धाता। तीर्थे करिती त्याची यात्रा। पादोदकालागीं पवित्रा। तीर्थें माथा वोढवितीं** ( पुढें करतात ) ॥ ...... **परधनीं अंध जयाचे नयन। परस्त्री पाहतां नपूंसक जाण। एका जनार्दनी शरण। तो जनक तीर्थांचा ॥** (१.९७४) हे असे कशाने होते? **जयाचेनि चरणें तीर्थां तीर्थपण। तो हृदयीं केला साठवण ॥ नवल महिमा हरिदासाचा। तीर्थें उपजतीं त्याचे कुशीं ॥ काशी मरणें मुक्ति। येथें वचनें, न मरतां, होय मुक्ति** ( १.१२७६ ). आत्मानुभवी माणसाच्या "**स्नानीं सोवळी जाली गंगा।** (१.१३५२) हाहि चरण, पूर्वी हा अभंग दिला तेव्हा, आलाच आहे. ह्याच प्रकारचे सविस्तर विवेचन आणखीहि अनेक जागी नाथांनी केले आहे ( १.१५४८,१५४९, इ. ). पवित्रापवित्राचाहि असाच खरपूस समाचार नाथ घेतात. **गंगोदक तें पवित्र !। येर (इतर) कडु अपवित्र !॥ दोन्हीं उदकें तंव सारखीं। शुध्द, अशुद्ध, काय पारखीं?॥ गंगा देवापासून जाली!। येर काय मध्यवर्ती केली?॥** (१.१२९१). आता विटाळाविषयींहि त्याच दृष्टीनें नाथ काय म्हणतात ते पाहा:– **देवातळीचें वस्त्र, तें म्हणती**

**अपवित्र ! । उदकें भिजाविलें, तें जालें पवित्र !!॥ देवापरीस जळ केलें सबळ ! । ज्ञान तें दुर्बळ होउनी ठेलें ॥ नीचाचेनि स्पर्शें देवो विटाळला ! । पाणियें प्रक्षाळुनी सोवळा केला !!॥ एका जनार्दनी, साच नाही भाव ।** (१.१२९०) हे 'जुन्या काळच्या' आणि 'जुन्या मताच्या' एका पवित्र सताचे विचार आहेत. कोणा 'आधुनिक' 'बाटग्याचे' नव्हत, हे लक्षांत ठेविले पाहिजे. जास्त तर काय, नाथ व्यर्थ वाटतात ते, **विधिनिषेध** पाळण्याच्याहि विरुद्ध आहेत :-
**विधिनिषेध धरितां मनीं । सहजीं कार्या होय हानि ॥** (१.१५५०) **आम्हां विधिनिषेधाचें नाहीं पैं कारण । नाम मुखीं स्मरण गोविंदाचें ॥** **(१.१५५१).** ह्याचप्रमाणे विधिनिषेधाविषयी अशाच प्रकारचे विचार प्रकट करणारे आणखीहि त्याचे दोन चार अभग आहेत (१.१५५२,१५-५३,१५५४. इ.). तसेच, नाथ म्हणतात, व्रते तपे, यज्ञ, दान, हेहि ह्या दृष्टीने फोलच आहेत. **व्रतें, तपें, यज्ञें, चित्तशुद्धि । परी निजपदीं स्थिर नोहे ॥** (१.२९८). नुसता **हठयोग** केला, किंवा वर वर देवाची सेवा केली, तरी काय उपयोग ? **धरिलें नासिक अनुभवावांचूनी । त्रिपुटीसी पाणी लावियलें ॥ करी प्रदक्षिणा गुरुगुह्याविण । व्यर्थ केला शीण कामां नये ॥** (१.९२). इतकेच नव्हे, तर, नाथ म्हणतात, ईश्वरप्राप्तीचा खरा मार्ग सोडून, व्यर्थच **प्रपंचत्यागहि** करू नकोस. हेहि श्रीनाथाचे मत फार लक्षात ठेवण्यासारखे आहे. सर्वच दृष्टीनी फारच सुंदर अशा एका पद्यांत ते म्हणतात, **वेष घेउनी नुसता कां । उगेच जगावरिं रुसता कां ? ॥ भोग देखुनी घुसता कां ? । आम्ही भले म्हणोनी पुसता कां ? ॥ थिता** (व्यर्थच) **वाईल कां सांडिली ! । आशा परवधू कां धुंडिली ? ॥ शुभ्र सांडोनी भगवीं कां गुंडिली ? । ऐसी भंडी कां हो मांडिली ! ॥ तुम्हां प्रपंचावर येकेघाई** (पुरतेपणी) **रुसवे ना । अहं ज्ञातेपण कोणा पुसवे ना ॥ एका जनार्दनीं, मन जिंकवे ना । मेल्या कुतऱ्यासारखें कां बसवे ना ! ॥** (१.६९). नाथ खवळले म्हणजे मग तुकोबांच्याप्रमाणेच त्यांच्या जवळहि क्षमा नाही, हें ह्या शेवटल्या चरणावरून दिसून येईल. खरा संन्यास कसा असतो, व कसा घ्यावा व त्याचा

अधिकारी कोण, ह्याविषयीं नाथ सांगतात, **संकल्प नाशी तो संन्यासी** (१.६२). **सकळ कामनेतें दंडावें । मग शिरादिक मुंडावें ॥** (११८९८).

**नाश करावे षड्वैरी नेमें । तया संन्यासकर्में म्हणिजेती ॥ एका जनार्दनी, गृहस्थुचि बरा । । फजीती बाजारां उभी होय !** ॥(१.१६७६). **त्यागुनिया स्त्री संन्यासी जे होती । पतनातें जाती अंतकाळीं ॥ घेउनी संन्यास ध्यान पै स्त्रियांचें । गुंतलासे आंश, वायां जाये !!** (१.१५९१) **अहो तुम्हीं संन्यासी जाला ! कामक्रोध जवळींचा नाहीं गेला । व्यर्थ कां विनाश केला ? । सावध होई ? । संसार व्यर्थ सांडिला । मुलां-बाळां तुटी पाडिला । नारायण नाहीं जोडिला । सावध होई ! । वरवर म्हणसी नारायण । अंतरीं विषयावरी ध्यान । कासया संन्यास घेऊन ।। सावध होई ! ।** ( २.९१ ) **अनुतापाविण व्यर्थ संन्यास ग्रहण ॥** (१.१६५४) **डोई बोडोनी केली खोडी** ( भोडी ) । **काया विटंबिली वापुडी । । संध्या स्नान द्वादश टिळे । फांसे घालुनी कापी गळे ? ॥ पाय घालुनी आडवा । काय जपतोसी गाढवा ! ॥** (१.१६२०) नाथाना ते ढोंग अगदीं सहन होत नाहीं ! हे ह्या शेवटल्या चरणावरून उघड आहे. असो. ह्या प्रमाणें व्यर्थ किंवा अनधिकारीपणें संसारत्याग करणारांची नाथांनी कडक शब्दांत निर्भत्सना केली आहे. इतकेच नव्हे, तर उलट, संसार करावा, असे श्रीनाथानीं स्पष्ट व ठासून मत प्रतिपादन केलें आहे, हें मी 'नाथांचे व्यवहारदर्शन' ह्या सदराखालीं पुढें यथास्थानीं दाखविणारच आहे. असो. त्याचप्रमाणें, ह्या ईश्वरदर्शनाच्या प्रयत्ना-बाबत नाथांनी आणखी एक महत्त्वाची गोष्ट सांगितली आहे ती ही कीं, **क्षुद्रदेवतांच्या**, ह्या **मेसाबाईच्या** ( १.२७५ व १४५१ ) [ मेसाबाई" हे नाथांनीं त्यांना एक उपलक्षणात्मक नाव दिलेले दिसते ] , बळी माग-णाऱ्या देवांच्या, **नारळ आणि शेंदूर यांचा भडिमार** असणाऱ्या देवांच्या नादीं लागूं नकोस. **लटिका देव, लटिका भक्त, लटिके सर्व वाव** व्यर्थ,] असें ह्यांचें वर्णन करून, **फजीतखोर देव, फजीतीचे देव** असे त्यांस नाथ म्हणतात. व आम्हा **तयांचें तोंडावर थुंकुं** म्हणून **बेधडक सांगतात !** [ **१.१४४५, १४४६** ] आणि ह्या सर्व **ठिकाणीं नाथ**

विठ्ठलभक्ति करण्यास कंठरवानें सांगतात. ह्याचें कारण उघड आहे. श्रीविठ्ठल परब्रह्माचे प्रतीक आहे.

ईश्वरप्राप्तीच्या अथवा आत्मप्राप्तीच्या नाथांच्या **बाह्यस्वरूपात्मक मार्गांत** मुख्यतः नामस्मरण, कीर्तन व सेवा, हे तीन मार्ग सांगितलेले आढळून येतात. पैकीं नामस्मरणावर व कीर्तनावर नाथांचे शेंकडों अभंग आहेत. ते येथे कोठवर द्यावे? त्यांचा नुसता जुजबी निर्देश करूनच समाधान मानणें भाग आहे. **नामा** बाबत नाथाचे 'हरिपाठाचे अभंग' ही तर महाराष्ट्रांतील वारकरी संप्रदायाची संध्याच आहे म्हटले तरी चालेल. तशाच 'नामपाठाचे अभंग' म्हणूनहि एक श्रीनाथांची नामाचे महत्त्व सांगणाऱ्या अभंगाची दीर्घ मालिका असून, तीशिवायहि पावलों-पावलीं त्यांच्या स्फुट काव्यात नामाचे माहात्म्य वर्णिलेले व विशद केलेले आहे. नामावरील त्यांच्या ह्या इतक्या विस्तृत लिखाणाचे सार काढणे सोपे नाही. पण तरी, त्यांचे म्हणणे पुढीलप्रमाणे आहे असे म्हटले असता ते चुकेल असे वाटत नाही. नाम कशासाठी घ्यावयाचे? त्याचा एक हेतु हा कीं, **अखंड वाचें नाम । तया न बाधी क्रोधकाम ॥** (१.६१) साधकाचा दुसरा त्यांतला हेतु हा, व नामजपाचा दुसरा परिणाम,--नाथ आपल्या सुंदर शब्दांत सांगतात,--तो हा कीं, साधक **जों जों उच्चारी नाम । तों तों प्रगटे मेघःश्याम ॥** (१.१३४). 'साधक' हा मी येथे वापरलेला शब्द श्रीनाथांचाच आहे; व त्यांनी तो वारंवार वापरला आहे. असो. पण हें नाम घ्यावयाचें कसें? **नको जपमाळा कांहीं । उगाच बैसे एके ठायीं । हृदयीं दृढ ध्यायी । रामनाम ॥** ( १.२८६ ) **मन करूनिया सावध । वाचें स्मरे तूं गोविंद ॥ मन धरीं एक मुष्टि । वाचे जपें नाम गोष्टी ॥ मन धांवे भलतीकडे । साधन वायां जाय कोडें ॥ मन आवरूनिया साधन । तेणें पावसी निज खुण ॥** (१.२५२) आणि, साधकाला ते सांगतात, हें नाम घेशील तेव्हां तें "व्यापक" करून घे. **व्यापक तें नाम अनंत ब्रह्मांडीं ।** पण, **मना सोस सांडी कल्पनेचा ॥ कल्पनाविरहित नाम तूंचि गाये । पांचांचा** [ पंचेंद्रियांचा किंवा पंचमहाभूतांचा] **मग ठाव कैंचा तेथें ? ॥** (१२१५) पण इतकें नाम

"व्यापक" व सफल कसें व केव्हां होईल? **व्यापक विठ्ठलनाम तेव्हांचि होईल। जेव्हां तें जाईल मी - तूं - पण॥ ............... आपुले वोळखी आपणचि सांपडे। सर्वत्रींहि** (सर्व विश्वात) **जोडे विठ्ठलनाम ?॥** विठ्ठलनाम 'व्यापक' केलें पाहिजे, ह्यावर नाथाचा मुख्य जोर आहे, हे येथे पाहिले पाहिजे. आणि ह्याप्रमाणे ते व्यापक केल्यावर काय होईल? **नाम तेंचि जालें वर्णरूपातीत। अनाम सतत उभें असे!॥** (१.२२२). **नाम तें अनाम। सर्वोत्तमनाम सर्वांठायीं!॥** (१.२२६). येथें नामाचें साफल्य पूर्णतेस गेलें. नामावर नाथांचा इतका भर आहे की, ते म्हणतात, **नामाविण मुख, सर्पाचें तें विळ!। जिव्हा नव्हे, काळसर्प आहे!॥** (१.१२४९). व्रतादिकांविषयीहि सांगतांना नाथ सांगतात, व्रतवैकल्यें करशील तर कर, पण तरी नाम घेच. (१.२९०, २९१). नुसतीं व्रतें व्यर्थ आहेत, हे त्यांचे मत मागें आलेंच आहे. **कीर्तनाचेंहि** माहात्म्य नाथांनी असेंच व फार वारंवार वर्णिलें आहे, हे वर सांगितलेंच आहे. त्या सर्वांचेहि सार फार थोडक्यांत सांगणे एकापरी थोडें कठिणच आहे; पण तरीहि साधारणत: त्याचें त्या वावतींतीलहि मुख्य म्हणणे त्याच्याच शब्दात पुढीलप्रमाणे सांगता येईल . .. **कीर्तनें सिद्धि, कीर्तनें सिद्धि। कीर्तनें समान बुद्धि। . . . ध्यानामाजीं समाधी रे॥ कीर्तनीं सद्भाव अखंड अहर्निशीं। पाप न रिघे त्याच्या देशीं। निजनामें निष्पाप अंतर देखोनी। देव तिष्ठे तयापाशीं॥ हरिनाम कीर्तनें अभिमान सरे।... कलिमाजीं कीर्तन श्रेष्ठ पैं साधन। . व्रतां - तपां - तीर्थी न भेटे**

ह्याप्रमाणे बाह्याचारात्मक साधनें सांगितली, त्याचप्रमाणें नाथा **अन्तःस्वरूपात्मक साधनेंहि** सांगतात; आणि तीच त्यास त्यातल्यात्यांत अधिक महत्वाचीं व आवश्यक वाटत, हे स्वाभाविकच आहे. ह्यांतील अगदी पहिलें साधन म्हणजे, **साधन तें मन करीं आपुले आधीन। यापरतें कारण आन** (अन्य) **नाहीं॥** (१६९१). ... **स्थिर मन। नाही तंव काय साधन!॥** (१८०७) **जिंकितांचि मन साधनें साधतीं। न जिंकितां फजीती मागें पुढें॥** (१.६९२). ह्याप्रमाणें मनाजय - अगदी प्रथम झाला पाहिजे हें सर्वांसच मान्य आहे. पण ह्याच्या पुढीला मात्र

क्रम नाथांचा इतर लोकांहून थोडा वेगळा दिसतो. साधन चतुष्ट्यांत विवेक, वैराग्य, सदाचार, व मुमुक्षा, असा क्रम मानण्याची रीति आहे. पण नाथ **वैराग्य** विवेकाच्याहि आधीं घेतात. **धडधडीत वैराग्य वरि बाहे विवेक। ज्ञानासी तो एक अधिकारी॥ वैराग्य विवेक बाणलेसे अंगीं ज्ञान तयालागीं वोसरलें॥ एका जनार्दनी, विवेकेशी भेटी। वैराग्याविण गोष्टी फोल होय॥** (१.४४.) ह्यांत तिन्ही ठिकाणी अर्थदृष्ट्या तर विवेकाच्या आधीं वैराग्य धरलेच आहे, पण निव्वळ त्या शब्दाच्या मांडणींतहि त्यापैकी दोन वेळ तोच क्रम कायम ठेविला आहे. नाथाच्या मतें वैराग्य, विवेक, भाव-भक्ति-प्रेम, व ज्ञान, असा आंतरिक साधनांचा क्रम दिसतो. मुक्तीचा तर अंतर्भाव त्याच्या ध्येयात मुळीं होतच नाही. ते साफ सांगतात, **ऐशीये भक्तिप्रति अंगे रावे मुक्ति, दास्य करी अहोरात्री। दासीसी अनुसरणे, हे तंव लाजिरवाणें, मूर्ख ते मुक्ति मागती.॥** (१.२७) पुढील उद्गार तर ह्याहूनहि कडक आहेत. **भक्ति असो; मुक्ति वाला रे बाहेरी वहुतां चाळविले; चाळायाची थोरी!॥ भक्ति ते राहो; मुक्ति ते जावो। मुक्तिमाजीं भावो नाही नाहीं॥ मुक्ति चाळा लावुनी सेखीं वोसंडी** (शेवटी टाकुनी देते)। **तेणे ऐसे किती केले पाषांडी॥ उपजोनिया पोटीं भक्तीतें ग्रासी। मातृहत्यारी मुक्ति कवण पोसी!॥ एका जनार्दनी, सेवितां चरणरज। मुक्ति सेवा करी सांडुनीया लाज॥** (१.३६४) वर सांगितलेल्या नाथाच्या चार साधनमार्गांपैकी अगदी पहिल्या असलेल्या **वैराग्याचें** लक्षण नाथ पुढील प्रकारे देतातः- **पक्षी आंगणी उतरती। ते का गुंतोनिया राहती ?॥** (१.८१९.) **पांथस्थ घरासी आला। प्रातःकाळीं उठोनी गेला॥ तैसें असावें संसारीं। जैसी प्राचीनाची** (पूर्व कर्माची) **दोरी॥ बाळी घरचार** (घरकुलाचा खेळ) **मांडिला। तो संवेचीं मोडुनी गेला॥ एका विनवी जनार्दना। ऐसें करी माझ्या मना॥** (१.१३८५) हें सर्व नश्वर **जाणार, जाणार, जाणार।** हें जोरदार विधान नाथांनीं दोन तीन जागीं घातलें आहे. ह्या वैराग्यापासून विवेक उत्पन्न होतो, हें नाथाचें विधान वर आलेंच आहे. तिसरें साधन भाव-भक्ति-प्रेम. ह्यावर नाथांचा सर्वांत जास्त भर आहे, हें स्वाभाविकच आहे. नाथांनीं भावाचें महत्त्व जागोजागीं फार सांगितलें आहे. **भावें घात-**

ली कास, देव आला दास। ...भावाचि कारण, भावचि कारण। यापरतें साधन आणिक नाहीं॥ भावाचेनि बळें जीवपण वोवळे (जातें) मन हें सोवळें ब्रह्मसाम्य॥ (१.१४९) देवासी तो भाव पुरे। तेणें देव सदा झुरे। ...भाव धरावा बळकट। आणिक नको कांहीं कष्ट। साधन हें श्रेष्ठ कलीमाजी॥. भावें देव घरीं नांदे। (१.२६५) एकविध भाव भक्ति करी भोळी। तेणें कुळीची मूर्ती हातीं लागे॥ (१.६९९) भावाचेनि भक्ति थोर। भावें तुटे येरझार॥ भावें अंकित देव भक्ताचा। ...भावें चाले भक्तिपंथ। भावें दिसे देहीं देव॥ (१.८०६) देव भुलला भावासी। (१.९२६) देव भावाचा भुकेला। (१.१२७४) (हा चरण पूर्वीहि एकदा वर आलेलाच आहे) अशा रीतीनें श्रीनाथांचीं भावभक्तिप्रेमाच्या वर्णनपर कितीं तरी वचनें सापडतात. नाथ अशा भक्तीला इतकें महत्व देतात कीं, ते स्वच्छ म्हणतात, भक्ति प्रेमाविण ज्ञान नको देवा। अभिमान नित्य नवा तयामाजी॥ प्रेमसुख देईं, प्रेमसुख देईं। प्रेमेंविण नाहीं समाधान॥ रांडवेनें (विधवेनें) जेंवि श्रृंगारु केला। प्रेमेंविण जाला तैसा ज्ञानी॥ एका जनार्दनीं, प्रेम अति गोड। अनुभवी सुरवाड (सुख) जाणतील॥ (१.१४८) नाथ म्हणतात, ज्ञान मुळीं भक्तीपासूनच उत्पन्न होतें. भक्तीचे उदरीं जन्मलें ज्ञान। भक्तीनें ज्ञानासी दिलें महिमान॥ भक्ति तें मूळ; ज्ञान तें फळ। वैराग्य केवळ तेथींचें फूल॥ भक्तीविण ज्ञान गिंवसितो (शोधतात) वेडे। मूळ नाहीं तेथें फळ कैसें जोडे (मिळे)? ॥ एका जनार्दनीं, भक्तियुक्त क्रिया। ब्रह्मज्ञान त्याच्या लागतसे पायां॥ (१.४५) नाथांचें मत ह्या ठिकाणीं अगदीं स्पष्टपणें व्यक्त झालें आहे. नाथ भक्तीची व्याख्या करताना मात्र ती अगदीं ज्ञानोत्तरा भक्तीसारखीच करतात, हें फार पाहण्याजोगे आहे. ते म्हणतात, सहज स्वरूपस्थिती तया नांव भक्ति, नवविधा भक्ति भासती॥ (१.२७) .... निजज्ञानशक्ति। निर्विषय मन ते अभेदभक्ति॥ (१.४२) ह्या ठिकाणीं वाटतें कीं, नाथ 'भाव' व 'भक्ति' ह्यांत कदाचित् असा भेद करीत असावे कीं, नुसत्या श्रद्धेला नव्हे, तर, ज्ञान होण्यापूर्वींच्या भक्तीला ते 'भाव' म्हणत असावे, व

ज्ञानोत्तरा भक्तीलाच 'भक्ति' म्हणत असावे. पण ह्या भानगडीच्या प्रश्नांत येथें जास्त खोल शिरण्याचें कारण नाहीं. नाथांची ही भक्तीची व्याख्या, **स्व स्वरूपानुसंधानं भक्तिरित्यभिधीयते** ह्या श्रीशंकराचार्यांच्या भक्तीच्या व्याख्येसारखीच वाटते. हें साम्य एका जागीं तर ह्याच्याहि पुढें गेलें आहे. ते सांगतात, **शुद्ध भाव भगवा चिरा। मूळ तंतु शिव दोरा। आत्मलिंग पूजूं बरा। म्हणोनी आलों तुमचे द्वारा॥** ( १.१२८ ) ह्या ठिकाणीं नाथ अंतरात्म्याचीच ( आचार्यांच्या "स्व- स्वरूपाचीच" ) भक्ति सांगत आहेत. एकनाथांचें प्रेमविषयक एक महत्त्वाचे अवतरण " सार " ह्या सदराखालीं पुढे देत आहे. असो. अशी त्यांची भक्तीची व्याख्या व भक्ति-विषयक दृष्टि असल्यामुळेंच वर्णाश्रमधर्माचे अभिमानी नाथ, वर्णाश्रमधर्म इतक्या आस्थापूर्वक पाळणारे नाथ, स्वच्छ सांगतात, आम्हाला जातपात नाहीं. **नामधारकासी नाहीं वर्णावर्ण।** ( १.६२१ ) **आम्हा ब्रह्मपुरीचे ब्राह्मण। याति, कुळ, नाहीं लहान॥ आम्हां सोवळें-वोवळें नाही। विटाळ न देखों कवणा ठायीं। आम्हां सोयरे जे जाहले। ते यातिकुळावेगळे केले॥ एकाजनार्दनीं बोधु। यातिकुळींचा फिटला संबंधु॥** ( १.०.० ) **जाती-वर्ण-कुळ-धर्म नुरेचि आम्हां कांही।** ( १.१६०४ ) **संत भलते याति असों। परी विठ्ठल मनीं वसो॥ तया घालीन लोळणी। घेईन मी पाय-वणी** ( चरणतीर्थ ) **ज्ञाती-कुळासी संबंध। मज नाही भेदाभेद॥ भलते ज्ञातीचा। विठ्ठल उच्चारी वाचा॥ तेणें पावन देह चारी। एका जनार्दनी निर्धारी॥** ( १.११८४ ) हीं व अशीं श्रीनाथांचीं वचनें वाचलीं म्हणजे त्यांची भक्तीकडे पाहण्याची दृष्टि ज्याप्रमाणे कळते, त्याचप्रमाणे त्यांची आत्मदृष्टि किती पूर्णतेला पोहचली होती, त्यांची सर्वत्र समदृष्टि किती स्थिर झाली होती, इतक्या त्या जुन्या काळांतहि जातीविषयीं, सोवळ्या-ओवळ्याविषयीं, व विटाळाविषयीं, असे उद्गार काढणारी त्यांची छाती किती खंबीर होती, हेंहि सर्व स्पष्टपणें कळून येतें. असो. ह्याप्रमाणें असलेल्या भक्तीपासून मग **ज्ञान** उदय पावतें. **अर्ध ऐकोनी अधिष्ठान॰** ह्या आपल्या लांब पदांत नाथ **आत्मज्ञानेविण न तुटेचि बंधन** ह्या जोरदार अर्धचरणाचा फार परिणामकारक अशा नाना

रीतींनीं पालुपदासारखा, जवळ जवळ प्रत्येक कडव्याच्या अखेरीस उपयोग करून स्पष्टपणे व सुंदर रीतीनें सांगतात कीं, ब्रह्मज्ञानाखेरीज किंवा आत्मज्ञानाखेरीज बाकी सर्व व्यर्थ आहे. [१.२५]. मनुष्याला आत्मज्ञान होत नाहीं ह्याचें कारण, **विषयाचें अभिलाषें सकळ भेदु भासे। विषय लेशु तेथें मुक्ति केविं वसे ?॥ विषय तृष्णा सांडी, मग तूं साधन मांडीं ॥...कणु भरीत** ( कण आंत गेलेला ) **जो डोळा शरीरासी दे दुःख। अणुमात्र विषय तो संसारदायक ॥** (१.४२). **तसेंच आशेपाशीं काम आशेपाशीं क्रोध, । आशेपाशीं भेद लागलासे ॥ .. आशेपाशीं वस्ती अहंकाराची ।** (१.१३७) म्हणून ह्या गोष्टी जर सोडून देतां आल्या तर, नाथ सांगतात, **ज्ञानें व्हावी ब्रह्मप्राप्ती**; आणि हेंच परम साध्य आहे. (१ ३८) "ब्रह्मज्ञानाचा क्षण" ह्या शब्दापासून **सुरू होणाऱ्या** कवितेंत सर्व प्रकारच्या मोठ्यांतल्या मोठ्या पुण्यांचा निर्देश **करून** नाथ सांगतात कीं, ह्या पुण्यांची सुद्धां किती जरी पट केली तरी ब्रह्मानुभवाच्या एका क्षणाची हि त्यांना कधींहि बरोबरी येणार नाहीं. (१.८४१) पण हा ब्रह्मानुभव येण्यासाठीं व्यक्तित्वाचा त्याग केला पाहिजे. **देहबुद्धि सांडीं, कल्पना दंडीं । ......तूंतें तूंचि पाहीं, तूंतें तूंचि पाहीं । पाहुनिया राहीं जेथीच्या तेथें** (१.३६३) "...... **येकपण** (व्यक्तित्व) **त्यागीं । ब्रह्मरूप जग आदळे अंगीं ॥** मग अशी स्थिती येते कीं, **भोगूं मी, काय, त्यागूं मी काय, । त्याग-भोग दोन्हीं चैतन्यमय ॥** (१.३५७) अशा माणसाला मग "**जनीं जनार्दन**" दिसूं लागतो. हे वर्णन मागें आलेंच आहे. त्याची स्थिति अशी असते **देव जाला पाठीं पोटीं । त्यामुळें तया नाहीं आटाआटी ॥ जेथें जाय तेथें देव । नाहीं भेव** (भय) **सर्वथा ॥. .. जनार्दनाचा एका म्हणे । देवा पाहणें पाठींपोटीं ॥** (१.४२१) हें जें देवाला पाठींपोटीं म्हणजे मागे पुढें सर्वत्र असा अर्थ, पाहण्यास सांगितलें आहे, तें म्हणजे ही वर सांगितलेली स्थिति प्राप्त करून घेण्याचा मार्ग म्हणून होय. नाथ दुसऱ्या एका जागीं म्हणतात, "**एक एक** (सर्व एकरूप, ईश्वररूप) **पाहतां दिठीं । होय विठ्ठलेसीं भेटी ॥**" (१.६५०). श्रीनाथांस जी स्थिति प्राप्त झाली होती, व ज्या स्थितीचे वर्णन मागें ह्या लेखांत आलें आहे, ती परमपदाची

स्थिति प्राप्त करून घेण्याचा श्रीनाथांनीं आपल्या स्फुट काव्यांत सांगितलेला मार्ग हा असा आहे.

## सार

आपण जो जनांस उपदेश केला व मार्ग सांगितला, तोच नाथांनीं साररूपानें कांहीं जागीं सांगितला आहे. तीं स्थळें महत्त्वाचीं वाटतात. म्हणून खालीं त्यांतील कांहीं मुख्य अवतरणें देतों.

**संतसंगें अन्तरंगें नाम बोलावें। कीर्तनरंगीं देवासन्निध सुखें डोलावें॥ सगुण चरित्रें परमपवित्रें सादर वर्णावीं। निराभिमानें सज्जनवृंदें आधीं वंदावीं॥ भक्तिज्ञानाविरहित गोष्टी इतरा न कराव्या। मनोभावें वैराग्याच्या युक्ति जोडाव्या॥ जेणें हृदयीं सत्वर मूर्ती ठसावे हरिची। ऐशी कीर्तनमर्यादा आहे या संतांघरची॥ श्रवणें मननें अद्वैत भजनें वाजवि करटाळी। एका जनार्दनी, मुक्ती झाली तत्काळीं॥** (१.१४६).

ह्यांत सांगितलेला साधनांचा क्रम लक्षांत घेण्याजोगा आहे. व त्यांतहि शेवटीं 'अद्वैत भजन' आलेंच आहे, हेंहि पाहण्याजोगें आहे. तसेंच, 'अद्वैताचें, व पुनः 'भजन' ही कल्पनाहि, मीं वर जें कांहीं नाथांविषयीं लिहिलें त्याला पूर्णपणें पुष्टि देणारीच आहे. ह्याचप्रमाणें वाचकांनीं ह्या दृष्टीनें ह्या सदरांतील ह्याच्या पुढल्या सर्व अवतरणांतहि लक्षपूर्वक पहावें.

**धन्य जगीं तोचि एक हरिरंगीं नाचे। रामकृष्ण वासुदेव सदा स्मरे वाचें॥ सुखदुःख समान, सकळ जीवांचा कृपाळ। ज्ञानाचा उद्‌बोध भक्तिप्रेमाचा कल्लोळ॥ विषयीं विरक्त, जया नाहीं आपपर। संतुष्ट सर्वदा, स्वयें व्यापक निर्धार॥ जाणीव, शहाणींव, वोझें सांडूनिया दूरीं। आपण वस्तीकर (प्रवाशाप्रमाणे) वर्ततसे संसारी॥ एका जनार्दनी, नित्य हरीचें कीर्तन। आसनीं, शयनीं, सदा हरीचें चिंतन॥"** (१.१४७)

**देह शुद्ध करुनी भजनी भजावें। आणिकांचे** (लोकांचे) **नाठवावे दोषगुण॥ साधनें, समाधि, नको पा उपाधि। सर्व समबुद्धि करीं मन॥** (१.६००)

कोणाचीहि निंदा करूं नये, ह्यावर नाथांचा फार भर आहे. ह्याविषयीं त्यांनीं अनेक जागीं लिहिलें आहे. असो.

**सर्वांभूतीं दया, भेद नोहे चित्ता। साधीं परमार्थ हाचि एक ॥ व्युत्पत्तिविचार न करीं निर्धार। व्यर्थ वायां भार काय करिसी ? ॥** (१.५९६) **सप्रेम करितां भजन। तेणें घडती कोटी यज्ञ ॥ प्रेम सार, प्रेम सार। वायां भार कुंथेचा ॥ प्रेमेविण न भेटे देवा। अवघा वावो**(व्यर्थ) **पसारा ॥ एका जनार्दनी, प्रेम सार। तुटे येरझार येणेंजाणें ॥** (१.१७२५) **देहीं धर्म विहित करी। अद्वैतभाव चित्तीं धरी ॥ सर्वभावें नमस्कारीं। एक आत्मा म्हणोनी ॥ तेणें तुटे रे बंधन। वाचें जपें जनार्दन ॥ आणिक नको रे साधन। रामकृष्ण स्मर सुखें ॥** (१.२६७). **तुमचें नामसंकीर्तन। हेंचि माझें संध्यास्नान ॥ तुमच्या पायांचें वंदन। हेंचि माझें अनुष्ठान तुमच्या पायांचा साक्षेप। हाचि माझा कालक्षेप ॥ तुमच्या प्रेमें आली निद्रा। हीच माझी ध्यानमुद्रा ॥ एका जनार्दनी, सार। ब्रह्मरूप हा संसार ॥** (१.१३८).

हा शेवटला अभंग वाचून, "मन्मना भव मद्भक्तो" इत्यादि गीतेंतील श्लोकाची कोणाला आठवण होणार नाही ? तसेंच, त्याची धाटणी कांहींशी कवीन्द्र रवीन्द्रनाथाच्या वळणाची आहे असें कोणाला वाटणार नाहीं ? असो. आणखी एकच अवतरण देतों.

**ब्रह्मस्थितीचें वर्म। तुज दावितों सुगम ॥ सर्वां भूतीं भगवद्भाव अभेदत्वें आपणचि देव ॥ संसार ब्रह्मस्फूर्ति सांडोनिया अहंकृति ॥** (१.८९). ह्या मुद्यावर अधिक लिहिण्याची जरूरच नाही.

## नाथांच्या कांहीं व्याख्या

श्रीनाथांनीं आपल्या स्फुट काव्यांत जातां जाता सहज दिलेल्या काहीं व्याख्या येथे देणे वावगे होणार नाहीं. **धडधडीत वैराग्य, वरी वाहे विवेक। ज्ञानासी तो एक अधिकारी ॥** (१.४४) ही अध्यात्म मार्गाच्या अधिकाऱ्याची व्याख्या, वैराग्य-विवेकाच्या संबधीं लिहितांना वर मीं उद्धृत केलेलीच आहे. खऱ्या संन्याशाची व्याख्याहि '**मार्ग व साधन**' ह्या सदराखालीं फोल काय काय आहे हें सांगतांना वर येऊन गेलेलीच

आहे. ज्ञानाची व्याख्या नाथ देतात, **ज्ञान म्हणजे शुद्ध सत्त्वगुण।** (१.८३७) आणि खऱ्या साधूची व्याख्या नाथ करतात, **ज्यासी ब्रह्मज्ञान। ... केवळ। तोचि साधु॥** (१.८४४) खऱ्या ब्राह्मणाची व्याख्या नाथ अशी करतात, **ब्राह्मण तयासी म्हणावें।... पूर्ण। ब्रम्ह जाणे तो ब्राह्मण॥** (१.१६०३) म्हणजे जो खरा पूर्ण साधु तोच खरा ब्राह्मण? **शहाणा तो जाण रे** अशी सुरवात असलेल्या बऱ्याच लांब व्याख्यामय कवितेंत तर नाथांनीं जवळजवळ प्रत्येक एकदोन चरणांत एकएका गोष्टीची, अशा चाळीस-पन्नास तरी व्याख्या दिल्या आहेत. त्या सर्व येथें देणें शक्य नाहीं. व ती सबंध लांब कविताहि येथें उद्धृत करण्यांत स्वारस्य नाही. तिचा क्रमांक १.१२९३ आहे.

## नाथांनीं दिलेल्या कांहीं कसोट्या

नाथानीं कांहीं काहीं गोष्टींच्या कांहीं कांहीं कसोट्या सागितल्या आहेत, त्या फारच सुंदर व मार्मिक आहेत. त्या सर्वत्र व सर्वांसच फार उपयोगी आहेत. नाथ म्हणतात, **हरिनाम ऐकतां जरी न वाटे सुख। अंतरीं तू देख पाप आहे॥** (१.३७) किती बरोबर आहे? तसेंच, **देहबुद्धि खुंटली तेथें माया तुटली॥...भोगी का त्यागी अथवा हो योगी। देहीं देहपण न लगे त्याच्या** अंगीं॥ (१.४३) साध्या व्यवहारांत एखाद्या सार्वजनिक कार्यकर्त्याला सुद्धां ही कसोटी किती उत्तम लागू पडते! आतां परमार्थाच्या कसोट्या पाहा:- **कनककांता न ये चित्ता। तोचि परमार्थी पुरता॥ हेंचि एक सत्य सार। वायां व्युत्पत्तीचा भार॥ वाचा सत्यत्वें सोवळी। येर कविता वोवळी॥ जन तेंचि जनार्दन। एका जनार्दनी भजन॥** (१.१३३) हीं कडक भाषेंतील कसोटी पहा:— **लांब लांब तुम्ही सांगाल गोष्टी। तत्त्वेंसी भेटी करीं** (करून द्या) **उठाउठी** (तावडतोब)॥ **मीपण जोंवरीं गेलें नाहीं। तोंवरीं तुम्हीं केलें काई?॥ मीपण देहीं, प्रपंचदृष्टि। कोरडया काय सांगाल गोष्टी॥! एका जनार्दनी, बोधाचें सत्त्व। बोलामाजीं तेथें दाखविलें तत्त्व॥** (१.१३५९) आणखी एकच शेवटला कसोटीचा फार महत्त्वाचा अभंग देतों, व हा मुद्दा संपवितों. नाथ म्हणतात, **सर्वांभूतीं दिसे देव। जया ऐसा अनुभव॥**

**तया चित्तीं देव वसे ।** ही कसोटी सांगून पुढें सांगतात, त्याला **देव जिकडे जिकडे पाहे तिकडे दिसे.** नाथ पुढें त्याची जी स्थिति वर्णन करतात ती अतिशय लक्षांत ठेवण्याजोगी आहे.ते म्हणतात, त्या माणसाला **देव जन, देव विजन । देवीं जडलें तनमन ॥ देव घरीं, देव दारीं । देव दिसे व्यवहारीं ॥ देव काम, देव धंदा । देवीं पावला स्वानंदा ॥ देव मागें, देव पुढें । दृष्टि चैतन्य उघडें ॥ माता देव, पिता देव । देवरूप स्वयमेव ॥ देव बंधू, देव जाया । देवरूप अवघो माया ॥ देव गुणी, देव निर्गुण । गुणातीत देव जाण ॥ देवाविण कांही नाहीं । ऐशी ज्याची दृष्टि पाही ॥ एका जनार्दनी,** (तो मनुष्य) **देव । सहज चैतन्य स्वयमेव ॥** (१,२८६).

ह्याप्रमाणें श्रीनाथांच्या आध्यात्मिक दर्शनांत गढून गेलों असताच आपण सहजच, **देव दिसे व्यवहारीं ॥ देव काम, देव धंदा॥...देव जाया** ह्या त्यांच्या सिद्धान्तापर्यंत व दृष्टीपर्यंत येऊन पोहंचलों, हें फार उत्तम झालें. नाथाचे निव्वळ आध्यात्मिक दर्शन येथें संपलें, व ह्या त्यांच्या अध्यात्मावर उभारलेलें जें त्यांचें व्यावहारिक दर्शन, ह्या निवृत्तीवर उभारलेली त्यांची जी प्रवृत्ति, उर्फ श्रीनाथाचा जो कर्मयोग, तिकडेच आपणास आतां वळावयाचे आहे.

## खंड दुसरा

# श्रीनाथांचें व्यावहारिक दर्शन

## कर्म करावें कीं नाहीं ?

श्रीनाथांच्या व्यावहारिक दर्शनात अगदीं पहिल्यानें तडाख्यासरशी आपण, जगांतील अत्यंत महत्त्वाचा असलेला, व भगवान् श्रीकृष्णांनीं देखील अत्यन्त गहन म्हणून वर्णिलेला, कर्माचाच प्रश्न विचारांत घेऊन टाकूं. माणसानें जगतांत कर्में करावींत कीं नाहींत, की कर्मांचा त्याग करावा, ह्याविषयीं नाथ काय म्हणतात ? ह्याबद्दल नाथहि श्रीभगवंतांप्रमाणेंच अगदीं प्रथम हेंच सांगतात कीं, कर्माचा प्रश्न मोठा बिकट आहे. कारण **कर्में करितां फलाशा वाढे । तें तें फल भोगणें घडे ॥ कर्म करितां फल बाधक । न करितां प्राप्त नरक ॥ ऐसी कर्माची**

**राहटी ! सदैव देखे उफराटी !** ॥ ( १.१८६७ ). **कर्माच्या पोटीं भ्रम। कीं भ्रमाच्या पोटीं कर्म। हें दोन्हींचें न कळे वर्म। जाणत्यासी** ॥ (१.१२८७). मग करावें काय? भगवंतांप्रमाणेंच नाथहि सांगतात, ह्यावर तोड हीच कीं, देवाचें नांव घे, आणि स्वधर्मकर्म कर. **स्वधर्म कर्म करीं, पडे व्यंग। विष्णुस्मरणे तें समूळ होय सांग** ॥ ( १.३१४ ). इतकेंच नव्हे, तर नाथ साफ सांगतात, ईश्वरप्राप्तीच्या आशेने कर्म सोडणें ही चूक आहे. **ब्रह्मालागीं कर्म सांडणे हें कुडें** (वाईट, चूक ) **पाय खांडोनी** (तोडून घेऊन) **पुढें चालूं पाहसी** ॥...... **सर्व कर्म पाहीं। सांडी मांडी** ( सोडण्या-धरण्याचा प्रश्न ) **नाहीं तयें ठायीं** ॥ ( १.५२ ). आणि नाथ असें नुसतें निषेधात्मक विधान करूनच थांबत नाहींत. ते त्याबद्दल विधिपर वाक्यहि स्पष्टपणें सांगतात. कर्में करच, असेंहि ते निश्चितपणें सांगतात. **परब्रह्मप्राप्तीलागी। कर्म आचरावीं वेगी** (१.१४१४). पण कर्म करण्यात नडते कोठें, हें तर वर ह्या मुद्याच्या प्रारंभींच सांगितलें आहे. मग हीं कर्में करावीं कशीं? नाथहि ह्याचे श्रीभगवंताप्रमाणेंच उत्तर देतात'... **ब्रह्मार्पण कर्म। तेणें अवघे धर्म जोडतील** (मिळतील)॥(१.१५०१). ब्रह्मार्पणबुद्धीनें कर्में करशील, तर परमपद तुला मिळेल. इतकेंच नव्हे, तर असा ब्रह्मसाक्षात्कार घडावा, हाच तर मुळीं कर्म करण्यातील हेतु किंवा त्याचा उद्देश आहे. तो साक्षात्कार नाहीं झाला तर मग कर्म केलें कशाला? **कर्मीं ब्रह्मप्रतीति नाहीं. । तरी त्या** (त्वा) **कर्म केलें काई ?**॥ **एका जनार्दनी, कर्म। कर्मीं पाहें परब्रह्म** ॥ (१.५४) . आणि हा कोरडा उपदेश लोकांना करून नाथ स्वतः स्वस्थ बसत नाहींत. त्याची स्वतःची कर्मांविषयींची प्रतिज्ञा किती कडक, निश्चयात्मक व छातीठोक, आहे ती पहाः— **कोटि जन्म आम्हीं करूं हरिकथा। कर्मकांड माथा धरुनीया ॥ ऐहिकादि कर्मे करुनी सर्वदा। भजों जी गोविंदा निरंतर** ॥.... **एका जनार्दनी, कर्म ब्रह्म एक। वेदान्तीं विवेक बोलियला.** ॥ ( १८८ ) आणि असें ब्रह्मार्पण करून कर्म माणसास करतां येतें कीं नाहीं, हा नाथांनीं नुसता तर्काचा, प्रश्न म्हणून विचाराकरता शिल्लक ठेवलेला नाहीं असें तें करतां येते, किंवा त्याच्याकडून तें होतें, ह्याला त्यांनीं स्वतःची ग्वाही दिली आहे. **कर्म, कार्य, कर्तव्यता। माझेनि नांवें तूंचि आतां ॥ एका**

**जनार्दनी निजात्मता। कर्म करून नित्य अकर्ता ॥** ( १.१३८२ ) नाथांचा हा अभंग ही त्याची बढाई नव्हे; ही त्यांची ग्वाही आहे. हा सुंदर अभंग मागल्या खंडांत नाथांच्या 'अनुभवा' च्या प्रकरणांत पूर्वी सबंध उद्धृत केलेलाच आहे, म्हणून येथें पुन्हां देत नाहीं येवढाच जरूरीपुरता भाग पुनः येथे दिला आहे. ह्या संबंध अभंगांत नाथांनीं हीच अत्युच्च वृत्ति वर्णन केली आहे. येथें कर्माकर्माचा निर्णय संपला. येथे त्याच्या उच्चतेची कमाल मर्यादाच संपली.

## संसार करावा कीं नाहीं ?

माणसानें संसार करावा कीं नाहीं, हा आध्यात्मिक दृष्टया दुसरा अत्यंत मोठयापैकीं व खूप रणें माजलेला प्रश्न आहे. ह्याचें उत्तर एका॰ परीनें, माणसानें कर्मे करावींत कीं नाहींत, ह्यावरील, अधिक व्यापक प्रश्नाच्या विचारांत सर्वसामान्य रीत्या आपोआपच दिलें गेलें आहे. पण हा प्रश्न तितकाच महत्त्वाचा असल्यामुळें, त्यावर मतभेदहि तितकाच तीव्र असल्यामुळें, व त्यावर भवति-न-भवतिहि फार झाली असल्यामुळें पहिल्या प्रश्नाच्या उत्तरावर ह्या प्रश्नाच्या उत्तराचा नुसता मोघम हवाला न देतां त्याविषयीं श्रीनाथ काय म्हणतात हें निश्चितपणें व स्पष्टपणें त्यांच्याच शब्दांत येथें नमूद करणें अवश्य आहे. जरूर तो मनःसंयम व खरेंखुरें वैराग्य हीं गांठीं नसता संसारत्याग करणाराची होणारी **फजीती व त्याचें पतन** ह्याचे हुबेहूब वर्णन श्रीनाथांच्या परिणामकारक शब्दांत मागल्या खंडात **मार्ग व साधन** ह्या सदराखाली पूर्वी येऊन गेलेंच आहे. संसारा-विषयींचा हा प्रश्न नाथांना आपल्या हयातींत समक्षच कोणी तरी केला होता. ते म्हणतात, **म्हणसी गृहस्थ साधकें। स्त्री सांडोनी जावें कें** (काय)?। **येच अर्थी उत्तर निकें। एक आतां सांगेन ॥** ( १.४११ ) आणि मग अन्यत्र नाथ खडखडीत उत्तर देतात, आनंदानें संसार करावा. फक्त देवाचें स्मरण मात्र ठेवावें. त्याचे स्वतःचे शब्द ऐकाः— **आनंदेंकरोनि संसारीं असावें। नाम आठवावें श्रीरामाचें ॥ नामाचिया योगें संसार तो चांग** ( चांगला )। **येरव्हीं तें अंग व्यर्थ जाय ॥**(१.२९९). ही ईश्वराचें स्मरण ठेवण्याची अट मात्र पाळली पाहिजे. नाहीं तर , नाथ

म्हणतात तो निव्वळ जनावरपणा होईल. पण ही अट पाळून संसार केला तर? नाथ सांगतात, तर मग संसारच ब्रह्मरूप होईल. **सुखें संसार हा करीं। वाचे उच्चारावा हरि॥ .. एका जनार्दनी, नामें संसार हा परब्रह्म!॥** (१.२७३). पण ज्याप्रमाणें इतर सर्व योगांना व साधनांना मन:संयमाची अत्यंत आवश्यकता आहे, तशीच ती ह्या संसारयोगाला किंवा गृहस्थाश्रम-योगालाहि अर्थात् आहेच. मन:संयमावाचून ईश्वरप्राप्ति करून देईल असें कोणतेंहि साधनच नाहीं.नाथ सांगतात,**साधन ते मन करीं आपुले आधीन। यापरतें कारण आन** (अन्य) **नाहीं॥** (हे दोन चरण व पुढे आलेले दोन चरण,ह्या लेखात पूर्वी आलेलेच आहेत.पण येथें मध्यें नाथ पुढें म्हणतात,).... **...मनासी आवरीं। मग तूं संसारीं धन्य होसी॥** (१.६९१). **जिंकितांचि मन साधनें साधतीं। न जिंकितां फजीती मागेंपुढें॥** (१.६९२).... **स्थिर मन। नाहीं; तेथ काय साधन?॥** (१.८०७). **मनें इंद्रियेंनिग्रह करी ।तो गृहीं असतां जाह्नवीतीरीं॥** (१.९७५). आणखी काय पाहिजे? संसारत्याग करावा, संसारत्याग करावा, असें सर्वच सांगतात, **व नाथहि** तसें कांहीं जागीं म्हणतात; पण नाथांच्या, व इतरहि उपदेश-कांच्या, त्या म्हणण्याचा खरा अर्थ काय असतो तो श्रीनाथांनींच स्पष्ट शब्दांत सांगून ठेवला आहे, तो काळजीपूर्वक लक्षांत ठेवण्याजोगा आहे. **त्याचे ध्यावे चरण सदा सर्वकाल। प्रपंच सकळ सांडुनिया॥ सांडुनीया म्हणजे मिथ्या** (नश्वर) **हा पाहावा। सद्गुरु करावा पाठीराखा॥ आणि मग,... ठेवोनिया जीव सद्गुरूचे पायीं। प्रपंचव्यवसायीं वागतसे॥ वागतसे जनीं परी तो विजनीं ।भेदभाव मनीं नाहीं जया॥** (१.९७८). सर्वत्र ईश्वर पहावा, व सर्वत्र समभाव ठेवावा, हें जें नाथाचे नेहमींचें स्वानुभवावरून सांगणें, तेंच **भेदभाव मनीं नाहीं जया।** हा चरण लिहिताना त्यांच्या मनश्चक्षूपुढें आहे. सद्गुरु काय आणि देव काय, दोन्ही एकच. म्हणून तोच भाव मनांत ठेवून नाथ निर्णयरूप सांगतात, संसार देवाचा म्हणून कर. **देह गेह माझें म्हणणें हें दुजें। सर्व विठ्ठलराजीं समर्पी तूं॥** (१.८९१). **देव दिसे व्यवहारीं ॥ देव काम, देव धंदा।...देव जाया।** हा श्रीनाथांचा उपदेश तर नुकताच वर दोनदा येऊन गेलाच आहे; आणि तो तर चालू मुद्याच्या दृष्टीनें येथें अत्यन्त महत्त्वाचा आहे. संसार

करावा कीं नाहीं, व तो कसा करावा, ह्या दोन्ही प्रश्नांचीं श्रीनाथांचीं उच्चतम दृष्टीचीं स्पष्ट उत्तरें हीं ह्याप्रमाणें आहेत.

## नाथ गीतार्थाची मूर्ति.

कर्म व संसार ह्या दोन सर्वांत महत्त्वाच्या प्रश्नांवरचीं श्रीनाथांचीं हीं उत्तरें पाहिलीं म्हणजे दोन तीन गोष्टी दिसून येतात. त्यांतील पहिली ही कीं, श्रीनाथांस कर्महि त्याज्य वाटत नाहीं, इतकेंच नव्हे तर तें करणें आवश्यक वाटतें. नाथांस ज्ञान व भक्ति हीं दोन्ही पाहिजे आहेत हें आपण मागेंच, पूर्वीच्या खंडांत पाहिलेंच आहे. आतां त्यांना कर्महि पाहिजे, असेंहि दिसून आलें. म्हणजे त्यांना तिन्ही पाहिजेत. लोकमान्य टिळक 'गीतारहस्यांत' सांगतात कीं, ज्ञानमूलक भक्तिप्रधान कर्मयोग हें श्रीमद्भगवद्गीतेचें सार आहे. ज्ञान, भक्ति, व कर्म, हीं तिन्ही पाहिजे असलेल्या श्रीनाथांसारख्या एका फार थोर पुरुषाचेंहि मत तसेंच, ह्या तिहींच्या समुच्चयाचेंच, असल्याचें ह्याप्रमाणें पाहून आपल्या मनास खचित समाधानच वाटते. तसेंच, श्रीनाथ म्हणजे गीतार्थाची मूर्तिच होते, असेंहि दुसरे ह्यावरून दिसून येतें. श्रीनाथांनींहि स्वतः संसार व सर्व प्रकारचीं ऐहिक कर्तव्यें चोखपणे पार पाडलीं तीं कर्मयोगदृष्टीनेंच होत, असा ह्यावरून त्यांच्या जीवनावरहि प्रकाश ह्यायोगें पडतो. तिसरी गोष्ट ह्यापासून निघते ती ही कीं, आमच्या संतांनीं लोकांस संसारपराङमुख व्यवहारविमुख, व म्हणून पोंचट व नादान करून टाकलें, व म्हणून आपल्या देशाचा अधःपात झाला, असा जो कांहीं आधुनिक विद्वानांचा व विशेषतः स्वतःला **धारकरी** म्हणवणारांचा, आमच्याकडील संतांवर आक्षेप आहे, त्याचेंहि, प्रस्तुत स्थळीं निदान नाथांपुरतें तरी खास, यथास्थित खंडण झालें; व **राइज ऑफ दि मराठा पॉवर** ह्या आपल्या पुस्तकांत कै. न्यायमूर्ति रानड्यानीं आपल्या संतांची जी बाजू जोरानें पुढें मांडली, व जी कै. ल. रा. पांगारकरांनी जन्मभर सांवरून धरली, तिला ह्यानें विपुल पुष्टि मिळते. असो. ह्याचा अधिक विस्तार करण्याचें हें स्थळ नव्हे.

## सर्वांत प्रमुख स्वभावविशेष.

साक्षात्कारी श्रीनाथांचे आपल्या स्फुट काव्यांत उमटलेले सर्वांत प्रमुख स्वभावविशेष भक्ति, दया, व सत्यप्रियता, हेच दिसून येतात. पैकीं त्यांचा आत्मानुभव व भक्ति ह्यांच्याविषयीं विवेचन पूर्वीं येऊन गेलेंच आहे. त्यांच्या उत्कट **दयाभावा**चेहि अगदीं थोडेसे दिग्दर्शन, व पुढील पैकीं कांहीं चरण, सचेतन-अचेतनाविपर्यींच्या त्यांच्या भावनांविषयीं लिहितांना मागें आले आहेत. पण तें पुरेसें नाहीं. श्रीएकनाथ आपल्या परमदयाभावामुळें, व अचेतनाच्या उलट सचेतनाविषयीं वाटणाऱ्या तीव्र कळवळ्यामुळें, बलिदानाच्या चालीच्या अत्यंत विरुद्ध होते. क्षुद्र देवतांची भक्ति कां करूं नकोस, हें सांगतांना त्यांनीं जें विवेचन केलें आहे, त्यांत हा मुद्दा इतर ठिकाणांपेक्षा जास्त स्पष्टपणें व प्रमुखपणें आला आहे. ते म्हणतात, **प्रेमें पूजी मेसाबाई। सांडोनीया विठाबाई॥ काय देईल ती वोंगळ। सदा खाय अमंगळ ? ॥ आपुलिये इच्छेसाठीं। मारी जीव लक्ष कोटी॥ तैसी नोहे विठाबाई ?। सर्व दीनांची ती आई ?॥** (१.२७५) **पुढें "मेंढरें बोकड मारिती"** म्हणून मेसाबाईचा त्यांनीं अन्यत्र पुनः एकदां धिक्कार केला आहे. (१.१४५१) अशा दैवतांविषयीं ते तळमळून फार कडक शब्दांत म्हणतात,

**फजीतीचे देव मागती घुटीरोटी। आपणांसाठी जगा पीडिती काळतोंडे मोठीं!॥ नको तया देवा आठव मजसी!। विठ्ठल मानसीं आम्ही ध्याऊं॥ अविचारी देव, अविचारी भक्त!। देवाकारणें मारिती पशुघात!॥ एका जनार्दनी, जळो ऐसा देव तो भांड (खोटा)!। विठ्ठल विठ्ठल न म्हणे त्याचें काळें तोंड!॥** (१.१४४६). अशा देवतांची अशा गर्ह्य रीतीनें पूजा करणाराविषयीं ते म्हणतात, **जीत जीव करुनी वध। दगडा दाखविती नैवेद्य!॥** (१.१६१६). तसेंच, **मेंढरें बोकुड मारिती। परतोनी आपणचि खाती!॥** (२.११३). एकनाथ महाराजांस यज्ञार्थ केलेला पशुवधहि बिलकूल संमत नाहीं, हाहि त्यांच्या सचेतनाविषयींच्या आत्यंतिक दयाभावाचाच परिणाम होय; व ह्या अर्थाचें त्यांचें वचन वर एकदां उद्धृत केलेलेंहि आहे. **म्हणती सोमयाग**

**करा। मुख धरुनी मेंढा मारा !॥** ( १.१५३ ) **भजन चाललें उफराटें** ह्याच्या उदाहरणांपैकीं त्यांचें हें एक उदाहरण आहे. अर्थ उघड आहे. नाथांच्या मतें मुळीं वेद अहिंसाच शिकवितो; पशुघात नव्हे. **श्रुती सांगती परमार्था। हिंसा न करावी सर्वथा॥** ( १.६२ ). अतिथीबद्दलहि त्यांनीं जे विचार व्यक्त केले आहेत तेहि त्यांच्या ह्या तीव्र सचेतन–अचेतनदृष्टीचे द्योतकच आहेत. **देवपूजा करी आदरें। अतीथ आलिया न बोले सामोरे॥** ( १.१७२६ ). श्रीनाथांच्या ह्या सर्व भावनांतील, विचारांतील व विवेचनांतील, उत्कट दयाभावाचें मूळ सूत्र एकच आहे, व तेंहि पूर्वी मीं एकदां दोनदां ह्या लेखांत उद्धृत केलेलेंच आहेः– **सचेतनीं द्वेष, अचेतनीं पूजा। भक्ति गरुडध्वजा केविं पावे ?॥** ( १.४१ ).

सत्याविषयींच्या नाथांच्या एकनिष्ठ प्रेमाचा, व खोट्याविषयींच्या त्यांच्या अत्यंत तिटकाऱ्याचा, पुरावा पाहिजे असल्यास, त्यांचें भोंदूंच्या विषयींचें, उर्फ हल्लींच्या भाषेंत सांगावयाचें म्हणजे **बोवाबाजी** विषयींचें विपुल लिखाण वाचावें. **कलिमाजी थोर जालें पाषांड। पोटासाठीं संत जाले उदंड॥** (१-१४२४) असे जे लोक; **टिळा टोपी घालुनी माळा। म्हणती आम्ही संत !॥**(१.८२७);**किंवा, अंगासी राख,दुंगासी लंगोटी। गोसावी हातवटी मिरविती॥ आणि भांगेचा सुकाळ ! चेले करी मूढ।** (१.९४६) असे जे अस्सल 'बुवा'; **द्रव्यदारालोभ अंतरीं। हरिकथा वरीवरीं॥ आणि अंतरीं तों ध्यान वल्लभेचें।** अशी ज्यांची स्थिति; **नाम गाय प्रेमभरित। रडे स्फुंदे डोळे पुसीत। अंतरींचा हेत। वेगळा बापा !॥** (१.२६९) अशी ज्यांची ढोंगाची शिताफी, त्यांचे नाथांनीं, ह्या उपरोक्त अभंगाखेरीजहि अनेक जागीं, चांगलेच वाभाडे काढले आहेत ( १.५९.२५३,२७४,७६९.८२१, इ. ).

**पाय घालुनी आडवा। काय जपतोसी गाढवा ?॥** हें ह्याच संदर्भांतील नाथांचें फटकळ वचन पूर्वी येऊन गेलेंच आहे. हीं नाथाचीं सर्व वचनें वाचलीं म्हणजे त्यांना असत्याची किती मनापासून चीड होती, व खऱ्या नाण्यावरच, सत्यावरच, त्यांचें कसें सर्वस्वी प्रेम होतें, हें दिसून आल्यावांचून राहात नाही. ह्याच सत्याच्या चाडीमुळें व अन्तःकरणांतील विशाल

विश्वात्मक भावनेमुळेंच "रहाट" ह्या कवितेंत त्यांनीं स्वार्थीवृत्तीच्या लोकांवर चांगलेच कोरडे ओढले आहेत (२.१३१); व केवळ "पोटासाठीं" धडपडणाऱ्या मतलबी व ढोंगी लोकांचाहि त्यांनीं तसाच खरपूस समाचार घेतला आहे तोहि ह्याचमुळें. ( १.९४५,१६४९,१६५०,१६५१, इ. ).

## श्री नाथांचें अध्ययन

दोन – तीन ठिकाणीं नाथांच्या वचनांत अगदीं उघडपणें उपनिषदार्थ उमटलेला दिसून येतो ( १.११५,३६९, इ. ). गीतेची छाया तर नाथांच्या किती तरी वचनांवर पडलेलीच आहे (१.६०,६७४,१६५६; इ.), व कांहीं ठिकाणीं गीतेचा निर्देश करूनच गीतेचें मत नाथांनीं आपल्या म्हणण्याच्या पुष्ट्यर्थ दिलेलें आहे (१.८३७ इ.). (श्रीमद्भागवताच्या एकादशस्कंधाचें तर नाथानीं सर्वविख्यात व्याख्यान केल्याचें सर्वांस विदितच आहे. ) नाथांचे सर्वांत जास्त आवडते ग्रंथ गीता आणि भागवत हे होते, असें एका अभंगावरून दिसून येतें ( १.४२८ ). क्वचित् ठिकाणीं ह्या स्फुटकाव्यांत नाथांनीं एखाद्या संस्कृत वचनाचें अगदीं भाषान्तरच करून टाकलें आहे. पण अशीं स्थळें फार थोडीं आहेत. कांहीं अभंग व पदें हीं 'औटपीठ,' 'गोल्हाट,' वगैरे थेट हठयोगाच्या परिभाषेत लिहिलेलीं आहेत, तर इतर कांहीं अद्वैत वेदान्ताच्या शुद्ध परिभाषेत लिहिलेलीं आहेत, व त्यांत कोठें कोठें अगदीं न्यायशास्त्रास धरून तर्कप्रधान युक्तिवादहि असून त्यांत घटपटाचे दृष्टान्तहि आले आहेत. विश्व, तैजस, प्राज्ञ, ह्या चैतन्याच्या तीन जागृतींचा, व प्रत्यगात्म्यांचाहि निर्देश त्यांच्या स्फुट काव्यांत आहे (१.१३७९). **अस्ति, भाति, प्रिय, ऐशीं पदें तीनी। एका जनार्दनी तेंचि झालें ॥** (१.१२५५) ह्या दोन चरणांत, **अस्तिभातिप्रियं रूप नाम चेत्यंशपंचकम्। आद्यं त्रयं ब्रह्मरूपं मायारूपं ततो द्वयम् ॥** ह्या पंचदशींतील श्लोकाचाच निर्देश स्पष्टपणे दिसतो; व ह्यावरून नाथांनीं वेदान्तावरील तो प्रमाणभूत ग्रंथहि अवलोकिलेला असावा, असेंच वाटतें. तसेंच त्यांच्या स्फुट काव्यांत एकाजागी **न्याय, मीमांसा सांख्य, पातंजली। व्याकरण, वेदान्त बोली ...॥** (१.११९३) असा ह्या अनेक शास्त्रांचा निर्देशहि आलेला आहे. ह्या त्यांच्या सर्व लेखनावरून त्यांचें अध्ययन व त्यांची बहुश्रुतता ह्यांची थोडीबहुत तरी कल्पना येते.

ह्याप्रमाणें ठोकळ मानानें श्री एकनाथांच्या व्यावहारिक दर्शनांतील मुख्य भाग येथें संपला; व ह्यापेक्षां अधिक तपशीलांत शिरण्याचें हें स्थल नव्हे. आतां आपण ह्या निबंधांतील त्यांच्या उरलेल्या कविरूपदर्शनाच्या तिसऱ्या खंडाकडे वळूं

# खंड तिसरा

## श्रीनाथांचें कविरूपदर्शन.

ह्या खंडांत आपल्याला श्रीनाथांकडे आतां केवळ कवि ह्या नात्या-नेंच पहावयाचें आहे. पण त्यांतहि अर्थात्, नाथाच्या काव्यात आलेले रस त्यांत ग्रथित झालेले अनेक अलकार, वगैरे शास्त्रीय विवेचनाच्या किचकट व रुक्ष खटाटोपात शिरून हा सुंदर विषय कटाळवाणाहि करून टाकाव-याचा नाहीं किंवा त्या प्रकारच्या विवेचनामुळे त्याचा विस्तारहि अनावर होऊ द्यावयाचा नाहीं. म्हणून, श्रीनाथमहाराजाकडे कवि ह्या नात्यानें पाहताच ज्या ठळक, सुदर, व महत्त्वाच्या गोष्टी डोळ्यात भरतात, व ज्यांची छाप आपल्या मनावर एकदम व सर्वांत जास्त बसते, तेवढ्याच मुख्यत: येथें रसग्रहणदृष्ट्या नमूद करून समाधान मानावयाचें, असेंच ह्या विषयाचे रूप योजणे भाग आहे. तसेंच, अर्थात् हा विचारहि आप-ल्याला फक्त त्याच्या स्फुट काव्यावरूनच येथें करावयाचा आहे, हेहि उघड आहे.

नाथांनीं फार साध्या कल्पनांचा व अगदीं साध्या शब्दांचा उपयोग करून **भावनेची उत्कटता** कशी व्यक्त केली आहे, ती पहा:— **'माझे माहेर पढरी'** ( १-१२ ) येथील ह्या 'माहेर' शब्दांत किती अर्थ व भाव भरला आहे ! **आम्ही परात्पर-भिकारी । वेगें आलों संताद्वारीं द्या मज भक्तीची भाकरी । म्हणोनी नाचतों नामगजरीं ॥** ( १.१६० ) ह्यांतील 'भिकारी,' 'भाकरी,' व 'नाचतों,' हे शब्द फार मौजेचे आहेत पुढील अभंग तर ह्या दृष्टीनें फारच स्पष्टपणें डोळयांत भरण्याजोगा आहे:— **नयन तान्हेले ! पाजावे काई ? । मना खत (क्षत, जखम ) जालें, फाडूं कर्षेण ठाई ? । ऐसा कोणीही वैद्य मिळता कां पुरता ? । सुखरूप काढी मनाची कां व्यथा ! ॥** ( १.३३८ ).

नाथांच्या काव्यांतील कांहीं सुंदर चरण पहा :– '**रूपा भाळला कंदर्प । तेणें** ( म्हणून ) **कृष्ण केला बाप ।** (१.५) **भावा विकला वासुदेवो रे**' ( १–३१ ) हा सुंदर चरण पूर्वी भावभक्तिप्रेमाच्या विवेचनांत दिलाच आहे. **स्वसुखाचे सोहळे विदेहभावें ।** ( १.४३ ) हाहि पूर्वी येऊन गेलेला चरण अतिशय थोड्या शब्दांत फार अर्थ फारच सुन्दर रीतीनें व्यक्त करणारा आहे, असे कोण म्हणणार नाहीं ? **बोधभानु, तया नाहीं माध्यान्ह ! सायं प्रातर नाहीं, तेथें कैंचा अस्तमान ? ॥...अस्तमान गेलें अस्तमाना ॥ जिकडे पाहे तिकडे उदयोचि भासे ! ॥ पूर्व पश्चिम तेथें कैंचा भासे ? ॥ एका जनार्दनी नित्य प्रकाशा । कर्माकर्म जालें दिवसा चंद्र जैसा ॥** (१.५३) किती रमणीय व पुनः किती समर्पक असें हें वर्णन आहे ! **जे कां आदित्यीं तेज तेजाळें । तेंचि तया** [ विठ्ठलाच्या ] **अंगी जालें डोळें ॥** ' ( १.६३ ) ही कल्पना फारच सुंदर रीतीनें मांडली आहे. '**एका जनार्दनी अवलीळा** ( लीलेनें ) **पाहतां त्रैलोक्य जाहला डोळा ! ॥** ( १.८० ) येथें सर्व व्यापित्वाचा व सर्वज्ञतेचा भाव किती थोडक्यांत अत्यंत समर्पक रीतीनें सांगितला आहे ! शिवाय त्यांत भव्यताहि फार आहे. दोन अप्रतिम गोड चरण पहा.:– **कैसें पीक पिकलें प्रेमाचें ! । सांठवितां गगन टांचें** ( लहान पडतें ) **!** ( १.१२५ ) हें उत्कट प्रेमभक्तीचें अत्यंत मधुर वर्णन आहे. आतां देवाविषयींच्या विरहभावनेचें हें उत्कट आणि सुंदर वर्णन पहा:– **स्वामी-सेवका अबोला । ऐसा जन्मचि अवघा गेला ! ॥** ( १.३५५ ). देव कसा आहे? तर, **दुःखाची विश्रान्ति, सुखाचा आनंद ! ॥** (१.५३३). किती अगाध तत्त्वज्ञान ह्या लहानशा गोड चरणांत भरलें आहे !

कांहीं ठिकाणीं अगदीं नवीन व आश्चर्यकारक पण फार सुंदर अशी शब्दयोजना करून कसा सुंदर अर्थ नाथांनी व्यक्त केला आहे तो पहा :– **एका जनार्दनी निजभाव । देहीं पिकला अवघा देव !॥** (१.१२५). **नयन नाचती ! सुखाचा हा गोंधळु ! । साचें सन्मुख देखोनो श्रीविठ्ठलु ॥** ( १.३७० ). **गोडपणें मिठी पडलीसे जीवा ! ।** (१.६४५). **वाढविसी देह काळाचें भातुकें ! ।** ( १.६४६ ). **धन, दारा, पुत्र, अपत्य, हे म्हणसी माझे । परी हें काळाचें खाजें ! ॥** (१.१४७४).

ढोंगी माणसाच्या सबंध जीवनाचें एका लहानशा सूत्रांत संपूर्ण वर्णन पुढील प्रमाणें आहे :—

**नित्य हाटपाठ, आचार सपाट।। कारभार दाट अलत्याचा।।**।(१.७९६). **कानीं जें पेरिलें, डोळां तें उगवलें !।** ( १.१२६९ ). हें गुरुगम्य आत्मानुभवाचें अतिथोडक्यांत अप्रतिम वर्णन आहे ! असे अनेक अगदीं नवीन, चमत्कारपूर्ण, व परमसुंदर शद्बप्रयोग निर्माण करणाऱ्या श्रीनाथांच्या काव्यशक्तीविषयीं कोणाला शंका राहील ?

नाथांचा जागोजागीं व्यक्त झालेला **कळवळा** फार हृदय हालवून सोडणारा आहे. **सद्गदित कंठ, बाष्प तैं दाटत। जयाभेटी लागीं हृदय फुटत !।।** ( १.३८४ ). ...**दत्तवेगळा जाण। नोहे माझा प्राण क्षणभरीं।।** (१.५१२). **भक्तीविण पशु कशासि वाढला ?। सटवीनें नेला कैसा नाहीं ?।। काय माय गेली होती भुतापाशीं ?। हरि न ये मुखासी अरे मुढा !।।** ( १.१२५३ ). **नाशीवंत सकाळिक। शाश्वत माझा नायक !।।** (१.१३०७). ह्यांतील 'माझा' शद्ब किती प्रेमळ आहे ! आणि देवाला 'नायक' हा शद्बहि किती मजेचा, अर्थपूर्ण, व नवीन, आहे ! मनुष्य प्राण्याचा नाथांना अनुभव किती कडू आहे, व तो कसा व्यक्त केला आहे तो पहा :— **मनुष्य-इंगळी अति दारुण !। मज नांगा मारिला तिनें। सर्वांगीं वेदना जाण। त्या इंगळीची !।।** ( २.२१० )

नाथांचे दोन तीन सुंदर **उपमा-दृष्टांतहि** देतों. **कणुभरित** (कण आंत गेलेला ) **जो डोळा शरीरासी दे दुःख। अणुमात्र तो विषय संसारदायक।।** ( १.४२ ) हे सुंदर चरण एकदां मागें निराळ्या कारणास्तव येऊन गेलेच आहेत, **साकर दिसे, परि गोडी न दिसे। ते काय त्या वेगळी असे ?।।** ( १.१२४ ) किती समर्पक हा दृष्टांत आहे ? **संतावांचोनिया नाम न ये हातां। साधनें साधितां कोटि जाणा।। जैसें कांतेविण करणें संसार। साधनविचार व्यर्थ ठेल।** ( ठारला, ठारतो. )।।! (१.२१८) कान्तेविण संसार !' आणि हे नाथ लिहीत आहेत !

कांहीं ठिकाणीं श्री नाथांनीं अचाट व अगदीं **नवीन कल्पना** आपल्या काव्यांत घातल्या आहेत. महालक्ष्मीनेंच दशावतार घेतल्याची अगदीं नवी

कल्पना मागें आलीच आहे. तसेच, दशावतारांच्याहि व श्रीज्ञानेश्वरांच्याहि स्त्रीरूपात्मक वर्णनांचाहि निर्देश मागें आलाच आहे. ब्रह्म व माया ह्यांचें नाथांनीं केलेलें वर्णन असें आहे:— **नागवा नवरा, नागवी नवरी। दोघे बसले चराचरी ! ॥ नागवा नवरा नवरी नेसला ! । नागव्या नवरीनें नवरा वेढिला !** ॥ ( २.१०७ ) ह्या अभंगातील कल्पना किती नवीन व किती अचाट आहे !

श्री नाथांची कांहीं सुभाषितवजा वचनें:— **सचेतनी देव, अचेतनी पूजा। भक्ति गरुडध्वजा केविं पावे !** ॥ ( १.४१ ) हे पूर्वी वेगळाल्या कारणांनीं दोनदां आलेले सुंदर, सुटसुटीत फार अर्थपूर्ण, व स्वतंत्र उपयोगांत आणतां येण्याजोगे चरण सुभाषितासारखे किंवा म्हणीसारखेच नव्हेत काय ? **तोंडभरीं विवेक, मनीं वाहे अभिलाख** ( ष ) वायफळ ज्ञान बोलणाराचें थोडक्यांत मार्मिक वर्णन ! तसेच तेथेंच हेंहि आहे:— **परिसोनी ग्रंथ निरोपी ज्ञानकथा । मनी वाहे आस्था विषयांची** ॥(१.४४) बोवांचें वर्णन:—**घरोघरीं गुरु आहेत आयते । गूळ घेवोनिया विकिती रायतें !** ॥ ( १.३४१ ) **अवघे सुखाचे सांगाती । दुःख देखतां पळती** ॥ ( १६४८ ) **कठिण समय येतां कोण कामास येतो ।** म्हणून लिहिणाऱ्या रघुनाथ पंडिताच्या पूर्वी किती तरी शतकें नाथाचे हे चरण लिहिले गेले आहेत. **गूळ सांडोनी वेगळी नव्हे गोडी ।** ( १.७१९ ) **गोडीसी साखर, साखरेसी गोडी । निवडितां अर्धघडी** (एक माप) **दुजी नोहे** ॥ ( १-७२१ ) सतत सहचर्य दाखविणारीं हीं दोन सुंदर सुभाषितेंच आहेत. **श्वानाचा तो धर्म करावी वसवस । भलें बुरें त्यास न कळे कांही ॥ .... निंदकाचा धर्म निंदा ती करावी । भलें बुरें त्यागावीं न कळे कांही** ॥ ( १.१०२७ ) **क्रोधी, अविश्वासी, त्यांसी बोध कैंचा ! । व्यर्थ आपुली वाचा शिणवूं नये** ॥ ( १.१२६१ ) हे अगदीं अनुभवाचे बोल आहेत. **प्रेमाविण भजन नाकाविण मोती । अर्थाविण पोथी वाचुनी काय ?** ॥ (१.१२६२) **डोळा फोडोनीं काजळ ल्याला ! नाक कापूनी शिमगा खेळला !** ॥ (११८८५) मूळ तत्त्वच आधीं सांभाळलें पाहिजे; तें गेल्यावर बाकी बाहेरच्या सर्व गोष्टी व्यर्थ आहेत, असा अर्थ **करूनी वेदशास्त्रश्रवण । होय शिश्नोदरपरायण** ॥ ( १.१८५७ )

शिक्षणाचा संस्कार म्हणून काहीं नाहीं ! अनेक आधुनिक 'सुशिक्षितांना' हि हें लागू पडणार नाहीं काय ? **जबलग उजाला तबलग दौड** (उजेड आहे तोंवर मजल काटून घे-) । (२.१४२) किती हितकर उपदेश आहे ! अशीं अनेक वचनें नाथांच्या स्फुट काव्यांत जागोजागीं आहेत.

नाथांचा **बिनतोड युक्तिवाद** हि नमुन्यादाखल थोडा देतों. 'हिंदु-तुर्क-भांडण' ह्या कवितेंत ते हिंदूच्या मुखाने तुर्कास म्हणनात:— **खुदा मारी ते 'मुरदा' देख । तुम्ही मारां तें पवित्र चोख ! । खुदापरीस तुम्ही जालेती पाक यवन हलक दोजखी** ॥ म्हणण्याचा अर्थ, तुम्ही स्यतः प्राणी मारून मांस खातां, तर मग देवानेंच मारलेल्या, आपोआप मेलेल्या प्राण्यांचे मुडदेच खाणें हें जास्त पवित्र नव्हे काय? त्याच कवितेंत ते पुढें म्हणतात, **हिंदु मुसलमान दोई । खुदानें पैदा किये भाई ! । तुर्कांची नष्टाई पाहीं । हिंदु धरूनी मुसलमान केला !** ॥ **हिंदु करितां** (करितांना) **खुदा चुकला । त्याहुनी थोर तुमच्या आकला ! । हिंदूस मसलमान केला । गुन्हा लाविला देवासी !** ॥ (२.९५)

साध्या यमकापलीकडे जास्त **प्रासानुप्रासाच्या** भानगडींत नाथ सहसा पडत नाहींत. पण कविच होते; एखाद वेळ लहर येईच! त्याप्रमाणें नाथांनीं प्रासानुप्रासात्मक कविता लिहिल्याचींहि तीन-चार उदाहरणें त्यांच्या स्फुट काव्यांत आहेत. पुढील दोन त्यांतल्या त्यांत जास्त छान आहेत. पैकीं पहिल्यांत भाव कोमल आहे, म्हणून तेथें मृदुव्यंजनांचा अनुप्रास साधला आहे, व दुसऱ्यांत नरसिंहाचें वर्णन आहे, म्हणून अनुप्रास कठोर व्यंजनाचा घातला आहे. हीं पद्यें अशीं :— **दीनदयाळ श्रीगोपाळ व्यापक घननीळा । तव पदकमळ सेवितां कमळा नेणे** (विसरून जाते) **निज लीला** ॥ (१.६२९). आतां नाथांचा ह्या बाबतींतील उच्चांक ज्या नारसिंहविषयक पद्यांत गांठला गेला आहे, तें पहा:— **स्तंभ फोडीत कटकट । दाढा व्यंकट** (विकाळ) **विकट । उत्कटवीर विकट नरकेसरी** ॥ **जिव्हा लळलळित लटलट । घुरघुरीत** (घुर्रघुर्र करणारा) **कंठ स्वासें नासापुट उतट** (उडतात), **पिंगट जटाजूट दाट** ॥ **बाण सणसणाट । वज्र दणदणाट । नखें तिखें** (तीक्ष्ण) **तिखट बोट, रागें फोडी पोट** ॥ **हात तट सुभट भट । नेत्र गरगराट । चंद्रसूर्य गर-**

**गराट रे !॥ शद्व कटकट। साधनीं कष्ट फुकट। एका जनार्दनीं, नामें वैकुंठपीठ रे॥** (१.१७५). हें नारसिंहवर्णन रसानुकूल आहे, व त्यांतील वर्णन भीतिप्रद आहे, ह्यांत संशय नाहीं. ही कविता वाचतांना तिच्या शब्दरचनेमुळे व तिच्या वृत्तामुळे भाटांच्या ओजस्वी **'कवितां'**चीच आठवण येते ह्यांतहि शंका नाहीं. ह्याशिवाय श्रीनाथांच्या आणखी एकदोन कविता अनुप्रासात्मक आहेत ( १.११४,११५, इ० ).

**विनोदहि** नाथाच्या काव्यांत कोठे कोठें फार मजेशीर चमकतो. पुढील उदाहरणें पाहण्याजोगीं आहेत. **जिता मायबापा न घालिती अन्न। मेल्या, प्रेतावरीं करिती पिंडदान !॥ पहा पहा, संसारीचा कैसा आचारु। जिता अबोला, मा** (मग) **मेल्या उच्चारू !॥ जिता मायबापा न करिती नमन। मेल्यामागें करिती मस्तकवपन?॥ जिता मायबापा धडगोड नाहीं? श्राद्धीं तळणमळण परवडी** (समृद्धि) **पाही !॥ जिता मायबापालागीं गालीप्रदान?। मेल्या, त्यांचेनि नांवें देती गोदान !॥ जिता मायबाप। नेदी प्याया पाणी। मेल्या, पितरांलागीं बसती तर्पणीं?॥ प्याया पाणी न घालिती सासरा जिता। पिंडापाशीं येती मग दंडवता?॥** ( १ १३४६ ) **तीर्था जाती उदंडें। त्यांचीं पाठीमागें तोंडें॥ मन, वासना, ठेवुनी घरीं तीर्था नेली भांडखोरीं॥ गंगेंत मारितां बुडी। मन लागलें बिन्हाडीं?॥ नमस्कार करितां देवासी। मन पायपोसा-पाशीं !॥ लवकर करी प्रदक्षिणा। उशीर झालासे भोजना !॥** (१.८०७) **नैवेद्य नारळ फोडिती। खोबरें एकमेकांसी वाटिती। नुसती नरोटी देवापुढें ठेविती?॥ लटिके धूप देउनी चाळविती॥** (२ ११३).

इतर संतांप्रमाणेंच कोठे कोठे नाथांनी देवाशीं फार सलगी केली आहे. **इतुलें** (इतके) **देईं अधोक्षजा!। नाहीं तरी घोट भरीन तुझा** (तुझ्या नरडीचा घोट घेईन)**!॥** (१ ३०७) **ऐके गा हृषिकेशी। जाणोनी तूं विश्वासी** (विश्वासू)। **निज गुह्य तुजपाशीं। ठेवणें दिधलें॥ आम्हां चाळवोनी विषयासी। थितें बुडवूं पाहासी। क्रियानष्ट होसी। तूंचि येक॥ आमुचें आम्हां देतां। तुज कां नये चिंता?। लाजसी तत्त्वतां?। भक्ति घेसी !॥ नेतां पंचांपाशीं। भलें नव्हे हृषिकेशी?। मजशीं समान होसीं !। एका जनार्दनीं॥** (१.३४२). **वेव्हाराच्या ठायीं। तुझें न चले कांहीं। मी तूं दोघे** ( हि ) **पाहीं। सरिसे** ( सारखे ) **तेथें॥ ठेविलें**

**बुडविसी । शेखीं** ( वर, शेवटीं ) **जावई न देसी ! । ऐकोन नायकसी** ( ऐकून न ऐकल्यासारखे करतोस )। **गर्हिसपणें** ( अडाण्याचे सोंग घेऊन ) ॥ **खवळलों तरी जाण । गिळीन मी-तूं-पण । तेथें देवपण । उडविन तुझें** !॥ **जो सांगे पांचांपाशीं** । त्याचें तोंड तूं धरिसी ! । **ठकडा केसा होसी ?** । **म्हणे एका जनार्दन** (१.३८३). किती गोड व पुनः अर्थपूर्ण हीं कवनें आहेत ! !

कोठें कोठें नाथ अगदीं **उलटी भाषा** वापरतात, उर्फ 'व्याजनिंदा' करतात. अर्थ अगदीं बरोबर असतो; पण जें म्हणावयाचें आहे त्याच्या अगदी उलट शब्दांत तें तो सांगतात. अशा वृत्तीत असताना ते ईश्वराचें वर्णन कसें करतात ते पहा:— **गांव ना तुज ठाव । सोलाट** ( सडेसोट ) **तूं पहा हो । लागला जगीं ॥ बहुतांचें ठेवणें । बुडविले येणें । शेखी जीव घेणें । मागत्यासी** ! ॥ **मायबापेंविण । वाढता हा जाण** ! । ( १.३४४ ) ह्याचा अर्थ उघडच आहे. ब्रह्म एकाच जागी नसून सर्वव्यापक आहे, एकमेवाद्वितीय आहे, अखेर जीव त्याच्यातच जाऊन मिसळतो, व हे ब्रह्म कोणापासूनहि उत्पन्न झालें नाहीं, तर स्वयभू आहे, असें त्यांस म्हणावयाचे आहे; पण त्यांनीं वापरलेली भाषा ही अशी, वर दिल्याप्रमाणे आहे. अशाच रीतीनें चांगल्या अर्थाला वाईट शब्द वापरून, व **लटकी याची आण** ( शपथ ) । **लटकेची प्रमाण । ऐसियासी कोण । विश्वासेल** ? ॥ असा प्रारंभ करून, त्यांनीं त्याच्याच पुढील तीनचार अभंगांत सबंध दशावतारांचें वर्णन केलें आहे ( १.३४५ ते ३४८, इ० ) तसेंच, ह्याच प्रकारे बोलतांना ते देवाला म्हणतात, **तुझे संगती नाश बहु । पुनः जन्मा न येऊं** ! ॥ (१.१६२२), म्हणजे तुझी भक्ति केल्यानें जन्ममरणाची फेरी चुकेल, हा खरा अर्थ ! अशाच उलटया भाषेंत संतांचें वर्णन करतांना **संत केवळ घातकी पाहीं** ! । असे ते म्हणतात, व सांगतात, ते इतके घातकी आहेत कीं, त्यांना यमसुद्धां भेटावयाला येत नाहीं ! **त्यासी अंतक कोर्वि भेटे** ! । ( १.६१९ ). अर्थात् ते जन्ममरणातीत असतात, ह्याच सांगण्याचा अर्थ. तसेंच, श्रीसद्गुरूनेंहि आपल्याला **परपुरुषाच्या** ( **परब्रह्माच्या** ) **शेजेवर कसें नेऊन पोंहचविलें**, ह्याचें असेच श्लेषात्मक शब्दांत वर्णन करून, ह्या '**दुष्कृत्या**'साठीं ते सद्गुरूला हि " **कुंटिण** "

म्हणतात ! (२.२३५) माझीं सर्व बंधनें आतां तुटलीं, असें सांगण्यासाठीं ते सांगतात. मी "सौरी" स्वैराचारिणी, झाल्यें ! आणि आपल्या "स्वैरिणी' पणाचें सविस्तर वर्णन करतात. ( १६५९-६६०, इ. ) स्वतःविषयीं ते आणखी सांगतात, **एका पिसाळला, एका पिसाळला ! । मायराणीचा अभिलाषला गेला ! ॥ नांव-रूप नाहीं ह्याचे पिसेपणीं ।......उफराटे जाले ह्याचे डोळे ! ।........**

**आपुलें, पारखें नोळखे कांहीं ।...बोलामाजीं घाली मौनाची मिठी ! । शून्याहिवरील सांगतो गोष्टी !॥......आपुल्या आपण नाशी शरीरा !॥** (१.१३७५ व १३७६). किती थोर अवस्थेचें हें किती विचित्र दिसणारें वर्णन आहे ! म्हणण्याचा अर्थ आहे, मी आतां ब्रह्मानंदांत मग्न झालों आहे. मी फक्त आपल्या उत्पत्तिस्थानाचा ( परब्रह्माचा ) अभिलाषी आहें. मी आतां नामरूपांच्या अतीत झालों आहें. मला आतां आप-पर-भाव उरला नाहीं. येथें वर्णनाला शब्दच नाहींत! शून्याच्या वरहि माझा अनुभव गेला व माझा शरीरभाव आता पूर्णपणें नष्ट झाला. हे अनुभव घेणारे श्रीनाथ धन्य आहेत! त्यांचे चरणीं कोट्यावधि प्रणाम असोत. असो. बाजारबसवी ह्या दुःशब्दानें त्यांनीं केलेलें गूढ वर्णन मायेचें आहे असें वाटतें. (१.८१६). **निरासिया** ( आशाहीन वृत्ति ) **वरूं आपरूपें** । ह्या चरणापासून सुरू होणाऱ्या अभंगापासून तों तहत **राम राम म्हणोनी सदा रडे** । ह्या अभंगापर्यंत ( १.१३६६ ते १३७६ ), ह्या अकरा अभंगांत नाथांनीं अशा प्रकारच्या उलट्या भाषेंतील लेखनाच्या कौशल्याची कमाल केली आहे. त्यांतील श्रीनाथांनीं स्वतःचें केलेलें वर्णन नुकतेंच वर दिलें आहे. ह्या व अशा अनेक, नाथांच्या अभंगांतील किती उतारे द्यावे आणि किती नाहींत, असें होऊन जातें. पण तरी तो मोह आवरून, त्या अकरा अभंगांत नाथांनी ब्रह्माचें, ईश्वराचें व सृष्टीउत्पत्तीचें जें अप्रतिम वर्णन केलें आहे, त्यांतील फक्त कांहीं विशेष चरण तेवढेच येथें देतों. अद्वैतवेदान्तदृष्टि ठेवून हे उतारे वाचले, म्हणजे त्यांचा सहज अर्थ लागण्याजोगा आहे. **नुपजतां लग्न लाविलें बापें ।......लग्न लागतां आला पोटा । मग सोडीलें अंतरपाटा ॥...... बोलूं नये तें आलें बोला । आमुचा बाप गरवार झाला ! ॥...एकाची दिठी, एकाचे डोळे ।......**

**बाप तोचि माय होऊनि आला पोटा। जातक वर्णितां गुंती पडली भटा ॥ बाप की माय, म्हणावा पुत्र ?। भुललिया श्रुति करितां वृत्तांत ॥ मी बापापोटीं, कीं बापु माझ्या पोटीं ?। वर्णितां ज्योतिषी विसरले त्रिपुटी ॥ एका जनार्दनी, जातक मौनीं जन्मनांव ठेविलें निःशद्ब देउनी ॥ ...लडिवाळ भक्त बोलोनिया हासे। बोल बोले तंव लावियेलें पिसें ॥ बोलावया ये तो बुडला अभिमाना। बोल बोले तंव दवडीला राना ॥ एका जनार्दनी मौनचि घोटी। एकपणें तेंही घातलें पोटीं ॥** (१.१३६६ ते १३७२). ह्यांतील, 'एकाची दिठी एकाचे डोळे', **जातक मौनीं। जन्म नांव ठेविलें निःशद्ब देऊनी,** व **एका जनार्दनी मौनचि घोटी। एकपणें तेंही घातलें पोटीं,** हे चरण इतके सुंदर आहेत की, कोणताहि गूढवादी किंवा गूढगुंजन करणारा कवि ह्या पेक्षां सरस काय लिहील, असें विचारावेंसेंच वाटतें !

## श्रीनाथांचीं पदें

**सत्वर पाव गो मला, भवानी आई, रोडगा वाहिन तुला** (१.८६४). **माझा कृष्ण देखिला काय'** (१.८६७), **नाथाच्या घरची उलटिच खुण** (१.९६७), **भजन चाललें उफराटें** (१.१३४७), **खरखर मुंडा आव्र रे फकीर** (१.१३९१), **मनमहोन मुरलीवाला** (२ ३८), **नंदनंदन मुरलीवाला** (२.३९), **गुरुकृपा अंजन पायो मेरे भाई** (२ ७२), **अशी ही थट्टा। भल्याभल्यासी लाविला बट्टा** (२ १७२), **अल्ला, तूंही तूंही रे** (२.१७४), **उठा, उठाजी मायबाप, कशी लागली झोप** (२.२२१), इत्यादि, हीं श्रीएकनाथमहाराजांचीं, वेगळाल्या दृष्टीनें, फार प्रख्यात पदें आहेत. पण अर्थात्, तीं सर्व येथें देणें शक्य नाहीं. हीं किंवा ह्यांतील कांहीं, बहुधा प्रत्येकाच्या ऐकण्यांत कोठे ना कोठे आलींच असतील. नसल्यास, तीं मुळांतूनच वाचलीं पाहिजेत. ह्यांपैकीं 'भजन चाललें उफरटें' ही कविता ह्या लेखांत मागें दिलेलीच आहे. असो. फार भव्य कल्पनेच्या, भव्य व सुंदर वर्णनाच्या, व सुंदर मांडणीच्याहि दृष्टीनें श्रीनाथांची 'दळण हें', 'फारच साधें नांव असलेली कविता फार चांगली आहे. ती मात्र तितकी लोकांच्या तोंडीं नसल्यामुळें तिच्यांतील कांहीं भाग देतों. **स्थूल, सूक्ष्म, (देह) दळियेले कारणासहित। ... दशा दोन्ही दळियेल्या द्वैत - अद्वैतासहित। ... पंचवीस स्वर्व दळियेले चवदा**

**भुवनांसहित । सप्तपाताळें दळियेलीं सप्तसागरांसहित ॥ ...... चंद्र सूर्य दळियेले तारांगणासहित ॥ नक्षत्र वैरण घालुनी नवग्रहांसहित । तेहतीस कोटि देव दळियेले ब्रह्माविष्णुसहित ॥ ज्ञान अज्ञान दळियेलें विज्ञानासहित । मी – तूं – पण दळियेलें जन्ममरणासहित ॥ ऐसें दळियेलें दोन्ही तळथांसहित । एका जनार्दनीं कांहीं नाहीं उरलें द्वैत॥ '** (२.१७१). ह्या कवितेंत ' दळिलें ' म्हणजे ' नाहीसें केलें; ' व ह्या सर्व दळणाची फलश्रुति शेवटीं आलीच आहे, **कांहीं नाहीं उरलें द्वैत** ! ही झाली भव्यता. आतां ह्याच्या उलट थोडेसें नाजूक वर्णन पहा. नाथ एका गोपीच्या श्रीकृष्णाशीं झालेल्या तद्रूपतेचें ' गौळण ' नांवाच्या एका कवितेंत वर्णन करीत आहेत. **दुडी-**( कळशी किंवा घागर )**-वर दुडी, गौळण सांते** ( बाजाराला ) **निघाली । गौळण ' गोरस ' म्हणों विसरली ! ॥ गोविंदु घ्या, कोणी दामोदरु घ्या गे ! । तंवतंव** ( तसतशा ) **हांसती मथुरेच्या** (**स्त्रिया) गे** ॥ (२.१९०). किती गोड ! पण अद्यापि ज्या कोणाला नाथांच्या काव्यसामर्थ्याविषयीं शंका राहिलीच असेल त्याला निरुत्तर करण्या-करितां श्रीनाथांच्या एक दोन कविता येथें उतरून घेण्याचा मोह आवरणें मला अशक्य झालें आहे. ह्यांत मी प्रथम देत आहें तें, फार रसिकपणें लिहिलेलें, नाथांचें प्रख्यात पद तशाच सुंदर रीतीनें म्हणणारा भेटला तर सभा कशीं रंगून जाते, हें मीं स्वतः पाहिलें आहे. त्या पद्यांत पहिल्या दोन चरणांतच किती शृंगार, किती मौज, किती नाट्य व अभिनय, व किती रमणीय चित्र, हीं सांठवलेलीं आहेत तें पहा. पुढेंहि तें पद निराळ्या दृष्टीनें, राधा – कृष्णांचें परस्परांविषयींचें आकर्षण वर्णन करण्याच्या दृष्टीनें, चांगलेंच आहे. पण असो. तें पद असें :—

**वारियानें कुंडल हाले । डोळे मोडित राधा चाले ॥ ध्रु. ॥**

**राधेला पाहून भुलले हरि । बैल दुहितो अपुले घरीं ॥ १ ॥**

**फणस, जंबीर, कर्दळी, दाटा । हातीं घेउनी नारंगी फाटा ॥ २ ॥**

**हरीला पाहुनी भुलली चित्ता । राधा घुसळी, खडबडी डेरा रिता ॥३॥**

**मन मिळालेसें मना । एका भुलला जनार्दना ॥ ४ ॥** (२.१९३).

ईश्वराचा विषय गंभीर आहे; तो कांहीं असा नुसता ललितवर्णनाचा विषय नव्हे. पण त्यावरहि श्रीएकनाथ अशीच कविता करतात. खालीं देत

असलेल्या अभंगांतील खोल अर्थसौंदर्य, पण तरी त्यांत असलेला प्रसाद, त्याच्या शब्दरचनेची मौज व सफाई, त्यांतील अकृत्रिम अनुप्रास, त्याची रेखीव व सुंदर तालबद्धता, व 'विटेवरीं' शब्दाची त्यांतील चतुरपणाची व परिणामकारक पुनरुक्ति, इत्यादि गोष्टींकडे वाचकांनीं लक्ष द्यावें. श्रीविठ्ठलावर अभग आहे.

**ध्यानाचें ध्यान, ज्ञानाचें ज्ञान। ते समचरण विटेवरीं ॥ १ ॥**
**भावाचा तो भाव, देवाचा तो देव। वैकुंठीचा राव विटेवरीं ॥ २ ॥**
**कामाचा तो काम, योगियां विश्राम। धामाचा तो धाम विटेवरीं ॥ ३ ॥**
**वैराग्याचें वैराग्य, मुक्तांचें माहेर। तो देव सर्वेश्वर विटेवरीं ॥ ४ ॥**
**भोळियाचा भोळा, ज्ञानियाचा डोळा। एका जनार्दनी, सोहळा विटेवरीं ॥ ५ ॥** (१.९५६).

हीं थोडीशींहि उदाहरणें पाहिलीं तरी श्रीनाथांच्या काव्यसामर्थ्याविषयीं शंका कोणालाहि उरणार नाहीं. तसेंच, "श्रोतीं केला प्रश्न" अशी सुरुवात करून दोन ठिकाणीं उत्तरें दिलेलीं आढळून येतात. ह्यावरून दोन गोष्टी दिसून येतात; एक ही की, त्यांच्या प्रवचनांत त्यांस प्रश्न विचारण्याची श्रोत्यांस मोकळीक असे; व दुसरी ही कीं, असें दिसतें कीं, नाथ हे तेथल्या, तेथेंच रचना करून त्या श्रोत्यास काव्यबद्ध उत्तर देत असावे, व तें कोणीं तरी तेथेंच टिपून घेत असावें, व तींच त्यांचीं उत्तरें आतां आपणांस ह्या कवितांच्या रूपानें उपलब्ध झालीं असावीं. इतकी सुसंबद्ध व चांगली रचना तेथल्या तेथेंच करणें हें खचित नाथांच्या काव्यशक्तीस अत्यंत गौरवास्पदच आहे.

## सादृश्यें

श्रीनाथांच्या व श्रीतुकाराममहाराजांच्या उद्गारांत तर मला, नाथांच्या स्फुट काव्यांत, टाकून दिल्यास सुमारें वीस बावीस तरी जागीं अतिशय सादृश्य दिसून आलें. ( १.८६, १४७, १६९, १८९, २४४, २४७, २९५, ४२५, ८८८, १२०५, १२६७, १३८३, १३८९, १४७७, १५५१, १७०९, १७६१, १८०७; व २.८७, ३० ) व आणखीहि कांहीं जागीं थोडें बहुत असेल. आणि हें स्वाभाविकहि वाटतें. तुकाराममहाराजांनीं

आपण पाठ केलीं कांहीं संतांची उत्तरें। विश्वासें आदरें करूनिया ॥
असें सांगूनच ठेविलें आहे. ह्या पाठांतरांत त्यांनीं कदाचित श्रीनाथांचीहि कांहीं " उत्तरें " पाठ केलीं असतील; व ते मनावर ठसलेले विचार सदृश शब्दांत कदाचित त्यांच्या तोंडून बाहेर पडले असतील, असा संभव आहे. नाथांच्या व श्रीसमर्थांच्या वचनांतहि, वरवर पाहणांना-सुद्धां, मला सहा-सात ठिकाणीं फार सादृश्य दिसून आलें ( १.१११, १५७, १८२, ८०८, १२८३, १७१८ इ० ) एके जागीं रामजोशांशींहि सादृश्य आढळून आलें ! ( १.१८२ ) टागोरांशीं आढळलेलें सादृश्य मागें दिलेंच आहे. अशीं आणखीहि थोरांचीं व त्यांचीं सादृश्यें सांपडतील. मी तर ह्या निबंधांत एका बाजूला श्रीनाथांचें वचन, व दुसऱ्या बाजूला त्या त्या दुसऱ्या थोर कर्त्यांचें वचन, अशीं हीं वचनें समोरासमोर दोन रकान्यांतच देणार होतों, व तें फार मौजेचेंहि झालें असतें; पण ह्या लेखाचा विस्तार आतांच माझ्या कल्पनेबाहेर गेला असल्यामुळें, अधिक विस्तार होऊं नये म्हणून, तसें केलें नाहीं.

तसेंच, ह्याखेरीजहि आणखी कांहीं दृष्टींनीं श्रीनाथांविषयीं ह्या लेखांत लिहिण्याचा प्रथम विचार होता; पण ते मुद्दे इतके महत्त्वाचे नसल्यामुळें, विस्तारभयास्तवच, तोहि सोडून दिला.

## इतर

वर येऊन गेलेल्या विषयांशिवाय श्रीनाथांचे पंढरीमाहात्म्यावर, निवृत्तिनाथ, ज्ञानेश्वर, सोपानदेव, मुक्ताबाई, ह्या भावंडांवर व नाथपूर्व-कालीन बहुतेक सर्व प्रसिद्ध महाराष्ट्रीय संतांवर, आळंदीवर, ज्ञानेश्वरीग्रंथावर, संतसंगमहात्म्यावर, तुळशीवर, एक-दोन-तीन ते दहापर्यंतच्या आंकड्यांवर, अन्नदानावर, हरिहरांतील अभेदावर, देहांतील चक्रावर, दैवावर, त्रिगुणांवर, समाधिवर्णनावर, 'अवघा' हाच शब्द प्रत्येक अभंगाच्या प्रारंभीं नेमानें व मध्येंहि वारंवार घालून त्यावर, मानसपूजेवर, उपमन्यु-मारुतीजन्म-गोसाई--रुक्मांगद इत्यादिकांच्या कथावर, एकादशी माहात्म्यावर, वगैरे अनेक अभंग इत्यादि आहेत. ह्यांपैकीं कांहीं कांहीं विषयांवर त्यांचे पुष्कळ पुष्कळ अभंगहि आहेत. एका अभंगांत त्यांनीं नामदेवाचें पूर्वजन्महि सांगितलेले

आहेत, ही गोष्ट अनेक दृष्टींनीं फारच फार महत्त्वाची आहे ( १: [illegible] ). ईश्वराविषयींचे नाथांचे अनेक 'विरहा' चे अभंग आहेत, ते गोड आहेत. नाथांनीं अनेक "गौळणी" म्हणजे गोपींची गाणीं लिहिलीं आहेत. "जोहार" ( म्हणजे महारांनीं केलेला रामराम ) तर नाथांनीं किती तरी वेगवेगळ्या तऱ्हेने पण सर्व पूर्ण वेदान्तपर असे लिहिले आहेत. "अर्जचिठी" "अर्जदास्त," "ताकीदपत्र," "अभयदान," "जमाखर्च," इत्यादि सर्व वेदान्तपरच असलेल्या पण त्या त्या नमुन्याबरहुकूम केलेल्या लेखनावरून श्रीनाथांस तत्कालीन दरबारी लेखनाचे सर्व नमुने कसे उत्तम माहीत होते, हें दिसून येतें. नाथांचे अनेक अभंग गूढ आहेत, व कांहीं कूट प्रश्ना-सारखेहि आहेत. एक अभंग मौजेखातर त्यांनीं अडाणी भाषेंतच लिहिला आहे. तेव्हां, "न्यारिचा वकुत होईल," "खवळला समिंदर," इ., [illegible] हल्लीं नवीन म्हणून मानलेल्या काव्यप्रकारालाहि कांहीं थोडीशी तरी जुनी परंपरा आहे म्हणावयाची ! एक 'अंबाईगीतहि' नाथांनीं लिहिलें आहे। नाथांनीं "कुत्रा व माणूस," बैल व माणूस," "ब्राह्मण व महार" इत्यादि अनेक संवादहि लिहिले आहेत. अशा रचनेंत ते एका [illegible] [illegible] किंवा कडव्यांत एकाएकाचें भाषण, अशा रीतीनें प्रश्नोत्तरात्मक लिहितात. कांहीं ठिकाणीं त्यांची रचना फारच फटकळपणाचीहि झालेली आहे व तत्कालीन रीतीप्रमाणें क्वचित् कोठें अश्लीलताहि तींत शिरली आहे. नाथांनीं अभंग व पदें हीं दोन्ही फार विविध प्रकारच्या चालींवर केलीं आहेत. ह्यावरून त्यांचे चालींच्या बाबतींतील विस्तृत ज्ञान दिसून येतें. भाषांच्या दृष्टीनें पहातां, मराठीप्रमाणेंच नाथांनीं हिंदींतहि कविता रचना केली आहे, व ती कमी अधिक साधलीहि आहे. कांहीं तर [illegible] करण्याच्या हेतूनें केलेली आहे की काय न कळे; व ती [illegible] [illegible] आहे हेंहि सांगतां येत नाही. कांहीं कांहीं जागीं तर खूप [illegible] [illegible] फारशी शब्दहि वापरलेले आढळून येतात. हें सर्व नाथांच्या [illegible] उचितच आहे. एक त्यांनीं संस्कृत कवितेचाहि प्रयत्न केलेला आढळतो ( १:१५१० ). पण तो केवळ [illegible] आहे, असेंच म्हटलें पाहिजे. [illegible] जागीं तर "भीतरथी," बाहेरथी," असेहि प्रयोग आलेले आहेत ! ( २ [illegible] ).

मग येथें हें गुजराथीहि डोकावून पाहात आहे कीं काय न कळे! अर्थात् त्यांची मराठी रचनाच ह्यांत सर्वांत जास्त आहे व सर्वांत उत्तम आहे, हें वेगळें सांगणें नकोच. नाथांच्या स्फुटकाव्यांत हुतुतु, विटीदांडु, लगोऱ्या सावली, चेंडूफळी, भोवरा, पिंगा, हमामा, हुंबली, सुरकवडी, एकीबेकी, व फुगडी, ह्या बारा खेळांचा निर्देश आला आहे. तेव्हां, हे खेळ इतके जुने आहेत. त्यांत पुनः विटीदांडूची मोजणी हल्लीप्रमाणें 'वखट,' 'लेड,' 'मुंड,' इ., हीच दिलेली आहे. नाथांस इतके खेळ माहीत होते हें विशेष आहे. भूत, शिद्दी, बाजार, नानक (त्या पंथाचा साधु), डोंबारी, पोर, गारुडी शकुन, देवऋषि, गोंधळ, फुलवरा, जोगवा, फकीर, पाळणा, जोशी, मुंढा, छापा, बाजेगारी (जादुगारी), दिवटा, डुगडुग्या, वैदु, सरोदा, पांगुळ, मुका, बहिरा, मानभाव, चोपदार, कांडण, रहाट, दरवेश, भांड, मांग, भटीण, महारींण, कंजारीण, कोल्हाटीण, मुलगी, लग्न, टिटवी, पिंगळा, बुलबुल, वटवाघूळ, पोपट, सर्प, विंचू, येडका, मोती, शिमगा, चौघडा, बागुल, जंगम, दादला, माळी, जातें, इत्यादि नाथांच्या कवितांचे असंख्य विषय पाहिले म्हणजे वाटतें की, डोळ्यांना कोणतीहि गोष्ट जगतांत दिसली, व त्यांनीं तिच्यावर कविता केली नाहीं, अशी गोष्टच उरली नसावी! आणि नवल हें कीं, ह्या सर्व कवितांत अध्यात्मपर अर्थ आहे! ह्याचा अर्थच हा कीं, श्रीनाथांची दृष्टि, व दृष्टिच नव्हे, तर वृत्तिच, रात्रंदिवस अध्यात्मांत इतकी पूर्ण रंगलेली होती कीं, जें कांहीं दृष्टीस पडे त्यांत त्यांस आध्यात्मिक अर्थच दिसे. त्यांच्या ह्या कविता ओढून ताणून केलेल्या व कृत्रिम मुळींच नाहींत, ह्यावरूनहि हा उपर्युक्त सिद्धांतच सिद्ध होतो. असे असलेले श्रीनाथ प्रातर्वंद्य पुरुष होत, असें कोण म्हणणार नाहीं? अशा श्रीनाथांची मी येथवर ह्या निबंधांत यथाशक्ति सेवा केली. ती त्यांच्याचं चरणीं अर्पण करून हें श्रीनाथ-स्फुटकाव्य-दर्शन पूर्ण करतों; व श्रीनाथांच्याच शब्दांत पुढीलप्रमाणें अखेरचें मागणें ईश्वरास मागतों:— **दान देतां धन न सरे। जो घे त्याचें दारिद्र्य चिरे। मग तें मागणें वोसरे। ऐसें धन दे का निर्धारें।॥ ...द्यावी भक्तीची कावोळी।** ( १.१५९ ). **मी वासुदेव नामें**

फोडितों नित्य टाहो। देखिले पाय, आतां मागतों दान द्या हो। सावळें रूप माझ्या मानसीं नित्य राहो। पावन संतवृंदें सादरें दृष्टि पाहो॥... मुक्त मी सर्वसंगीं, सर्वदा वृत्ति जागो। भाविक प्रेमळांच्या संगतीं चित्त लागो॥ द्वैतेंचि चालो अक्षयीं भक्ति योग। स्वप्नींहि मानसातें नातळो द्वैत॥ संग अद्वयानंदवेधें नावडो अन्य भोग। अक्रियत्वची वाहो सक्रियारूप बोध॥ पाहतां विश्व मातें निजरूप दाखवीं। सत्कथा श्रवण कर्णीं पीयूष चाखवीं ॥ (१.१६९). मागणें हेंचि माझें देवा!। दुजेपण दूरीं ठेवा॥ मी-तूं ऐसी नको उरी।...रंक मी एक दीन। माझें करावें स्मरण॥ नीच सेवा मज द्यावी।...आस पुरवावी॥ (१.९५०) सर्वा भूतीं तुझें रूप। हृदयीं सिद्धचि स्वरूप॥ ...सकळां-हुनी करीं सान। सकळिकां समसमान॥ ...निःशेष दवडोनीया स्वार्थ। अवघा करी परमार्थ॥ (१.२०७).

---

# श्रीएकनाथी भावार्थरामायण ● ● ●

श्री. जनार्दन सखाराम करंदीकर,
विश्वस्त केसरीमराठासंस्था, पुणे.

॥ आधींच रम्य रामायण । वरी हें रसाळ निरूपण ॥
॥ अमृत नव्हे ब्रह्म पूर्ण । सुखी पूर्ण आम्हां केलें ॥
(भावार्थरामायण किष्किंधा कांड १५-१२३)

महाराष्ट्रांत जे अनेक विख्यात साधुसंत होऊन गेले त्यांत श्रीएकनाथांचें स्थान अनेकपरींनीं अलौकिक आहे. संसाराच्या पाशांत न सांपडलेले अथवा संसार-पाश टाकून मुक्त झालेले असेच बहुतेक साधुसंत आढळतात. नाथांनीं मात्र अखेरपर्यंत संसारत्याग न करितां आपला गृहस्थाश्रम सुव्यवस्थित रीतीनें चालवून मुक्तिसंपदा आत्मवश करून घेतली. ते गाढे संस्कृतज्ञ पंडित असूनहि साधे भोळे वारकरी होते. अध्यात्मविद्येंतील अद्वैतबोध त्यांच्या अंगीं पूर्ण बिंबला असूनहि त्यांची सगुणभक्ति अढळ होती. त्यांनीं अत्यंत गूढ असें अध्यात्मनिरूपण व्यावहारिक दृष्टान्तांनीं सुगम केलें आणि व्यावहारिक भारुडांतून अध्यात्मपर सिद्धान्त उपदेशिले. भागवतांतील पौराणिक कथाभाग वगळून केवळ अध्यात्मपर अशा एका- दशस्कंधाधारे '**एकनाथी भागवत**' रचून मराठी वाचकांस वेदान्ताचें रहस्य उकलून दाखविलें आणि आपल्या आयुष्याच्या अखेरीस वाल्मीकि- रामायणाच्या ऐतिहासिक कथाभागांतील युद्धकांडाच्या वर्णनांत आपलें काव्यचातुर्य दर्शविलें. एवंच नाथ हे सगुणभक्त व निर्गुणोपासक, पंडित व कविश्रेष्ठ, जीवन्मुक्त व गृहस्थाश्रमी, वेदान्ती व वारकरी अशा सर्व भूमिका एकाच वेळीं अविरोधानें चालविणारे असे कुशल योगेश्वर होते.

श्रीएकनाथांच्या काव्यसागरांतल्या चतुर्दशरत्नांपैकीं 'भावार्थ- रामायण' नामक रत्नाचा आपणांस या ठिकाणीं परिचय करून द्यावयाचा आहे. नाथांच्या सर्व ग्रंथांत 'भावार्थ रामायण' हा ग्रंथ अखेरचा असून त्यांत नाथांच्या विद्वत्तेचें, कवित्वाचें आणि आत्मानुभवाचें सारसर्वस्व ओतलें असल्यामुळें तो ग्रंथ सर्व ग्रंथांत मुकुटमणि म्हणून शोभण्यासारखा आहे. नाथांच्या भावार्थरामायणानें मराठी भाषेवर जो ठसा उमटविला त्यायोगानें मराठी भाषेचें स्वरूप सुस्थिर झालें. सोन्याच्या पत्र्यावर राजमुद्रा

उमटविली म्हणजे तें नाणें जसें व्यवहारांत स्थिरमूल्यानें वापरलें जातें, त्याप्रमांणें नाथांच्या भावार्थरामायणानंतर मराठी भाषा ही व्यवहारसुलभ व सर्वमान्य झाली. नाथांनीं आपल्या शब्दभांडारानें आणि अलकारप्राचुर्यानें मराठी भाषा वैभवसंपन्न केली. आपल्या काव्यांतील रसाविर्भावानें त्या भाषेला नटविलें. भावार्थरामायणांत भक्तिरसाचें, म्हणजेच शांतरसाचें प्राचुर्य असलें तरी वीर आणि करुण हे रस यथाकालीं व यथाप्रमाण आविर्भूत झालेले दृष्टोत्पत्तीस येतात. भक्तिपर काव्यांत शृंगाररसाला गौण-स्थानच मिळावयाचे व त्या दृष्टीनेंच नाथांनीं त्याची संभावना केली आहे. क्वचित्स्थळीं अश्लील वर्णन व बीभत्स रस दृग्गोचर होतो; पण हा दोष त्या काळच्या भाषारूढीमुळेंच नाथांच्या ग्रंथांत शिरला असावा.

## भावार्थरामायणाची रचना

भावार्थ रामायण नाथांनीं लिहिलें खरें, पण त्याची समाप्ति त्यांच्या हातून होण्यापूर्वींच त्यांना मृत्यूनें गांठलें आणि मग त्या रामायणाचा राहि-लेला भाग त्यांचा एक शिष्य **गावबा** यानें पूर्ण केला असा लोकप्रवाद आहे. या लोकप्रवादाच्या समर्थनार्थ म्हणून युद्धकांड अ. ४५ च्या अखे-रच्या कांहीं ओव्यांकडे अंगुलिनिर्देश केला जातो. **या परी मी अनाथ। होतों भवदरिद्रें पीडित ॥ एका जनार्दनी येथ। केला सनाथ विजयार्ती** ( युद्धकांड अ. ४५ – १८७ ). परंतु ही ओवी संदिग्धच आहे. ती एकनाथांच्या तोंडीं सुसंगत दिसणार नाहीं असें नाहीं. एकनाथमहाराज नेहमींच नम्रभावानें आपल्या सद्गुरूच्या आपल्यावरील कृपेचें महिमान अशाच शब्दांनीं व्यक्त करीत असतात. तेव्हां ही ओवी एकनाथांची नव्हेच, असें म्हणतां येत नाही.

यानंतर ( अ. ४७ – १६२ ) **नेणे पदबंधव्युत्पत्ती। रीघ नाही संस्कृतीं ॥ लेखणी देवोनि हातीं। राम निज कीर्ती लिहवितो ॥** या ओवींत माझी योग्यता नसतां श्रीराम माझ्या हातीं लेखणी देऊन मज-कडून लिहवितो, असें म्हटलें आहे. हें गावबाला लागूं पडण्यापेक्षां एकना-थांनाच अधिक लागूं पडतें. कारण भावार्थरामायणांत अनेक ठिकाणीं '**माझी योग्यता नसतां श्रीराम माझ्याकडून हें वदवीत आहे**' असे उद्गार

एकनाथांनीं काढले आहेत. शिवाय वरील ओवीच्या पुढें पांच सहा ओव्यां नंतर **तुझेनि मुखें हे कथा । आवडली श्रीरघुनाथा ॥ वाचे वचन आणि वक्ता । स्वयें तत्वतां होवोनि ठेला ॥** अशी १६७ वी ओवी आहे. तींत ही कथा तुझ्या तोंडून ऐकून रामचंद्राला आवडली असे म्हटलें आहे. **गावबा** जर याच अध्यायापासून रामकथा पुढें चालविण्यास प्रारंभ करीत आहे असे मानलें, तर **तुझेनि मुखें ही कथा । आवडली श्रीरघुनाथा** असें कसें म्हणता येईल ? कथालेखनास प्रारंभ होतो न होतो तोच **तुझी कथा श्रीरामाला आवडली** असें प्रशस्तिपत्रक कसे देतां येईल? यावरून **अ. ४५** काय अथवा अ. ४६ काय, या दोन्ही अध्यायातील शेवटच्या शेवटच्या ओव्या एकनाथाव्यतिरिक्त अन्य कोणाच्या मानण्याचें कारण नाहीं.

वरील दोन स्थळांखेरीज अधिक निस्संदिग्ध म्हणून आणखी एक स्थळ निर्दिष्ट करण्यांत येतें. अ. ५१ ते ५४ या चार अध्यायांत अहिरावण-महिरावणवधाचें उपाख्यान संपविताना त्या चार प्रक्षिप्त अध्यायाचा कर्ता 'जयरामसुत' हा हें उपाख्यान मध्येंच घुसडण्याचें कारण सांगून आत्मसमर्थन करतांना लिहितो कीं — **एकनाथी रामायण । केलें सप्तकांडकथन ॥ त्यांत अहिरावणाख्यान । काय म्हणोनि विसरले ॥ ऐसें न वदावें उत्तर ते तंव विष्णूचा अवतार ॥ त्यासी स्वप्नीं नाहीं विसर । महाचतुर ग्रंथ-कर्ते ॥ मग साक्षेपें जयरामसुतें । करोनि घातले अध्यायातें । हृदयीं धरोनि एकनाथें । हे मजहातें करविलें ॥ ऐसें श्रोत्यांसी प्रार्थून । जय-रामात्मजें करोनि नमन ॥ म्हणे पुढील अनुसंधान । सावधपणें परिसावें**

या ओव्यांवरून नाथांच्या रामायणांत अहिरावणमहिरावणांची कथा नव्हती, ती उणीव जयरामसुतानें भरून काढली हें स्पष्ट आहे. पण त्यावरूनच हेंहि सिद्ध होतें कीं, नाथांनीं रामायणाचें युद्धकांड संपविलें, त्या वेळीं त्यांत 'अहिरावण—महिरावण' हें उपाख्यान नाथांनीं लिहिले नव्हतें, कारण वाल्मीकीच्या मूळ रामायणांत ती कथा नाहीं; परंतु कालां-तरानें दंतकथांची आवड जनतेंत वाढूं लागल्यावर ही अद्भुत कथा भावार्थ-रामायणांत अवश्य घालावी असें वाटून, हा चार अध्यायांचा प्रक्षिप्त भाग मूळ कथेंत घुसडून दिला, असें स्वतः जयरामसुतच लिहीत आहे, त्यावरून

या चार अध्यायांखेरीज बाकीचें, मागचें व पुढचें, युद्धकांड नाथांनी लिहून संपविलें होते, असाच त्यावरून निष्कर्ष निवतो. नाथांचें युद्धकांड जर ४४ व्या अध्यायालाच खंडित झालें असते, तर 'नाथांच्या रामायणांत अहिरावणाख्यान आलें नाहीं हें कसें' असा आक्षेप तरी वाचकांच्याकडून कसा येणार? सारांश ज्या अर्थी '**जयरामसुतानें**' ५१ ते ५४ हे चार अध्याय, केवळ नाथांच्या ग्रंथांतील उणीव भरून काढण्याकरितांच, मीं लिहिले असें म्हटलें आहे त्या अर्थी हा जयरामसुत '**गावबा**' हून वेगळाच एक लेखक असावा. स्वतः गावबानें आपल्या नांवाचा उल्लेख कोठेहि केला नाहीं, 'एकाजनार्दन' या नांवावरच त्यानें भावार्थरामायणाचा अपूर्ण राहिलेला भाग पूर्ण केला, हें जर निश्चित आहे तर तो गावबा या चार अध्यायांपुरतेंच आपले नांव कसें प्रकट करील? एतावता 'जयरामसुत' व 'गावबा' हे दोघे भिन्न भिन्न लेखक आहेत; त्यांतील जयरामसुतानें नाथांच्या युद्धकांडात समाविष्ट न झालेली अहिरावणाच्या वधाची उपकथा तेवढी लिहिली व तो भाग अध्याय ५१ ते ५४ असा मध्येंच घुसडून दिला आणि '**गावबा**' नामक नाथशिष्यानें नाथांचें भावार्थरामायण जेथें खंडित झालें होते तेथून पुढचा भाग लिहून तें पूर्ण केलें, असाच निष्कर्ष निवतो.

## उत्तरकांड हीच गावबाची कृति

वरील अनुमान निश्चित झाल्यावर गावबाने भावार्थरामायणाचा कोणता व केवढा भाग लिहिला असावा असा प्रश्न उपस्थित होतो. याचें उत्तर आमच्या मतें हेंच की, गावबाने 'उत्तरकांड' लिहून ग्रंथ पूर्ण केला. नाथांनीं युद्धकांडसमाप्तीच्या शेवटच्या ९२ व्या अध्यायांत श्रीरामचंद्र भद्रासनीं बसल्याचा सोहळा अति रसभरित काव्यमय भाषेंत वर्णिला आहे. त्या वर्णनाची समाप्ति अ. ९२ ओवी ४८ येथेच झालेली दिसते. ही शेवटची ओवी पुढीलप्रमाणें आहे:—

> ॥ **राम बोळला परमानंद । झाला त्यैलोक्यीं आनंद** ॥
> ॥ **एका जनार्दनीं स्वानंद । नित्यानंद रामायणीं** ॥ युद्ध. अ. ९२-४८

आपला अवतार समाप्तीचा काळ समीप आला हें ओळखून नाथांनीं येथें 'स्वानंद' भराच्या आनंदांतच आपल्या लेखणीला विराम दिला असावा.

अंतकाल समीप आला म्हणून तर त्यांची लेखणी कुंठित झाली असेलच; पण या बाह्य कारणाशिवाय उत्तरकांडांतील सीतावियोगाचा दुःखदप्रसंग वर्णन करण्याला त्यांचें मन धजेना, असेंहि एक अंतर्गत कारण असावें. कोणत्याहि ग्रंथाचा शेवट आनंदपर्यवसायी करावा, असा प्राचीनकाळीं आपल्यांत परिपाठ होता. यामुळेंच आपल्या वाङमयांत पाश्चात्य वाङमयांतल्याप्रमाणें, शोकपर्यवसायीं नाटकें लिहिलीं गेलीं नाहींत. शोकपर्यवसायीं नाटक पाहण्यांत देखील प्रेक्षकांना कदाचित् एक प्रकारचा आनंद वाटत असेल; परंतु काव्यानंदांत तल्लीन झालेल्या लेखकाला कथानकाचा शोकपर्यवसायीं कथाभाग लिहितांना हौस वाटत असेल, असें म्हणवत नाहीं. कथाभागांची समाप्ति कशी तरी केलीच पाहिजे, आणि प्राचीन कथा बदलतां येत नाहींत, म्हणून शेवटचा भाग पुराणांतून लिहिला जातो, पण लेखकाचें मन त्यांत रंगत नाहीं आणि बहुतेक वाचक तर तो भाग वाचावयाचा टाळतात असें आढळून येतें. याच कारणामुळें श्रीएकनाथांनीहि युद्धकांडाच्या अखेरीस श्रीरामचंद्राला भद्रासनीं बसवून त्या स्वानंदांतच आपली लेखणी खालीं ठेवली असावी.

## पांगारकरांनीं दिलेली आख्यायिका.

ह. भ. प. पांगारकर यांनीं आपल्या मराठी वाङमयाच्या इतिहासाच्या दुसऱ्या खंडांत पृ. ४०६ वर एक आख्यायिका दिली आहे. तिचा तात्पर्यार्थ असा कीं, "कृष्णदास लोळे नामक एक कवि रामकथा वर्णीत होता. त्याचें रामायण युद्धकांडाच्या समाप्ती जवळजवळ आलें. तरी पण तें संपूर्ण होण्याला ११ दिवसांचा तरी अवधि लागणार होता. तेवढ्यांत त्याच्यावर यमराजाचें वारंट सुटलें; तेव्हां कृष्णदासाची इच्छा जाणून नाथांनीं तें वारंट लांबवून कृष्णदासाच्या हातून युद्धकांड समाप्त करविलें. ही पूर्वीची कथा नाथांच्या श्रोत्यांना अवगत असल्याकारणानें त्यांनीं नाथांना स्वतःचें आयुष्य तसेंच लांबवून ग्रन्थ समाप्त करण्याची विनंती केली. परंतु नाथांनीं कालवंचना करण्याचें नाकारलें आणि ग्रन्थ परिपूर्ण न करतांच देह ठेवला." या आख्यायिकेवरून ग्रन्थसमाप्तीपूर्वीच नाथांचें देहावसान झालें, एवढें निश्चित आहे. परंतु मृत्युपूर्वी त्यांच्या ग्रन्थाचें लेखन

कोठपर्यंत येऊन ठेपलें होतें? युद्धकांडाच्या ४५ व्या अध्यायापर्यंत कां युद्धकांडाच्या ९२ व्या अध्यायापर्यंत? प्रचालत इ० इ० इ० अध्यायालाच नाथांची लेखणी खुंटली! पण मला ही कल्पना पटत नाहीं. युद्धकांडाच्या ४४ व्या अध्यायांत द्रोणागिरीवरील औषधी आणण्यासाठीं मारुती निघाल्याची कथा आहे; आणि मधल्या चार अध्यायांत अप्सरोद्धारण नंदिग्रामगमन, भरतदर्शन इत्यादि कथाभाग असून ४९ व्या अध्यायांत लक्ष्मणोत्थापन आहे. वर उद्धृत केलेल्या कृष्णदास लोळे यांच्या आख्यायिके- वरून नाथ आपल्या भक्तांचा मृत्युकाल लांबवूं शकत हें दिसून येतें. जें भक्तासाटीं केलें तें स्वतःकरितां त्यानीं करावें आणि ते ते करूं शकतील अशी त्यांच्या श्रोत्यांची कल्पना होती. आणि नाथांसारख्या सिद्ध पुरुषाची तशी इच्छा असती तर ते आपला देहपाताचा काळ थोडा तरी लांबवूं शकले असते. पण तसें करण्याचें त्यांनीं नाकारलें. हें त्यांचें नाकारणें केव्हां सयुक्तिक व स्वाभाविक दिसलें असतें बरें? लक्ष्मणवीर मरणोन्मुखा- वस्थेंत पडलेला आहे, द्रोणागिरी आणण्यासाठीं हनुमानाची रवानगी झाली आहे.; त्याच्या आगमनाची मार्गप्रतीक्षा अत्यंत आतुरतेनें रामचंद्र करीत आहेत, अशा कथानकाच्या प्रसंगीं इच्छामरणी, सिद्ध पुरुष, राहूं देत राम, लक्ष्मण, व मारुति तशाच अधांतर स्थितींत, मीं आपला माझी लेखणी येथेंच स्थगित करतो असें म्हणेल काय? पौराणिक व प्रासादिक ग्रंथ वाचतांना वाचनाला खंड कोठे पाडावा व कोठें पाडूं नये याविषयीं कांहीं शास्त्र- संकेत रूढ आहेत. गुरूचरित्रांतील एकच अध्याय दररोज वाचण्याचा नियम असला तरी सतीच्या पुत्रमरणाचा अथवा सतीच्या पतिमरणाचा अध्याय वाचल्यावर तेथेंच वाचन समाप्त न करितां पुत्राचें व पतीचें पुनरुज्जीवन झाल्याचा अध्याय वाचून नंतर पोथी खालीं ठेवण्यांत येते. वाचकांच्या बाबतींत जो संकेत आहे तोच संकेत लेखकालाहि पर्यायानें लागू आहे अशी भाविक लेखकाची तरी समजूत असणारच, अर्थात्च नाथांनी लक्ष्मणाला मूर्छितावस्थेंत तसाच ठेवून पुढील कथाभाग न वर्णि- तांच ग्रंथ थांबविला असेल असे मानण्याकडे मनाची प्रवृत्ति होत नाहीं. अगदीं मरणप्राय स्थितींतहि नाथांसारख्या सिद्धपुरुषांनीं लक्ष्मणाला उठ-

रामायणाला बरोबर जुळतात. परंतु त्यांतलें जें उत्तरकांड नवें सांपडलें आहे, तें छापील उत्तरकांडाहून अगदीं भिन्न आहे. या उत्तरकांडाचा कर्ता मुक्तेश्वर आहे. हा मुक्तेश्वर एकनाथांचा दौहित्रच असावा. ही हस्तलिखित प्रत कोल्हापूर प्रांतांत मिळाली आणि त्या प्रतींत हे उत्तरकांड पंचगंगातीरीं मुक्तेश्वरानें श्रीनृसिंहसरस्वतींच्या कृपाप्रसादाने लिहिलें असें म्हटलें आहे. एकनाथांचें दौहित्र मुक्तेश्वर हे दत्तभक्त होते आणि त्यांची समाधि तेरवाड येथें आहे. त्यावरून उत्तरकांडाच्या या हस्तलिखिताचे कर्ते सुप्रसिद्ध मुक्तेश्वर कवीच असावे. असें वाटतें असे श्री. कानोळे यानी भा. इ. सं. मंडळ पुणें यास एका लेखाद्वारें कळविलें आहे. आपल्या पितामहाचें अर्धवट राहिलेले रामायण पूर्ण करावें असें मुक्तेश्वरास वाटणे साहजिक आहे. तथापि मुक्तेश्वरकृत महाभारताप्रमाणे त्याचें हे उत्तरकांड प्रसिद्ध का झालें नाहीं, कळत नाही. तें कसेंहि असो; ज्याअर्थी मुक्तेश्वरानें भावार्थरामायणातील अपूर्ण राहिलेला भाग पूर्ण केला आहे त्या अर्थी नाथांनी उत्तरकांड रचलें नव्हते हें सिद्धच आहे. परंतु युद्धकांडाचे किती अध्याय नाथानी संपविले होते हा मुद्दा या हस्तलिखित प्रतीवरून उकलत नाही; कां तर, या हस्तलिखित प्रतीतले मधले युद्धकांड गळबटले आहे तें सांपडेपर्यंत आपल्याला अनुमानांवरच अवलंबून रहावे लागणार आणि तर्कशास्त्रानुसार अनुमान काढीत गेल्यास नाथानी बहुतेक सर्व युद्धकांड संपविले होते. उत्तरकांड मात्र त्यानीं लिहिलें नाहीं; त्याला कारण मृत्यूची झडप असली तरी नाथाना उत्तरकांड लिहिण्याची उत्कंठा वाटली नसावी असे मानण्यास ते असंभवनीय म्हणता येणार नाही.

## नाथांची ग्रंथनिर्मिति

नाथांच्या ग्रंथनिर्मितीला चतुःश्लोकी भागवतापासून सुरुवात झाली आणि तिची समाप्ति भावार्थरामायणाच्या युद्धकांडाने झाली. भावार्थरामायणाची ग्रंथसंख्या ४० हजार आहे. पण त्यांतलें अंदाजि ५४०० ओव्यांचे उत्तरकांड वगळल्यास ही ग्रंथसंख्या ३४६०० राहते. भावार्थरामायणाखेरीज इतर ग्रंथसंख्या सुमारे ३० हजार भरेल. एतावता नाथांची ग्रंथसंपत्ति ६५ हजारांच्या सीमेला येऊन थडकते. नाथांच्याहून अधिक ग्रंथ

कोठपर्यंत येऊन ठेपलें होतें? युद्धकांडाच्या ४५ व्या अध्यायापर्यंत कां युद्धकांडाच्या ९२ व्या अध्यायापर्यंत? प्रचलित ४० ३० ३० अध्यायांतच नाथांची लेखणी खुंटली! पण मला ही कल्पना पटत नाहीं. युद्धकांडाच्या ४४ व्या अध्यायात द्रोणागिरिवरील औषधी आणण्यासाठीं मारुती निघाल्याची कथा आहे; आणि मधल्या चार अध्यायात असुरोद्धारण नंदिग्रामगमन, भरतदर्शन इत्यादि कथाभाग असून ४९ व्या अध्यायात लक्ष्मणोत्थापन आहे. वर उद्धृत केलेल्या कृष्णदासांच्या आख्यायिके-वरून नाथ आपल्या भक्तांचा मृत्युकाल थांबवूं शकत हे दिसून येतें. जे भक्तासाठी केलें ते स्वतःकरितां त्यांनीं करावें आणि ते ते करूं शकतील अशी त्याच्या श्रोत्यांची कल्पना होती. आणि नाथांसारख्या सिद्ध पुरुषाची तशी इच्छा असती तर ते आपला देहपाताचा काळ थोडा तरी थांबवूं शकले असते. पण तसें करण्याचें त्यांनी नाकारलें. हे त्याचें नाकारणें केव्हां सयुक्तिक व स्वाभाविक दिसलें असतें बरें? लक्ष्मणवीर मरणोन्मुखा-वस्थेंत पडलेला आहे, द्रोणागिरी आणण्यासाठीं हनुमानाची रवानगी झाली आहे.; त्याच्या आगमनाची मार्गप्रतीक्षा अत्यन्त आतुरतेनें रामचंद्र करीत आहेत, अशा कथानकाच्या प्रसंगीं इच्छामरणी. सिद्ध पुरुष, राहूं देत राम, लक्ष्मण, व मारुति तशाच अर्धांतर स्थितींत, मीं आपला माझी लेखणी येथेंच स्थगित करतो असें म्हणेल काय? पौराणिक व प्रासादिक ग्रंथ वाचताना वाचनाला खंड कोठे पाडावा व कोठें पाडू नये याविषयीं कांहीं शास्त्र-संकेत रूढ आहेत. गुरूचरित्रांतील एकच अध्याय दररोज वाचण्याचा नियम असला तरी सतीच्या पुत्रमरणाचा अथवा सतीच्या पतिमरणाचा अध्याय वाचल्यावर तेथेंच वाचन समाप्त न करिता पुत्राचें व पतीचें पुनरुज्जीवन झाल्याचा अध्याय वाचून नतर पोथी खाली ठेवण्यात येते. वाचकांच्या बाबतींत जो संकेत आहे तोच संकेत लेखकालाहि पर्यायानें लागू आहे अशी भाविक लेखकाची तरी समजूत [illegible] नाथांनी लक्ष्मणाला मूर्छितावस्थेंत तसाच ठेवून पुढील [illegible] तांच ग्रंथ थांबविला असेल असें मानण्याकडे मनाची प्रवृत्ति होत[illegible] अगदीं मरणप्राय स्थितींतहि नाथांसारख्या सिद्धपुरुषांनीं लक्ष्मणाला उठ-

रामायणाला बरोबर जुळतात. परंतु त्यांतलें जे उत्तरकांड नवे सांपडलें आहे, तें छापील उत्तरकांडाहून अगदीं भिन्न आहे. या उत्तरकांडाचा कर्ता मुक्तेश्वर आहे. हा मुक्तेश्वर एकनाथांचा दौहित्रच असावा. ही हस्तलिखित प्रत कोल्हापूर प्रांतांत मिळाली आणि त्या प्रतींत हें उत्तरकांड पंचगंगातीरीं मुक्तेश्वरानें श्रीनृसिंहसरस्वतींच्या कृपाप्रसादाने लिहिलें असें म्हटलें आहे. एकनाथांचें दौहित्र मुक्तेश्वर हे दत्तभक्त होते आणि त्यांची समाधि तेरवाड येथें आहे. त्यावरून उत्तर-कांडाच्या या हस्तलिखिताचे कर्ते सुप्रसिद्ध मुक्तेश्वर कवीच असावे. असें वाटते असे श्री. कानोले यांनीं भा. इ. सं. मंडळ पुणें यास एका लेखाद्वारे कळ-विलें आहे. आपल्या पितामहाचें अर्धवट राहिलेले रामायण पूर्ण करावे असे मुक्तेश्वरास वाटणे साहजिक आहे. तथापि मुक्तेश्वरकृत महाभारताप्रमाणे त्याचें हें उत्तरकांड प्रसिद्ध कां झालें नाहीं, कळत नाही. तें कसेंहि असो; ज्या-अर्थी मुक्तेश्वरानें भावार्थरामायणातील अपूर्ण राहिलेला भाग पूर्ण केला आहे त्या अर्थी नाथांनीं उत्तरकांड रचलें नव्हते हें सिद्धच आहे. परंतु युद्धकांडांचे किती अध्याय नाथांनीं संपविले होते हा मुद्दा या हस्तलिखित प्रतीवरून उकलत नाहीं; कां तर, या हस्तलिखित प्रतीतले मधले युद्धकांड गळबटलें आहे तें सांपडेपर्यंत आपल्याला अनुमानांवरच अवलंबून रहावें लागणार आणि तर्कशास्त्रानुसार अनुमान काढीत गेल्यास नाथांनी बहुतेक सर्व युद्धकांड संपविलें होतें. उत्तरकांड मात्र त्यांनीं लिहिलें नाहीं; त्याला कारण मृत्यूची झडप असली तरी नाथांना उत्तरकांड लिहिण्याची उत्कंठा वाटली नसावी असें मानल्यास तें असंभव ीय म्हणतां येणार नाही.

## नाथांची ग्रंथनिमति

नाथांच्या ग्रंथनिर्मितीला चतुःश्लोकी भागवतापासून सुरुवात झाली आणि तिची समाप्ति भावार्थरामायणाच्या युद्धकांडानें झाली. भावार्थरामा-यणाची ग्रन्थसंख्या ४० हजार आहे. पण त्यांतलें अंदाजे ५४०० ओव्यांचें उत्तरकांड वगळल्यास ही ग्रंथसंख्या ३४६०० राहते. भावार्थ-रामायणाखेरीज इतर ग्रंथसंख्या सुमारें ३० हजार भरेल. एतावता नाथांची ग्रंथसंपत्ति ६५ हजारांच्या सीमेला येऊन थडकते. नाथांच्याहून अधिक ग्रंथ

निर्मिती करणारे कांहीं ग्रंथकार महाराष्ट्रांत होऊन गेले आहेत. तथापि नाथांच्या वाङमयाचें वैशिष्ट्य कौतुकास्पद आहे. नाथांनीं केवळ अध्यात्मपर अशा कवितांनीं ग्रन्थरचनेस प्रारंभ केला आणि पुढें पुढें त्यांच्या अध्यात्माला व्यावहारिक स्वरूप येत चालले. नाथांनीं अर्थाला अनर्थ न मानता अर्थप्राप्तीचें सार्थक कसें करावें तें शिकविलें. त्यांनीं गृहस्थाश्रमाचा त्याग करण्याचा आग्रह कोठेच न धरतां, अवघा प्रपंच परमार्थपर कसा करावा हे सोदाहरण प्रतिपादन केलें. धनामुळे अनर्थ घडतात हा धनाचा दोष नसून शास्त्रशुद्ध आचाराचा बोध मनावर न ठसल्याचा तो परिणाम आहे. अर्थात्च असा बोध मनावर ठसविणें, हे उपदेशकाचें कर्तव्य आहे; म्हणूनच नाथानीं धननिंदेचें चऱ्हाट वळीत न बसतां द्रव्याचा सद्व्यय कसा करावा याचा व्यावहारिक बोध केला. गृहस्थाश्रमातील आचाराचें त्यांनीं केलेले वर्णन अत्यंत बहारीचे आहे.

**ब्रह्मामाजी रंगली चित्तवृत्ती । यालागी विसरला गृहासक्ती ॥ त्यासी गृहाश्रमीं माझी प्राप्ति । सुखसंपत्ती निज बोधु ॥** या ओवींत गृहस्थाश्रमांत, म्हणजेच कर्मयोगात, राहून ब्रह्मप्राप्ति कशी होते याचे दिग्दर्शन आहे. अशा रीतीनें नाथांचें सर्वच वाङ्मय अत्यंत उद्बोधकारक आहे. पण आम्हांस येथें त्यांच्या भावार्थरामायणाचाच विचार करावयाचा आहे, यास्तव आतां त्या ग्रंथाकडे वळूं.

## रामायण लिहिण्याची स्फूर्ति

चतुःश्लोकी भागवतापासून आरंभ करून नाथभागवत म्हणून गाजलेल्या एकादशस्कंधाच्या प्राकृत विवरणापर्यंत अनेक वेदान्तपर ग्रंथ रचल्यावर नाथांना रुक्मिणीस्वयंवर आणि भावार्थरामायण हे लौकिक ग्रंथ रचण्याची स्फूर्ति झाली याचें नवल वाटतें. एकनाथीभागवत या ग्रंथाची समाप्ति वाराणसीक्षेत्रीं इ. स. १५७३ या वर्षी केली. तत्पूर्वी किती वर्षे ते काशिक्षेत्रीं जाऊन राहिले होते ते अवगत नाहीं. पण या भागवताचे अवघे ५ अध्याय पैठणास लिहिले गेले होते. त्यापुढचा सगळा ग्रंथ काशीस रचला गेला. यावरून त्यांचा काशीवास दीर्घकालीन असावा असें अनुमान निघतें. या काळांत इकडे दक्षिणेत एक मोठा वज्राघात

अशा मन:स्थितींत नाथांनीं ही रामकथा रामप्रेरणेनेच लिहिली. किष्किंधाकांडाला प्रारंभ करतानाच नाथांनी हें जे निरुपण केलें आहे, तें मोठे सूचक आहे. किष्किंधाकांडातील कथाभाग ज्या प्रदेशात घडला, तो प्रदेश म्हणजे विजयानगरचा आसमंतात प्रदेशच होय. त्या ठिकाणीं नुकताच वज्राघात होऊन हिंदूंचे राज्य जाऊन यावनी राज्य स्थापित झालें होते. सुग्रीवाला घालवून देऊन वाली त्याची स्त्रीहि बळकावून बसला होता. म्हणून सुग्रीव समर्थाच्या सहाय्याची मार्गप्रतिक्षा करीत होता. अशावेळी श्रीरामाचें तेथें आगमन होऊन सुग्रीवाला आपली भार्या व राज्य यांची परत प्राप्ती झाली, या कथेचा अनुवाद करतांना नाथांच्या मनश्चक्षुपुढें महाराष्ट्रांत पुनश्च रामराज्य व्हावे ही कल्पना खेळत असल्यानें त्याचे मन पूर्णपणें रामकथामय झाले असावें, समर्थ रामदासस्वामींना आनंदवनभुवनाचें स्वप्न सत्यसृष्टींत उतरलेलें, दिसले, तसें आपले स्वप्न सत्यसृष्टींत उतरलेले पाहण्याचे भाग्य नाथाना लाभले नाहीं; तथापि त्यांना तसें सुखस्वप्न पडूं लागले असावे, या करितांच त्यानी आपल्या मनाची रामचरित्राशीं परिपूर्ण तन्मयता झाल्याचे बहारीचे वर्णन या स्थळी केलें आहे. यातन्मय स्थितीच्या वर्णनाचाच अनुवाद पुढें युद्धकांडाच्या प्रारंभीहि नाथानी केला आहे. किष्किंधाकांड व युद्धकांड अशा दोन ठिकाणच्या वर्णनातच ही तन्मयता प्रकट झाली. यांतील रहस्य हेच कीं, किष्किंधाकांडात वालीचा वध करुन त्याच्या जागी आपला भक्त सुग्रीवाची स्थापना करण्यात आली. आणि, युद्धकांडांत दुष्ट रावणाचा नि:पात करून स्वभक्त जो बिभीषण त्याची स्थापना करण्यांत आली. अशाच प्रकारे महाराष्ट्रांतील यावनी सत्ता लयाला जाऊन तेथें रामराज्याची स्थापना व्हावी, ही भावना अंत:करणात भरून राहिल्यानेंच, या दोन कांडांतील कथाभागाचे वर्णन नाथांनी इतक्या तन्मयतेनें केलें आहे. त्यांना जळीं, स्थळीं, काष्ठीं, पाषाणीं श्रीराम दिसूं लागला होता; त्याची कथा वर्णिल्यावांचून त्यास राहवेना, आणि तन्मयतेनें त्यांनी युद्धकांडाच्या समाप्तीपर्यंत रामायण लिहून श्रीरामचंद्राची सिंहासनावर स्थापना केली आणि आपली लेखणी खाली ठेवली. उत्तरकांडाच्या लेखनांत त्यांची ती तन्मयता राहणें शक्य नव्हते, या करितां त्यांनीं तो

निर्मिती करणारे कांहीं ग्रंथकार महाराष्ट्रांत होऊन गेले आहेत. तथापि नाथांच्या वाङमयाचें वैशिष्ट्य कौतुकास्पद आहे. नाथांनीं केवळ अध्यात्मपर अशा कवितांनीं ग्रन्थरचनेस प्रारंभ केला आणि पुढें पुढें त्यांच्या अध्यात्माला व्यावहारिक स्वरूप येत चाललें. नाथांनीं अर्थाला अनर्थ न मानतां अर्थप्राप्तीचें सार्थक कर्म करावें तें शिकविलें. त्यांनीं गृहस्थाश्रमाचा त्याग करण्याचा आग्रह कोठेच न धरतां, अवघा प्रपंच परमार्थपर कसा करावा हें सोदाहरण प्रतिपादन केलें. धनामुळे अनर्थ घडतात हा धनाचा दोष नसून शास्त्रशुद्ध आचाराचा बोध मनावर न ठसल्याचा तो परिणाम आहे. अर्थातच असा बोध मनावर ठसविणें, हें उपदेशकांचें कर्तव्य आहे; म्हणूनच नाथांनीं धननिंदेचें चऱ्हाट वळीत न बसतां द्रव्याचा सद्व्यय कसा करावा याचा व्यावहारिक बोध केला. गृहस्थाश्रमांतील आचाराचें त्यांनीं केलेले वर्णन अत्यंत बहारीचे आहे.

**ब्रह्मामाजी रंगली चित्तवृत्ती। यालागी विसरला गृहासक्ती॥ त्यासी गृहाश्रमीं माझी प्राप्ति। सुखसंपत्ती निज बोधु॥** या ओवींत गृहस्थाश्रमांत, म्हणजेच कर्मयोगात, राहून ब्रह्मप्राप्ति कशी होते याचें दिग्दर्शन आहे. अशा रीतीनें नाथांचें सर्वच वाङ्मय अत्यंत उद्बोधकारक आहे. पण आम्हास येथे त्यांच्या भावार्थरामायणाचाच विचार करावयाचा आहे, यास्तव आतां त्या ग्रंथाकडे वळूं.

## रामायण लिहिण्याची स्फूर्ति

चतुःश्लोकी भागवतापासून आरंभ करून नाथभागवत म्हणून गाजलेल्या एकादशस्कंधाच्या प्राकृत विवरणापर्यंत अनेक वेदान्तपर ग्रंथ रचल्यावर नाथांना रुक्मिणीस्वयंवर आणि भावार्थरामायण हे लौकिक ग्रंथ रचण्याची स्फूर्ति झाली याचें नवल वाटते. एकनाथीभागवत या ग्रंथाची समाप्ति वाराणसीक्षेत्रीं इ. स. १५७३ या वर्षी केली. तत्पूर्वीं किती वर्षे ते काशिक्षेत्रीं जाऊन राहिले होते ते अवगत नाहीं. पण या भागवताचे अवघे ५ अध्याय पैठणास लिहिले गेले होते. त्यापुढचा सगळा ग्रंथ काशीस रचला गेला. यावरून त्यांचा काशीवास दीर्घकालीन असावा असें अनुमान निघतें. या काळांत इकडे दक्षिणेत एक मोठा वज्राघात

अशा मनःस्थितींत नाथांनीं ही रामकथा रामप्रेरणेनेच लिहिली. किष्किंधा-कांडाला प्रारंभ करतानाच नाथानी हें जे निरुपण केले आहे, तें मोठे सूचक आहे. किष्किंधाकांडातील कथाभाग ज्या प्रदेशात घडला, तो प्रदेश म्हणजे विजयानगरचा आसमंतात प्रदेशच होय. त्या ठिकाणीं नुकताच वज्राघात होऊन हिंदूंचे राज्य जाऊन यावनी राज्य स्थापित झाले होते. सुग्रीवाला घालवून देवून वाली त्याची स्त्रीहि बळकावून बसला होता. म्हणून सुग्रीव समर्थांच्या सहाय्याची मार्गप्रतिक्षा करीत होता. अशावेळीं श्रीरामाचें तेथें आगमन होऊन सुग्रीवाला आपली भार्या व राज्य याची परत प्राप्ती झाली, या कथेचा अनुवाद करताना नाथांच्या मनश्चक्षूपुढें महाराष्ट्रांत पुनश्च रामराज्य व्हावें ही कल्पना खेळत असल्यानें त्याचे मन पूर्णपणे रामकथामय झालें असावें, समर्थ रामदासस्वामींना आनंदवनभुवनाचें स्वप्न सत्यसृष्टींत उतरलेलें, दिसलें, तसें आपले स्वप्न सत्यसृष्टींत उतरलेलें पाहण्याचे भाग्य नाथांना लाभलें नाहीं; तथापि त्यांना तसें सुखस्वप्न पडूं लागले असावें, या करितांच त्यांनीं आपल्या मनाची रामचरित्राशीं परिपूर्ण तन्मयता झाल्याचे बहारीचें वर्णन या स्थळीं केलें आहे. यातन्मय स्थितीच्या वर्णनाचाच अनुवाद पुढें युद्धकांडाच्या प्रारंभीहि नाथांनी केला आहे. किष्किंधाकांड व युद्धकांड अशा दोन ठिकाणच्या वर्णनातच ही तन्मयता प्रकट झाली. यांतील रहस्य हेंच कीं, किष्किंधाकांडात वालीचा वध करुन त्याच्या जागी आपला भक्त सुग्रीवाची स्थापना करण्यांत आली. आणि, युद्धकांडांत दुष्ट रावणाचा निःपात करून स्वभक्त जो बिभीषण त्याची स्थापना करण्यात आली. अशाच प्रकारे महाराष्ट्रातील यावनी सत्ता लयाला जाऊन तेथें रामराज्याची स्थापना व्हावी, ही भावना अंतःकरणात भरून राहिल्यानेंच, या दोन कांडांतील कथाभागाचे वर्णन नाथांनी इतक्या तन्मयतेनें केलें आहे. त्यांना जळीं, स्थळीं, काष्ठीं, पाषाणीं श्रीराम दिसूं लागला होता; त्याची कथा वर्णिल्यावांचून त्यास राहवेना, आणि तन्मयतेनें त्यांनी युद्धकांडाच्या समाप्तीपर्यंत रामायण लिहून श्रीरामचंद्राची सिंहासनावर स्थापना केली आणि आपली लेखणी खालीं ठेवली. उत्तरकांडाच्या लेखनांत त्यांची ती तन्मयता राहणें शक्य नव्हते, या करिता त्यांनीं तो

कथाभाग स्वतः न वर्णिला असल्यास आपल्या शिष्यावर ती कामगिरी सोंपवून दिली असावी हें अगदीं स्वाभाविक आहे.

## वाल्मीकीच्या वर्णनाशीं साम्य व विरोध

नाथांनीं रामचरित्रवर्णनासाठीं वाल्मीकि रामायणाचाच आधार मुख्यत्वें करून घेतला असला तरी इतर अनेक रामायणांतील भिन्न वर्णनामुळें नाथांनींहि कित्येक भाग वाल्मीकीला सोडून वेगळ्या प्रकारें वर्णिले आहेत. पायसदान व पुत्रोत्पत्ति या संबंधांत तर मोठाच भेद आहे. वाल्मीकीनें लक्ष्मण व शत्रुघ्न हे सुमित्रेचे पुत्र म्हणून सांगितले आहेत. नाथांनीं भरत, शत्रुघ्न हे कैकेयीचे पुत्र व सख्खे बंधु म्हणून वर्णिले आहेत. राजपुत्रांच्या अध्ययनसमाप्तीनंतर नाथांनी त्यांना तीर्थयात्रेला पाठविलें आहे! वाल्मीकि रामायणांत तीर्थयात्रेचा उल्लेख नाहीं. सीतास्वयंवराच्या वेळीं तेथें रावण आला व त्याची फजीती झाली असें वर्णन मराठी रामायणांतून सर्वत्र रूढ आहे. नाथांनींहि त्या प्रसंगाचें हृदयंगम वर्णन केलें आहे. वाल्मीकि रामायणांत या कथेला आधार नाहीं. त्याच प्रमाणें द्रोणागिरी आणतांना मध्यंतरींच्या विघ्नांचा उल्लेख वाल्मीकि रामायणांत नाहीं. युद्धकांडांत नाथांच्या भावार्थ-रामायणांत अहिरावण-महिरावणांचें उपाख्यान आलें आहे. परन्तु तें 'जयरामसुत' नामक कोणीतरी कवीनें मागाहून घुसडलें असल्याचा ऊहापोह पूर्वीं केलेलाच आहे. तेव्हां त्याबद्दल नाथांच्यावर जबाबदारी पडत नाहीं. उत्तरकांडांत तर पुष्कळच कथांत, दोहोंत अंतर आहे. त्यांतल्या त्यांत कैकेयीचें लंकागमन व लंकावलोकन आणि मूळकासुराची कथा व त्याचा वध हा सगळाच भाग अगदींच नवा आहे. मूळ वाल्मीकि रामायणांत याला कांहीं आधार मिळत नाहीं. श्रावणवधाच्या कथेच्या तपशिलांत दोन्ही ग्रन्थांत थोडेसें अंतर आहे. पण तें विचारांत घेण्याइतकें महत्त्वाचें नाहीं. अशा रीतीनें वाल्मीकि रामायण व भावार्थरामायण यांतील साम्य व विरोध यांचा तपशील आढळून येतो. तथापि इतर अनेक रामायणांप्रमाणें नाथांनीं वाल्मीकि रामायण सर्वथैव झुगारून देऊन आपलें स्वतःचें रामायण रचलें असें म्हणतां येत नाहीं. शक्यतोंवर त्यांनीं वाल्मीकीचें अनुसंधान राखलें आहे

वाल्मीकि रामायण जसें सप्तकांडात्मक आहे, तसेंच भावार्थरामायण हि सप्तकांडात्मकच आहे; मात्र प्रत्येक कांडाच्या पोटविभागाला वाल्मीकीनें सर्ग म्हटलें आहे, तर नाथांनीं अध्याय म्हटलें आहे. असा हा फरक केवळ शाब्दिकच आहे, असें नसून नाथांचा अध्याय वाल्मीकींच्या सर्गापेक्षां बराच मोठा असल्यानें वाल्मीकिरामायणांतील ६४५ सर्गांच्या जागीं नाथांनीं अवघ्या २९७ अध्यायांत अवघा कथाभाग आटोपला आहे. त्या–वरून सामान्यतः तीन सर्गांतील मजकूर नाथांच्या एकएका अध्यायांत आला आहे असें म्हणण्याला प्रत्यवाय नाहीं. वाल्मीकि रामायणांतील ग्रंथ-संख्या २४ हजार आहे. तर नाथांच्या भावार्थरामायणांतील ओवीसंख्या ४० हजार आहे. अर्थातच नाथांनीं कोठेंहि मूळकथेचा संक्षेप केला नसून शक्यतोंवर मूळची कथा विस्तारपूर्वक तर वर्णिली आहेच, शिवाय मूळांत नसलेलीं कित्येक प्रकरणें आपल्या ग्रन्थांत घेऊन ग्रन्थाची विविधता वाढविली आहे. हें विधान साकल्यानें ग्रन्थाचा विचार केला तर त्याला लागू आहे. परंतु कांडशः विचार केल्यास नाथांनीं अयोध्याकांडाचा बराच संकोच केलेला दिसतो. वाल्मीकि रामायणांत अयोध्याकांडाचे ११९ सर्ग आहेत तर नाथांनीं त्यांचा भावार्थ अवघ्या १८ अध्यायांत आटोपला आहे. सुंदरकांड व युद्धकांड या दोन कांडांत मात्र नाथांनीं आपल्या कवित्वशक्तीला अनिर्बंध संचार करूं दिला आहे. मुळांत सुंदरकांडाचे सर्ग ६८ आहेत, तर भावार्थरामायणांत प्रदीर्घ असे ४२ अध्याय आहेत. युद्धकांडांतहि १२८ सर्गांच्या समाचारार्थ नाथांनीं ९३ अध्याय खर्ची घातले आहेत. नाथांचा एकेक अध्याय वाल्मीकीच्या तीन सर्गांबरोबरीचा असतो हें सरासरीचें प्रमाण लक्षांत घेतल्यास सुंदर व युद्ध या दोन कांडांतलें भावार्थरामायणांतलें वर्णन किती विस्तार पावलेलें आहे हें लक्षांत येईल.

## नाथांची भाषासरणी

मराठी वाङ्मयांत ज्ञानेश्वरीला आद्यस्थान आहे. मुकुंदराजाचा विवेकसिंधु हा ग्रंथ ज्ञानेश्वरीच्याहि आधींचा असल्याविषयीं प्रसिद्धी आहे. अलीकडील कांहीं शोधावरून विवेकसिंधु हा ज्ञानेश्वरीनंतर बऱ्याच काळानें लिहिला गेला असें आढळून आलें आहे. यामुळें ज्ञानेश्वरीचें अग्र-

स्थान अढळ आहे. ज्ञानेश्वरी हा मराठी भाषेंतला आद्य ग्रंथ म्हटल्यानंतर त्यांतील भाषा इतकी दुर्बोध कां, अशी पृच्छा करण्याचें कारणच पडत नाहीं. तथापि ज्ञानेश्वरांच्या कालानंतर मराठी वाङमयांत झपाट्यानें भर पडूं लागली. महानुभाव पंथांतहि मराठींतून ग्रंथनिर्मिति होत होती, पण त्यांची लिपी सांकेतिक असल्यानें महानुभावी वाङ्मयाचा प्रसार जनतेंत फारसा होऊं शकला नाहीं, नाथपंथांत मात्र अनेक ग्रंथकार होऊन गेले व त्यांच्या काव्यनिर्मितीनें मराठी भाषेला आधुनिक वळण लागूं लागलें. नाथपंथांतील कवींची दृष्टि साधारणतः योगसिद्धी आणि वेदान्त यांच्या वर्णनाकडेच वळलेली असे. पौराणिक कथेचा मराठींत अनुवाद करणारा पहिला कवि **चोंभा** हा होय. त्याचें '**उषाहरण**' काव्य सुप्रसिद्ध आहे व त्याची प्रसिद्धी अद्यापपावेतों टिकून आहे. उषाहरणांतील भाषेपेक्षां '**बहिरापिसा**' कवीची भाषा आधुनिक भाषेला जवळची अशी वाटूं लागते. त्यानंतरचा मराठींतला सुप्रसिद्ध ग्रंथ '**श्रीगुरुचरित्र**' हा होय. यांतील भाषेत थोडीशी कानडीची लकब आहे. तरी पण यांतील मराठी भाषा आधुनिक वळणावर आली असें म्हणण्यास हरकत नाहीं. त्या नंतरचा जो दासोपंतांचा '**गीतार्णवग्रंथ**' त्या ग्रंथानें मराठी भाषेंत मोठीच भर घातली आणि त्या भाषेला चांगलें बाळसें आणलें. अशा रीतीनें ज्ञानेश्वरापासून तीनशें वर्षे मराठी भाषेची वाढ होत होती. अखेरीस नाथांच्या ग्रंथसंपत्तीनें तिला पुरतें गोंडस स्वरूप प्राप्त झालें. आधुनिक मराठीचें अखिल भाषासौंदर्य नाथांच्या ग्रंथांत दृष्टीस पडतें. जुने अप्रसिद्ध मराठी शब्द क्वचित् स्थळीं आढळतात. तरी पण वाक्यरचनेचे सगळे आधुनिक प्रकारच नाथवाङमयांत आढळतात. विभक्तीच्या रूपांत मात्र एक मोठा भेद आढळतो, तो असा कीं, शक्यतोंवर विभक्तीचा प्रत्यय न लावतां केवळ सामान्यरूप करूनच विभक्तीचा कार्यभाग भागविला जातो. तृतीया विभक्तीचा नें हा प्रत्यय तर कोणत्याहि नामाला लावलेला दिसून येत नाहीं.

**देखोनी देवांची करुणा । विष्णु कळवळिला मना ॥ करिता झाला सूचना । दैत्यहननालागोनी ॥** यांत 'मना' कळवळिला म्हणजे 'मनांत' कळवळला. **आतां न वचे लंकापुरा ॥** म्हणजे लंकापुराला. जसा तृतीयेचा

'ने' प्रत्यय कोठें आढळत नाहीं, त्याचप्रमाणे द्वितीयेचा 'ला' प्रत्यय कोठेंहि सांपडत नाहीं.

असो. नमुन्यासाठीं कांहीं वैशिष्ट्यें दर्शविलीं. व्याकरणदृष्ट्या ग्रंथाचें परीक्षण करणें हा या लेखाचा हेतु नसल्यानें हें विवेचन सोडून ग्रंथांतील भावार्थाकडे आतां वळूं.

## अध्यात्मावर मुख्य भर

रामायणांतील कथाभाग जरी मुख्यतः ऐतिहासिक आहे तरी त्या कथाभागालाहि नाथांनीं ठिकठिकाणीं अध्यात्माचें स्वरूप देण्याचा प्रयत्न केला आहे. मुख्य कथेचा ओघ बदलून त्यांनीं हा प्रयत्न केला असें नव्हे; तर कथाभाग जशाचा तसा वर्णन करून त्यावर अध्यात्म्याचें रूपक करून दाखविण्याकडे त्यांची प्रवृत्ति दिसते. सीता व रामचंद्र यांचा विवाह म्हणजे 'प्रकृति व पुरुष' यांचें मीलन होय असें वर्णन अध्यात्मपर तर आहेच, पण तें केवळ दृष्टान्तपरहि मानतां येईल. 'अजा' पासून 'दशरथ' झाला. यांत "अज' म्हणजे परब्रह्म व त्यापासून 'दशरथ' म्हणजे 'दशेंद्रियें' असा संबंध जोडून दाखविण्यांत आला आहे. यांत शब्दश्लेष चांगला साधला आहे असें म्हणतां येईल. परंतु हा दृष्टान्त नीटसा जुळत नाहीं. दशरथाच्या राण्यांपैकीं कौसल्या ही 'सद्विद्या,' सुमित्रा ती 'शुद्धबुद्धि' आणि कैकेयी ती 'अविद्या' असें सांगून मंथरेला 'कुविद्या' म्हटलें आहे. राम हा आनंदरूप व तो स्वतः चतुर्भाग झाला; त्यांत लक्ष्मण हा 'आत्म-बोध', भरत हा 'भावार्थ' आणि शत्रुघ्न हा 'निजनिर्धार' असें म्हटलें आहे. परंतु ऐतिहासिक कथाभागांत असलीं रूपकें नीटशीं बसूं शकत नाहींत. 'निजनिर्धार' मागें अयोध्येंत ठेवून कां राम वनाला गेला? राम हा 'परमात्मा' व सीता ही 'चिच्छक्ति' हें वर्णन मूळस्वरूपांत ठीक जुळतें. परंतु परमात्म्यानें मनुष्यरूपानें अवतार धारण केला असें एकदां म्हटल्यावर मूळचें रूपक पुढें तसेंच शब्दशः चालवूं म्हटल्यानें कथा-प्रसंगाला विसंगति येते. परमात्म्यापासून चिच्छक्तीचें हरण सहा महिने तर राहोच पण एक क्षणभरहि कोणी करूं शकत नाहीं. अर्थातच हीं वर्णनें केवळ उपमा अथवा दृष्टान्त या दृष्टीनें पाहण्यांत यावीं.

रामायणांतील व्यक्तिमात्रावर अध्यात्माचीं रूपकें नीटशीं बसत नाहींत, हें आपण पाहिलेंच. परंतु कथाभागांतून अध्यात्मपर बोध घेण्यांत विसंगति नाहीं व रसहानिहि नाहीं; उलटपक्षीं त्यायोगानें रसोत्कर्ष साधतो आणि आत्मबोधहि मनावर चांगला ठसावतो. दशरथ कैकेयीच्या नादीं लागला आणि रामाला वनाला धाडून आपल्या प्राणास मुकला, यांतून वेदान्तपर बोध घेण्यासाठीं ‘दशेंद्रियें जेव्हां कुविद्येच्या नादानें विषयांत निमग्न होतात त्या वेळीं आत्मसाक्षात्काराचें सुख दुरावतें आणि आत्मा दुरावला कीं बापडीं इंद्रियें विकल व निचेष्ट होतात’ असा बोध अध्यात्माच्या भाषेंत सांगितल्यानें मनाला चांगला पटतो. अध्यात्मरामायणातला वेदान्तपर भाग असाच प्रसंगाप्रसंगानें आला आहे. परंतु नाथांनीं केवळ उपदेशप्रसंगापुरताच वेदान्ताचा आश्रय न करितां चरित्रांत पुष्कळ भाग अध्यात्मपर रीतीनें वर्णिला आहे. उदाहरणार्थ पुढील प्रसंग पहा—

## दशरथाच्या स्त्रीलंपटतेवरील भाष्य

क्षणार्धे स्त्रियांची संगती । वनवासी होय वशावर्ती ॥
जे नित्य स्त्रियांते सेविती । त्यांची निर्गति कैसेन होय ॥
स्त्रियां वश्य केले वनवासी । स्त्रियां केले किंकर ग्रामवासी ॥
अपभ्रंशता स्त्रियांपाशीं । घात मुक्तीसी स्त्रीसंगें ॥
स्त्रियांचें दर्शन स्पर्शन । स्त्रियांचें जें भाषण ॥
स्त्रियांची जी आठवण । अपभ्रंश संपूर्ण स्त्रीसंगें ॥
नको स्त्रियांसी संगत । नको स्त्रियांसी एकांतमात ॥
नको स्त्रियांशीं हेत । होय अपघात पुरुषांसीं ॥

बालकाड अ, २ ओव्या ४० ते ४३

## सुमित्रेवर सत्संगतीचा परिणाम

भाग देतां कैकेयीसी । कौसल्या अति उल्हासी ॥
सवतीभाव नाहीं मानसीं । देत उल्हासीं निजभाग ॥
जैसी कौसल्येची बुद्धि । तैसीच सुमित्रेची सद्बुद्धि ॥
बाप सत्संगाची सिद्धी । दे अर्धार्ध निजभागा ॥
सत्संगाचें निजमहिमान । कौसल्या देत आपणा समान ॥

**कासल्येसंगे समित्रा जाण । दे आपण भागार्ध ॥**
**सुष्ठु मैत्री कौशल्येसी । म्हणोनि सुमित्रा म्हणणें तियेसी ॥**
**तेणें सुमित्रा भावेसी । दे कैकेयीसी भागार्ध ॥**
**जैसा संग होय ज्यासीं । तैसी बुद्धि होय त्यासीं ॥**
**कौसल्यासंगें सुमित्रा तैसी । दे कैकेयीसी भागार्ध ॥**

बालकाड अ ३ ओव्या २६ ते ३१

ज्ञानप्राप्तीचें साधन व सहज ब्रह्मप्राप्ति—

**ऐके बापा रघुवीरा । सांगेन ज्ञानाच्या सर्व सारा ॥**
**जो श्रवणार्थी चातक खरा ॥ तो वाक्यसुखसारा झेलोनि घे ॥**
**ज्ञानकथा अवघेची ऐकती । परी ऐकिलें तें नाचरती ॥**
**यालागीं श्रवणाची होय माती । परमार्थप्राप्ती त्या कैची ॥**
**ऐके श्रीरामा सावधान । येथें भोगेच्छा मुख्य बंधन ॥**
**ते त्यागी तो ज्ञाता पूर्ण । तेथें मुक्तपण सहजचि ॥**
**इच्छात्याग अति कठिण । जो त्यागी तोचि विचक्षण ॥**
**त्याही त्यागाचें लक्षण । निर्वाण खूण अवधारी ॥**
**मनें मनातें आवरावें । मनें मनातें निग्रहावें ॥**
**मनें मनातें धरावे । मनें मारावें मनातें ॥**
**मनें मनाचा निग्रहो ऐसा । तेणें समूळ निमे आशा ॥**
**चैतन्याचा ओते देह ठसा प्रपच आपैसा परब्रह्म होय ॥**
**ऐसिया सूक्ष्म अति युक्तीं । परब्रह्माची सद्यः प्राप्ती ॥**
**स्वयें परब्रह्मची आहाती । प्राप्ती अप्राप्ती भावाभावें ॥**
**स्वयंभू हृदयीं ब्रह्मस्थिती । ब्रह्मप्रभा इंद्रियवृत्ती ॥**
**ते अभावें ब्रह्म नव्हे म्हणती । सद्भावें होती परब्रह्म ॥**

बालकाड अ० ११ ओव्या १३१ ते १४०

जनकाचा प्रधान अयोध्येला दशरथाला बोलावण्यासाठीं गेला या साध्या गोष्टीवरील रूपक पहा—

**बैसला मनोरथरथीं । चारी वारू चहूं पुरुषार्थी ॥**
**मनासी ज्याचेनि निजगती । तोचि सारथी धुरेसी ॥**
**ऐसिया सन्नद्ध निज स्थिती । पाठविली शी गती ॥**
**तो पावला तिसरे वस्ती । वस्तीची स्थिती अवधारा ॥**
**प्रथमवस्ती श्रवणमननपुरीं । दुजी निदिध्यास नगरीं ॥**

तिसरी वस्ती साक्षात्कारीं । अयोध्यापुरीं पावला ॥
अयोध्या प्रथम मोक्षपुरी । अजाचा पुत्र राज्य करी ॥
ते श्रीरामाची निजनगरी । प्रधान तेथवरी पावला ॥

बालकांड अ. २१ ओ. १४ ते १७

श्रीराम व सीता यांची एकात्मता साधली–

ॐपुण्याहं मुळींची गोष्टी । तेणें शब्दविरे प्रणवाच्या पोटीं ॥
अंतःपट फिटे उठाउठीं । सीता गोरटी वरी राम ॥
नयनीं नयन संलग्न । एकचि जालें देखणेंपण
प्राणपती वरितां पूर्ण । प्राणे प्राण एक जाले ॥
वसिष्ठाच्या लग्नाक्षता । एकात्मता पंचभूतां ॥
श्रीरामें वरिली सीता । एकात्मता निजलग्नीं ॥
एक अवयवी एक अवयव । एक जाले सीता राघव ॥
एक जाले जीवभाव । लग्न अपूर्व श्रीवसिष्ठें ॥
पाणिग्रहणीं रघुनाथा । पावोनिया जी सर्वथा ॥
क्रिया पारुषल्या समस्ता । निष्कर्मता श्रीरामें ॥
श्रीराम स्वयें चैतन्यमूर्ति । सीता तंव ते चिच्छक्ती ॥
लग्न लागलें एकात्मप्रात । चतुरोक्ती चहूं ठायीं ॥

बालकांड अ. २५ ओ. ३८ ते ४६

श्रीरामाचा शबरीला उपदेश–

श्रीराम पुसे आपण । शबरी तूं ऐके सावधान ॥
मी एक ज्ञाता जग अज्ञान । हें महाविघ्न जिंकिलें कीं ॥
ज्ञानाचा ज्ञानाभिमान । हेंचि तापसां महाविघ्न ॥
जेणें जिंतिला ज्ञानाभिमान । तप वर्धमन तयाचें ॥
अद्वैत देखिलें स्वस्वरूप, तैंचि जिंतिला जाय कोप॥
असतां द्वैत खटाटोप । सर्वथा कोप जिणवेना ॥
जंव द्वैताची सुदृढता । तंव जिंकवेना मोहममता ॥
अद्वैत भावना भावितां । मोहममता निमाली ॥
वृत्ति पावल्या चित्स्वरूप । तैं मन होतें सुखरूप ॥
मनीं असतां दुःख संताप । केल्याहि तप अति मिथ्या ॥
इंद्रियकर्मांची प्रवृत्ति । तुज आहे कीं अकर्त्रात्मक प्रतीती ॥

ते सकळवासना होय शांती । सुखस्थिति स्वानंद ॥
ऐसी निजानंदप्रतीती । या नांव सार्थक तपःस्थिती ॥
निजदेह मिथ्यात्वें देखती । मुख्य परमार्थी तो एक ॥

अरण्यकाड अ. २३ ओ. १४ ते २८

मारुती व श्रीराम एकरूप झाले–

देतां हनुमंता आलिंगन । श्रीरामा नाठवे रामपण ॥
मारुतीस नाठवे वानरपण । ब्रह्म परिपूर्ण स्वयें जाला ॥
विरोनि गेलें मीतूंपण । खुंटले बोल तुटलें मौन ॥
दोघे जाले चैतन्यघन । वस्तु परिपूर्ण परिपूर्णत्वें ॥

किष्किधाकाड अ. १३. ओ. ८० ते ८१

उदरभरण नोहे जाणिजे यज्ञकर्म

ऐकोनि हनुमंताचें वचन । तापसी फळें आणूनि पूर्ण ॥
करोनि विधियुक्त पूजन । दिधलें भोजन तें ऐका ॥
वनिताहार्ताहूनि निसटलीं । अहंममता देठीं हूनि सुटलीं ॥
संकल्पविकल्पें तुटलीं । फळें आलीं परिपाका ॥
नित्य निर्विकारें पाडा आलीं । शांतिसेजे स्वयें मुरालीं ॥
॥ जीं नैराश्यें मधमधली । फळें सेविलीं वानरीं ॥
॥ निजात्मबोधें मघमघित । नित्य नैराश्यें रस गळत ॥
॥ जेथें हंस शुक झेपावत । तीं फळें भक्षीत वानर ॥
॥ अहंकोऽहंसोहंविहीन । ब्रह्मीं ब्रह्मत्वही विलीन ॥
॥ सांडोनिया मीतूंपण । फळें परिपूर्ण सेविती ॥
॥ ऐसिया पूर्णत्वाचे सिद्धी । वानरा जाली पारणाविधी ॥
॥ श्रीराम कृपाळू द्वंद्वबाधी ॥ भक्त त्रिशुद्धी वाचविले ॥
॥ शब्द निःशब्द शब्दशुद्धी ॥ आशा निराशा मनःशुद्धी ॥
॥ देहीं विदेहत्व देहशुद्धी ॥ जाणा त्रिशुद्धी पावन ॥
॥ ऐशिया त्रिशुद्धी वानर ॥ पावोनि तृप्ति अभयंकर ॥
॥ देती स्वानंदें उद्गार । तेणें अम्बर गर्जत ॥
बुभुक्षितासि तृप्ती भोजन । तेणें सुखी श्रीभगवान ॥
तापसीचें भाग्य गहन । श्रीरामजन सुखी केले ॥
भोले म्हणती ववलाचो । वानर भोजन अभिप्रायें ॥

शुद्ध साधुनी भक्तिसद्भावो । ब्रह्मान्वयो स्थापिला ॥
आधींच रम्य रामायण । वरी हें रसाळ निरूपण ॥
कथा नव्हे ब्रह्म पूर्ण । सुखी पूर्ण आम्हां केलें ॥

किष्किंधाकांड अ० १६ ओ० १०० ते १२३

सर्वं खलु इदं ब्रह्म—गजेंद्राचे विष्णुस्मरण

ॐकार बीज सनातन । स्वर वर्ण उच्चार ब्रह्म पूर्ण ॥
भूतभौतिकें चैतन्यघन । त्या भगवंता नमन अनन्यत्वें ॥
जो या सर्वां आदिकारण । स्वयें अकारण आपण ॥
त्या श्रीपुरुषोत्तमासी नमन । अनन्य शरण अनन्यत्वें ॥
ब्रह्मा विष्णु आणि महेश । हे ही ज्याचे अंशांश ॥
ऐसा परेशाचा जो ईश । नमन त्यास अनन्यत्वें ॥
त्याचें करूं जातां ध्यान । ध्येय ध्याता होय शून्य ॥
ध्यानेंचि होय चैतन्यघन । त्यासी नमन अनन्यत्वें ॥
हें सर्व भासे ज्याचे ठायीं । ज्याचेनि सर्व प्रकाशलें पाहीं ॥
जो सर्वां कोंदला ठायींच्या ठायीं । जो कीं सर्वही आपण ॥
ऐसा जो का भगवंत । स्वलीला लोकसंग्रहार्थ ॥
ब्रह्मा विष्णु शिव समस्त । अवतार धरीत गुणकर्में ॥
नट नानावेश मांडी । संपादूनी सर्वेंचि सांडी ॥
नटासी नाहीं घडामोडी । तैसी परवडी भगवंता ॥

सुंदरकांड अ० २२ ओ० ७ ते २१

श्रीरामाचा राजधर्माचा उपदेश—

युद्धधर्म चतुर्विध । साम दान दंड भेद ॥
अनादिसिद्ध हे प्रसिद्ध । ऐका विशद विभाग ॥
साम न करितां जाण । युद्ध करितां दारुण ॥
असंख्य मरती प्राणिगण । ते हत्या कोण सोशील ॥
स्वयें साम न करितां । साम न मानी जो सर्वथा ॥
भूतहत्या त्याचे माथां । राजधर्मता सुनीती ॥
ज्यासी नाहीं रणाभिमान । कर्मीं नाहीं कर्माभिमान ॥
ज्यासी देहीं नाहीं देहाभिमान । ते तूं जाण नित्य मुक्त ॥
ते जें जें करिती कर्माचरण । तें तें कर्मचि होय ब्रह्म पूर्ण ॥

त्यासीं नाहीं दोषदर्शन । चैतन्यघन निजदृष्टी ॥
ज्यांच्या बुद्धीच्या पै ठायीं । देह देही दोनी नाहीं ॥
कर्मबाधा त्या न बाधी कांहीं । देहीं विदेही ते पुरुष ॥
ऐशा पुरुषें करितां रण । मरिते मारिते नाही जाण ॥
ठसठसावोनी पूर्ण । करिती रण रणमारें ॥
ब्रह्म पावोनी तटस्थ जाला । तो तव सत्त्वगुणे प्रशिला ॥
त्रिगुणां जिणोनि दादुला । युद्धी तगटला तो शूर ॥
समूळ स्वधर्माची कथा । स्वयें सांगतां श्रीरघुनाथा ॥
अति विस्मय हनुमंता । जांबवंता ताटस्थ्य ॥

युद्धकाड अ० ६ ओ० १४ ते३१

रामरावणाच्या युद्धाचे अध्यात्मपर वर्णन—

आत्मा-राम अहं-रावण । दोघांचें युद्ध अति दारुण ॥
अंतर क्रियेचें विंदान । सावधान परिसावें ॥
महामायेचें करोनि लाघव । बंदी घातले इंद्रादि देव ॥
सेवा घेतसे अपूर्व । नित्य निषय भरडणें ॥
दशेंद्रियें अलौकिक । तेंचि रावणाचें दशमुख ॥
केव्हां न पवे तृप्ति सुख । जरी त्रैलोक्य चघळिले ॥
विचित्र वासनेचें जुंबाड । तेंचि अनावर बाहुदंड ॥
कवळितां सगळें ब्रह्मांड । न पुरे कोड दशमुखा ॥
उघडी ममतेची दांताळीं चाटीत लोभाची अवाळी ॥
विकल्पाचे चाकळे चघळि । सदाकाळी समसमित ॥
ओढोनि कामाचा मेढा । संकल्पबाण धडपुढा ॥
विंधावया रावण गाढा । श्रीरामा पुढां चालिला ॥

युद्धकाड अ० ६१ ओ० २८ ते ३५

मारुतीनें केलेलें रामनाममाहात्म्यवर्णन

पूर्वीं येथून जातेवेळा । रावणें राक्षस पाठविला ॥
कपटाश्रम निर्मिला । गोवूं लागला कपीसी ॥
श्रीराम स्मरतां चित्तीं । झाली कपटाची उपहती ॥
राक्षस मारिला निश्चिती । प्रतापशक्ती नामाची ॥
जळसरोवराभीतरीं । शापदग्ध निशाचरी ॥

**गिळावया कपिकेसरी ॥ पायीं झडकरी झोंबली ॥**
**पायीं झोंबता कपीसी । रामस्मरोनि आवेशीं ॥**
**मारूं आदरिलें राक्षसीशीं । रामें तिशी उद्धरिलें ॥**
**तिणें राक्षसाची मात । मज सांगितला वृत्तांत ॥**
**कपटी म्हणोनिया घात । करितां मुक्त रामें केला ॥**
**ओषधींतें राखिते । चौदा सहस्र गंधर्व तेथें ॥**
**रणीं मिसळलें युद्धातें । ते श्रीरामें निवटिलें ॥**
**हातीं असतां गिरिवर । युद्ध झालें घोरांदर ॥**
**नामें निवटिले समग्र । क्षणमात्र न लागतां ॥**

युद्धकाड अ० ५० ओ ६७ ते ७४

असो. अशाप्रकारे जागोजागीं नाममाहात्म्य, भक्तिमाहात्म्य, सर्वभूतीं एकात्मता इत्यादि तत्त्वाचें विवेचन आहे. त्यांत विशेष हे कीं, सगुण भक्तीला धक्का न लावतां अद्वैताचा बोध केला आहे. युद्धकांड अ. ६१ चा उत्तरार्ध व समग्र अ. ६२ हे वेदान्तपरच आहेत. अशा रीतीनें या ग्रंथांत अध्यात्माचें निरूपण असले तरी मुख्य ऐतिहासिक कथाभाग जशाचा तसा राखून त्यावर अध्यात्माची झिलई चढविली आहे. प्रबोधचंद्रोदय नाटक ज्या अर्थानें केवळ अध्यात्मपर तशी कांहीं रामकथा केवळ अध्यात्मपर नव्हे वाल्मीकिरामायणात नसलेल्या अनेक कथा 'भावार्थरामायणांत' घेऊन नाथांनीं आपला ग्रंथ अतिविस्तृत केला आहे. मात्र पूर्वींच्या कोणत्या तरी ग्रंथांत ग्रथित न झालेली अशी एकहि कथा त्यांनीं स्वतः रचून घातलेली नाही. वाल्मीकिरामायणात नसलेली कथा तुम्ही आपल्या पदरची कां सांगता असा आक्षेप वाचकांकडून येईल हें जाणून त्यानीं अशा आक्षेपकांना निरुत्तर करण्यासाठीं म्हणून प्राचीन आधाराचा दोन ठिकाणीं स्पष्ट निर्देश केलेला आहे.

किष्किंधाकांडांत वानरगण सीताशुद्ध्यर्थ निघाले असतां वाट चुकून एका गुहेंत शिरले. तेथें त्यांना उपोषण घडलें असता एका तापसीनें इच्छाभोजन दिलें. त्याचें सविस्तर वर्णन करतांना नाथांना स्वतःलाच शंका येऊन ते म्हणतात–'**विधिनोपहस्तदा**' । **याचि धरोनी श्लोकाच्या पदा ॥ वानरभोजनसंपदा । ग्रंथानुवादा मी वदलों ॥**

**व्यर्थ वाढविले ग्रंथा । ऐसें न म्हणावें श्रोतां ॥**
**मुनीच्या धरोनी पदार्था । ग्रंथीं ग्रथतां रामवदवी ॥** कि. १५-.१९

किष्किंधाकांडांतच मारुतीच्या जन्माची कथा वर्णितांना घारीनें पायस नेलें, तें अंजनीच्या हातीं पडलें असें वर्णन करतांना नाथांनाच शंका आली, म्हणून ते लिहितात–

**पिंडभाग व्यवस्था । हे शिवरामायणींची कथा ॥**
**वृथानुवाद न म्हणिजे श्रोतां । पहावें त्या ग्रंथा विचारोनीं ।**

येथें शिवरामायणांतून ही कथा घेतल्याचा स्पष्ट उल्लेख आहे. त्याचप्रमाणें युद्धकांडांतील अहिरावणमहिरावणाची कथा, वाल्मीकिरामायणांत नसल्यानें, ही कथा कोठून घेतली म्हणून श्रोते विचारतील त्याकरितां ही कथा सेतुबंधरामायणांतून घेतली असें म्हटले आहे. परंतु नाथांनीं एक दोन ठिकाणीं आधार देण्याचें नाकारलें आहे, नाथ म्हणतात–

**माझे भावार्थ रामायण । त्याचें मूळ म्यां दावावें कवण ॥**
**श्रीराम मूळीं मूळ कारण । कथार्थ गहन श्रीराम ॥**

सुंदरकांड ३–१२५

## अनेक कथांचा संग्रह

मूळ वाल्मीकिरामायणांत नसलेल्या किती तरी कथा नाथांनीं आपल्या भावार्थरामायणांत समाविष्ट केल्या आहेत. या कथा कोठून घेतल्या असें श्रोते पुसतील तर त्याला त्यानीं मोघम उत्तर असें देऊन टाकलें आहे कीं, वाल्मीकिरामायण हें एकच कांहीं रामायण नव्हे. प्रथम वाल्मीकीनें रामायण रचलें तें शतकोटि होते, त्या एका रामायणाचीं पुढें दहा रामायणे झालीं. यास्तव जी कथा एका रामायणांत नसेल ती दुसऱ्या रामायणांतून घेण्यास हरकत नाहीं. अशा रीतीनें आपल्या मनानेच स्वतःला वाटेल त्या ग्रंथाचा आधार घेण्याची परवानगी घेऊन ठेवून तिचा त्यांनीं यथेष्ट उपयोग केला आहे. दहा रामायणें कोणतीं याचा त्यांनीं नामनिर्देश केला नाहीं. परंतु त्यांनीं वाल्मीकिरामायणाशिवाय अध्यात्मरामायण, अद्भुतरामायण, आनंदरामायण, शिवरामायण, सेतुबंधरामायण, भागवतांतील रामकथा, भारतांतील रामकथा, पद्मपुराणांतील रामकथा, स्कंदपुराणांतील रामाख्यान, योगवासिष्ठ,

अग्निपुराण, नारदपुराण इत्यादिकांतील कथांचा संग्रह केला आहे. कोणती कथा कोणत्या पुराणांतून घेतली हें शोधून काढणें हें एक संशोधकांना त्यांनीं काम ठेवून दिलें आहे. त्याच प्रमाणें भावार्थरामायणांत जे हजारों संस्कृत श्लोक अवतारणासाठीं घेतलेले आहेत ते सर्व क्रमवार एकत्र करून त्यांतला प्रत्येक श्लोक कोठून घेतला त्याचा पत्ता काढून, तें तें स्थळ नमूद करून जर एक ग्रंथ केला तर तें अनेक कर्त्रींनीं गायिलेलें एक चक्रीरामायणच होईल. कोणा तरी संशोधकानें असा प्रयत्न करून पाहिल्यास तें 'चक्रीरामायण' खरोखरच लोकप्रिय होण्यासारखें आहे.

असो. येथें इतक्या खोलांत शिरण्यास अवकाश नसल्यामुळें नाथांनी भावार्थरामायणांत मूळ रामायणाव्यतिरिक्त अन्य ग्रंथांतून ज्या विविध कथा संग्रहीत करून आपल्या ग्रंथाची अद्भुतता वाढविली आहे. त्यांतील कांहीं ठळक कथांचा ओझरता नामनिर्देश करून आपण पुढें जाऊं.

आरंभींच बालकांडांत दशरथाच्या राज्यांत अवर्षण पडलें म्हणून दशरथ शुक्राशीं लढावयास गेला त्या युद्धांत शुक्रानें दशरथाच्या रथाचा आंस छेदिला असतां कैकेयीनें हात घालून रथ सावरला व राजानें संतुष्ट होऊन तिला वर देण्याची भाक दिली असें यांत वर्णन आहे.

कैकेयीच्या हातांतील पायस घारीनें नेलें व तें अंजनीच्या हातांत पडलें; त्यापासून मारुतीचा जन्म झाला अशी कथा किष्किंधाकांडांत आली असून, बालकांडांत कैकेयीला कौसल्या व सुमित्रा यांनीं अर्धा अर्धा वाटा दिला म्हणून कैकेयीला दोन पुत्र झाले असें म्हटलें आहे. इतरत्र सुमित्रेला दोन पुत्र झाल्याचें वर्णन असून नाथांनी तें न स्वीकारतां येथें आनंदरामायणाचा आधार आपल्या कथेला घेतला आहे.

मारुतीच्या बाळपणच्या पराक्रमाचें वर्णन यांत सविस्तर असून शापामुळें त्या पराक्रमाचा लोप झाला होता, पण रामदर्शन होतांच तो पराक्रम परत अंगीं येईल असा उश्शापहि मिळाला असल्याची कथा किंष्कधाकांडांत दिली आहे. याच कांडांत सीतेचा शोध करतांना वानर ज्या विवरांत शिरले त्या विवरांत हेमा नांवाची एक अप्सरा तापसीरूपानें होती. मयासुराचा वध

व्हावा म्हणून त्याला भुलवून विवराबाहेर आणण्याकरिता इंद्रानें तिला पाठविलें होतें. त्याप्रमाणे तिनें मयासुरास भुलवून विवराबाहेर आणलें व इंद्रानें मयासुराचा वध केला आणि हेमेला तापसी होऊन येथे रहा आणि सीताशुद्धयर्थ वानर आल्यावर त्याना वाट दाखविल्यावर व फळभोजन दिल्यावर तुझा उद्धार होईल असें सांगितल्याची व त्याप्रमाणे वानराना फळभोजन मिळाल्याची अद्‌भुत कथा यात आहे.

किष्किंधाकांडाच्या शेवटीं संपातीनें बळ दैत्याच्या पुत्राशी झालेल्या युद्धाचें केलेलें वर्णन वाल्मीकिरामायणात नाहीं. मारुतीने लकादहन केल्यावर समुद्रात आपले पुच्छ विझविले, त्यावेळीं त्याच्या घामापासून एका मगरीच्या पोटी मकरध्वज पुत्र जन्मला आणि त्यानें पुढें अहिरावणमहिरावणाच्या वधाच्या प्रकरणात हनुमताला सहाय्य केले, ही कथा यांत नवी आहे.

या भावार्थरामायणांत रामनामाचे महात्म्य जागोजागीं वर्णिलें आहे सेतुबंधनाचे काम चालूं असता वानरांना गर्व झाला त्यावेळीं ते दगड पाण्यांत बुडूं लागले. तेव्हा रामनामाचा जप केल्याने ते तरूं लागले असें वर्णन आहे. त्याहून मौजेची कथा अशी की, मारूतीनें द्रोणागिरी पर्वत आणल्यावर त्यावरील औषधींचा रस काढून सुषेणानें तो सौमित्राला दिला तरी त्यापासून गुण येईना. तेव्हा सुषेणानें रामाची करुणा भाकिली व त्याबरोबर औषधांचा गुण येऊन लक्ष्मण उठून बसला. मंदोदरी ही विष्णूची कन्या असून शंकरानें ती रावणाला दिली. व अशा रीतीनें पार्वतीवरील संकट निवारलें गेले असें यात म्हटले आहे. रामलक्ष्मण नागपाशांत बद्ध झाले असतां नारदाच्या मांगण्यावरून गरुड तेथें आला व त्याने नागपाशांतून रामलक्ष्मणाला सोडविलें अशी नारदाची मध्यस्थी येथें दर्शविली आहे. द्रोणागिरी पर्वत आणीत असतांना कालनेमीचे व अप्सरेचें संकट आणि भरताच्या बाणानें विद्ध झाल्यानें भरताची भेट इत्यादि कथा व उपकथा यांत नवीन आहेत.

द्रोणागिरीवरील वनस्पतींचा प्रभाव वर्णन करण्यासाठीं येथें समुद्रमंथनाच्या कथेचा उल्लेख असून त्यावेळी सांडलेल्या अमृतामुळें द्रोणागिरींवरील वनस्पति एवढया प्रभावी झाल्या, असें कथासूत्र येथे नव्यानेंच सांगितलें

आहे. त्याच बरोबर द्रोणागिरीवरील अमृतमय फळांचें यथेच्छ भोजन करण्यास श्रीरामाने सर्व वानरांस परवानगी दिली. असें म्हणून त्यांच्या फळभोजनाचें जें वर्णन येथें केलें आहे त्यांत बहुतांशीं किष्किंधाकांडातील तापसीनें दिलेल्या वनभोजनाचीच द्विरुक्ति दिसते. वर निर्दिष्ट केलेल्या समुद्रमंथनाच्या कथेच्या अनुषंगानें येथें मोहिनीच्या अवताराचा निर्देश असून त्याच मोहिनीचें देवालय नेवासे येथे आहे असें म्हटले आहे.

युद्धकांडात रावणवधानंतर मंदोदरी सती गेल्याचे कथन वाल्मीकीनें केलेलें नाहीं. भावार्थरामायणांत नाथानीं मंदोदरी सती गेली असें म्हटलें आहे. उत्तरकांडानतर पुष्कळच नव्या नव्या कथा आलेल्या आहेत. त्यांत एका स्त्रीराज्याचा उल्लेख असून रामाने मारुतीला त्या स्त्रीराज्याचें रक्षण करण्याला आज्ञापिलें आहे. अंबरीषाच्या कथेत दुर्वासाच्या शापामुळें विष्णूला अवतार घ्यावे लागले असे सांगितलें असून भावार्थरामायणांतील उत्तरकांडांत भृगूच्या शापामुळे रामावतार घ्यावा लागल्याची कथा सांगितली आहे. अशा आणखी कितीतरी नव्या व अद्‌भुत कथा या भावार्थरामायणांत भरल्या आहेत.

## नाथांची रसाळ वर्णनशैली

कथा नवी असो वा जुनीच असो नाथांच्या काव्यांत ती कथा वाचतांना तींत जो रसाळपणा आढळतो तो इतर कवींच्या काव्यांत क्वचितच आढळतो. नाथाच्या वर्णनांत प्रसाद व भक्तिप्रेम हे गुण ओथंबलेले दिसतात. त्यांची भाषा कृत्रिम सौंदर्याने नटलेली नसून ती सहजरम्य आहे. त्याचे भाषेंत सौष्ठव, माधुर्य आणि ओजस्विता हे तीनहि गुण यथा प्रमाण आढळून येतात. जुन्या नव्या दोन्ही प्रकारच्या भाषांतील गुण त्यांच्या भाषेंत उतरले असून तींत दुर्बोधता वा क्लिष्टता हे दोष आटळत नाहींत. यामुळें त्यांच्या या महाकाव्यानें मराठी भाषेला स्थैर्य व सौंदर्य आले आहे. त्यांच्या भाषेतील या गुणांचा वाचकांना परिचय करून देण्याकरितां भावार्थरामायणांतून कांही सरस वेंचे उद्‌धृत करूं—

ज्ञानाच्या थोरवीचें वर्णन पाहा —

**यालागीं आपण । महत्त्व सांडोनिया पूर्ण ॥**
**रंकाचे रंक होऊनि जाण । ज्ञानगवेषण करांवें ॥**

भूक नाहीं ज्याचे पोटीं । तो पंचामृत पाये लोटी॥
तेवी अवैराग्यें करंटी । शुद्ध ज्ञानेसी भेटी नोहे ॥
हातीं घेवोनी खापर । ज्ञानार्थ चांडाळाचे घरोघर ॥
भीक मागणें श्रेष्ठ सधर । परि मूर्ख शरीर त्याहून निंद्य ॥
मूर्खत्वें सार्वभौम पूर्ण । तें सोलीव दु:ख दारुण ॥
जो ज्ञान पावोनि अकिंचन । तो वंद्य जाण ब्रह्मादिदेवां ॥

बालकांड अ. ११ ओ. ८४ ते ८७

ज्ञानकथा अवघेचि ऐकती । परी ऐकिलें तें नाचरती ॥
या लागीं श्रवणाची होय माती । परमार्थप्राप्ति त्या कैंची ॥ १३२
ऐके श्रीरामा सावधान । येथें भोगेच्छा मुख्य बंधन ॥
ते त्यागी तो ज्ञाता पूर्ण । तेथें मुक्तपण सहजचि ॥

बा. अ. ११ । १३५

दशरथ कैकेयीचें आर्जव करीत असतां ती त्यास झिडकारते त्या प्रसंगाचें शब्दचित्र पहा—

तिसी लावूं जातां हाता । तिणें झांजडिलें नृपनाथा ॥
तिचें मुख पाहूं जाता । मुख सर्वथा दावीना ॥
प्रिया पाहों नेदी वदन । रायासी आलें जी रुदन ॥
धावोनि तिचे धरिले चरण । प्रिये तुजवीण मी परदेशी ॥
येरीं आसुडिले पाये । उठी येथूनि परता जाये ॥
मुख दाविसी काये । निर्लज्ज पाहे तूं एक ॥
सुणा येतां सुणी वसवसी । कैकेयी दशरथासी तैसी ॥
स्त्रीलोभाची दशा ऐसी । अपभ्रंशी स्त्रीलोभु ॥
राजा दशरथ सूर्यवंशी । त्याची स्त्रीलोभें पदसी ऐसी ॥
इतर पुरुष स्त्रियांच्या दासी । स्त्रीलोभापायीं हा बडिवारु ॥

अयोध्याकांड अ. ४ ओ. ११ ते १५

वनवास सोडून अयोध्येला परत न जाण्याची श्रीरामाची प्रतिज्ञा—

पूर्ण चंद्राची जावो शोभा । मेरु पृथ्वीमाजी विरो उभा ॥
सुवर्ण पावो काळिमा प्रभा । तरी व्रतारंभा त्यजीना मी ॥
पश्चिमे उगवो दिनकर । एक होवोत सप्तसागर ॥
आतां प्रळय। करो वज्र । तरी राजोत्तर मी [illegible] ॥

दीपाचा पतंग घोट भरूं । नभाची मोट बांधो लेंकरूं ॥
रुद्रातें सुखें गिळो उंदिरू । तरी व्रजविचारू त्यागीना ॥
सूर्य अडखळोनी आडीं पडो । मृगजळामाजी मेरू बुडो ॥
मक्षिका पाखीं आकाश उडो । तरी मागें मुरडो मी न शकें ॥

अयोध्याकांड अ. १७ ओ. ७२ ते ७५

सुवर्णमृगाचे वर्णन पहा—

तनु मनोहर सोनसळी । रत्नबिंदू रोममूळीं ॥
पृष्ठी शोभे मुक्ताफळी । नभोमंडळीं जेवी तारा ॥
खुर आरक्त प्रवाळवर्णी । कळावया मरकतमणी ॥
पांचु बिंदु उमटले श्रवणीं । कर्णाभरणीं अति शोभा ॥
शृंगाग्रीं मणी लखलखती । पुच्छ तळपे सिंदुराकृती ॥
शुभ्र उदर हंसस्थिति । विचित्राकृती मृगशोभा ॥
अंगींच्या तेजाची प्रगल्भा । लोपती रविचंद्राची प्रभा ॥
सोलीव लावण्याचा गाभा । मृगशोभा शोभत ॥
ऐसा चमकत विचकत । चकित दृष्टी चपळ पहात ॥
कांहीं चरत कांहीं फडकत । आश्रमांत स्वयें आला ॥

अरण्यकांड अ. १४ ओ १२ ते १७

सीतेच्या अभिलाषानें रावणाची दुरवस्था कशी झाली तें ऐका—

सीताहरण करूं म्हणतां । मुळींच भीक लागली लंकानाथा ॥
चौपालवी आली हाता । अंगी अशुभता बाणली ॥
चौदा चौकड्यांचें राज्यलक्षण । तें गेलें न लागतां क्षण ॥
भिकारी जाला आपण । सीताहरण करूं म्हणतां ॥
सीतेचा आश्रम देखतां । भेणें पळाली राज्यवैभवता ॥
भिक्षेनें वरिले लंकानाथा । ऐसें सामर्थ्य सीतेचें ॥
अभिलाषितां लाविली भीक । लंकेस सीता नेलिया देख ॥
राक्षस मारवील एकाएक । लंका निःशेख जाळील ॥
वळचणीमाजी दीपकळी । ठेवितां ते तात्काळ जाळी ॥
तेवीं राक्षसकुळीं । करील होळी क्षणार्धें ॥
अभिलाषितां कामधेनु । निर्दाळिला सहस्रार्जुनु ॥
तेवीं सीताहरणें रावणु । कुळ निर्दळणु राक्षसां ॥

अरण्यकांड अ. १६ ओ. ४ ते ९

श्रीराम, लक्ष्मण, हनुमान यांच्या मैत्रीचें वर्णन--

ऐकतांचि श्रीरामवचन । हनुमंतासी आल्हाद पूर्ण ॥
स्वेद रोमांच आले रुदन । श्रीरामचरण वंदिले ॥
तुटली भिन्नत्वाची गोष्टी । सुटलें मौन पडली मिठी ॥
ऐक्याची पडली गांठी । घडली दाटी क्षेमाची ॥
गंगा यमुना सरस्वती । तीन्ही मिळोनि एक भागीरथी ॥
श्रीराम लक्ष्मण आणि मारुती । ऐक्यानुवृत्ती चिन्मात्रें ॥

किष्किंधाकांड अ. १ ओ ९६ ते ९८

समुद्रोल्लंघन करण्यापूर्वीचें हनुमंताचें वीरश्रीचें भाषण--

शतयोजने अब्धिलंघन । तें माझें पादक्रमण ॥
तुम्हांसी संदेह तो कोण । सीता आणीन निमिषार्धे ॥
ऋष्यमूक पर्वताहूनि जाण । घेवोनिया रामलक्ष्मण ॥
घालीन लंकेवरी उड्डाण । सकुळीं रावण वधावया ॥
लंकाद्वारीं रणकल्लोळीं । खेळेन शिरांची चेंडुफळी ॥
करीन लंकेची होळी । तरी मी बळी हनुमंत ॥
सीताशुध्दी ते तंव किती । यालागी कायसी कुंथाकुंथी ॥
सुखी राहावें समस्तीं । लंकेप्रती मी जातों ॥
माझे उड्डाणाचे निजनेटें । महेंद्र पृथ्वीमाजी दाटे ॥
पर्वतशिखरें होतीं पीठें । कडे कपाटें बुजतील ॥
अंगवाताचेनि घर्घरें । बैसती मेघांची दांतोरें ॥
समुद्रगडगर्जन घिसरे । येतील शाहारे कळिकाळा ॥
त्या नादाचा धाक मोठा । उमा झोंबेल नीलकंठा ॥
रमा थापटी वैकुंठा । भयसंकटा निवारी ॥
उड्डाणकाळ अति दुर्धर । धाकती सुर नर निशाचर ॥
तेथें तुम्ही गा वानर । कैसेनि धीर धराल ॥
यालागी तुम्ही वानरगण । हात धरोनि अवघेजण ॥
पर्वत कवळा सप्राण । तरीच प्राण उरतील ॥
जैसा श्रीरामाचा बाण । तैसें करीन उड्डाण ॥
लंकेमाजी प्रथमकंदन । बोहणी जाण मी करीन ॥
करीन इंद्रजितासीं सळ । तुकीन रावणाचें बळ ॥
राक्षसांचें अमितदळ । तें मी सकळ गांजीन ॥

पाडोनी राक्षस दातांसी । त्यांच्या मी करीन राशी ॥
मग मोजून कुडवेसी । घालीन सळेसी रावण ।
घेता लंकेवीं घरधांडोळी । जरी न लभे जनकबाळी ॥
लंका उपडोनी समुळी । रामा जवळीं आणीन ॥

किष्किंधाकांड अ. १७ ओ. ४६ ते ७०

सीतेच्या निर्भयतेचें व निर्धाराचे कौतुकावह वर्णन

राक्षसी त्या ऐशा परी । भेडसाविती अति दुर्धरी ॥
सीता त्यांचे भय न धरी । श्रीरामचंद्री निजबोध ॥
न करी रुदन नव्हे दीन । श्रीराम सुखें सुखसंपन्न ॥
राक्षसीचें भयदान । तृणासमान सीतेसी ॥
नित्य श्रीरामनाम स्मरतां । सीतादेही विदेहता ॥
शंका न मनी देह छेदितां । तेचि श्लोकार्थी अनुवादे ॥
नांव वैदेही सीता सती । देह भयाची नाही भ्रांती ॥
श्रीरामध्यानें भयनिवृत्ति । न मानी क्षिती देहाची ॥
छेदा भेदा खा समस्तीं । श्रीराम भोक्ता सर्वांभूतीं ॥
परी नांवें न पाहे लंकापती । स्वप्नस्थितीं स्पर्शेना ॥
देह छिन्नभिन्न करा समस्ती । अथवा घाला अग्नीप्रती ॥
परी नातळो लंकापती । जाणा निश्चिती नेम माझा ॥
कराळविकराळ वदनाकृती । घर्घर हाका माराल किती ॥
नाही वरणें लंकापती । स्वप्न सुषुप्ती जागृती ॥
निधडी देखोनि सीतासती । राक्षसी चळचळा कांपती ॥
हे कोपलिया आम्हांप्रती । करील शांति अवघ्यांची ॥
इचेनि अभिलाषें रावण । सन्निपातें पावेल मरण ॥
ऐशा राक्षसी आपआपण । स्वयें गुणगुण त्या करिती ॥

सुदरकाड अ. १० ओ. ३७ ते ४८

हनुमंतानें अशोकवनांत सीतेचा शोध लावल्यावर तिच्यापुढें खुणेकरितां मुद्रिका टाकली; ती मुद्रिका पाहून सीतेनें अनेक आशंका घेऊन जो विलाप केला त्यांतील वेचक संशयरत्नमाला पहाः—

मुद्रिका देखतांचि दृष्टि । अत्यानंद मानी गोरटी ।
सीता सप्रेम पुसे गोष्टी । अवस्था पोटीं जे वर्ते ॥

कुशल असतां रामलक्ष्मण । माझी कां न करिती सोडवण ॥
करावया नाहीं आंगवण । दुर्धर बाण असोनी
सुटलिया श्रीरामाचे बाण । शोषोनि टाकितील समुद्र संपूर्ण ॥
सकुळ निवटोनि रावण । माझी सोडवण कां न करी ॥
त्या दोघां वीरीं टाकिली सृष्टी । हें न सांगवे दुःखकोटी ॥
यालागीं सुचली मौनदृष्टी । सज्ञान मोठी तूं होसी ॥
श्रीराम गेला परलोकता । तूं मज मूळ आलीस आतां ॥
तो जरी स्वस्थ असता । मज सोडविता निमिषार्धें ॥
मुद्रिके तूं सांगे गोष्टी । रावणें माते हरिल्यापाठीं ॥
दोघे येवोनी पंचवटी । अति संकटीं काय केलें ॥
मज न देखतां पर्णकुटीं । दोघे जाहले कडेलोटी ॥
अथवा शस्त्रें घातलीं पोटीं । केले संकटीं गळाफांस ॥
किंवा लोकलज्जे लाजले । दोघे विष घेवोनि निमाले ॥
किंवा माझ्या शोकें मूर्च्छा पावले । कीं विकळ होतां गेले प्राण ॥
सीता सीता आक्रंदोनी । प्राण सांडिले दोघेजणीं ॥
ना तरी मागतां पाणी । ताहना फुटोनी निमाले ॥
विजनी मूर्छित पडले । की वृकव्याघ्रीं ते फाडिले ॥
किंवा सिंहें विभांडिले । कीं रगडिले वनगजीं ॥
किंवा गिळिले मत्स्यसुसरीं । कीं बुडाले असती सागरीं ॥
अथवा रिघतां राहिले विवरीं । तरसीं तगरीं भक्षिले ॥
ते तो महावीर निधडे । सिंह व्याघ्र काय त्यांपुढें ॥
शार्दूळ पळती तयापुढें । केलें कुडें रावणें ॥
रावणें छळोनि केलें घाता । स्नान तर्पण संपादितां ॥
अथवा फळ मूळ भक्षिता । दोघां निद्रिस्तां मारिलें ॥
देखतां श्रीरामाचा बाण । रावण भयें पलायमान ॥
श्रीराम नित्य सावधान । त्यासी छळण चालेना ॥
छळावया सुन्दरपणे । शूर्पणखा आली आपण ॥
तिचें केलें विटंबण । न चले छळण रामासीं ॥
माझेनि दुःखशोकें जाणा । स्वयें रामें सोडिलें प्राणा ॥
येरवी निवटोनि रावणा । माझे सोडवणा येता कीं ॥
वर्षोनिया बाणजाळीं । लंकेची करोनिया होळी ॥
रावण निर्दाळोनि समूळीं । जनकबाळी सोडविता ॥

श्रीराम सहजें उदासी । रावणें हरितां स्त्रियेसी ॥
न्यस्तशस्त्र जाहला संन्यासी । वनवासी विचरत ॥
संन्यासीयासी स्वभावता । धरूं नये देहाची ममता ॥
करूं नये स्त्रियेची चिंता । तुटली कथा धावण्याची ॥
संन्यास धर्म स्वभावता । अभयदान दिधलें भूतां ॥
आतां वधूं नये लंकानाथा । खुंटली कथा लंकेची ॥
अथवा आणिक आहे गुज । श्रीराम आत्माराम सहज ॥
रावणें हरितांचि भाज । समाधि सेजे प्रवेशला ॥
समाधिसुखें सुखसंपन्न । मिथ्या हें प्रपंचाचें भान ॥
मिथ्या श्रीराम रावण । धावण्या कोण येथ धावे ॥
मुद्रिके सत्य सांग मजपाशीं । श्रीराम तरी जाहला संन्यासी ॥
अथवा समाधिशेजेसी । किंवा देहासी त्यागिले ॥
मुद्रिके मौनाचें लक्षण । निमालें श्रीराम लक्ष्मण ॥
हेंचि तुझें मौनवचन । अति सावधान निज मौनें ॥
अबोलणे ज्याचें ठायी । त्याचिया ज्ञाना मर्यादा नाहीं ॥
तें तंव वर्तते तुझे ठायी । वानूं कायी गुण तुझे ॥
माझी वस्ती वामभागीं । तूं वर्तसी दक्षिणांगीं ॥
श्रीरामाचें अंगसंगी । तूं सर्वांगी सर्वज्ञ ॥
केसेनि चालवलें वाटा । कैसेनि उल्लंघवलें घाटा ॥
समुद्र तरोनि दुस्तर मोठा । कैसेनि परतटा आलीसी ॥
मज संबोखावया येथें । तुज काय धाडिलें रघुनाथें ॥
ऐसें बोलत बोलत तेथें । पडे मुर्च्छित जानकी ॥
सीता पडतांचि मूर्च्छापन्न । हनुमंत मनीं अति उद्विग्न ॥
हृदयीं स्मरतां रघुनंदन । बुद्धि निर्विघ्न आठवली ॥
सीता व्हावया सावधान । आतां करूं श्रीरामसंकीर्तन ॥
म्हणोनि रामकथा गायन । करी आपण मारुती ॥

सुंदरकांड अ. ११ ओ. ४८ ते ८९

सुग्रीवानें रावणाला चीत केलें—

दोघे धीर विचक्षण । दोघे युद्धीं अति प्रवीण ॥
दोघे करितां निर्वाण । सुग्रीवें रावण क्षीण केला ॥
बाहु बाहुसी कवळित । पदीं पदा आवळित ॥
शिरीं शिरातें आदळत । पुच्छ नाकांत सुदलें ॥

रावण सहसहसां शिकी । सुग्रीव हाणी बक्कयाबुक्की ॥
तेणें लंकेश अति दुःखी । अधोमुखीं पाडिला ॥
दहाहि कंठीं तत्काळ । पुच्छें लावोनिया कळ ॥
रावण सर्वांग विकळ । पाडिला तात्काळ सुग्रीवें ॥
रावण पडिला अचेतन । यासी मारितां न लगे क्षण ॥
जीवें मारितांचि रावण । राम संपूर्ण क्षोभेल ॥
श्रीरामें वाहिली असे आण । स्वहस्तें मारावा रावण ॥
त्यासी मारितां आपण । श्रीराम दारुण कोपेल ॥
श्रीरामाची हे प्रतिज्ञा । मिथ्या करणें हे अवज्ञा ॥
हें कळलें सुग्रीवा सर्वज्ञा । दशानना न मारीच ॥
मारितांचि रावणासी । द्रोही व्हावें श्रीरामासी ॥
वृथा अंतरणें सेवेसी । यालागी त्यासी न मारीच ॥
रणीं गांजोनि रावण । मुकुट घेवोनिया जाण ॥
सुग्रीव जातो मी आपण । केलें गर्जन लंकेसी ॥
इंद्रजित आणि कुंभकर्ण । निधडे वीर प्रधान ॥
ज्यांसी असेल आंगवण । करावया रण तिहीं यावें ॥
ऐसें गर्जोनी लंकेसी । घेवोनि रावणाचे मुकुटाशी ॥
सुग्रीव उडाला आकाशीं । श्रीरामापासीं यावया ॥

युद्धकांड अ. ५ ओ. ८० ते ९२

मारुतीच्या पराक्रमाचे वर्णन-

जेवी गगनीं रविमंडळ । मेघ अच्छादी सकळ ॥
तेवी येवोनी राक्षसदळ । गोळांगुळ आच्छादिला ॥
तो रवि आपल्या निजकिरणीं । मेघांचें अंतर भेदूनी ॥
स्वप्रकाशें करूनी । अवनी गगन प्रकाशी ॥
श्रीरामदळीं हनुमानवीर । जेवी मूर्तिमंत दिवाकर ॥
महामेघ राक्षसवीर । पाहती कपींद्र आच्छादूं ॥
बाप कपिकुळीं दिनमणी । पुच्छरूप निज किरणी ॥
अंतरें सकळांची भेदूनी । ठेला करून वाताहत ॥
जेवीं सरोवरीं गज रिघे । कमळिणी निवटी वेगें ॥
तेवीं कपीनें लागवेगें । राक्षस रागें मर्दिले ॥
पर्वतेंसहित युद्ध करीत । देखतां देव समस्त ॥
होवोनी सकळ विस्मित । स्तुति करीत कपीची ॥

सुर जयजयकार करीत । विजयी झाला कपिनाथ ॥
ठेवोनी स्वस्थानीं पर्वत । आला रघुनाथवंदना ॥

युद्धकांड अ. ५० ओव्या १४० ते १४७

श्रीरामाचा बिभीषणास उपदेश —

ऐसे नानापरी बहुत । बंधु पुढें घेवोनि तेथ ॥
बिभीषण विलाप करीत । हृदय पिटीत निजकरें ॥
तें देखोनि रघुनंदन । संबोखीतसे आपण ॥
शास्त्ररीती लौकिक वचन । शांतवन अतिप्रीतीं ॥
व्यर्थ न करीं शोकातें । न व्हावें झालें निरुतें ॥
सावध होवोनी निजचित्तें । सांडी परतें मोहासी ॥
घटामाजी भरलें जळ । त्यांत बिंबलें चंद्रमंडळ ॥
काळें वेंचल्या घटजळ । बिंब तत्काळ हरपलें ॥
त्या बिंबालागीं आपण । शोक करितां दारुण ॥
तेथें श्रमचि उरे जाण । बिंब पूर्ण न ये हाता ॥
घटामाजी बिंब असतें । शोक करितां तें भेटतें ॥
तेवी धरिलिया प्रेतातें । रावण तेथें भेटेना ॥
बिभीषणा ऐक विनंती । शोक करितां तुजप्रती ॥
न भेटे गा लंकापती । सांडी निश्चिती भ्रमातें ॥
तूं विवेकसंपन्न राजा । इतरा उपदेश व्हावा तुझा ॥
तो तूं येथें मोहसमाजा । निमग्न काजा पैं कवण ॥
रावणें करोनी ख्याती । समरांगणीं सर्व शक्ती ॥
तुच्छ करोनी देहस्थिती । ब्रह्मस्थिती साधली ॥
म्हणोनी शोका योग्य रावण । सर्वथा नव्हे नव्हे जाण ॥
तूं बिभीषण सर्वज्ञ । व्यर्थ रुदन सांडी परतें ॥
गेलियाचा शोक करितां । लागो पाहे मूर्खता ॥
तें सांडोनिया सर्वथा । बंधुस्वधर्मता साधावी ॥
तूं बिभीषण सविवेक । सांडोनिया दुःख शोक ॥
करी बंधूचें और्ध्वदेहिक । व्यर्थ दुःख करोनि काय ॥
जेवीं उगवतां दिनमणी । सचंद्रतारा हरपती रजनी ॥
तेवीं श्रीरामवचनेंकरूनी । मोह तत्क्षणीं पळाला ॥

युद्धकांड अ. ६४ ओव्या ११९ ते १४१

सीतेनें दिव्य केल्यावर रामजानकीच्या भेटीनें आनंदित झालेल्या दशरथाचे विमानांतून एकूं आलेले धन्योद्गार —

देदीप्यमान विमानीं । मोक्षलक्ष्मीकरोनि ।
दशरथ मंडित गगनीं । जेवीं दिनमणी आकाशीं ॥
अर्धांगी सीता समवेत । विराजमान रघुनाथ ॥
बंधुही लक्ष्मण तेथ । नमन करीते पैं तिथे ॥
तें देखोनि निजमानसीं । आनंद झाला दशरथासी ॥
विमानीं नाचत हरिखेसीं । निज पुत्रासी देखिलिया ॥
ब्रह्मादिकां लक्षा नये । तो पुत्रत्वें मज घरीं पाहे ॥
निजानंदें क्रीडताहे । नवल काये सांगो मी ॥
तथापि केवढें औद्धत्य । पुत्रत्वें आज्ञापेनि तेथ ॥
वना धाडिला रघुनाथ । निंद्य जगांत पैं जालों ॥
स्त्रियेचिया वचनासाठीं । राम लाविला दिक्पटीं ॥
लोकेकीं विस्तारली गोष्टी । निंद्य ललाटीं पीटलें ॥
परि तें हित जालें बहुतां । संपादिलें सुरकार्यार्थी ॥
द्विजां जाली सुखावस्था । आल्हादें वसतां जनस्थानीं ॥
राक्षस जे कां विश्वघातक । निवटोनिया सकळिक ॥
देवांचा जो देवघातक । सकळघातक रावण ॥
देवद्रोही विश्वद्रोही । ब्राह्मणांचा ब्रह्मद्रोही ॥
तो रावण निवटोनि पाहीं । त्रैलोक्य सर्वही सुखी केलें ।
कैकेयीचें वचन निष्ठुर । त्रैलोक्यासी उपकारकर ॥
सकळां जालें सुख अपार । बंदी समग्र सोडविले ॥
कैकेयीवचनशल्यदुखा-। पासूनि आजि सुटलों देखा ॥
देखिलिया रघुकुळटिळका । अनंत सुखा पावलों ॥
श्रीरामा ऐक सावधान । धन्य भ्राता सौमित्र जाण ॥
तुझें निजदास्य करोन । कीर्ति पावन त्रैलोक्यीं ॥
धन्य पतिव्रता सीता । तुझेनि दास्यें निष्पापता ॥
तुझेनि धर्मे रघुनाथा । जगद्वंद्य माता जगाची
जितेंद्रिय सीता सती । निर्दोष यश त्रिजगतीं ॥
अनुरक्त बंधु उर्मिलापती । स्वयें रघुपती घेवोनि जावें ॥
वेदमंत्रीं अभिषेक । आपण करोनि सावकाश ॥

सुख द्यावें बंधु भरतास । शत्रुघ्नास सुख देईं
जेवी पर्जन्यवीण धान्य । तृषित प्राणी जीवनेंविण ॥
क्षुधाक्रान्त स्मरे अन्न । तेवीं जन अयोध्येचे ।
त्यांसी द्यावें समाधान । पुत्रवत्प्रजापालन ॥
सुखें करावें आपण । बंधूंसी जाण समवेत ॥
निजराज्य भोगी अक्षयीं । ऐसे दशरथ बोलतां पाही ॥
तिये जाळे सुखमयी । नमिला पाही निजजनक ॥
घालोनिया लोटांगण । मस्तकांजळी विनीत वचन ॥
ताता तुझेनि धर्मेंकरून । सकळ कल्याण पावलों ॥

युद्धकांड अ० ६९ ओव्या १११ ते १४४

असो— याप्रमाणे निवडक वेंचे द्यावेत तितके थोडेच. जेथें आद्यन्त सर्वच ग्रंथ सुरस तेथें कितीहि वेंचे दिले तरी समाधान होणार नाहीं तथापि नमुन्याकरितां कांहीं निवडक भाग उद्धृत केला. यांत उत्तर कांडा-चा समावेश केला नाहीं कारण ते एकनाथांच्या हातचें नसून गावबाच्या हातचे आहे. तरी तें देखील नाथांच्या कृतीला साजेल असेंच आहे. परंतु नाथदर्शनात त्याचा समावेश युक्त नव्हे म्हणून तें वगळलें.

नाथांचा कवितासमुद्र असा अपार असून त्यांत अनेक दिव्य रत्नें आहेत. त्या रत्नांतील कांहीं रत्नें प्रयत्नेंकरून हातीं लागलीं तीं वाच-कांच्या अवलोचनासाठीं मांडलीं आहेत. त्यांच्या अवलोकनानें तृप्ती न मानतां नाथग्रंथवाचनाची आवड वृद्धिंगत व्हावी आणि नाथांच्या ग्रंथांचा अभ्यास अधिकाधिक वाढावा एवढाच हा लेख लिहिण्यांतला हेतु आहे. नाथांचा एकच भावार्थरामायण ग्रंथ घेतला तरी कर्म, भक्ति, ज्ञान या त्रयींचे यथार्थ रूप दर्शविण्यास तो समर्थ आहे. केवळ लौकिक दृष्टीनें पाहिलें तरी मराठी भाषेंतील शब्दसृष्टीचा तो अखंड झरा आहे. मराठी वाङमयाचें हें एक भूषण आहे. शुद्ध मराठी भाषेचें तें एक प्रतीक आहे. मराठी वाङमयरूपी बटूचें ज्ञानेश्वरांनीं उपनयन करून त्यास अध्ययन-प्रवण केले. नाथांनीं त्या बटूला गृहस्थाश्रम देऊन सर्वव्यवहारकुशल व वैभवसंपन्न केलें. या महदुपकाराबद्दल मराठी भाषेचे अभ्यासक सदैव नाथांचे ऋणीच राहतील.

---

# एकनाथी भारुड • • •

श्री. डॉ. नारायण गोविंद नांदापूरकर
( एम. ए. पीएच. डी )

## प्रास्ताविक

गोदेचा परिसर म्हणजे साधुसंतांचें माहेर घर. येथें ज्ञानेश्वरएक-नाथादि महान सत्पुरुष होऊन गेले. त्यांनीं आपल्या चारित्र्यानें महाराष्ट्रास जीवन देऊन अजरामर करून ठेवले आहे. महाराष्ट्रांत धर्माची आणि संस्कृतीची जी ज्योत अखंड तेवत आहे ती ह्याच्याच पुण्यस्नेहानें. ज्ञानेश्वरांनीं भागवत-धर्माचा पाया घातला, त्यावर नाथांनीं आपल्या चारित्र्याने मंदिर उभे केलें आणि आपल्या अमोल वाणीतून स्रवणाऱ्या वाङ्मयामृतानें त्या जीवनमंदिरावर विशुद्धतेचा वज्रलेप केला. गंगेच्या पाण्याने शेती पिकते आणि नाथांच्या वाणीनें जनतेचे जीवन विकसतें. नाथांनीं आपल्या जीवनाचा क्षणन्क्षण जनतेच्या कारणीं लावला आणि वाणीच्या शब्दाशब्दाने लोकांच्या ललाटींचा लेख पालटून टाकला. त्यांनीं प्रौढ सुशिक्षित जनांसाठीं भागवतरामायणादि रचना तर केलीच, पण बाळे भोळे तरण्यासाठीं भारुडांची पोतडी सोडली आणि ज्याच्यात्याच्या ऐपतीप्रमाणें त्याच्या-त्याच्यापुढें उपदेशाचा आदर्श धरला.

## भारुडाची व्युत्पत्ति

भारुड शब्दाचा प्रचार फार पुरातन असला तरी नाथांच्या लेखनापासूनच ह्या प्रकारास विशेष महत्त्व प्राप्त झालें आहे. भारुडाची व्युत्पत्ति सांगणें फार कठीण आहे. ती निश्चित अशीच म्हणून सांगतां येत नाहीं. आणि त्यास आज जो अर्थ प्राप्त झाला आहे आणि जें स्वरूप त्यानें आज धारण केलें आहे, तेंहि पूर्वीं असेंच होतें कीं भिन्न होतें हें निश्चित म्हणून सांगतां येत नाहीं. नाथांच्या पूर्वीं ज्ञानेश्वर, नामदेव, जोगा-परमानंद यांनीं भारुडें रचिलीं, पण तीं थोडीं आहेत. तथापि त्यांत नाथांच्या भारुडाचें बीज आणि स्वरूप सांपडतें.

'गारुड' आणि 'भारुड' हे दोन शब्द एकसारखेच व्युत्पादितां येतात. गारुडयांसंबंधीं जें, तें 'गारुड.' पुढें अर्थविस्तारानें गारुड्यासारखे डोंबारी, कोल्हाटी आणि तत्सदृश समाज यांचा त्यांत अंतर्भाव होऊन त्याची व्याप्ती वाढली. त्याचप्रमाणें, 'भारुडां' संबंधीं अथवा 'भराड्यां" संबंधीं जें गीत तें 'भारुड.' 'भारुड' म्हणजे धनगर असा 'शब्दकोशांत-अर्थ दिला असून तत्पुष्ट्यर्थ "रत्नप्रभेचेनि कोडें। मैंढिया शृंगारिली भारुडें" असा मानभावांच्या 'ऋद्धपुरवर्णन' ग्रंथांतील आधार दिला आहे. यावरून 'भारुड' धनगरांना म्हणत असें दिसतें. पण ह्या शब्दाचा आढळ इतर पुरातन मराठी वाङ्मयांत नाहीं. तथापि 'भरवाड' ही कानडी धनगरांची एक जात आहे. त्याप्रमाणेंच भराडी जात हीहि फार पुरातन आहे. प्राकृत भाषा प्रचलित असतां ही जात होती; आणि ती शिवाचें विशिष्ट व्रत करीत असे. 'पाइसद्दमहाण्णवो' (प्राकृतशब्दमहार्णव) ह्यांत 'भरड'शब्दाचा असा अर्थ असून त्यात "सिवमवणाहिगारिणा भरडएण" 'शिवमंदिरांतील भरडानें' असा एका प्राकृत वाक्याचाहि आधार दिला आहे. ही भराडी जात महाराष्ट्रियांस परिचित आहेच. ह्याचे दैवत खंडोबा, बहिरोबा इ. असून, हे लावण्या पोवाडे म्हणतात, तमाशेहि करतात. तशीच 'भराडी' ही गोसाव्याचीहि एक जात आहे. तेहि असेच गीतें गात हिंडत असतात. ह्या वरून ह्या जातींचा, गीताचा नि स्तुतींचा संबंध स्पष्टच आहे. पण भारुडांत लौकिकताहि पुष्कळच असते आणि तीहि ह्या जातींचा जनतेशीं येणारा जो विविध प्रकारचा संबंध त्याजवरून आलेली दिसते. भराडी ह्या शब्दाचें 'वराडी' हेंहि एक पूर्वरूप आढळतें 'कां, भीमकीचा नव्हशी बराडी?" [सामराज रुक्मिणीहरण सर्ग १]. यांत त्याचा संबंध 'वऱ्हाड' [प्रांत नव्हे] वर+हाट=वऱ्हाट, वऱ्हाड वरासमागमें असणारी अवांतर मंडळी यांजशीं आहे. प्रथम, वराच्या समागमें असला तरी नंतर वधूच्याहि समागमें असलेल्या मंडळींसाठीं हा शब्द वापरण्यांत येऊं लागला. वरसंगतीच्या ह्या यात्रिकांत अनेक जातींचे लोक असतात आणि ते भोजनभाऊ तर असतातच, पण बहुधा वराच्या असल्यानसल्या गुणांचा गुणाकार करून सांगत सुटतात. वास्तव 'भराड' शब्दाच्या अनेक ठिकाणच्या ह्या प्रवासावरून भराडयांच्या गीतांत असे अनेक गुण आले असा-

वेत असें अनुमान होतें. धनगर, गोसावी, शिवोपासक आणि वराचे नि वधूचे स्तुतिपाठक आणि ह्यांत अठरापगड जाती असल्याकारणानें त्यांचेहि जातिगुण त्यांत संलग्न होऊन आजच्या भारुडाचें स्वरूप बनत गेलें असें दिसतें. स्वतंत्र जाति, पंथ आणि त्यांची उपासना हींहि त्यात असून लौकिक अचारविचारांचाहि त्यांत अन्तर्भाव होऊं लागला. वास्तव त्यांत इंग्रजीतील Pastoral songs चें स्वरूप असून तीं Folk songs'हि व्यापक अर्थानें आहेत.

'भारुड' ह्या शब्दाची व्युत्पत्ति कानडीच्या संपर्कानेंहि लागूं शकते. नाड+ हाडु= 'नाडहाडु म्हणजे ग्रामीण गीतें Country songs ह्या कानडी, शब्दांतील गीतवाचक 'हाडु' शब्द, भार म्हणजे जनसंभार ह्याजपुढें येऊन भार + हाडु = भाराडु, आणि भारुड असा होणें संभवनीय आहे. अथवा भरवाड + हाडु = भरवाडु, भारुडु, आणि भारुड असाहि उद्भवणें शक्य आहे. 'हाडु' हा शब्द मराठींत 'पवाडु' ह्या शब्दांत आढळतो. त्याचा गीतदर्शक अर्थहि त्यांत आहे. पोहा, पावा आणि पवा ह्या यात्रावाचक शब्दास तो लागून पोहाहाडु, पावाडु, पवाडु, पवाड, पवाडा आणि आजचा शुद्ध शब्द पोवाडा असा बनलेला दिसतो. पोहा, पावा हे यात्रा-वाचक शब्द स्वतंत्र राहून, पोवाडा हाहि रूढ झाला. तद्वतच भराडी, भराड, भरवाड हे शब्द राहून पुन्हा त्याचें गीतदर्शक 'भारुड' हाहि रुढ झाला असणें शक्य आहे. पवाडा याची व्युत्पत्ति 'प्रौढ' आणि 'प्रवदन' ह्या संस्कृत शब्दांपासूनहि होऊं शकते. पण वर दर्शविलेल्या 'पोहा' यावरून ती अधिक समर्पक वाटते. यात्रे-मध्यें जनांच्या करमणुकीकरतां वीरांची, देवांची कीर्ति, स्तुति गाइलेली असते. अशा प्रकारेंहि ह्याची व्युत्पत्ति, पुरातनता आणि सर्वसंग्राहकता दिसून येते.

कै. पांगारकरांनीं आपल्या मराठी वाङमयाचा इतिहास या ग्रंथांत आणि प्रस्तुत लेखकानें "मायबोलीची कहाणी' या पुस्तकांत आणिकहि एका प्रकारें या शब्दाची व्युत्पत्ति देण्याचा प्रयत्न केला आहे. बहुरुढ म्हणजे लोकप्रिय गीत आणि 'बहु'चा अपभ्रंश 'भा' 'भो' असा करून

भारुड ते व्युत्पादितात; आणि त्याच्या बहुगुणीपणाची कल्पना आणून देतात. प्रस्तुत लेखकाने 'भा' म्हणजे दीप्ति आणि 'रूढ' म्हणजे तिजवर अधिष्ठित असलेलें ते भारूढ, भारुड, अथवा भार म्हणजे जनसमुदाय त्याजवर आरूढ असलेले म्हणजे जनसमुदायासंबंधीं जें गीत तें भारुड असे सांगितलें आहे. तद्वतच त्याची आणिकहि एक व्युत्पत्ति संभवते. 'भा' म्हणजे प्रतिभा तिजवर आरूढ असलेलें म्हणजे प्रतिभा जागृत होताच एकदम अचानक स्फुरण पावलेलें शीघ्रकाव्य. ह्या व्युत्पत्त्या काल्पनिक आणि व्युत्पत्तीच्या शास्त्राधारें दिल्या असल्या तरी त्या चुकीच्याच असतील असे म्हणता येत नाहीं. ह्यांच्यातहि भारुडाची सर्वसंग्राहकता समुचितपणें निवास करूं शकते आणि भारुडातील तेजस्विता आणि शीघ्रकवित्व याचीहि त्यांजवरून आठवण होते.

ह्या गीतांत तेजस्विता असते,स्तुति असते आणि सामाजिकता असते. आणि भराडी इत्यादि जातीहि आहेत. मराठी भाषेच्या उत्पत्तीपूर्वींहि त्यांचें अस्तित्व होतें नि तेंच पुढें मराठींत आलें. तेव्हा प्राकृतांच्या पूर्वीं ह्याचा कोठे थागपत्ता लागतो काय हे पाहिलें पाहिजे. संस्कृतांत 'भरंड'(भृ-अंडन) हा शद्ब स्वामी, राजा, वृषभ आणि कीटक अशा अर्थीं आहें. ह्या 'भरंड' पासून भारंड अथवा भारुंड हें सहजच सिद्ध आहे. ह्या शब्दांतील अर्थावरून राजप्रशस्तीपर आणि पशुपक्षीविषयक असें हें गीत असावें असें दिसतें. अर्थात् ह्याहि रूपांत भारुडांतील देवांपासून प्राण्यांपर्यंतच्या सर्व विषयाचा समावेश आहेच. प्राकृतांतील 'भारुंड' शब्दाचा अर्थ "पाइसद्दमहाण्णवा" मध्ये दोन तोंडाचा पक्षी असा आहे. तेव्हां 'भारुंड' ह्या गीतप्रकाराचा आणि ह्या एककाय–द्विमुख पक्ष्याचा संबंध मोठा चमत्कारिक वाटतो. पण मराठींतील भारुडाने हींहि कल्पना आत्मसात केलेली आहे. (भारुड हें द्विमुख असतेंच मुळी. त्याचीं दोन तोंडें म्हणजे त्याचे दोन अर्थ. भारुडाचें शरीर (शब्दरचना) एकच असलें तरी त्याचे अर्थ दोन असतात; एक वाच्यार्थ आणि दुसरा लक्ष्यार्थ, एक व्यावहारिक आणि दुसरा पारमार्थिक.)

वर दर्शविल्याप्रमाणें 'भारुड' हा शब्द सिद्ध होतो एवढेंच नव्हे तर तो महाभारतांतहि सांपडतो. शकुंतलाख्यानांत "भारुंडसामगीता-

**भिरथर्वशिरसोद्गतैः। यतात्मभिः सुनियतैः शुशुभे स तदाश्रमः"** १।७०।३९ असा श्लोक आहे. दुष्यंतास दिसलेल्या कण्वाश्रमाचे हें वर्णन आहे. ह्यावर नीळकंठानें **"भारुंडसामानि पूगयज्ञिय सामानिच साम्ना मवांतरभेदा"** अशी टीप दिली आहे. चि. वि. वैद्यांनीं "भारुंड साम गाऊन अथर्वशीर्ष म्हणणाऱ्या ब्राह्मणांनीं तो आश्रम शोभत होता," असा ह्या श्लोकाचा अर्थ केला आहे. पण खाली 'भारुंडसाम' ह्या पदावर "हे अथर्ववेदी समजावे," अशी टीप दिली आहे. [यंदे आणि मंडळीचें महाभारत पहा.] बापटशास्त्र्यानीं "सामवेदी विविध सामे गात आहेत," असा अर्थ केला; आणि चिपळूणकर मंडळीच्या भारतात "भारुंड (पूगयज्ञिय) सामांच्या नि अथर्ववेदीय मंत्रांच्या योगे," असा अर्थ आहे. यावरून 'भारुंडसाम' अथवा 'भारुंड' हा एक गीतप्रकार होता हें निश्चित दिसते, मग तो सामवेदी असो वा अथर्ववेदी असो. मोनियर विल्यमच्या कोशांतहि याचा अर्थ सामवेदाचा एक भेद आणि पक्षीविशेष असा आहे. पण भांडारकरसंस्थेकडून प्रसिद्ध झालेल्या आदिपर्वांत हा श्लोक प्रक्षिप्त मानला आहे. प्रस्तुत प्रश्न श्लोकाचा नसून 'भारुड' शब्दाचा आहे. महाभारताच्या शेवटच्या संस्करणांत हा श्लोक होता हे ह्यावरून कळतेंच, आणि तें संस्करण ख्रिस्त शकारंभाच्या जवळपासचे आहे. त्याचप्रमाणें राजवाड्यांच्या मतें 'अथर्वशीर्षाचा' काळ अडीच हजार वर्षांच्या पूर्वीचा होता. यावरून 'भारुंड' हा शब्द निदान दोन हजार वर्षांइतका प्राचीन आहे हें विधान निर्वेधपणे करतां येते. पूर्वीं यज्ञप्रसंगीं गाथा इत्यादि गात. त्यांत देव, राजे इत्यादिकांची स्तुति आणि वर्णनें असत. गाथाप्रमाणेच हीं गीतेंहि करमणुकींसाठीं गाइली जात असावीत. तीं कदाचित एके काळीं वेदांचा भागहि असतील. अथवा वैदिक ऋषींच्या व्यतिरिक्त व्यक्तींनीं गाइलेलीं आणि क्षणिक, चलत्स्वरूपाचीं असल्याकारणानें वेदांत संग्रहिलींहि कदाचित नसतील, कदाचित लुप्त झालेल्या वेदाच्या कांहीं भागांप्रमाणें यांचाहि लोप झाला म्हणून तीं आज वेदांत नसतील. पण नीळकंठी टीकेवरून त्यांचा नि वेदकालाचा संबंध लागतो एवढें मात्र खरें. पुढें यज्ञयागांच्या लोपानंतर यांच्या मूळ स्वरूपाचा लोप होऊन देवांच्या, आधुनिक देवतांच्या नि राजांच्या स्तवनाचा आणि सामाजिक आचार

विचारांचा ह्यांत विशेष अंतर्भाव झाला असावा. वेदकालीं आणि वेदोत्तर कालींहि यज्ञप्रसंगीं प्राकृत लोकांचे, अर्थात जानपदाचे करमणुकीचे प्रकार होत असत. त्या काळीं वैदिक देव नि वीरपुरुष यांच्या स्तुतींचीं हीं गीतें, यज्ञलोपानंतर यज्ञांच्या जागीं देवतापूजन आलें तेव्हां, आणि संस्कृतची जागा प्राकृतादि भाषांनी घेतली तेव्हां,कालमानानुसार पालटते रूप घेऊन अशीं वावरूं लागलीं असावींत असें दिसतें. यास्तवच 'भारुंड' शब्दांत दोन मुखाची जी कल्पना आहे ती यांच्या दैवी आणि सामाजिक अर्थाच्या स्वरूपाची निदर्शक अशी यथार्थ वाटते.

अशा प्रकारें या शब्दाची व्युत्पत्ति लागते. वेदकाळीं ऋषींनीं वा ऋषींच्या व्यतिरिक्त अन्य जानपद कवींनीं गाइलेलीं, दैवतोत्पत्तीनंतर देवांची नि वीरांची स्तुति नि सामाजिक परिस्थिति दर्शविणारीं, पुढें प्राकृतांच्या काळीं आपल्या दोन अर्थांच्या स्वरूपाची ओळख ठेवणारीं, 'भरड' आदि पूजकांनीं गाइलेलीं आणि नंतर भराडी, भरवाडी यांनीं आणि एतत्सदृश समाजांनीं गाइलेलीं गीतें ही भारुडें होत. एके काळचा हा जनव्यापी कवनप्रकार असल्याकारणानेंच संस्कृतीच्या लोपामुळें आणि भाषांच्या रूपभेदामुळें त्याचें हें आजचे स्वरूप आपणांस असें दिसते. एवढा प्रदीर्घ कालाचा प्रवास करूनहि महाराष्ट्रीयांनीं आपल्या पूर्वजांचा हा कवनप्रकार सांभाळून ठेवला हें त्यास किती भूषणावह आहे. !

## नाथपूर्व भारुंड

भारुडांची संभवनीय काल्पनिक आणि ऐतिहासिक व्युत्पत्ति दर्शविल्यानंतर या भारुडाचें पूर्व रूप कसें होतें तें पाहणें क्रमप्राप्त आहे. पण दुर्दैवाची गोष्ट अशी कीं अशीं भारुडें जतन केलेलीं नाहींत. संस्कृतांतहि ही रचना नाहीं आणि प्राकृतांतहि ही आज उपलब्ध नाहीं. हीं जानपदगीते आणि शीघ्रकवित्वाचे प्रकार असल्यामुळे, हीं बहुधा लेखननिविष्ट झालींच नसावींत. तथापि 'भारुंड' ह्या शब्दावरून यांचें अस्तित्व मात्र आढळतें. मराठींतहि नाथांच्या पूर्वी ज्ञानेश्वराचीं पंधरावीस भारुडें असून नामदेवाचीं खेळिया, बोबडा इत्यादि आणि जोगापरमानंदाचें 'गुडगुडी,' हींच काय तीं उपलब्ध आहेत. ह्यांतून त्यांनीं आत्मानुभव

निवेदन केला असून समाजास परमार्थपर उपदेशहि केला आहे. नाथांच्या नंतरहि तुकाराम-रामदासानी भारुडें रचिलीं; पण 'भारुड' शब्दाचा उच्चार करताच नाथांची ती परम कारुणिक मूर्तिच समोर उभी रहाते. नाथांची विषयप्रतिपादनाची हातोटी, खेळकरपणा, रोकठोकपणा, आणि अन्तःकरणांतील उमाळा त्याचप्रमाणे त्यांतील विषयाची विविधता आणि विपुलता ह्यायोगाने आज त्यांचीच भारुडे बहुसंख्य प्रमाणांत गाइलीं जातात.

## भारुडें रचण्याचें कारण

एकनाथ हे एक अलौकिक विभूति होऊन गेले. त्यांनीं गुरुकृपेनें ज्ञान संपादून, शास्त्रांच्या आणि स्वानुभवाच्या कसोटीवर ते घासून पुसून घेतलें होते, आणि त्या ज्ञानाच्या दिव्य तेजानें ते अन्तर्बाह्य परमेश्वराचा साक्षात्कार अनुभवीत होते. मानवी जीविताचे कोडें त्यांनीं केव्हाच उकललें होतें. त्याचा 'देहभावो तो चैतन्यघन'[1] झाला होता, देहीं देहपण[2] विलया गेलें होते. त्यांनीं भक्तीच्या पेठा वसविल्या असल्यामुळें[3] ते नरदेहींच सायुज्यता अनुभवीत होते. ते जीवन्मुक्त होते आणि त्यांचें स्वतःसंबधीं जीवितकार्य संपलें होतें. पण दुसऱ्या दृष्टीने पाहतां त्यांचे जीवितकार्य आता अधिक विस्तृत,व्यापक झाले होते.ते 'जनवनस्वयंभ एकें[4] जालें' होते आणि सर्व जगच ब्रह्ममय पहात होते. त्यांच्या दृष्टीने ब्रह्मानंदीं सृष्टी[5] हेलावत होती. **गेलीया देहाची अहंता। मग जगही ब्रह्म स्वभावतां[6], ॥** असे त्याना सर्व जगच ब्रह्ममय झालें होते. पण ही त्यांची स्वतःची जगाकडे आणि आपणाकडे पाहण्याची दृष्टि होती. जग मात्र आपलें आपणास पारखे झालें होते. जगातील यच्चयावत् प्राण्यांनीं हें ओळखावें, जगांतून अज्ञान दूर व्हावे आणि जनतेचा उद्धार व्हावा, हीच एक तळमळ साधु संताना असते. आणि ह्याच आत्यंतिक तळमळीतून **ब्रह्मीं स्फुरें -तें स्फुरण शुद्ध सत्वाचें[7] लक्षण** असे नाथाचें सात्त्विक स्फुरण भारुडांच्या रूपानें प्रकट झाले. एवंच दयाळु बुद्धीच्या नाथांनी आत्मोद्धार झाल्यानतर **'प्रबो**

---

१) भारुड २७०८, २) २६६९, ३) २६६५, ४) २६४३, ५) २५२२, ६) १८८५, ७) २५७१,

भावंथा महामूढां, कर्मजडां उद्‌बोध' अशी केवळ 'परोपकारकार्यें ही रचना केली.

## सर्व सृष्टि हेंच महा काव्य

नाथ हे परम विरक्त, भगवद्‌भक्त होते नि त्यांचें अंतःकरण फार प्रेमळ होतें. **पाहिजे समता सर्वांभूतीं भाव । मुंगी आणि राय सारखेंची**, अशी त्यांची विशाल, अन्तर्भेदी, समष्टींत व्याष्टि आणि व्यष्टींत समष्टि पाहण्याची समदृष्टि होती. **सर्वांभूतीं भावो भगवद्‌भक्ति पाहीं.' भूतें भगवंत ये दोन्हीं एक** अशा रीतीनें त्याना सर्वत्र भगवंतच दिसत असल्याकारणानें त्यांच्या वृत्तीला परमेश्वर गुणानुवादावांचून विषयच नव्हता आणि वाणीला जें येईल तें त्या भगवंताचें स्तवन होतें. **'जी जी वाणी स्तुति केली, ती ती देवासीं पावली'** अशी त्यांची स्वतःची पूर्ण भावना होती. यासाठींच सृष्टींतील सारे विषय त्यांच्या काव्याला आवाहन करते झाले. निजानंदीं रंगलेल्या नाथांना सर्व सृष्टी हेंच महाकाव्य होतें. त्यांच्या समोर जे आलें, दृष्टींत जें भरलें, चित्तांत जें विकसलें आणि वाणीनें जें व्यक्त झालें, तें अक्षरब्रह्माचें स्वरूप ल्यालें. त्यांच्या काव्याचे विषय इतके विविध असण्याचें कारण हें आहे. विषयांची एवढी विविधता आणि व्यापकता असलेला कवि मराठी वाङ्‌मयांत तरी नाथांवांचून दुसरा कोणी नाहीं. संपूर्ण विश्वच ज्याला काव्यमय झालें आहे; आणि तेंहि काल्पनिक नसून अनुभूतीचा आस्वाद घेतलेलें काव्य झालें आहे, त्याला विषयाची वाण कोठून पडणार ?

## अध्यात्म आणि समाज

नाथ हे ब्रह्मसाक्षात्कारी पुरुष होते. त्यांची वृत्ति कवीची होती. जें आपण आस्वादिलें त्याचा परिपाक दुसऱ्यांसहि आस्वादितां यावा, आपलें भावमय अन्तःकरण दुसऱ्याच्या अन्तःकरणांत उतरावें, अशी त्यांची साहजिकच मनीषा होती. यासाठींच स्वानुभूती वा साक्षात्कार त्यांनी जनतेपुढें काव्यरूपानें प्रगट केला. भागवतरामायणादि महाकाव्यांची रचना याच उद्देशानें झाली; पण ती प्रौढ आणि पंडित जनांसाठीं झाली; भोळ्या

१) २६५५, २) २६१३, ३) ५२७, ४) २६९०, ५) २६२९.

**भाविकां लहान थोरांच्या** उद्धारासाठीं तिचा फारसा उपयोग नव्हता. तींतील ज्ञानामृताचें पान करण्यासाठीं परिश्रमाची आणि हरिदासपुराणिकादि मध्यस्थांची आवश्यकता होती. यास्तव त्यांनीं भारूडादिकांचा अवलंब केला. यावरून त्याचें समाजनिरीक्षण अत्यन्त मार्मिक होते हे दिसतें. आपलें मनोगत इतराना पटवून परिणामकारक करण्यासाठीं त्या त्या समाजांतील चालीरीती, उद्योगधंदे, करमणुकीचे प्रकार आणि आचारविचार या सर्वांचा आश्रय घेऊन आपल्या मनोगताला त्या परिवेषांत प्रगट करण्याच्या योगानें त्यांनीं मोठें औचित्य साधलें आहे. विषय, भाषा, आचार, विचार इत्यादि सारेंच बहुजनसमाजाचे असल्याकारणाने त्यांत सर्वांनाच आत्मीयता वाटते; आणि त्यांतच त्या भारुडाचीं पठनसुकरता,गेयता,स्मृतिसुलभता आणि सर्वांत अधिक म्हणजे नाट्यानुकूलता ह्या गुणांमुळें तर तीं विशेषच प्रिय वाटतात. यांत वाच्यार्थाच्या पलीकडे लक्ष्यार्थ असतो आणि तो कळण्यास क्वचित कठिणहि असतो, तरी एकंदर भावार्थ आणि उपदेश सहज समजण्यासारखा असतो. तेव्हा अशा प्रकारची रचना करून स्वोद्दिष्ट साधण्यांत नाथांचा व्यापक दृष्टिकोन स्पष्ट प्रतीत होतो. पारमार्थिकज्ञानाचे पसायदान करून अखिल समाज सुखसंपन्न करण्याचा असा जगडव्याळ प्रयत्न होऊं लागला म्हणजेच ह्या विषयांत सामाजिकतेचा प्रवेश होतो. नुसतें अध्यात्मज्ञान जड जीवांना, अज्ञानी बाळा-भोळयांना पेलणे आणि पचणें अशक्य असतें. व्यावहारिक भाषेत आणि समाजास परिचित अशा कल्पनावलयांत अवगुंठून तें समाजापुढे ठेवलें म्हणजे तें सामाजिक मनांत सहज प्रवेशून वृत्तींना विशिष्ट वळण लावतें.

## भारुडांची विशिष्ट रचना कां आदरिली?

नाथ हे परमार्थ–सिद्धि प्राप्त झालेले महापुरुष तर होतेच, पण ते सांसारिकहि होते. नाथांनीं आदर्श संसार करून **जनीं वनीं निरंजन वासुदेव समान**[1] असा पाहिला होता.[2] संसार हा दुष्कर असल्याकारणानें सर्वांनाच अशी स्थिति संपादितां येणें कठीण आहे, तथापि प्रयत्न केल्यास मानवाला ही साधतां येते, हें त्यांनीं स्वतःच्या आचरणाने जसें

१) २५५२, २) २६०१.

दाखविले,) तसेंच आपल्या उपदेशांनींहि त्यांना सांगायचें होतें. परम अर्थानें प्रपंच नश्वर आहे हे ते जाणत होते, पण तो टाकून भलत्या नादीं लागण्यानें आपलें अकल्याण होईल हें त्यांनीं स्पष्टच सांगितलें आहे. **एका जनार्दनीं प्रपंच एकु । नश्वर[1] म्हणतां नाडला लोकु** प्रपंच हा परब्रह्माशी एकरूप आहे. प्रपंचहि त्या ब्रह्माचें व्यक्त स्वरूपच आहे. तो नश्वर उपेक्षणीय म्हणून लोक तिकडे दुर्लक्ष करतात, यास्तव त्यांचा कार्यभाग नाशतो. तेव्हा ही विचारधारा सोडून द्यावी. **एका जनार्दन[2] म्हणे । मनुष्यदेहाचेनि अनुसंधानें । ब्रह्म परिपूर्ण स्वयें होणें । जिणें मरणें असेना.** (संसार असा करावा कीं ह्या मानव देहाच्या साधनानें स्वतःच ब्रह्मस्वरूप व्हावे आणि जन्ममरणाचा फेरा चुकवावा. जनतेच्या मनावर हें तत्त्व पूर्णपणें बिंबविण्यासाठींच त्यांनीं भारुडांचा हा सोपा, लौकिक पण अलौकिक असा उपाय योजिला.)

मानवी जीवन हे विविध परींनीं नटलें आहे. व्यक्तिव्यक्तीमधील चिदंश एकरूप असला तरी प्रकृतिपरत्वे त्याचें स्फुरण भिन्नतया प्रकट होतें. समाज ह्या सर्वांचें समवायरूप असतो. समाजाचा उद्धार करणारानें त्यातील सर्व थराना सहज कळतील असेच वाणीचे विलास करावयास पाहिजेत आणि त्यांतील साऱ्या आचारविचारात, गुणकर्मांत एकत्वाचें, समतेचे सूत्र कसें अनुस्यूत आहे हें दर्शवावयास पाहिजे. नाथानीं आपल्या काव्याचें आलंबन समाजातील ह्या विविध पात्रांना आणि गुणकर्मांना केलें तें याचसाठीं. भारुड, ह्या शब्दाच्या व्युत्पत्तीवरून आपण पाहिलेंच की, ह्या गीतांचा व्याप फारच मोठा आहे. त्याचा आणि तीं गीतें गाणाऱ्या व्यक्तींचा संबध समाजाशीं मोठा घनिष्ठ आहे. नाथांच्या काळीं तर तो अधिक निकट होता. जोशी, आंधळा, पागळा, बहिरा, मुका, वासुदेव, बाळसंतोष, पिंगळा, फकीर, गारुडी, डोंबारी, कोल्हाटी, जोगी, जंगम, मानभाव, भाड, सौरी, महार, ह्याजसारख्या व्यक्ति समाजात सर्वसंचारी होत्या. नि रहाट, जातें, दळण, कांडण, घाणा, डेरा, भूत, बाजार, हीं आजहि कोणास अपरिचित आहेत? आणि पशुसृष्टींतील येडका, कुत्रा, बैल, पोपट,

---

1) २५१०, 2) २५२३.

बुलबुल, टिटवी, वटवाघूळ, विंचू, सर्प हीं न पाहिलेला आजहि कोणी ऐकला आहे काय ? आणि ते खेळ ! हमामा, हुतुतु, चेंडू, विटीदांडू, टिपरीं, भोंवरा, फुगडी, पिंगा, एकीबेकी, हीं न खेळलेला निदान त्यावेळीं तरी कोणी झाला असेल असें वाटत नाहीं. आणि या सर्वांपेक्षा अधिक नवलाची गोष्ट म्हणजे नवरा, नवरी, सासर, माहेर, सासरवास, थट्टा, मोतीं हीं ? हीं काय विचारावीं ? खंडोबा, बहिरोबा, मेसाई, जोखाई, यल्लमा, महालक्ष्मी, अंबाबाई हीं दैवतें न नवसिलेला; गोंधळ न घातलेला नि डौर, डाक न ऐकलेला, जोगवा न मागितलेला आणि फुलवरा न बांधलेला, अथवा रोडगा न वाहिलेला आणि शिमगा न खेळलेला असा कोणी असेल काय ? आजहि पद्धिक पोरटपंचीमुळे समाजापासून फटकून वागणारा मुठभर असा नगरांतील वर्ग वगळला तर बहुजनसमाजास हे विषय पूर्ण परिचित आहेत. नाथांच्या काळीं समाजात ते किती प्रभावी आणि समाजास व्यापून उरणारे असतील हे पुन्हा काय सांगावे ? एवंच नाथांचे विषय समाजाच्या अंतरंगापर्यंत जाऊन पोचलेले होते, समाज त्यांच्यावरच अधिष्ठित होता. बहुजनसमाजांत त्याचा सर्वत्र संचार होता; ते समाजाचें अविभाज्य अंग होते. थोडक्यांत म्हणजे ते विषय समाजाचे सर्व संचारी प्राण होते.

## तत्कालीन समाज-जीवन

नाथांनी उत्तर, दक्षिण हिंदुस्थानांत प्रवास केला होता. त्यांची दृष्टि व्यापक आणि निरीक्षण सूक्ष्म होते. इस्लामाच्या वावटळीनें हिंदूराज्यवृक्ष उन्मळून पडला होता, आणि त्या ठिकाणीं मुसलमानी राज्ये स्थापन झालीं होतीं. तथापि त्याहि काळीं हिंदूराजवाटिकेंतील काहीं रोपटीं उफाड्याने वाढण्याचा प्रयत्न करीत होतीं, कांहीं मोडक्या बुंध्यांना कुठे कुठे पालव्या फुटत होत्या आणि कांही नवीं रोपटी निघू पहात होती. मुसलमानाचा पहिला आवेग ओसरला होता. त्यांच्याहि राजवटींत, आणि ह्या जीर्ण आणि नूतन हिंदू रोपट्यांच्याखालीहि बहुजनसमाजाला थोडा आसरा, विसांवा आणि क्वचित सावली मिळत होती. पण एकंदर राजकीय परिस्थिति अस्वस्थकरच होती. यवन सरदारांची आपसांतील असूया हिंदू-यवन सरदारांचीस्वसत्ता-संरक्षिण्याची आणि अधिक संपादिण्याची मनीषा, आणि

त्यामुळे उडणारे खटके, आणि ह्या संधीचा स्वार्थासाठीं उपयोग करणारी पुडपाळेगाराची पुंडाई, ह्यामुळे सत्ता कोणाचीहि असली तरी हिंदू प्रजेलाच विशेष उपसर्ग पोंचत असे. त्यांतच इस्लामी अवलियांनीं आपल्या धर्म-प्रचाराचे सत्र आरंभिले होतें. स्वार्थी, भोंदू, ढोंगी, लोकांनीं समाज पोखरून सोडला होता. दाडग्याच्या दाडगाव्यांतून उरलेलें वित्त हे ढोंगी लोक लुबाडीत; पण त्याहूनहि अधिक शोचनीय गोष्ट म्हणजे हे त्याचें चित्तहि बुजाडवीत. तत्कालीन समाजात यांचा फारच सुळसुळाट झाला होता. यांनीं समाजाचे सांपत्तिक आणि मानसिक शोषण अहर्निश चालविले होतें. समाज आपल्या अज्ञानाने या शोषकाचे पोषण करीत होता. ही दुरवस्था एका विशिष्ट वर्गाचीच होती असे नव्हे तर, सारेच थर सारखेच अवनत झाले होते.

ब्राह्मणांनीं कर्मठपणा वाढविला होता, स्नानसंध्या, वेदपठण, अग्निहोत्र इत्यादिकाचा त्याग करून जारणमारणउच्चाटणादि कर्मांना कवटाळले होतें, अनेक उपासना वाढविल्या होत्या आणि कल्पित मोक्षा-साठीं विविध साधने निर्माण केली होतीं. ते अनेक अवांतर देवताच्या पूजनींहि लागले होते. त्याच्यातील कित्येक 'दावलमलकाच्या गदेचीं पूजा करीत, ताबूत उचलीत, 'तुरबती' वर फुलें वहात, आणि चिल्ली, वल्ली इत्यादिकांचा उपदेशहि घेत आणि मुसलमानी पद्धतीनें उपासहि करीत. कित्येक ब्राह्मण पीरमुरशदांच्या भजनीं लागले होते; आणि उष्टा मलिदाहि खात होते. 'परधर्मोभयावहः' हे वचन केवळ भगवद्‌गीतेंतच उरले होतें. ब्राह्मणासारख्या सच्छील, सदाचारी, मार्गदर्शक अशा बुद्धिमान पण अनासक्त वर्गाचीच ही दशा म्हणावें तर तसेंहि नाहीं. सर्वसंग-परित्याग करून परमार्थांत उर्वरित आयुष्य घालवून निरपेक्ष समाजसेवा करणारे म्हणून एके काळीं प्रसिद्ध असलेले आणि हेंच करण्यासाठीं जनात संचार करणारे संन्यासी, साधु, संत, जोगी, बैरागी, जंगम, मानभाव, फकीर, कलंदर हेहि सारे पोटा-चेच भिकारी झाले होते; आणि ओकारी येईल असे अमंगळ आचरण करीत होतें. सत्ता आणि संपत्ति असलेला ब्राह्मण आणि ब्राह्मणेतर वर्ग म्हणजे पाटील, कुळकर्णी, देशमुख, देशपांडे, चौधरी, चौगुले, शेटये, महाजन हेहि

त्याच माळेचे मणि होते. राजाची खंडणी न देणे, गांवें ओस पाडणें, खोटीं खतें करणें, व्याजबट्ट्याचा व्यवहार करून लोकांना लुबाडणें, खोट्या वस्तु खऱ्या भासवून आपली तुंबडी भरणें, हाच यांचा नित्याचा आचार होता. सरकारी अधिकारीहि याच वर्गात होते. लोकांना बिगारीला धरणें ही यांची नित्याची लीला असून गावे ओस पाडण्यासहि (वसविण्यास नव्हे) हे बराच हातभार लावीत. यांच्या जोडीला गांवांत कांही आगाऊ पाटील असत. त्याचे व्रत लांड्यालबाड्या करण्याचें असून त्यायोगें ते साऱ्या गांवाला सळो की पळो करून सोडीत. आणि ह्या सर्वांच्याहि वर पुंड पाळेगारांचा रगाडा असे तो निराळाच. वाटा-पेठा लुटण्याचा त्यांचा धंदा असून गांवाची जाळपोळ करणे हा त्याचा नित्याचा खेळ असे. एकंदर गांवगुंडी कारभार असून लाच-लुचपत देण्या-घेण्याची कोणालाहि काडीइतकीही लाज वाटत नव्हती.

सुबुद्ध, सत्ताधारी आणि संसारत्यक्त यांचीच अशी दुरावस्था झाली होती म्हणावें तर तसेंहि नाहीं. शेतपोती करणारा वर्ग देखील असाच पतित होता. शेती पडित पाडणें, गवत वाढूं देणें, खंड देतांना खळखळ करणें, थोटपणा करून बलुत्याना बलुतें न देणें, धन्याची बाकी वेळच्या वेळीं न देतां वाढूं देणे आणि अधिक झाली म्हणजे पळून जाणे हा यांचा धंदा असे. झाडपाल्वी सांभाळायची नाहीं, नांगरहाट नीट करायची नाहीं, आणि शेजाऱ्यास सुखाने मुगी खाऊं द्यावयाची नाहीं, ही यांची वृत्ति होती. शेजाऱ्याच्या शिवेचे धोंडे वरचेवर उपटून टाकणे हें यांचें जातां येतांचें काम असे. काळीची सेवा न करतां पांढरी सोडूनहि वरचेवर पळून जाण्याची वृत्ति कुळवाड्यात फार बळावली होती. साऱ्यांनींच कुळाचार सोडला होता आणि अनाचार जोडला होता. मुलें देखील मातापित्यांचें ऐकत नसत. परद्रव्य आणि परस्त्री यांच्याकडे पाहण्याचें कोणासहि पाप वाटेनासें झालें होतें. सख्या मेहुणीशींहि व्यभिचार जेथें करीत तेथें दासी बटकींची कथा काय? आणि मग घरच्या स्त्रियांनीं उंबरठा ओलांडला तर त्यांत चूक कोणाची? साराश असा एकंदर प्रकार होता. कुंटिणी-स्वैरिणींचा सुळसुळाट, गांवगुंडांचा गोंधळ, अधिकाऱ्यांचा धांगडधिंगा, साधुसंतांच्या

नांवाखालीं ढोंगधत्तुरा, पुरुषांची बाईलबुद्धि, लांच, अनाचार, असत्य, कपट, नीचांशीं संगत आणि सज्जनांशीं द्रोह, खऱ्या साधुसंतांचा छळ, भक्ति-नीतीचा उच्छेद आणि पापाचे पर्वत: असा अनाचार, अत्याचार आणि दुराचार त्या काळीं समाजांत फारच बोकाळला होता. (एकनाथकृत अभंग २५३१, २५३२, २५३३, २५३८, २५४१, २५५०, २५५४, २५७२, २६०६, २६१०, २६१८, २६२५, २६४४)

## मानसिक परिवर्तन

नाथांच्या भारुडांतून व्यक्त होणाऱ्या सामाजिक ऱ्हासाचें हें केवळ दिग्दर्शन आहे. अन्त:करण नसलेल्या एखाद्या दगडाला देखील ह्या दृश्यानें द्रव सुटेलमग नीति, दया, शांति सदाचार यांची साकार मूर्ति असलेल्या नाथांना हें पाहून काय वाटलें असेल? निर्गुण निराकार परब्रह्माला अवतार धारण करण्याचें आव्हान देणारा असाच तो काळ होता. तदनुसार नाथांच्या रूपानें तें अवतरले, नि समाजाची अवनती पाहून नाथाची करुणा भारुडाच्या रूपानें प्रकट झाली. नाथ हे विशाल अंत:करणाचे थोर कलावंत होते. समाजाचें त्यानीं सूक्ष्म निरीक्षण केलें होतें. समाजाची उन्नती करावयाची असेल तर त्याच्या अन्तरंगांत शिरून जोंपर्यंत त्याचीं सत्य नि काल्पनिक सुखदु:खें समजून घेतलीं जात नाहींत आणि तीं समाजाला पटेल अशा रूपांत प्रगट केलीं जात नाहींत, तोंपर्यंत समाजहि त्यांजकडे दुरूनच पाहतो. नाथांनीं ह्या पतित समाजास द्यावयाची मात्रा शोधून काढली होती आणि ती समाजास न कळत त्यांना द्यावयाची होती. समाजांतील दुष्प्रवृत्तीचा जोपर्यंत नायनाट झाला नाहीं आणि सत्प्रवृत्ति त्यांत जोपर्यंत उदित आणि प्रफुल्लित झाल्या नाहींत, तोपर्यंत समाजास स्वास्थ्याची आशा नाहीं, हें ते जाणत होते. म्हणूनच मानवी मनाची ठेवण पालटण्यासाठीं, सदाचार त्याच्या अंगवळणी पाडण्यासाठीं त्याचा हा खटाटोप होता. राज्यादिकांच्या ऐहिक वैभवांपेक्षां मानवता अधिक महत्त्वाची असल्याकारणानें समाज मानवी सद्गुणांनीं पुष्ट व्हावा, मानवी मनांत सद्भावनांची ज्योत प्रज्वलित व्हावी हीच त्याची एकमेव मनीषा होती. सामाजिक विनाश टाळण्यासाठीं आणि पारमार्थिक नि ऐहिक सुख साधण्यासाठीं नीति, सदाचार आणि सत्प्रवृत्ति

ह्या मूलभूत तत्त्वांवर दृष्टि ठेवून त्यांनीं तत्प्रसारार्थ प्रयत्न केला. त्यासाठींच त्यांनीं भारुडांची ही पोतडी सोडली आणि समाजांत सर्वत्र संचार करणाऱ्या ह्या पात्रांच्या योगानें लोकशिक्षण दिलें. निर्गुण निराकार परब्रह्माला ज्याप्रमाणें मायेच्या उपाधीनें आकार धरावा लागतो, त्याप्रमाणें नाथांच्या ब्रह्मस्वरूप सत्त्वोद्रेकांना जनतेच्या, प्रकृतीच्या स्वभावधर्मानुसार आणि गुणकर्मानुरूप विविध आकारविकार धारण करावे लागले. भारुडांची पार्श्वभूमि ही अशी उदात्त आणि व्यापक आहे. कलावंताचे खरें मर्म दर्शवून नाथांनीं समाजसापेक्ष असें जें लेणें मराठीमहालक्ष्मीच्या अंगावर चढविलें तें विविधतेनें, विपुलतेनें, सर्वसंग्राहकतेनें नि बहुगुणसंपन्नतेनें मानवी बुद्धीला थक्क करून सोडतें. पांगारकरांनीं त्यास वेरुळच्या लेण्याची जी उपमा दिली ती अगदीं यथार्थ वाटते.

## भारुडांचें अंतरंग-निरीक्षण

नाथांनीं एकंदर किती भारुडे लिहिलीं हें निश्चित सांगतां येत नाहीं. इतरांचींहि भारुडें त्यांच्या नांवावर आहेत आणि त्यांचींच इतर भारुडे वस्तुतः भारुडें असूनहि अभंगात समाविष्ट आहेत; आणि कित्येक अद्याप अनुपलब्ध आहेत. तथापि प्रस्तुतच्या संग्रहावरून पाहतां ठोकळ मानानें तीं तीनशेपेक्षां अधिक भरतात. एवढीं भारुडे मराठी वाङ्मयात दुसऱ्या कोणाहि कवीने लिहिलीं नाहीत. स्थूल मानाने त्याचें वर्गीकरण पुढीलप्रमाणे केलें आहे. देवदेवता नि भक्तिपर, वित्त—विद्या—सत्तामदांधासाठीं, भोळ्या बहुजनसमाजासाठीं, संसारगीते नि दैनंदिन कर्मे, खेळ याजवरील; दुष्ट दुराचाऱ्यांचीं, प्राणीसृष्टि नि भूतसृष्टि, सर्व धर्मपंथांची एकवाक्यता सुचविणारीं, आणि अवांतर. यांत कूटात्मक रचना नीति उपदेश इ. येतात. त्यांत संसारी माणूस, त्याच्या देवदेवता, धर्मपंथ, गांवातील वरिष्ठांशीं येणारा त्याचा संबंध, संसारोपयोगी वस्तू करमणुकीचीं साधनें, सुष्टदुष्टांशीं,—मग तें प्राणी, पशु, मानव वा कल्पित कांहींहि असोत त्यांजशीं येणारा संबंध हे सारे येतात. ह्या साऱ्या जंजाळांत बहुधा मानव प्राणी गुंतलेला असतो. तेव्हां त्या साऱ्या संबंधांतहि परमेश्वरी सूत्र कसें अनुस्यूत आहे आणि त्यांतहि मानवाला परमार्थसाधन कसें करतां येईल हें नाथांनीं कसें दाख-

मिळें, ह्याच्या सोयीसाठीं हें वर्गीकरण आहे. यास्तव त्यांच्या अन्तरंगांत आतां प्रवेश करूं.

## देवतापर आणि भक्तिपर भारुडें

यांत महालक्ष्मी, गोंधळ, डांक, जोगवा, फुलवरा, भुत्या, वाघ्या रोडगा भूपाळी इ. येतात. महालक्ष्मी वरील दोन्हीं भारुडें 'निर्गुण निराकार आदिमायेवर' आहेत. हिलाच नाथ **महालक्ष्मी** या नांवानें संबोधितात. पहिल्यांत ह्या महालक्ष्मीस आपलें निर्गुणरूप आवरण्यास ते विनवितात. ह्याच्या आरंभावरूनच त्यांच्या मनांत काय घोळत होतें तें दिसतें.

**नमो निर्गुण निराकार आदि मूळ माया तूं आकार । महालक्ष्मी तूं साचार ॥ उघडें दार ठेवून बैसलीस बया । बया दार लाव बया दार लाव धृ ॥**

**घेउनि दहा अवतार, करिसी दुष्टांचा संहार आकार सारुनि निराकार, काय बैसलीस? बया दार लाव,बया दार लाव. ॥१॥**
त्वां पूर्वी दशावतार धारण करून दुष्टांचा संहार केला आणि तुझ्या दिवट्यांनींहि तुझा उदो उदो बोलत गोंधळ घातला. शेवटीं

**आषाढी-कार्तिकीं गोंधळ घातला । उदो उदो ऐसा शद्ब जाला**
**काम क्रोधादिकां पळ सुटला । उदो शद्ब ऐकोनी**

यास्तव तूं त्याच विचारांत दार लावून बसलीस. पण बये! सांप्रत काय चाललें तें ऐक :—

**पुढें कलीचा प्रथम चरण । दैवतें राहिलीं लपून**
**तीर्थे सांडोनी महिमान । आठरा वर्ण एक जाले ॥२३॥**
**म्लेंच्छें गांजिले देवभक्ता । महिमा उच्छेदिला सर्वथा ॥**
**न चले जप तप तत्त्वतां । एकरूप सर्व जाले ॥२४॥**
**महालक्ष्मी दार लाव बया! । उदे उदे उदे. बया दार लाव ॥२६॥**
**काम महिषासुर मातला ।तेणें विषय गोंधळ मांडिला ॥**
**अज्ञानपोत पाजळला । आशा संबळ लावोनी ॥२७॥**
**क्रोध वेताळ दारुण । मातलासे मर्दे करून ॥**
**मत्सर-मद साह्य होऊन । भक्तिवैराग्य बुडविलें ॥२८॥**

दंभ-झोटिंग महाबळी । अहंकार मुंजा छळी ॥
आशा-मनषा तृष्णा घेउनि गोंधळी । विषय कल्लोळीं नाचतु ॥२९॥
कल्पना इच्छा वासना भुतावळी । औट कोटिया मिळाली ॥
नाचती विषय कल्लोळीं । भोग-दिवटी घेउनी ॥३०॥
ऐसें तुज न पहावें जाण । म्हणोनी बैसलीस मौन धरून ॥
विटेवरी समचरण ठेवून । निवांत रूपें बया ॥३१॥
एकाजनार्दनी शरण । विठ्ठलनामें अंबा जाण ॥
पुंडलीक दिवटा अवलोकून । निवांतरूपें बैसलीस ॥
बया दार लाव बया दार लाव ॥३२॥ (२३७५

यांत(नाथांनीं धर्मोच्छेदाचे कारण सांगून त्याच्या दुष्परिणामाचे गाऱ्हाणें जें अंबेस ऐकविलें ते अन्तःकरणाला पीळ पाडणारें आहे. समाजाच्या उद्धारासाठीं आणि धर्माचरणाचा मार्ग मोकळा करण्यासाठीं, निर्गुणास आपलें निराकार स्वरूप आच्छादून, निर्गुणद्वार लाव म्हणून प्रथम विनवून,)पुढें ते(दुसऱ्या भारुडांत त्याच अंबेला सगुणाचें दार उघडण्यास आळवितात. अर्थात दोन्ही एकाच महालक्ष्मीवरील भारुडें असल्यामुळें ह्यासहि 'महालक्ष्मी' हेंच नांव आहे. हें भारुड पहिल्यापेक्षां अधिक ओजस्वी आणि काव्यमय आहे. ह्याचा आरंभच किती दिव्योदात्त आणि बुद्धीला थक्क करून सोडणारा आहे!/

नमो आदिमाया भगवती । अनादि सिद्ध मूळप्रकृती ॥
महालक्ष्मी त्रिजगतीं । बया दार उघड, दार उघड ॥
हरिहर तुझें ध्यान करिती । चंद्रसूर्य कानीं तळपतीं ॥
गगनीं तारांगणें रुळती । तेवी भांगीं भरले मोतीं ॥
नवखंड पृथ्वी तुझी चोळी । सप्त पाताळीं पाउलें गेलीं ॥
एकवीस स्वर्ग मुकुटीं झळाळीं । बया दार उघड, दार उघड ॥

विराटस्वरूपिणी महालक्ष्मीचे असें ध्यान करून तिच्या सर्वसंचारी रूपाचें ते पुढीलप्रमाणे आवाहन करतात.

अलक्षपूर भवानी दार उघड बया । माहुर-लक्ष्मी दार उघड बया ॥
कोल्हापुर लक्ष्मी दार उघड बया । तैलंगण लक्ष्मी दार उघड बया ॥
तुळजापुर लक्ष्मी दार उघड बया । पाताळ लक्ष्मी दार उघड बया ॥

**कानाड लक्ष्मी दार उघड बया । अष्टभुजा लक्ष्मी दार उघड बया ॥**
**पंढरपुर निवासिनी दार उघड बया । दार उघड बया, दार उघड बया॥**

(नाथांची महालक्ष्मी अलक्षपुरापासून माहुर, कोल्हापुर, तुळजापुर, तेलगण, कर्नाटकादि प्रांतांना व्यापून पंढरपुरांत राहणारी आहे. पैशा पासरी दैवताचा उपसर्ग दूर करण्यासाठीं नाथानीं तिला 'बया दार उघड' म्हणून ललकारी ठोकली आहे.)

**वेताळ, फेताळ, खंकाळ, । मारको, मेसको, भैराळ, ॥**
**जागाई, जोखाई, क्षेत्रपाळ, । म्हैंशासुर दैत्य मातला प्रबळ ॥**
**अबब, पीडा केली अंबे, । बया दार उघड, दार उघड ॥**

(नाथांची महालक्ष्मी जितकी सर्वव्यापी आहे तितकीच त्यांची उपासनाहि सबाह्यांतरंगाचें समर्पण करणारी आहे.)

**उदो उदो ऐसा शब्द गाजतो । कामक्रोध दैत्यांवर कोरडा कडकडा वाजतो**
**ज्ञानपोत पाजळतो । बोध-परडी हातीं घेतो ॥**
**प्रेमाचा पाऊल पुढें ठेवतो । अहंशंखासुर दैत्य बळी देतो ॥**
**बया दार उघड, बया दार उघड ॥**

(अशा प्रकारे त्यानी तिची उपासना केली आणि नाथांना जगदंबा प्रसन्न झाली.)

**जगदंबा प्रसन्न झाली । भक्ति कवाडें उघडलीं ॥**
**शंखचक्रांकित शोभली । कोटी चंद्रसूर्य प्रभा वेल्हाळी ॥**
**एकाजनार्दनीं माउली । करी कृपेची साउली ॥**
**भक्तजयाकारणें संपूर्ण झाली । बया दार उघड, दार उघड ॥** २३७६

(हीं दोन्ही भारुडें अत्यंत काव्यमय, रसाळ आणि भक्तिभावभरित असून नाथांची निर्गुणात सगुण आणि सगुणांतहि निगुर्ण पाहण्याची दृष्टि व्यक्त करणारी आहेत. त्यांची महालक्ष्मी दहा अवतार धरते. तीच श्रीकृष्णहि आहे, जगदंबाहि आहे; आणि तीच विठाई माउलीहि आहे. नाथ सर्व दैवतें अशीं अभेदानें पहात, त्यांची महालक्ष्मीच 'मरीआईच्या' नि 'यलमाच्या' (२४६७) रुपानेंहि नटते.

नाथांनीं ह्या जगदंबेवर 'फुलवरा' हि बांधिला आहे. त्यांची देवी जितकी व्यापक तितकाच हा फुलवाराहि प्रसादपूर्ण आहे.

**जय जगदंबे पूर्णकदंबे जग उद्धोयें देह तुज अर्पिला ।**
**तुज म्या फुलवरा बांधिला ॥धृ॥**
**पिंडांड ब्रह्मांड अंतरीं दैवत भिन्नाकृती वो ।**
**शोधुनि पाहतां अवघे चराचर व्यापक घनसंभूती वो ॥**
**भेदभाव त्रिगुणाचा रज - तम - सत्वाची आरती वो ॥**
**ऐसें जाणुनी, केली उभवणी, द्वैत सारुनी, परी तो मनीं**
**एक हरि अंकिला ॥**
**तुज म्या फुलवरा बांधिला ॥१॥ ....**
**ऐशीं दैवतें केलीं अनंतें नवस बहु फेडिले ।**
**परी ते फलकट आले शेवटीं गळां येउनी पडिलें ॥**
**बहु जाचिलें, दुःख भोगिलें, दिशीं व्यापिलें,**
**चौदिशीं व्यापिलें वो ।**
**जालें मी उदास, । धरिली कास । सोडुनी आस ।**
**पंढरी पाहुनि जीव हर्षला ॥ ६ ॥**

( ह्या जगतीतलावर अनेक दैवतें आहेत पण विचार करून पाहतां सर्व चराचर त्या श्रीहरींतच सामावलें आहे. यास्तव द्वैत भावना दूर सारून, अन्य दैवतांचें फलकट फेंकून देऊन पंढरी–पांडुरंगाच्या भक्तीचा फुलवारा मी बांधला '**तेणें मज बुडतां हात दिधला**' हें नाथांनीं मोठ्या मार्मिकपणें सांगितलें आहे. अवांतर दैवतांच्या पूजनाचे विधि आणि त्यांची भवदुःख निवारण्याची असमर्थता ह्यांत मोठ्या निर्भिडपणें आणि आवेशपूर्ण भाषेंत नाथांनीं वर्णिलीं आहेत.) नाथांच्या उत्तम काव्यांपैकीं हा भाग आहे. वाचकांनीं तो मुळांतून अवश्य वाचावा.

( देवीच्या उपासनेंत जोगवा, गोंधळ, डांक यांचें विशेष महत्त्व आहे.) नाथांनीं मागितलेल्या जोगव्याचें स्वरूप पुढीलप्रमाणें आहे : ( "द्वैत सारून मी माळ घालीन, हातीं बोधाचा झेंडा घेऊन भेदरहित वारी करीन, नवविधा भक्तीच्या नवरात्री करून ज्ञानपुत्र मागेन, सद्भाव मनीं धरीन, दंभ सासरा सोडीन; पूर्ण बोधाची परडी हातीं घेऊन आशातृष्णेच्या

दरडी पाडीन आणि मनोविकाराची कुवेंडी करून अद्भुत रसाची परडी भरीन. आतां मी निसग झाल्यें; विकल्प पति त्यागून कामादि मांगांना झोडपून मार्ग मोकळा केला. असा जोगवा मागून महाद्वारीं मी नवस फेडला आणि जन्ममरणाचा फेरा चुकविला") २५६२. ह्या जोगव्याला अनुरूपच त्याचे गोंधळ आहेत. त्यांत कुठें "ब्रह्मानंदाचा गोंधळ घालून सुखाचा सुकाळ मातविला" २५७५, तर कुठें "स्वर्ग-मृत्यु-पाताळांचा मंडप घालून चार वेदांचा फुलवरा बांधिला आणि शास्त्रपुराणांचा गोंधळ घालून, "उदो बोला, उदो बोला कृष्णाबाई माउलीचा" असा जयजयकार केला २५७७; कोठें 'अष्ट धातूंचें देवालय रचून भीवरेमाझारीं विठाईपुढें गोंधळ घातला २५७८; तर कोठें 'वैष्णवी माउलीचा गोंधळ घालून ती एकच असून तिनें दशावतार कसे धरले आणि तीच एकाजनार्दनात कशी सहजीं सहज ऐक्याला आली २५८२ हें सांगितलें. असा नाथांनीं "गोंधळ घातला आणि भला परमार्थ लुटला" २५८१. हें सारे गोंधळहि फार भव्यो-ज्ज्वल आहेत. अशा प्रकारची दिव्यता प्राप्त होण्यासाठीं 'डाक' फारच एकतानतेनें वाजवावी लागते. डाकेचा नादनिनाद जर हृदयाकाशांत दुमदुमला तरच ती विश्वव्यापक भवानी गोंधळात येऊन उभी राहते. नाथांनीं "डांक" मोठ्या तन्मयतेने वाजविली आहे. "हृदयाचा चौक भरला, वर आनंदाचे भोग अंथरले; आणि सोहं सुमनमाळ घालून पूर्णत्वाचा घट त्यावर स्थापला. अहं धूप जाळून भावानें धूपारती केली आणि त्रिगुणाच्या वाती लावून चिन्मयारती ओंवाळली. भेदवचन छेदून षड्रस पक्वानें केलीं आणि पूर्णत्वाच्या पात्रांत भरून आत्मनिवेदनानें नैवेद्य दाखविला." हें पाहून निजभाव प्रकट करीत, गळा तुळशीमाळा धरून वैष्णव जयजयकार करतात नि आनंदानें नाचतात; आणि असें काया वाचा मनानें शरण येऊन स्तवन करतांच अंबा प्रसन्न होते २५८०."(नाथांच्या ह्या स्तवनांचा नि कवनांचा प्रकार असा अद्भुत आणि आनंदोल्लास प्रकट करणारा आहे.) स्थलाभावी सर्वच उतारे देणें शक्य नाहीं. यास्तव वाचकांनी तीं भारूडें स्वतःच वाचावींत; आणि आनंदाचा प्रसाद घ्यावा.

निर्गुण निराकाराम सोडून साकारलेल्या दशावतारधारिणी विठ्ठल-कृष्णाई-जगदंबा-महालक्ष्मीची अशी स्तुति करून नाथ ह्या भवानीरूपि-

णीला "अनुहात चैंवंडंक डुगडुग वाजवीत, बोधाची परडी घेऊन ज्ञानाचा संबळ नादवीत आणि अज्ञानाचा पोत जाळीत, 'भवानी ! मी तुझा खरा भुत्या आहे" असें आळवितात २६२२. भवानीप्रमाणेंच त्यांनी खंडोबावरहि दोन भारुडें लिहिलीं आहेत. खंडोबा महाराष्ट्रीयांचें दैवत असून तो महादेवाचा अवतार आहे. महाळसा ही पार्वतीचा अवतार असून वाघ्या आणि मुरळी सेवक आहेत. तो वीरांचा देव आहे आणि त्याचें वाहन घोडा आहे. इत्यादि, ह्या देवासंबंधीं पागारकरानीं विवेचन केलेंच आहे. हा देव जाधवांच्या तर पूर्वीचा आहेच पण तो जाधवांच्या फारच पूर्वीचा असून त्याला देवत्व प्राप्त होऊनहि बराच काळ तेव्हां लोटला असावा असें त्याच्या नावावरून दिसतें. 'खंडेराय' हे नांव कानडी दिसतें. कानडीत मराठीप्रमाणेच 'खांडा' ह्या शद्बाला 'तलवार' अर्थ आहे. यावरून तलवारधारी देव असा त्याचा अर्थ आहे. याचा सेवक 'वाघ्या' हेंहि 'वागय्या' म्हणजे सेवक ह्या शब्दाचे अपभ्रष्ट रूप आहे. त्याचप्रमाणे याचा जयजयकार 'येळकोट घे' 'येळकोट घे' यातील 'येळकोट' हा शद्ब एळु+कोट म्हणजे सात कोट, असा सात कोटी सैन्याचा निदर्शक आहे. जेजुरीच्या 'खंडोबा'च्या भोवतीं ज्या अनेक देवता आहेत त्यात 'हेगडे' या नांवाची एक देवता आहे आणि तिचा अर्थ सेनापति असा आहे. पुरुष सेवकाना जसे वाघ्या म्हणतात तसे याच्या स्त्रीसेविकाना 'मुरळी' म्हणतात. देवाना मुली वाहण्याची ही प्रथा दक्षिणेंतील असून आजहि ती तिकडे अस्तित्वांत आहे. मद्रास प्रांतानें "देवदासींचा कायदा" केला हें सर्वश्रुतच आहे. वास्तव कानडया विठ्ठलाप्रमाणें हे कानडे 'खंडेराय' हि महाराष्ट्रांत स्थिर झाले असावेत असें वाटतें. (पिंगळ्याच्या भारुडात नाथानी "कानड्या खंडेराया" २५५३ असा ओळख ठेवूनच त्याचा उल्लेख केलेला आहे.) हा मल्लांचा अरि असल्यामुळें याला मल्लारीहि म्हणतात. नाथाचीं या देवावरील दोन्ही भारुडें नितांत सुंदर आहेत.

> **अहं वाघा सोहं वाघा। प्रेम नगारा वारी। सावध होउनि भजनीं लागा देव करा कैवारी ॥ मल्लारीची वारी माझ्या मल्लारीची वारी ॥ २६२३**

यांत ते इच्छा मुरळीस न पाहतां ज्ञानदिवटी पाजळण्यास आणि आत्मनिवेदनाचा भरीत रोडगा वाहण्यास सांगतात. दुसऱ्यांत

**वाहन तुझें घोड्यावरी। वरी बैसली म्हाळसा सुंदरी॥**
**वाघ्या मुरळी नाचती परोपरी॥**

असे वर्णन करून आपण ज्ञानकोटंबा घेऊन बोधाचा भंडार लावला आहें आणि तुझ्या वारीचा भिकारी झालो हे सांगतात.

या सर्व भारुडांतून नाथांनीं निर्गुण निराकार परमेश्वर आणि सगुण साकार दशावतार, त्याच प्रमाणें कृष्ण, विठ्ठल, महालक्ष्मी. जगदंबा भवानी, शिव, शक्ति इत्यादि सारीं दैवतें एक असून त्यांची उपासन-त्यांनीं दर्शविल्याप्रमाणे केल्यास, तीं सर्वांचें संरक्षण करतात हें दर्शविलें असून, इतर तामसी दैवतें क्षुद्र असून तमोगुणांना वाढविणारीं असल्या, मुळें त्याची उपासना मनाचें अंतिम समाधान करूं शकत नाहीं, हें प्रतिपादिलें आहे हीं देवतापर भारुडें पुष्कळच आहेत पण सर्वांचा विचार येथें करतांहि येत नाहीं, आणि सर्वांतहि अधिक उण्या प्रमाणांत हीच विचारसरणी असल्याकारणानें वर त्यांच्या थोड्याशाच भारुडांचा विचार केला आहे, आतां शेवटीं त्यांची अत्यंत आल्हादकारक अशी भूपाळी देऊन हा भाग आटोपता घेऊं.

**श्री-जगदंबे भक्तपालके महिषासुरमथने। त्रिपुरसुंदरी जगद्वयके उठ कल्मष दहने॥ कमलासन, भव, रमेश मघवा अष्टौ दिक्पाल। अष्टवसु अर्यमा मरुद्गण आश्विनीचे बाळ॥**
**सहपरिवारें येती निर्जर साधुनिया वेळ। गौतम विश्वामित्र पराशर वशिष्ठ भृगु कपिल॥ वेद स्तुतीने स्तवन करिती बहुत मंजुळ। गंधर्वादिक सिद्ध चारण गाती धरुनि ताल॥**

**चाल :– अष्टसिद्धि बुद्धि रिद्धि अद्रिकुमरा। पतिव्रता साध्वी अहिल्यादि तारा॥ पाजळुनी आरत्या तिष्ठती तव द्वारां। मंजुळ गीत गाती कितीं एक मधुरा॥**

**चाल :– अरुणोदय जाला अंबिके ललितांबुज वदने। त्रिपुरसुंदरी जगद्वयके उठ कल्मषदहने॥१॥ सायंकाळीं वृक्षीं द्विजगण होते ते उठले। कमळीं षट्पद निशीं गुंतले तेहि मुक्त जाले॥**

यात्रिक जन पंथानें सिद्धता करुनी चालले । अग्निहोत्री देती आहुती कर्मीं जे आगळे ॥ सौर उपासिती सूर्या, वैष्णव विष्णूतें स्मरलें । शैव अर्चिती शिवा गजानन भक्त पूजनीं रतले ॥

चाल :- पश्चिमेसी गेला रमाबंधु गगनीं । उदय करूं पाहे उदयाद्रीं तरणी दृर् विंदलीत नयनें भुवनत्रय जननी (?)

चाल :- दुर्गे अंबे प्रणवरूपिणी चंडमुंड मथने । त्रिपुरसुंदरी ... ॥२॥ चतुर्भुजीं आयुधें धरावीं दुष्टांच्या दमना । शिष्टजनां पाळावें विघ्नें नासुनिया नाना ॥ विद्यार्थ्यासी विद्यारूपें द्यावी धारणा । धनार्थियाच्या लक्ष्मीरूपें प्रगटावें सदना ॥ अपुत्रियासी पुत्र सुलक्षण द्यावें संताना । संकटिं नाना रक्षिलें (रक्षितील जे) रक्षुनिया माना ॥

चाल :- श्रवण करूनी माता अति सत्वर उठली ।
कोटी सूर्य भानु असी मूर्ति दिसली ।
गजर दुंदुभीचे पुष्पवृष्टि सुटली ॥

इच्छित वर सर्वांसि देतसे इच्छित स्मितवदनें । जनार्दनाच्या हृदय-मंदिरामध्यें जिचीं चरणें ॥ त्रिपुरसुंदरी ॥३॥ २५८३

ज्यांनीं निर्गुण निराकारास आपलें निर्गुण स्वरूपाचें दार लाव म्हणून सांगितलें आणि सगुण स्वरूपाचें दार उघड म्हणून सगुण स्वरूपाचा अवतार धारण करण्यास विनविलें, ज्यांनीं तिजवर तो ज्योतिर्मय फुलवरा बांधला आणि अन्तःक्षोभ शमविणारा गोंधळ घातला, त्याच नाथांच्या वाणींत अशी भूपाळी आळविण्याचें सामर्थ्य आहे. विश्वव्यापक जगदंबेला साजेसेंच हींतील वर्णन असून नाथांच्या अन्तःकरणाला व्यक्त करील अशीच मागणी आहे. (नाथांना स्वतःसाठीं काय मागायचें होतें ? सांगायचेंहि लोकोद्धारासाठीं आणि मागायचेंहि लोकोद्धारासाठीं ! अंबे, तूं दुष्टाचा संहार कर नि सुष्टांचा सांभाळ कर, विद्यार्थ्यांना विद्या दे नि धनार्थ्यांना संपदा दे, पोटीं सुलक्षणी सतती होऊं दे, नि संकटीं प्राण आणि मान राखण्याच्या कामीं येऊ दे. हे नाथाचे मागणें त्या काळीं तर योग्य होतेच, पण आजहि तें किती समयोचित आहे. आणि कोण याहि काळी जनतेच्या अभ्युदयासाठीं मागणें याहून अधिक काय असणार ?) नाथांचें हेंच दान

देवीदासानेंहि व्यंकटेशस्तोत्रांत मागितलें आहे; आणि ह्याच भूपाळीच्या हृदयमंदिरांतून होनाजी बाळाच्या 'घनश्याम सुंदरा श्रीधरा' ह्या भूपाळीचा अरुणोदय झाला असला तर त्यांत नवल काय ? ही आहेच तशी अलौकिक त्रिपुरसुंदरी !

देव देवता यांच्या ठायींची आपली भक्ति व्यक्त करून, आणि इतरे जनांस भक्तीचा पंथ दर्शवून, आणि त्यांच्या ऐहिक कल्याणाची देखील कळकळ दाखवून, नाथांनीं त्यांच्या आचरणाचे मार्ग सुधारण्याचा प्रयत्न केला. यांत प्रथम दुष्टांचा समाचार त्यांनीं घेतला आहे. हे दुष्ट साधेभुधे नसून त्यांना सत्ता, संपत्ति वर्णाश्रमधर्म यांचा पाठिंबा होता. या रचनेंत जोहार, अर्जदास्त, ताकीदपत्र, कबूलपत्र, जाबचिठ्ठी, किल्ला, जमाखर्च, अभयदान आणि एतत्सदृश पन्नासच्यावर भारुडें येतात यांत नाथांनीं, समाजांत ह्या सत्तामदांधाचा कसा उपसर्ग पोंचतो, हें मोठ्या मार्मिकतेनें दर्शविलें आहे. जोहार हे तर बोलून चालून महारांचेच. यांत नाथांना आपलेकडे मोठेपणाची भूमिका घेणेंच शक्य नव्हतें. पण ह्या नम्रतेंत अंगाचे सभाडे काढण्याचें सामर्थ्य आहे. महारासारख्यानें मोठ-मोठ्यांनाहि तत्त्वज्ञानाच्या नि उपदेशाच्या गोष्टी सांगणें आणि प्रसंगीं निर्वाणीचें उत्तर देऊन कान उपटणें, यांतच त्याची सारी तीक्ष्णता आणि वज्रासारखें कठीणपण आहे. समानांचा उपदेश सहन होतो. वरिष्ठांचा आदरानें ऐकावा लागतो; पण यःकश्चितांनीं हा आव आणला तर मनुष्य आकाशपाताळ एक करण्यास उठतो. तें कसेंहि असलें तरी ह्यावरून एक गोष्ट स्वच्छ दिसते कीं लहानांवर, हीनांवर, उपदेश करण्याचा प्रसंग आला आहे, त्याअर्थी वरिष्ठांचा कल्पनातीत अधःपात झाला असला पाहिजे. त्यावांचून महाराला असा लहान तोंडीं मोठा घास पचला नसता. नाथांनीं हें महारांचें पात्र फारच विचार करून निर्माण केलेलें दिसतें. ना धन, ना मान, ना वस्त्र, ना पात्र असा हा सर्वतोपरी दीन समाज. सत्ता पहावी तर सर्वांची सेवा करणें, सामाजिक अवस्था सर्वांच्या खालची आणि लेखनवाचनादि शिक्षणक्षेत्रांत अक्षरशत्रुत्व. तेव्हां अशा प्रकारें सर्वतोपरि हीन, दीन, अनाथ असें पात्र निवडून नाथांनीं औचित्याचा कळस गांठला आहे. सत्ता, वित्त, जातिवर्णादिकांचा अभिमान नि ज्ञानाचा गर्व इत्यादि अनेक

व्याधींवर धावयाची ही एकच मात्रा पाहिली म्हणजे ह्या धन्वंतऱ्याचें अत्यंत कौतुक वाटतें. तत्कालीन समाजास त्याची अत्यंत आवश्यकता होती हें दिसतें. महारबावडींतलें हें तीर्थ पावन तर आहेच, पण फार ढाळकहि आहे. त्याच्यात आजहि सत्तावित्तविद्याधांचे डोकें ताळ्यावर आणण्याचें सामर्थ्य आहे. नाथानीं महारांच्या ह्या भूमिका मोठ्या आमीयतेनें वठविल्या आहेत. त्यांजवर भाष्य करण्यापेक्षां त्या मुळांतच ज्यानें त्यानें पाहणें बरें. येथें केवळ दोन तीन जोहारच उतरून घेतों.

**जोहार मायबाप जोहार : माझें नांव विठनाक महार ॥**
**सांगतों ऐका एक विचार । तो वळकट धरा कीं जी मायबाप ॥१॥**
**गांव पांचा पंचवीस प्रजेचा । तेथें कारभार सहाजणांचा ॥**
**तो ऐकिजे मायबाप ॥ ॥२॥**
**ज्या धन्याचे पदरीं शेर । त्यासी नाहीं कधीं जोहार ॥**
**आघवा आईजींचा कारभार । काम करितो कीं जी मायबाप ॥३॥**
**आबाजींनीं हवालीं केला गांव । धन्याचें विसरला नांव ॥**
**तलफ आल्यावरी ठाव । पळावया कैंचा कीं जी मायबाप? ॥४॥**
**जेव्हां तलफ लागे बाकीची । तेव्हां तुम्हां सुद बुद कैंची? ॥**
**म्हणून या सहाजणांची । भीड धरूं नका कीं जी मायबाप ॥५॥**
**सहा जणें राहतील एकीकडे । गांठ तुम्हां आम्हांसींच पडे ॥**
**मग कोणी इकडे तिकडे । हलों न देती कीं जी मायबाप ॥६॥**
**करा भक्तीची कुळवाडी । धरा हरिनामाची गोडी ॥**
**नाहीं तरी चौऱ्यांशींची बेडी । पायीं पडेल कीं जी मायबाप ॥७॥**
**तेथील मार्ग सपाट । विष्णु लोकीं वाजवा घांट ॥**
**मग धुडधुडा वाट । धांवल कीं जी मायबाप ॥८॥**
**एका जनार्दनी कुळवाडी मोठा । तेणें बाकीस मारिला फाटा ॥**
**उघडा केला दारवंटा । कैलासींचा कीं जी मायबाप ॥९॥ २५४१**

दुसरा जोहार असा

**जोहार मायबाप जोहार । मी विठोबा पाटलाचा महार ॥**
**सांगतो सारासार विचार । ऐका कीं जी मायबाप ॥१॥**
**गांव तो पांचा पाटलांचा । पंचवीस प्रजांचा ।**
**तेथें सहाजणांचा । कारभार कीं जी मायबाप ॥२॥**

ज्या धन्याचें हें शहर । त्या धन्यासी नाहीं जोहार ॥
अवघा ओढिती कारभार । ऐजीकडे कीं जी मायबाप ॥३॥
ऐजीची चाली फार । सारा ओढिताती कारभार ॥
परी सहा जणांसी आधार । ऐजीचाच कीं जी मायबाप ॥४॥
बाप तुम्ही धन्यासी राजी राखा । नाहीं तरी शेवटीं होईल धाखा ॥
मग कोणी नाहीं सखा । सोडविता कीं जी मायबाप ॥५॥
कामाजी बाजी हुद्देदार । क्रोधाजी हा सरदार ॥
यांचे वेगळाले विचार । ऐका कीं जी मायबाप ॥६॥
मदाजी बाजीचें वेगळें बंड । त्यासी मिळाला लोभ भाबंड ॥
अवघ्यांनीं मिळोनी थोतांड । रचिलें कीं जी मायबाप ॥७॥
गांव तो होता चांगला । परी या सहाजणांनींच नाश केला ॥
तुम्हीहि त्यांसींच मिळाला । हें बरें काय कीं जी मायबाप ॥८॥
परी ते राहतील एकीकडे । शेवटीं गांठ तुम्हांसींच पडे ॥
मग इकडे ना तिकडे । हो ना कीं जी मायबाप ॥९॥
ऐजीनें यांस कारभार दिला । यांनींच गांवाचा नाश केला ॥
शेवटीं खाईल तुम्हाला । हें बरें कीं जी मायबाप ॥१०॥
गांवांतील तीन पांच थोर । पंचवीस त्यांचा विस्तार ॥
घडी घडी त्यांचा समाचार । घेत जावा कीं जी मायबाप ॥११॥
रयतेचें फार हित करावें । धन्याचे कामासी रुजू असावें
धनासेवेसी तत्पर असावें । लागतें कीं जी मायबाप ॥१२॥
तुम्हांस धन्यानें दिला गांव । तुम्ही विसरला त्याचें नांव ॥
तलब आलिया लपावया ठाव । मग कैंचा कीं जी मायबाप ॥१३॥
तुम्ही धन्यासी करितां चोरी । ऐजीकडे करितां येरझारी ॥
परी या सहाजणांसी सारी दोरी । तुमचीच कीं जी मायबाप ॥१४॥
परी जेव्हां होईल ठावें । तेव्हां कळों येईल स्वभावें ॥
घडी घडी आपुलें हित करावें । लागतें कीं जी मायबाप ॥१५॥
जेव्हां तलब होईल धन्याची । तेव्हां तुम्हां मुदत कैंची ॥
म्हणोनी सहा जणांची । भीड धरूं नका कीं जी मायबाप ॥१६॥
आतां ऐजीची आस्था सोडा । धन्याची बाकी हळूंहळूं झाडा ॥
नाहीं तरी पायीं पडेल खोडा । प्रपंचाचा कीं जी मायबाप ॥१७॥
महार बोलतो म्हणून नका जाऊं गर्वे । नाहीं तरी शरीर राहील हिरवें

आपुलें स्वहित होईल बरवें। तें करावें कीं जी मायबाप ॥३०॥
बाकी साठी आपुली मूळ मुई सोडाल। परमुलखा जरी जाल ॥
तरी बाकीचा निकाल। नाहीं कीं जी मायबाप ॥३१॥
धरा भाव भक्ति कुळवाडी। काढा शेतांतील पेंढी ॥
नाहीं तरी पायीं पडेल बेडी। अविद्येची कीं जी मायबाप॥३२॥-२५३८

## तिसरा जोहार २५३२

जोहार मायबाप जोहार। सद्‌गुरू जनार्दनाचा एक महार ॥
सांगतों ऐका कलियुगाचा विचार। सावधपणें ऐका जी मायबाप ॥१॥
चार युगांमाजीं परम। कलियुग हें उत्तम
करावें हरिभजन सत्कर्म। नामस्मरणें असावें कीं जी मायबाप ॥२॥
ऐशीं वैष्णवभक्तींची लक्षणें। सांगितलीं सर्व खुणें ॥
हें धर्म जो नेणें अधर्म साधनें। करितीं कीं जी मायबाप ॥७॥
अठरा वर्ण याती। यांची सांगतों मति ॥
सावधान ऐका निश्चिती। रागावूं नका कीं जी मायबाप ॥८॥
आम्ही ब्राह्मण म्हणती। स्नान संध्या वेदपठण न करिती ॥
अशौच कर्म जारण मारण जपती। मोहन स्तंभनादिक कीं जी मायबाप ॥९॥
जगीं म्हणती आम्ही साधिलें। साधन तें दूर राहिलें ॥
परस्त्रीनें चित्त गोविलें। कुलुलुलु कीं जी मायबाप ॥१०॥
जालों म्हणती संन्यासी। षड्वैरी हृदयीं अहर्निशीं ॥
परद्रव्य परअभ्यासी। रात्रंदिवस लक्षिती कीं जी मायबाप॥११॥
सहांचा करावा न्यास। तया म्हणिजे संन्यास ॥
नारायणीं नाहीं आस। कासया नाश कायेचा कीं जी मायबाप ॥१२॥
पोट भराक्या फकीर जाला। अल्ला अल्ला म्हणतां जन्म गेला ॥
नसोनी दोष अंगीं लाविला। हाय दोष म्हणती कीं जी मायबाप॥१३॥
जालों म्हणती आम्ही जोगी। राख लाविती वाउगी अंगीं ॥
भोगी, ना त्यागी, ना योगी। वर्म नेणती जोगाचें कीं जी मायबाप ॥१४॥
जोग साधावा उत्तम। न करावें सांसारिक कर्म ॥
साधावें उत्तमोत्तम। वाउगा श्रम करूं नये कीं जी मायबाप॥१५॥

आम्ही जंगम जालों म्हणती । शिव उपासना न करिती ॥
पोटासाठीं भिक्षा मागती । शंख वाजविती भं भं भं
कीं जी मायबाप ॥१६॥

जालों म्हणती मानभाव । अंतरीं शुद्ध नाहीं भाव ॥
वर मुंडिती मस्तक वाव । गुरुशिष्यभाव दाविती
कीं जी मायबाप ॥१७॥

गुरुशिष्य म्हणती । झोळीस झोळी लाविती ॥
गडबडगुंडा जाला म्हणती । कृष्ण कृष्ण म्हणती की
जी मायबाप ॥१८॥

नसोनी काळेपण लाविती अंगी । उगेच सोंग मिरविती जगी ॥
देवाचा द्वेष करिती वाउगी । ही फजीती बरी कीं जी मायबाप ?
॥१९॥

आम्हीं संत जालों म्हणतीं । गळां माळा गोपीचंदन लाविती ॥
दिवटी घेउनी हातीं । उदय उदय करिती की जी मायबाप ॥२०॥

पोट भरावया कीर्तन करिती । लोकां अर्थ सर्व दाविती ॥
बाळें भोळें भोंदिती । आपण वर्म नेणती कीर्तनाचें कीं जी
मायबाप ॥२१॥

परद्रव्य परनारीसी । स्पर्श न करावा निश्चयेंसी ॥
ऐसी मर्यादा सांगती लोकांसी । आपण तेंचि कर्म करिती
की जी मायबाप ॥२२॥

एकविध भक्ति करावी म्हणती । ना ऐकावी आणिकांची स्तुती ॥
कांहीं व्यथा शरीराप्रती । मग देवऋषी पहाती कीं जी
मायबाप ॥२३॥

आणिती निंब नारळ उद सामान । मेंढरें कोंबडे मारिती जाण ॥
वेताळ महिषासुर पूजन । नग्न होऊन करिती कीं जी
मायबाप ॥२४॥

म्हणती खंडेराव दैवत आमुचें । तें कोपलें या साचें ॥
कुळधर्म सांडिले वडिलांचे । म्हणोनि दुःख पावलों कीं जी
मायबाप ॥२५॥

मग गोपीचंदन टाकिती । आदरें भंडार लाविती ॥
भरित रोडगे करिती । येळकोट येळकोट म्हणती कीं जी
मायबाप ॥२६॥

ऐकोनि कीर्तन श्रवण । गीता ज्ञानेश्वरी मनन ॥
आश्विन मास आलिया जाण । शक्तिपूजन करिती कीं जी
मायबाप ॥२७॥

**ऐशियासी एकनिष्ठ भाव । तयासी कायसें वैभव ॥**
**उगेच सोंगाचें गौरव । वाढविती कीं जी मायबाप ॥२८॥**
**एकावधा भक्ति करावी । वाट आणिकाची न पहावी ॥**
**शुभाशुभ येतीं बरवीं । ते प्रारब्धदशेप्रमाणें कीं जी मायबाप ॥२९॥**
**जैसें पतिव्रतेचें मन । सर्व पतीच प्रमाण ॥**
**अपाय उपाय हे तो जाण । ईश्वर प्रमाण कीं जी मायबाप ॥३०॥**
**एका शरण जनार्दन । मी बोलिलों सत्य वचन ॥**
**अनुभवुनी ही खूण । या पंथें जाऊं नका की जी मायबाप ॥३१॥**

यांत नाथांनीं ह्या लोकांच्या अनाचाराचे जें चित्रण केलें तें किती विदारक आणि उद्‌बोधक आहे. इतर जोहारांतूनहि नाथाचा महार असेच दोष दाखवून त्याना जागे करतो.कधीं तो **सालंबाज मारतो हाका । वसूल करा दिवाणीचा टका** २५३१ म्हणून प्रथम विनवितो आणि न ऐकाल तर **मग आरोळी देऊन घातली उडी । एका काढिलें लवडसवडीं । एक उताने उबडी । वाहीयले** २५३१ अशी गत होईल म्हणतो. कधीं ह्या गांवांत (**ममताई आवा पाटलीण मोठी, थोर नायकाची बेटी, मनींची निर्मळ नव्हे, खोटी, लक्षलक्षापत्ति येती तिचे भेटी, पाटलीण आवाचा डेंबा जाला फार, अवघा गांवगुंडी कारभार आवाजी करिती**; आणि पाटील बोवा, **पाटीलबोया स्वप्नीं गुंतले कारभार टाकून निलाजरे झाले**) असा सारा **प्रवेश पाहून दंग झालों** २५३३ म्हणतो आणि कधीं मोठया कळवळ्याने पण निक्षून सांगतो **मोठ्या मोठया सांडून द्या गोष्टी। विठ्ठल चरणीं घाला मिठी । नाहीं तरी एका जनार्दनी बेबटी । ठसतील कीं जी मायबाप** २५४५"

ह्यापेक्षां महारानें अधिक काय बोलावें? आणि बोलायचें ठेवलें तरी काय ! या साऱ्या भारूडांत उपरोध, उपहास आणि सडेतोडपणा असून अन्तःकरणांतील जिव्हाळा, हार्दिक कळकळ आणिक सात्त्विक तळमळ आहे आणि वर सत्याची सहृदयता, साधुत्वाची शुचिताहि आहे. प्रसंगीं ही वाणी कठोर आणि तीक्ष्ण असली तरी परिणामीं कल्याणकारी आहे. यातील कोमलकठोरतेचा संगम खडीसाखरेंतील माधुर्य-काठिण्यासारखा आहे.

आतां नाथांच्या अर्जदास्त अभयपत्राचा प्रकार पहा:—

अर्जदास्त २४७६. अर्जदास्त, अर्जदार, बंदगी बंदेनवाज, अलेकं सलाम साहेबाचे सेवेशीं । बंदेशरीराकार, जिवाजी शेखदार, बुधाजी कारकून परगणे शरीराबाद, किल्ले कायापुरी । सरकार साहेबांची आज्ञा घेऊन स्वार झालों तो परगणें मजकुरीं येऊन सरकारकाम सुरू करावयास लागलों तो परगणे मजकूरचे जमेदार दंभाजी शेटये व कामाजी महाजन व मनीराम देशमुख व ममताई देशपांडीण व क्रोधाजी नाईकवाडी ऐसे हरामजादे फार आहेत. ते सरकारकामाचा कयास चालूं देत नाहींत. दंभाजी शेट्या कचेरीस येऊन जोम धरून बसतो.मनीराम देशमुख आपलें काम परभारें करून घेतो. ममताई देशपांडीण इणें तमाम प्रगणा जेरदस्त केला. क्रोधाजी नाईकवाडी यानें तमाम तफरका केला. तो साहेबापासून जरासध चोपदार आला. त्याने खबर केली कीं मागून यमाजीपंताची तलब होणार. त्यास त्या धास्तीनें तमाम परगणा वोस झाला. बितपशील कलम.......... यावर सरकार काम सुरूं करीत होतो. तों यमाजीपताची परवानगी आली कीं हुजूर येणें, आपणास साहेबांचा आश्रय आहे. एकाजनार्दनका बंदा बंदगी रोषन होय हे अर्जदास्त."

जिवाजीपंत शेखदारांनीं असा अर्जदास्त बंदगींत रोषन केल्यावर सरकारांनीं त्यास 'अभयपत्र' धाडलें तें पुढीलप्रमाणें. २४७७

"स्वस्तिश्री नृपशालिवाहन शके १५२५ आषाढ व॥ ५ गुरुवासरे क्षत्रियकुलावतंस अयोध्याधीश श्रीरामराजा छत्रपती अनंत ब्रह्मांडनायक यांणीं आज्ञापत्र राजेश्री जिवाजीपंत शेखदार मौजे देहगांव तर्फ अष्टपुरी, मामले पंचालेश्वर यांस आज्ञापत्र ऐसा जे. मौजे मजकूर जी खबर बखर लिहून पाठविली तेथील लिहिले की मनाजी देशमुख याणें कामक्रोधादि असुरसेना पुंडपाळेगार मेळवून गांव मारतो, वसाहत होऊं देत नाहीं. ब्रह्मपुरीचा मार्ग चालूं देत नाही याजवरून तुम्हांवर साहेब मेहरबान होऊन मनाजी देशमुख वगैरे यांस तंबी पोहोंचावयास सरकारांतून सुभे रवाना केले. बितपशीलः आत्मानात्मविवेक पंतप्रधान, स्वानुभव सेनापति, प्रबोध सरलष्कर यासमागमें वीतराग वीर दैवी संपदा देऊन ताब

इतोबीनें रवाना केले आहेत. तर मौजे मजकुरीं पावतांच अवघे पुंडपाळेगार मारले जातील. जेरजबरदस्ती करून त्यांस सत्समागमीं लावतील. वर्णाश्रमविधीनें साधनचतुष्टयसंपन्न होऊन सत्समागमीं लागोन नवविधा भजनीं लागोन तुम्हांस अनन्यशरण येऊन वश होतील, तेव्हां साहेबकाम सुरळीत चालोन ब्रह्मपुरींचा मार्ग चालों लागेल तर तुम्हीं आपली खातरजमा राखोन साहेबकामास रुजू राहणे म्हणजे केली सेवा मंजूर आहे. हुजूर आलिया सबंध मोक्षांतील शाश्वतपद इनाम दिल्हे जाईल. सहज पूर्ण निजानंदें रंगोन साहेबकामास तत्पर असणे जाणिजे लेखनअलंकार श्रीसद्गुरुनाथार्पणमस्तु.

नाथांनीं केवळ हें आज्ञापत्रच धाडलें असें नाहीं तर जिवाजीपंतांना आपला कारभार करण्यास सोयींचें पडावें यासाठीं इतर अधिकाऱ्यांसहि सरकारकडून ताकीदपत्र धाडलें आहे तें पुढील प्रमाणें:—

**समस्त राजकार्यधुरंधर परगणें शरीराबाद ॥ सुमातैसलोली प्रमाहे**

ताकीदपत्र दिलें कीं कायापुरास जिवाजी नामें गृहस्थ कऊल देऊन देहगांवची वस्ती रक्षावयानिमित्त पाठविले आहेत. हरएकविशीं साहित्य करावे. मनाजीराव सुभेदार, बुधाजीपंत फडणीस, व चित्ताजीपंत चिटणीस हे पदरीं थोर मनुष्य असतां, अहंकारपंत सबनीस याचे हवालीं सर्व देहगांवच्या कारभार केला. त्याचे (त्यानें) धन्याचे घरचे मुत्सद्दी घरीं बसवून नवीन मुत्सद्दी कामगार उभे केले तें हें चांगलें नव्हे. विकल्पाजी महाजन व मोहाजी शेटये व कामाजी कोतवाल व क्रोधाजी नायकवाडी व द्वेषाजी जमेदार, अधिकार जासूद, लोभाजी पोतनीस, विकारपंत जकातदार, मत्सरजी मेहेत्र्या, कुतर्काजी गस्तवान, उन्मत्तजी पाटील, कुबुद्धिपंत कुळकर्णी, भ्रमाजी शिपाई, मदाजी देशपांड्या, दंभाजी देशमुख, प्रपंचपंत मुजुमदार, मूर्खाजी हुजरे, स्वार्थाजी खिजमतगार, अविवेक पुसपिक, अज्ञान मशालजी हे नवीन कामगार उभे केले. व त्यांतील पहिल्या दासी उभ्या केल्या, त्या आशा, मनशा, तृष्णा, कल्पना, ममता, माया, प्रीति, भुली, भ्रांती, इच्छा, वासना, भ्रमणा, कुबुद्धि, निंदा, अहंता, चिंता, निद्रा, मोहनी ह्या कर्मकर्तव्यवादी अहंकारपंत सबनीस यानें उभ्या केल्या. त्यानीं

दसेबस्त परगणा बुडविला. आणि यमाजीपंत कमावीसदार यांचे घरीं एकान्तस्थळ स्थापन केलें. त्यावरून हें ताकीदपत्र सादर केलें ते मुत्सद्दी व कामगार त्यागावे आणि सरकार हुजूरचे मुत्सद्दी कामगार आहेत तर त्यांचे हातीं काम घ्यावें. मुत्सद्दी तपशील: शुद्ध सत्त्वभाव, वैराग्य, विवेक, बोध, परमार्थ, आनंद, समाधान निर्वैर, स्वानुभव, धैर्य, सत्य, भजन-पूजन हे कारभारी (हे बारा) आणि कार्यकर्त्या सुशीला, सुबुद्धि, उन्मनी, प्रतिष्ठा नवविधामर्यादा, शांती, क्षमा, दया, नम्रता, समाधि, (ह्या सोळा, १८) ह्या कार्यकर्त्या हे मुत्सद्दी यांचे हातीं काम घ्यावें याजविषयीं सरकारांतून ताकीद झाली आहे. तर लिहिल्याप्रमाणें वहिवाट करावी. सबनीस मजकूर यांचे कामगार मुत्सद्दी दरम्यान या कामांत आल्यास पारिपत्य केलें जाईल. हें स्पष्ट समजावें. सरकारकामगार उभे करावे. याप्रमाणें वहिवाट करावी. एकाजनार्दनीं शरण हे आशीर्वाद. हें ताकीदपत्र. २६६१

ह्या तत्कालीन सरकारदरबारच्या भाषेंत लिहूनहि नाथांनीं जनांना हेंच सांगितलें कीं जसे जनांत हे अधिकारी, सत्ताधारी लोक दुष्टावा करतात, तसेच शरीरांत हे विकारहि पीडा देतात. वास्तव जिवाजीपंताचा कारभार व्यवस्थित चालण्यास विवेकपंताच्या साह्यानें वागणें, **नरदेह जमेस धरून, अज्ञानाचा झाडा करून, स्वानंदाचा जमाखर्च करणें २७३९.** ह्या भारुडांतून त्यांनीं जो ह्या रूपकांचा आश्रय केला आणि तींहि अगदीं नित्याच्या परिचयांतलीं उपमानें निवडून, त्या अर्थी ह्या व्यक्तींना तेव्हां महत्त्व प्राप्त झालें होतें. देशमुख, देशपांडे,पाटील, पटवारी, पाटलीण आणि सरकारी अधिकारांतील ही मंडळी आपल्या दुराचारांनीं लोकांच्या चांगलीच परिचयाची झाली असली पाहिजे. नाथांनीं दोषांवर ह्यांचीं रूपकें करून त्यांची नि यांची एकरूपता दर्शविली आणि मोठे औचित्य व्यक्त केलें. ह्या प्रकारें ह्या मार्गानें त्यांनीं ह्या दुष्टांची कानउघाडणी केली आहे. यांत गांवकारभारी, राज्यव्यवस्था आणि शेटसावकार इ. सारेच येतात. प्रपंचांत राहून परमार्थसाधन कसें करतां येतें, हें नाथांनीं यांत किती सुंदर सांगितलें आहे !

बाळया भोळया बहुजनसमाजासाठीं **त्यांनीं** जीं भारुडें रचलीं **त्यांत** नाथ जोशी, वासुदेव, डौर, आंधळा, पांगळा, पिंगळा, शकुन, फकीर, खेळिया, डोंबारी, कोल्हाटी, गारूडी, कैकाय, सरोदा, उदवा, डुगडुग्या ह्या आणि अशाच अनेक रूपानीं समाजांत फिरले आणि त्यांनीं दुर्गुणांचा दुर्गंध जनाला दाखवून दिला आणि तो दूर करण्याचा उपाय सांगितला. जोशी होऊन यांनीं सांगितलें कीं, बाबांनो **रहाट काढाचें दिवस आले, जागे सांडून फेरे केले; सांप्रत घेडा-मांगांच्या मान्यता झाल्या, उत्तम योनी भिकेस लागल्या, स्त्रीसंगतीनें महिमा बुडाली, दरिद्री झाला.** माझें ऐका. **'तिचा संग टाकी दादा, बरवा चालेल तुझा धंदा'** आणि माउल्यानो तुह्मीहि **कुबुद्धि काढून टाका.** असा **जोशी सांगोन जातो होरा भोळया भाविकां लहान थोरा** त्यांचा पिंगळा डुगडुग आवाज करतो आणि परोपकाराकारणे सारासार विचार सांगतो. तो नवा ठाईं फाटका झगा दान मागतो, आणि माझें न ऐकाल तर काळ बाघून नेईल अशी सूचना देतो. ' बाळसंतोष ' हा परात्पराचा भिकारी असून तो भक्तीची भाकरी मागतो आणि दान देणारास तो शिव-पण देतो. नाथांनीं दोन कैकाय लिहिले आहेत. कैकाय म्हणजे कैकाडी. एकीची बोली खोल नि तेलंगीकानडीमराठीच्या मिश्रणाची आहे. **शुळ-गुळाई वो आम्मा बुटगुंडा बुरगुंडा गंदिने, धनाम्ने, तमिम्ने, गबिम्ने** असें अगम्य ती बोलते. तिजपाशीं **ज्ञानकरंडा** असून ती शकुनहि सांगते. दुसरीची भाषा मराठी आहे. **निर्गुण निराकार दादा माहुर माझें गांव। शकुन सांगावया आलें यमाई माझें नांव** असे आपलें नांव गांव सांगून ती कलियुगाचा शकुन सागते कीं, **कलियुगाची दादा ऐकावी थोरी। पुत्र तो होईल पित्याचा वैरी भ्रतारा सोडोनि घरोघरीं फिरतील नारी**

---

जोशी, २५५०, २५५१, २५५२ पिंगळा २५५३, २६१० -२६१३, २७११ **बाळसंतोष** २६१५, २६१६. कैकाय २५१२, २५१६ वासुदेव २६३८, २६३९, २६४०, २६०१ **डौर**, २५१७--२५२८, फकीर, सफेत कलदर, छापा सिद्धी इ० २६२६ २६३६, २७१३, २७१४, २७१८ गारुडा, डोबारो = २५६८–७४ २६५० कोल्हाटी, २४६५ कोल्हाटीण, २४६६. आंधळा, पांगळा, बहिरा, मुका=२५९८, २६०२, २६०३, २६०४, २६०९, २७०७, २७०८, २७०९.

वासुदेव तर फारच गोड उपदेश करीत येतो. वासुदेवनामाचा टाहो फोडतो आणि **सर्व चिंता सोडा, संतपदीं मन जोडा; नाममंत्र घ्या आणि सर्वेशा प्रेम असुं द्या** हें दान तो मागतो आणि शेवटीं **हें दान पावलें सद्गुरु शांतिलिंगा, आत्मया पांडुरंगा, व्यापक अतरंगांत** इ० सांगून भक्तीचा नाद हृदयाकाशांत मिसळून जातो.

ह्या सर्वांहून अधिक सकस सांगणें डौरकाराचें आहे. डौर हें एक वाद्य आहे. 'डमरू' पासून त्याची उत्पत्ति. नाथांनीं एकंदर बारा डौर लिहिले; आणि उपदेशाचा **नादानिनाद** सर्वत्र भरला. ह्या डौरांतून एकदां त्यांनीं पाच नाद काढले. **'चटपट'** नादानें संन्यासाची विटंबना दर्शविली, **'खटपट'** नादानें शास्त्राचा 'खटाटोपो भयंकरः' कथिला, **'फटफट'** नादानें हठयोग्यांची फटफजीती केली, **'लटपट'** नादानें गुरुशिष्यांची लटकी लटपट सांगितली आणि **'तळमळ'** नादानें **नाना व्रतें आरंभिलीं नाना दैवतें पूजिलीं, शेखीं काळें नरडी चेपिली, दुःखें तळमळे गा** अशी जीवाची तळमळ निवेदिली. अशा प्रकारें जीवाची मुक्ति प्राप्त करून घेण्याची कशी धडपड चालली असते पण ती कशी चुकीच्या मार्गाने आहे हें सांगून ते शेवटीं खरा मार्ग सांगतात. **वेदान्ती, सिद्धान्ती धादान्ती** हे सारे लबाड आणि पोटार्थी आहेत, हें दर्शवून त्यांचा डौरकार स्वतःस **'भोगांत'** म्हणवितो आणि स्वमत पुढीलप्रमाणें सांगतो :—

**मज भोगांताचिया वाइका । तुम्ही सादर होऊनी आइका ॥**
**धरूनी आपुलाला आवांका । निजात्मसुखा लागोनी ॥**
**ये खेपे आलें धरा गा ये राय हो। आलें धरा, आलें धराल तरी ढवळा धरा ॥**
**ढवळा धरा, ढवळा धरा । ढवळा धराल तरी मासा धरा ॥**
**मासा धराल तरा बांदी धरा । बांदीच्या कारणें जातें धरा ॥**
**जातें धरावया कारणें मेंढा धरा । मेंढा धरावया कारणें बेटकुळी धरा ॥**
**ये अवघीं धरावया कारणें । अवश्य धरावें ग्रहण ॥**
**ग्रहण धराल तरा जीवें भावें धरा । तेणेंचि ग्रहणें अर्थोदय करा अगा सज्जन हो ॥ २८१९**

काय सांगावा ह्या डौल्काराचा डौल? त्याचा अंगरखा पायघोळ, त्याच्या बोलाचे लाख मोल आणि त्याचा भाव लई खोल. त्याची सांगण्याची रीत आगळी मनाची कळी उघडते पाकळी. आपण सांगितलेलें गूढ लोकांना उकलणार नाहीं म्हणून तो ते कसें उकलतो पहाः

आले म्हणजे काइ गा ?

**काय माळ्याचें आलें धरावें । कीं पीक आलें धरावें?**
**कीं केणें आलें धरावें ? कीं नाणें आलें धरावें ?**
**कीं कोण आले धरावें म्हणाल ? तरी ऐका या ये बोधनिधी !**
**उद्गार चक्रवर्ति माळ्याचें आलें तें आलें नव्हे कीं पीक आलें तें आलें नव्हे**
**केणें आलें तें आलें नव्हे, नाणें आलें तें आलें नव्हे**
**मनुष्यदेहीं आयुष्य आलें तें आयुष्य धरा.**

आल्याची ही उकल आयुष्यानें केलेली पाहून चित्त कसें चाकाटून जातें! हें आलें कसे धरावे हेंहि तो सांगतो

**म्हणाल आलें धरावें कवण्या रीतीं। विवेक वैराग्य धरावें हातीं॥**
**सदा भगवद्भाव धरावा सर्व भूतीं। एकाजनार्दनीं चित्तीं धरितां विश्रांतीं आलें लाभे॥**

अशा प्रकारे तो सर्व गोष्टींची फोड करून सांगतो. तिचा भावार्थ असा. आयुष्यरूप आलें धरल्यानंतर तें ज्या धवळ्यावर चालतें, मोल पावते तो धर्म म्हणजे धवळा, सर्व भूतीं भगवद्भाव पाहणें. असें धर्माचरण करूं लागल्यानंतर मनोभाशा धरला पाहिजे. नि मन वश करून घेण्यासाठीं इच्छादासीच्या पायांत निराशेची बेडी घालावी लागते. तेव्हां मनुष्यदेह जें वृथा जातें तें धरावें. एक क्षणहि वायां जाऊं देऊं नये. याच समयीं त्या मेंढ्याकडेहि लक्ष असूं द्या. तो काल रात्रींचा एडका शिंगावीण बोडका अंधारी हाणी धडका तो मेंढा बळकट धरा आणि तशीच ती शेजेची बेटकुळी वेगळी धरा. तिच्या फुटपुटीच्या झणत्काराला भाळूं नका. एवढें झाल्यावर मग ग्रहणाची सिद्धता होते. हें ग्रहण म्हणजे गुरुग्रहण आहे. गुरुग्रहणीं जो चिमटका-की केवळ वाटून घ्याला, अहमात्मा गिळून ठेला, अंगें

झाला परब्रह्म. तोच अकार, उकार, मकार, विकार निरसून अर्धमात्रा धरतो. हेंच अर्धोदय पर्व आहे. यानें उत्पत्ति, स्थिति लय सर्व मावळून ब्रह्मीं ब्रह्मत्याचा लय होतो. हा नाथांचा डौरकार आहे. सर्व भोग भोगण्यास सांगूनहि ते वर दर्शविल्याप्रमाणें भोगले तर त्यांचा अंत होतो असें हें भोगान्ताचें तत्त्वज्ञान सांगून तो लोकांना सन्मार्गी लावतो. संसार सोडण्यास तो सांगत नाहीं. आयुष्याचें महत्त्व ओळखून, धर्माचा मागोवा घेत, मनःसंयमपूर्वक निरासक्तीनें भोग भोगून, मृत्यूची जाणीव ठेवून वागलें नि सद्गुरुचरणीं लागलें तर चिन्मात्रींची यात्रा सहज घडतें. त्यांचा दुसरा डौरकार अनादिशक्ति मायराणीच्या अगणीं मांडलेल्या प्रपंचरूपी डेऱ्याची कथा सांगतो. ही फारच कल्पनारम्य आहे. ती मुळांच्या ठाव घेऊनच पहावी. त्याचे सरोदा, कुडबुडया हेहि असाच उपदेश करतात ( २६५६–२६६०,२७०९ ) आणि दावा उद्यां होईल भूर, डोळिया पातें लवे ऐसा संसार असल्याची साक्ष देतात. ( डौर :– २५१७–२५२८ )

फकीर हे मुसलमान साधु; यांचाहि वेष धरून नाथांनीं १०,१२ भारुडें म्हटलीं. या फकिरांची भाषा हिंदी असून, कांहीं इकडे राहिल्यामुळें तुटकें फुटकें मराठी बोलूं शकतात. आशा टाकूनि फकीर झाला त्याच्या आतां परिसा बोला. भला संतनका संग, खावे निजबोधनकी भंग. सदा आनंदमो दंग असा हा फकीर कंठशोष करून सांगतो कीं हजरत मौला सब दुनिया पालनवाला तोच विटेवरी आहे असक आल्ला स्वतः तो त्याने ओळखला असल्यामुळे इतरांचें ढोंग तो सहजच ओळखतो, दिलका हमने पछाना बे, कायकु सोंगें बताता बे. तूं अल्ला अल्ला करकर खावन मांगे मीठा असा पोटोबाचा पुजारी आहेस. अरे! सारे दिन करत पेटखातर धंदा, बिठलनाम लेवत नही क्यं रे तू गधा! खरें पाहिलें तर अल्ला तूहि तूहि देव तूच आहेस. यास्तव आता हुशियार, बंदे हुशीयार, तेरा तन खबरदार, तुझे खिलावन एक नार, बताइव बालदेव सतरावी घर पाई है तू सावध हो अविद्याअवदसेला सतरावीचें घर दाखवून समूळ नाशून टाक. मग दिलरिझे तो करले धंदा. असा ज्ञानोत्तर कर्माचा मार्ग तो सांगतो. अरे, सतरावीचें घर दाखविण्याचा

समाधीसुखाचा अनुभव तुज काय सांगू? **अजब है त्रिकूटका घाट, जोत लगी घनदाट, धूड लेना औही बात, पलख ज्योत लगी** अशा प्रकारें फकीररूपानें फिरून ढोंगसोंगाचा निषेध करून 'ईश्वर अल्ला' कसे एकरूप आहेत हें नाथांनीं मोठया रोकठोकपणें प्रतिपादिलें. कुंडलिनी जागृत झाल्यानंतर ती अमृत प्राशून जेव्हां तेजोमय बनते आणि त्या तेजांत अनुहतादि नादाचें मिश्रण होऊन ब्रह्मरंध्राच्या भेदानंतर महद्ब्रह्मज्ञान कसा प्रवेश होतो, हा स्वानुभव नाथानीं किती सहजसुंदरतेनें सांगितला आहे. हें भारुड नित्य संस्मरणीय आहे. तें मुळांतून पाठ करावें.

गारुडी, डोंबारी, बाजेगर, कोल्हाटी इत्यादि लोक खेळ करून लोकांची करमणूक करीत आपले पोट भरतात. यांचे खेळ पाहण्यास खेडयांतून बहुधा सारा गांव लोटतो. हे लोक फिरते असून ते गांवोगांव आपले खेळ करतात. नाथांनीं ह्याहि पात्राचा अवलंब करून आपलें जनता जागृतीचें काम चालूच ठेवलें. यांवरहि नाथांचीं १०।१५ भारुडें आहेत. नाथांचा गारुडी म्हणजे अगदीं पूर्ण गारुडी. त्यांनी घेतलेलें सोंग कोठें उणें पडलें आहे असें झालेंच नाहीं. तो **आदिपुरुष निर्गुन निराकारकी याद कर** म्हणून जो येतो तो आपल्या अमोघ वक्तृत्वानें सारे प्रेक्षक थक करून सोडतो. त्याची ती भाषा, तें नमन, ती शब्दरचना, तें भंडपुराण, तीं अधिक उणीं उत्तरें नि तो एकंदर थाटमाट हीं अगदी अप्रतिम असतात. नाथांचा गारुडी **चल चल चल निरंजन चल जंगलके जिवडे** म्हणून अभिमान जिवडयाला पाचारितो आणि त्याच्या दंशानें **डंख मारा वे डंख मारा सो बडे बडेसे नहीं उतारा** म्हणून विव्हळतो; पण जगद्गुरूच्या ज्ञानाने तें जहर उतरतो. आणि मग तो हंडीबागास बोलावून **बाप बडा क्या बेटा बडा। बेटे आगे बाप खडा** इत्यादि जीव शिवांच्या स्वरूपाचें विवरण करून, द्वैताचें स्वरूप सांगून, तत्पद त्वंपद आणि अहंपद यांचा अर्थ व्यक्त करून, एकापासून पांच, आणि पांचाचे पंचवीस आणि छत्तीसहि तत्त्वें कशीं झालीं यांचा गूढ निर्देश करून, त्या छत्तीसांचा एक आणि एकहि नाहीं तेथे 'एकाजनार्दन देख' असें साभिनिवेश म्हणत आपला खेळ संपवितो. त्यांचा डोंबारीहि

**लगे ढोल लगे ढोल, तुझा वस्तात खोल, तरीच मशी बोल, नाहीं तरी वायां फोल, जाई जाई रे गङ्घागा** असें सूतोवाच करून कैलास-वैकुंठापासून पंढरपुरापर्यंत दशावताराचे खेळ कसे झाले हें सांगतो आणि **धन्य त्या विठ्ठल रायाची याद कर** असा उपदेश करतो (५२६८-२५७४,२५५०).

गारुड्याप्रमाणेंच नाथाचा कोल्हाटी आहे; पण हा योगाचा खेळ खेळतो यमनियमाच्या योगें इंद्रियाचा निरोध करून त्यांना हृदयांत कोंडतो नि अन्तर्मुख करतो, वायूला ऊर्ध्वगामी करतो आणि शेवटी शून्यांत राहणाऱ्या त्या चैतन्याची गांठ घेतो. मस्तकीं त्रिपुटाचे ठिकाणीं हा सोहंनाद नादवितो आणि आपल्या योगकौशल्यानें ब्रह्मकटाह भेदून शून्यांत विलीन होतो. मग हाच स्वतः महाप्रपंचाचा वेळू रचून त्यावर हे विश्वाच्या घडामोडींचे खेळ खेळतो. हा खेळ पाहिल्यानंतर **सगुणची लागले ध्यान त्यानें केले निर्गुण** सगुणानिर्गुणाचें भान उरत नाहीं. सगुणांतच तो निर्गुण पहातो. हें विश्व नव्हे तर प्रत्यक्ष परब्रह्मच आहे, हें तो पाहतो. असा हा नाथांचा कोल्हाटी **आमची उडी उलटी सुलटी** म्हणत उलटी सुलटी भाषा वापरून खेळ करतो. नाथांनीं त्याच्या बायकोचेंहि वर्णन केलें आहे. हा कोल्हाटी (योगी) हाट (योगसाधना) करून बाईल (जीवन्मुक्ति) आणतो. ती वसरीच्या कांठावर येऊन बसतांच अविद्यारूपी पहिली बायको स्वतः त्रस्त होऊन त्यासहि त्रास देऊं पाहते. ही जणूं शंखीण, डाकीण, पिशाच्चीच आहे. हिचा आहार फारच मोठा आहे. चाऱ्ही अवस्थांचा वरणभात करून, वर साऱ्या साधनांची भाजी ही तोंडीं लावण्यास घेते; आणि मोठे घास घेऊन एकसारखी तटस्थ पहात राहते. ही आपल्याच नादांत असते. ही आठ वृत्तींच्या आठ भाकरी सूर्यचंद्राच्या म्हणजे इडा, पिंगळा नाड्यांच्या बारा, सोळा कळा ह्याच कोणी धिरडीं, पोळया खाते; आणि वर सत्रावीचें (अमृतकलेचे) पाणी पिते. असा हिचा मराठमोळा आहे. हिची ही सहजावस्था आहे. षड्विकार आणि षडूर्मि ही बसे, आणि षोडश प्रकारचें कर्म, यांचीं लुगडीं ही नेसते; पण तीं तिला अपुरीं पडतात. (ह्यांच्या योगानें ही अवस्था झांकली जात नाहीं) आणि चाऱ्हो शरीरांची (स्थूल, सूक्ष्म, कारण, महाकारण यांची) चोळी शिवली तरी ही पोटीं

येत नाहीं, तिची गांठ पडत नाहीं. ह्या चाऱ्ही वेदांत ती समातूं शकत नाहीं. नाथ म्हणतात ही अशी बाईल केली नि हिच्या भयानें सारीं दैवतें कोमाल पळालीं. ह्या स्थितींत सगुण उपासनेची शुद्धी उरत नाहीं आणि आवश्यकताहि रहात नाहीं. अशा प्रकारें नाथांनीं गूढ भाषेनें कोल्हाटिणीचें वर्णन करून स्वतःच्या जीवन्मुक्तावस्थेचें अनुभविक वर्णन केलें आहे.

सामाजिकांच्या गुणादुर्गुणांचा विचार करून, प्रथम त्यांना सद्गुण-संग्रह करायला सांगून, मंतर त्यांनीं समाधी-स्थितीचें वर्णन केलें; आणि पुढें समाजास जागृत करण्यासाठीं निराळ्याच प्रकारें आवाहन केले. हें आंधळा, पांगळा, बहिरा, मुका इत्यादि भारुडांत आहे. हीं नितात सुंदर नि भक्ति-कारुण्यांनीं ओथंबलेलीं आहेत. एक म्हणतो झालो मी अंध पंगु । माझा कोणी न धरिती संगु । चालता वाट मार्गीं मज कांही दिसेना । उच्चारिती नाम संत । त्या मागें चाललों जाणा. दुसरा म्हणतो, असोनी हात पाय डोळे जाहलों आंधळा । मुखीं नाम तुझें लागला चावेसी चाळा ॥ देउनी दान मातें नाम सांगे ये काळीं । विठोबाचें दान आलें ऐसी देईन आरोळी ॥. तिसरा म्हणतो, श्वानाची परी जाहली अवघे करिती हाड हाड ॥ साधुसंत दयावंत जे दयेच्या सागर । भावाचें मुख्य स्थान भक्तीचें ते माहेर । तिहीं केलें कृपादान मस्तकीं ठेविला कर । माया मोह निरसली शुद्ध जाहलें कलेवर ॥ अशा रीतीनें हा आपलें अन्तःकरण उघडून दाखवितो नि कळवळून दान मागतो. हात पाय डोळे इत्यादि सारीं इंद्रियें असूनहि हे आपंग झालेले आहेत. बहिरामुकाहि असेंच गीत गातो. त्यांचें आत्मकथन आणि अनुताप हीं फारच हृदयद्रावक आहेत.

बहिरा

बहिरा झालों या जगीं देवा बहिरा मी झालों
नाहीं ऐकिलें हरिकीर्तन, नाहीं केलें पुराण श्रवण ॥
नाहीं वेदशास्त्र शब्दगुण, गर्मीं बधिर झालों या गुणें ॥
नाहीं सत्कीर्ति श्रवणीं आली, नाहीं संतवचनें ऐकिलीं ॥
पितृवचना पाठ दिली, तीर्थव्रतें असोनी त्यागिलीं ॥
माया माउली पाचारितां, नाहीं शब्द दिला मागुता ॥
बहिरा नरदेही येतां, एकाजनार्दनीं स्मरेन आतां ॥

## मुका

**मुका झालों वाचा गेली ॥धृ०॥**

**होतों पंडित महाज्ञानी, दशग्रंथ षड्शास्त्र पुराणीं ॥**
**चारी वेद मुखोद्गत वाणी, गर्वामध्यें झाली सर्व हानी ॥**
**जिव्हा लांचावली भोजना, दुग्ध, घृत, शर्करा पक्वान्ना ॥**
**निंदिलें उपान्ना, तेणें पावलों मुखबन्धना ॥**
**साधुसंतांची निंदा केली, हरिभक्तांची स्तुति नाहीं केली ॥**
**तेणें वाचा पंगु झाली, एकाजनार्दनीं कृपा लाधली ॥**

पांडित्याचें अपत्य असे औद्धत्य, रसनेची रसलोलुपता आणि वाणीचे हे विषारी फूत्कार, पितृवचनाला पाठ देणें आणि मातेला मऊ न बोलणे, दुर्जनाच्या गळा पडणे आणि हरिजनावर बोटें मोडणे, त्याचा छळ करणें, यांचें हें फळ आहे. इंद्रियवृत्तींचा सदुपयोग करायला पाहिजे. तो तसा न करतां, सदासर्वदांच कसा दुरुपयोग होतो, हे नाथानीं यांत मोठया कळवळ्यानें सांगितलें आहे. हे त्या त्या व्यक्तीचें आत्मकथन आहे. त्यांच्या दुराचारांचा हा परिपाक आहे. यास्तव त्यातील भावनाचा आवेग अंत:करणाला पीळ पाडून बाहेर पडला आहे. करायचें तें केलें नाहीं. पहायचे तें पाहिलें नाहीं, ऐकायचे तें ऐकलें नाहीं; भलतेच केलें, भलतेंच पाहिले, आणि भलतेंच ऐकिलें म्हणून असें भलतेच झाले. असे होऊं नये, लोकांनी धर्मानें वागावें म्हणून त्यांनीं मागणें मागितलें तें असे:—

**तुझा धर्म जागो प्रपंच भीक भंगो। क्रिया कर्म धर्म आम्हां अंगीं न लागो ॥**

**अत्यंत आंधळें मी गाढें। दृश्य न दिसे मागें पुढें ॥**
**धर्मी दाते तुम्ही रोकडे। दानचाडे मी आलों ॥**
**हरीचा धर्म जागो। नरहरीचा धर्म जागो ॥**
**अनंत धर्म जागो। अच्युत धर्म जागो ॥**
**हा सदा धर्म जागो। नित्य नीज लागो ॥**
**निजीं निज लागावया। आम्ही भीक मागों ॥**
**रिद्धिसिद्धि दान देणें। देतां घेतां लाजिरवाणें ॥**
**तुज देवा देतां अल्पपणें। मज घेतां निंद्य जिणें ॥**
**देवा अक्षराचें नाणें दारोदार नाही जाणें ॥**

**धर्म जागो दीन वचन । ऐकूनी कळवळलें मन ॥**
**चित्त दिधलें चैतन्यघन । एकाजनार्दन दाता ॥** २५९८

आंधळें होऊन नाथांनीं मागितलेलें दान " **धर्म जागो निवृत्तीचा हरिनामें उत्सवो** " ह्या ज्ञानेश्वरांच्या दानाची आठवण करून देतें. केवढें विशाल तें अंतःकरण ! समाजाचे सारे अपराध पोटांत घालून त्याजसाठीं नाथांना आंधळा पांगळा होऊन हें हरिनामस्मरणाचें दान मागितले आहे. असे नाथ अनंतरूपीं, अनंतवेषीं समाजांत हिंडले आणि समाजास त्यांनीं सांभाळून धरले.

## संसार आणि सांसारिक भारुडें

मानव ज्या संसारामध्यें एवढा गुंतला आहे, त्यांत तो जीं कार्यें करतो त्यांतील पुष्कळांवर भारुडें रचून नाथांनीं त्यांचें वैयर्थ्य प्रतिपादून त्यांचा सत्यार्थ सांगितला. प्रथम त्यांचें **फट गाढवाच्या लेंका संसार गेला फुका** १७३०, १६४५ हें भारूड पहा. संसाराचा व्याप मुळांतच खोटा आहे. त्यांत गुंतून न राहतां "**हरीस्मरण करा सद्‌गुरुचरण धरा**" म्हणजे कधीं तोटा येणार नाहीं. पण जनरीत कांहीं निराळीच आहे. **सद्‌गुरुचरण नावडती, आवडती स्त्रीच्या लाथा** यास्तव ते कळवळून सांगतात कीं **संसाराचें सुख मानी तोचि एक करंटा** अरे कोण कोणाचा आहे ? **अंतकाळीं प्राण जातां रडती देती हांका । लेकुरवाळी बाईल म्हणे तोंड याचें झांका ॥** संसार म्हणजे केवळ सासुरवास आहे. या सासुरवासाचें वर्णन त्यांनीं मोठें मार्मिक केलें आहे. " विषय हें माझें सासर असून दुश्चित्त बोळाऊ सांगाती आहे, नि भ्रांतीची बुंथी पांघरून मी येथें नांदतें. अविवेक माझा पति, अहंकार सासरा, असें अविद्येचें माझें घर आहे. कल्पनासासूच्या सासरवासानें माझी मला आठवण देखील रहात नाहीं. कधीं काळीं आठवण झालीं तर हृदय फुटून जातें. काम क्रोध हे दीर भावे फार त्रास देतात नि मेला म्हातारा मोह सदा दारांतच बसून असतो. तो इतका दुष्ट आहे कीं धड माणसाला देखील पिसें लावील. वरून भावडा पण आंतून वांकडा हा दंभ नेहमीं पायांत खोडे अडकवितो. इच्छा निंदा ह्या बटकुऱ्या ना ! पण त्या मामंजीच्या असल्याकारणानें

नेहमीं चिमटे घेतात. ममता नि चिंता ह्या थोरल्या धाकल्या नणंदा, ह्यांच्या जाचानें तर मला कधीं एकांत मिळतच नाहीं. नेहमीं कामाच्या रगाड्यांत कसला आला आहे विसांवा? निष्कामाला क्रोध दंड करतो आणि द्वेषाची तर नेहमींच काचणी असते. मला कोण्या पापिणीच्या ह्या घरांत दिलें हो! माझ्या भोळ्या भ्रात्याच्या मागें संदेह-श्वान लागल्यामुळें तो देशोधडीला लागला; आणि माझ्या मैत्रिणीनें, भक्तीनेंहि तोच मार्ग धरला. मी किती आर्ततेने आणि आतुरतेनें माहेराची वाट पहात आहे, पण अजून कोणी भेटत नाहीं. संत हो, तुम्ही मला मूळ या, माझें माहेर पंढरीस आहे, तेथें मला नेऊन घाला. एकाजनार्दनाला सासर हेंच गुरुकृपेनें माहेर झालें." हें रूपक मोठें असलें तरी संसारांत जिवाची होत असलेली कुचंबणा यांत किती आपुलकीने नाथांनीं वर्णिली आहे! हेंच रूपक त्यांनीं आणिक एके ठिकाणीं थोडें अधिक विस्तारानें सांगितलें आहे (१६५६, २६४५ पहा.). नाथांची ही सासरवाशीण संसारास उबगलेली आहे; पण पुढें ही मुक्त झाल्यानंतर आपल्या सासूलाच कसें शहाणपण शिकविते तेंहि ऐकण्याजोगें आहे.

**वृद्धपणीं शांतिधरा तुम्ही सासुबाई, नरम गरम पाहूं नका अंतीं सुख नाहीं.**

**रात्रंदिवस विचारितां जीव दिक झाला, मायलेकी रहा तुम्ही मज नेऊन घाला.**

**प्रपंचाचें ताक तुम्ही सांचविलें घरीं, संचिताचें दुःख (?) लोणीं गमाविलें चोरीं**

**वासनेच्या बिडाळीला कोंडून बाहेर ठेवा, नवही द्वारें गुप्त करा ज्ञान दीप लावा**

**प्राप्त भूमि चारी तुम्ही हाट करा वेगीं, कल्पनेची रहाटी मोडा तोची धन्य योगी.**

**चारी मुक्ति त्याचे माथां काळ झेंप घाली, विश्वासानें जाऊं नका जीवा मुक्ति झाली.**

**अहेव मणी गळां तुम्ही व्यर्थ बांधियेला, बारा सोळा पुत्र जाले दादला नाहीं केला.**

**घांस तुम्ही पुत्र भासे, तुमचें तुम्हां साजे, इतर स्त्रिया करूं म्हणती मरती लोक लाजें.**

**क्षणिक तुम्ही वृद्ध पहा क्षणिक तरूण बोले, एकाजनार्दनीं त्याणें शरण रूप केलें २६४६**

हा उपदेश सासूबाईंना तसाच जीव मुक्त झाला आहे म्हणून विसंबून राहणाऱ्या योग्यांनाहि तितकाच उपयुक्त आहे. नित्यता प्राप्त करून घेतल्यावांचून खरें सौख्य प्राप्त होत नाहीं. देहबुद्धि असेल तेथें शाश्वत शांति रहात नाहीं. यास्तव देहबुद्धि, इच्छा तिची लेंक, ह्या सोडा; वासनाबिडाळीला—मांजरीला—बाहेर घालवून, संयमानें इंद्रियें निरोधून, ज्ञानदिवा लावा. चार भूमिका साध्य झाल्या आहेत, आतां प्रयत्न करून आत्मानात्मविचाराची धारणा दृढ करा. कल्पना सोडा, म्हणजे चारी मुक्ति साध्य होतील. खरें ज्ञान प्राप्त झाल्यावांचून ही सारी योगसाधना व्यर्थ आहे क्षणिक समाधी हें साध्य नव्हें. तोहि भ्रमच. परात्पर पुरुषाला शरण जा नि सहजावस्था साध्य करा.

निजानंदीं रंगलेल्या ह्या सासरवासिणीची चोळीहि नाथांनीं मोठी सुंदर शिवली आहे. हिचें नांव “ कायावाचाचोळी ” अलक्ष्यानें ह्या चोळीची वेतणी मांडली. हिचा रंग साजरा नि भुजावर रेखिलें हंसमयूरां हिला सहा चक्रें बावन जवदाने आणि बहात्तर कंगोरे आहेत. हिचें कापड औट हात असून त्याला ठायींची कातर घातली. अरे रे, चोरट्या शिंप्या मर, मर; त्वां अस्सलच चोरलें. त्रिगुणांचा दोरा घेऊन ही सोहं सुईनें शिवली. ही नऊ टुकड्यांची चोळी असून हिजवर पांच फडकीं, सात फुलें आणि वर दोन बिरडींहि आहेत. हिला करायला नऊ मास लागले; पण ही घालताच दाटली अन् कोंपरावर फाटली. मेल्या शिंप्या, चोळी पुरती नाहीं केली. यासाठीं नाथांनीं कापड ‘श्रीरंगानें’ रंगविलें, अन्तरंगानें त्याची चोळी शिवली आणि एकाजनार्दनानें बिरडें घातलें; तेव्हां कोठें आतां ही घालतां येते. ” यांतील भाषा योगांतील परिभाषेनें भरली आहे. पुरुष आपल्या ध्यानावस्थेंत असतां त्याला सृष्टि रचण्याची इच्छा झाली, तेव्हां त्यानें ह्या देहाचा बेत मांडला, बाह्याकार नि वर्ण सुंदर घडला आणि आंतहि षट्-चक्रें मेरुदंडाच्या बावन्न ग्रंथी आणि बहात्तर कोठे अशी रचना केली.

देहाची लांबी साडेतीन हात आहे. आतां ह्या कापडाची चोळी करतांना योग्यानें त्रिगुणदोरा, सोऽहंसुई, नव द्वारांचे वा नऊ नाड्यांचे टुकडे लावून, पंच कर्मेंद्रियें इत्यादींचा फडक्यांसारखा उपयोग केला आणि श्रीहटा-पासून ब्रह्मांडापर्यंत सात चक्रें हींच कोणी फुलें तिजवर पाहिलीं नि गोविलीं आणि त्यापुढें दोन बिरडींहि घातलीं. पण मुख्य आत्मज्ञानाचीच चोरी झाल्याकारणानें ती ब्रह्मसाधनेंत अपुरी पडूं लागली. यास्तव नाथांनीं हरिनामाच्या रंगांत ती रंगविली आणि अन्तरंगानें शिवली, तेव्हां कोठे आली. यांत नाथाचें सांगणें असें दिसतें कीं शुष्क योगसाधना उपयोगी नसून ती कुठेंतरी अडतेच. तिला भक्तीचा ओलावा असावा. (५८१)

नाथांची ही सासुरवाशीण गृहकृत्यांतहि मोठी प्रवीण आहे. ती दळण कांडण करते आणि रिकाम्या वेळीं पोपटाला आत्मबोध करते नि कधीं ती पिंगाफुगडीहि खेळते. देहाचें उखळ करून मनाचें मुसळ घेते आणि विवेकाचे तांदूळ कांडतांना ही **विवेक कांडणी कांडितें साजणी निजबोध स्मरणो फिरतसे** असें गीत गाते. कांडणापेक्षां हिला दळणाचें काम फार आहे. दळायला बसतांना ही **ब्रह्माहमस्मि** च्या टाकीनें द्वैताची तळी उकटून घेते, **अधिष्ठानाच्या** खुंट्यानें दोन्हीं पाळूंना निश्चिळ ठेऊन त्यांतून एकत्वाचा नाद काढते आणि षड्रिपूंचें वरणें घालून अठरा ज्ञानसाधनांनीं दळून काढते. कर्माकर्म जन्ममरणासहित दळून काढते, माया, वृत्ति, देहबुद्धि, नि वृत्ति सारें भरडून काढते; विज्ञानासहित ज्ञान-अज्ञान दळून काढते. दळतांना शीण न व्हावा म्हणून ही गीत गाते, **सुंदर माझें जातें ग फिरे बहुत । ओव्या गाऊं कौतुकें तूं येईबा ॥** असें प्रपंचाचें दळण दळून पीठ भरते सामूपुढें नीट ठेवते आणि नंतर सत्त्वाचें आधण ठेवून पुण्य वैरिते, तेव्हां पाप उतूं जाते, असा स्वयंपाक ही करते. (२५२९, २५५९, २५६०, २६८३.)

संसारकामांतून रिकामा वेळ मिळाला कीं, ही पोपटाशींबोलत बसते. पोपट हा प्राणी आहेच गुणी; नाथांनीं पढविला आणि सर्वांना आवडला ऐका आतां ती काय बोलते, तें कान लावून ऐका, अन् मनानें तर्का :—

**पढो माझ्या आत्मारामा राधाकृष्णाचें हें ध्यान**
**पिंजऱ्यामध्यें गुंतलासी तुज सोडवील कोण ? ध्रु०**

**चौऱ्यांशी लक्ष योनी वनीं तूं तरी हिंडसी ॥**
**प्रमदाविषफळीं अतित्वरें धांव घेसी ॥**
**येऊनीया दोही पक्षी पाहती तुज न्यावयासी ॥ १ ॥**
**पिंजरा घडविला पंचभूतांचा कुसरी**
**नव द्वारें सोळा सांधे प्रभा पडली भीतरीं**
**लाविली प्राचीनाची दोरी बांधिला निजमंदिरीं ॥ २ ॥**
**हिरवा तुझा रंग गुंजवर्ण दोन्ही डोळे**
**चोंच आहे तुझी लाल बोल तुझा हा मंजुळ**
**राघवा तूं बोल माझ्या सख्या अमोलिक बोल ॥ ३ ॥**
**अचल तूं माझें चंचल मोठे हिंडे तीनहि ताल ॥**
**तुला जपला काळबोका केव्हां घालील गळ ॥**
**जरी जाशी उडोनिया पूर्व सुकृताचें फळ ॥४॥**
**सत्य गुरु दत्त दाता तारक मंत्र तुज देई ॥**
**तोच तुला सोडवील यम करील काई ! ॥**
**पावशील चिंतामणी एका जनार्दनाचे पायी ॥५॥**

पंचभूतात्मक पिंजऱ्यांत अडकलेल्या ह्या आत्मारामपोपटास त्याची परिस्थति दर्शवून केलेला बोध कोणा मानवाला पटणार नाही ?

ही सासुरवाशीण असली तरी हिलाहि मैत्रिणींच्या मेळाव्यांत पिंगा फुगडी खेळावीं वाटनातच. ही निजस्वरूपी ‘ अहंब्रह्मास्मि ’ची फुगडी खेळते नि पिंगा घालताना **पिंगा बाई पिंगा गे अवघा धागडधिंगा गे,** असा संसाराचा अटापिटा नेहमींच न करतां **तुम्ही रामरंगी रंगा गे,** म्हणून सांगते; आणि **निराकाराचा आकार झाला, त्यांतच माझा पिंगा जन्मला** आणि तोच पुढे दशावतार झाला नि शेवटीं **ऐसा निराकाराचा पिंगा। त्यांत माझा श्रीरंगा। एकाजनार्दनीं पांडुरंगा। माझा पिंगा घालतो धिंगा** असें सुचविते. हा पिंगा म्हणजे चैतन्याचा लीलाविलास होय.

(२२०२, २१९२, २२०६).

मानव योनी अन् दुःखाची खाणी. ह्या सासुरवाशिणींला कोणता आणि कसा सर्प डसला. ह्याचें तिनें वर्णन केले तें फारच उद्बोधक आहे तें तिच्याच मुखाने ऐका:—

**स्वरूपमंदिरीं होतें मी एकली , माया सांजवेळीं अविद्येच्या बिळीं**
**माझें तुझें चालतां पाउलीं , मोह भुजंगें धरिली करांगुळी**

लोभसर्पे डंखला करूं काय, स्वार्थसंपत्तीनें जड झाला पाय
आशालहरी तापला माझा देह, तृप्तिवारा घालि वो गुरुमाय
भजनगूळ तो मज कडू झाला, विषयनिंब बहु गोडिये आला
वित्तहानी गळां झेंडू आला, असत्य अशुद्धाच्या येताती गरळा
कामिनीकामाची डोळां आली पितता, रस स्तुति निंदा काळे
झाले दांत
विकल्पवासनेच्या मुंग्या धांवत स्त्रीपुत्रलोभें पडली भ्रांत
मीपणाची थोर आली भुली, मी येथें कोण ओळखी मोडिली
अहं (अ) विवेकें काया जड झाली सद्गुरु-गारुडी बोलवा माउली
गुरु गारुडी आला धांवोनी, बोधवैराग्याचें पाजिलें पाणी
विवेकअंजन घातलें नयनीं, सोऽहं शब्द वाजवी नामध्वनी
मिथ्या भूतमय अवघी स्थिति, अभय स्वरूपीं लाविली विभूति
उतरला सर्प निवारली भ्रांती, एका जनार्दनीं आलीसे प्रचिति

स्वस्वरूपीं विलीन असलेल्या आत्म्यास मायेच्या आवरणानें कसा भ्रम होतो हें यांत नाथांनीं सर्पाच्या रूपकानें फारच यथार्थ वर्णिलें आहे. तो म्हणतो, अविद्येच्या दिवशीं ममतेची झांपड पडली असतां आपपर-भावाच्या चालीनें मी चालत होतो. तेव्हा हा लोभमोहाचा भुजंग चावला स्वार्थमुळे पाय जड पडूं लागला, आशेच्या लहरी उठूं लागल्या नि· शरीर तप्त झालें. सद्गुरुमाय, या नि समाधानाचा वारा घाला. भजनाचा गूळ कडू नि विषयनिंब गोड वाटत आहे. वित्तहानीच्या रूपानें झेंडू फुटला नि असत्यअशुद्धाच्या गरळा वरचेवर येऊं लागल्या. नेत्रांत कामिनीकामाचें पित्त आलें नि आत्मस्तुति आणि परनिंदा ह्यांचे रसायनाने दात काळे झाले. विकल्पवासनेच्या मुंग्या चढूं लागल्या. स्त्रीपुत्रलोभाच्या भोंडा येऊं लागल्या. अहंकाराची दाट मूर्च्छा आली आणि ‘कोऽहं’ ही जाणीवहि पार बुजाली. अविवेकाच्या योगानें सर्व शरीर बधिर झाले. गुरुमाय, आतां धांव गुरुगारुडी तांतडीनें आले. त्यांनीं बोध वैराग्याचें पाणी पाजलें, विवेकाचें अंजन नेत्रांत घातलें, नामाचा कानमंत्र देऊन सोहं शब्द घुमविला, हा भूतमात्राचा पसारा सारा खोटा, असें सांगून निःसंदेह आनंदास्थितीची विभूति लाविली; तेव्हां सर्प उतरला; भ्रम दूर झाला; आणि मीं

पूर्वीहि एक होतों, नि आतांहि एकच आहे, असा अनुभव आला. ह्यांत दर्शविलेला मोहाचा रगाडा जितका व्यापक आहे, तितकेंच यांतलि समस्तवस्तु - विषयक सांगरूपक समर्पक आहे.

मोतीं:-नाथांची ही निजानंदीं रंगलेली सासुरवाशीण आहे. हिची चोळी त्यांनीं सुंदर शिवली नि दळतांकांडतांची तिची ओवी गायिलीं. हिच्या सर्पदंशाची गोष्ट आपण ऐकिली, आतां हिच्या मोत्याची मात श्रवण करा:-

धुतांच मोतीं जळीं हरपलें सखोल मोठें पाणी। चला पाहूं सात चार अठराजणी ॥ धृ ॥

प्रपंच धोंडा मृगजळ पाणी आपटीत होतें चोळी। विसरलें सुख घसरलें तळीं

सखे मायेनें मोतीं दडविलें भवसिंधूच्या जळीं। होती गडे भ्रांति बहीण जवळीं

तिणेंच मजला गोष्टी चिनविल्या चित्त गेलें भुलोनी। चला पाहूं सात चार, अठराजणी ॥ १ ॥

सहा जणींनीं मोतीं दडविलें वरी ठेविला धोंडा। अशाच पहाती (पहा त्या) अवघ्या रांडा

बारा, सोळा तळीं उतरल्या त्यांनीं धरिला दांडा। ठाऊक सत्रावीला झेंडा

त्यामध्यें मी गर्क झाल्यें एकलीच बाई वनीं। चला पाहूं सात चार अठराजणी ॥ २ ॥

अवघी जणी सत्वर मिळुनी डोळीं अंजन घाला। माझ्या मोत्याला प्रेमें न्याहाळा

ज्ञान बोधाची लावुनि दिवटी बरवी वात उजळा। माझ्या मोत्याला सर्व कळा

प्रपंच पडदा फाडुनि गुरुपदिं लावा गे ठिकाणीं। चला पाहूं सात चार अठराजणी ॥ ३ ॥

चौघीजणी मोक्षनायिका मजला धरा हातीं। उतरा सागर- पैलपर्थी

या मोत्याच्यासाठीं मजला जाणें आहे सती। म्हणुनि मी येत्यें काकुळती

एकाजनार्दनी चिन्मयमोतीं न मिळे गुरुवांचुनी। चला पाहूं सात चार अठराजणी ॥ ४ ॥ (२६७४)

मोत्यासाठीं सती जाणारी ही साध्वी सांगते कीं मी चोळी धूत असतां मोतीं हरवलें. पाणी फार खोल आहे,यास्तव ज्ञानाच्या सात भूमिक

साधनचतुष्टय आणि ज्ञानाचीं अठरा लक्षणें यांच्यायोगें तें पाहिलें पाहिजे. अविद्येच्या पाण्यांत प्रपंचाचा धोंडा होता नि त्यावर मी 'देहबुद्धी'ची चोळी धूत होते. भ्रांति बहीण जवळच होती. तिनें प्रपंचाच्या गोष्टी काढल्या. त्या नादांत मला कशी भुरळ पडली नि मी आपल्या 'स्वरूपाला' विसरलें; तोंच ' निजसुखमोतीं ' गळालें नि ह्या भवसागरांत मायेनें तें दडवून टाकलें. अष्टधा प्रकृतीनें त्या सुखावर धोंडा ठेवला. ह्या साऱ्या रांडा, अष्टधा प्रकृति आणि अष्टवृत्ति, साऱ्या अशाच गोडघाश्या नि कामनाश्या आहेत. मी योगसाधन करून कुंडलिनी जागृत केली, ती नाभिकंदावर दंडाप्रमाणें उभी राहिली आहे. इडा - पिंगळा नाड्या म्हणजे चंद्र सूर्य, यांच्या सोळा बारा कळा ती शोषून घेते, अमृताचें पान करते आणि जणूं सत्रावी कळा बनते. हिलाच ब्रह्मरंध्रांत प्रवेश करून, चैतन्यांत विलीन होऊन जाण्याचा धोंडा, सुषुम्ना नाडींतून वर जाण्याचा मार्ग ज्ञात आहे. ह्या मार्गानें मी जाऊन त्या महदाकाशांत, निरालंबांत, एकत्वांत विलीन झाल्यें आहे. चारी अव-स्थांनो, आतां डोळे उघडा, ह्या निजसुखमोत्याला नीट निरखून पहा. तें प्रेमस्वरूप, आनंदरूप, सुखरूप आहे. सद्गुरुबोधानें सत्कर्माच्या वाती घ्या आणि आत्मज्ञानाची ज्योति पेटवा. तुम्हांला अनुभव येईल कीं माझें मोतीं तेजःसंपन्न आहे. यास्तव आतां प्रपंचाचा पडदा फाडून मला गुरुचरणीं विलीन करा; तेंच माझें मूलस्थान आहे. चौघी मोक्षनाइकांनो, मी कळव-ळून सांगते, मला ह्या सागराच्या पलीकडे न्या, हातीं धरून न्या, सांभा-ळून न्या. ही माझी सारी धडपड, हें माझें सतीचें वाण, केवळ तें स्वरूप-मोतीं चिरकालासाठीं प्राप्त करून घेण्यासाठीं आहे. बाई, नाथ म्हणतात कीं हें चैतन्यमोतीं गुरुकृपेवांचून प्राप्त होत नाहीं. हें मोतीं म्हणजे नाथांच्या अध्यात्माचें सार आहे. त्याचें वर्णन पामरानें काय करावें ?

नाथांनीं अशीं सोज्वळ सांसारिक भारुडें पुष्कळ रचिलीं. त्यांत सदाचारसंपन्न गृहिणींच्या रूपाचा जसा आश्रय घेतला, तसाच धांगडीं-चाहि घेतला आहे. पण ह्या धांगडी नाथांच्या आहेत. हें लक्षांत ठेवा. यांचाहि थोडा धांगडधिंगा ऐका. एक हुंडगी, आडदांड स्त्री, मुलगी, बाजा-राला निघाली आहे. तिच्या झिन्या बारीक झाल्या आहेत, (झिनी हा पायाच्या बोटांत घालायचा एक नग. प्रस्तुत भारुडांत 'जुना' हा शब्द त्या ठिकाणीं

पडला आहे, तो 'जुना' नसून मला वाटतें 'झिन्या' असावा.) आणि त्या तिला नव्या करून द्यायच्या आहेत. ती म्हणते, दारींची गोंधन तोडून मला रहाट करून द्या नि त्याचें कौतुक करीत रहा. बैल मारून त्याची तांत करून द्या नि तलवार मोडून तिची चात करून द्या. अहो, तुमची टाळ मोडून मला खेळायला भिंगरी करून द्या नि वस्त्रे फाडून पुन्हां पिंजून मला पेळू करून द्या. अशी ही त्रिळा मोडून खिळा करून मागणारी आहे. यांत दहा इंद्रियांचा खेळ कसा चालला आणि देहबुद्धि ही आत्म्याला कशी गरगरा फिरविते हें ह्या 'रहाटा'च्या रूपकानें नाथानीं दर्शविलें आहे २७१७. ही हुंडगी पुढें ज्या बाजारास गेली तोहि अर्थात् तिच्याच जोगा आहे. संसाराच्या बाजारीं कामादि षड्रिपु हेच गिऱ्हाईक आहेत, तेव्हां **यांत सुख नाहीं, त्यांत सुख नाही, या हाटाचें सुख कोठें नाही**. असं सगळ दुःखाचंच येथें देणं घेणं चालतं २६५२. यास्तव संतसंगावाचून सुटका नाहीं असं तिला वाटतं. हिचा संसार फारच फाटका असल्याकारणाने ही **मला दादला नको ग बाई** २६८०, असें म्हणते. घर मोडकं नि वर छप्पर तुटकं, दळायला जातं देखील नाहीं. नेसायला फाटकं दानखड नि ल्यायला चिंध्या झालेली चोळी, मग सोन्याचं नांव कशाला? खाण्याच्या नावान अन्नान्न दशा. हरभऱ्याच्या पिठाची भाकर नि वर अंबाड्याची भाजी, पण एखाद दिवशीं जिवाची दिवाळी करावी म्हटलं तर भाजीवर घ्यायला तेल देखील मिळत नाहीं. मग करायचा आहे काय असला संसार? प्रपंच हा सारा दुःखाचा पसारा असल्याकारणानें ही प्रपचरूपी दादला नको म्हणते. इतकेंच नव्हे तर ह्या प्रपंचांतील सासू सासरे, दीर नणंदा, जावा भावा, पति यांच्या तापातून मुक्त होण्यासाठी ही भवानी आईला रोडगा देखील वाहूं करते ६२३. हिची भाषा ओबडधोबड नि ग्राम्य आहे; पण ह्या संत्रस्त दुर्भगेच्या अन्तःकरणातील भाव अत्यंत निर्मळ आहे. अविद्यारूप प्रपंच, अहंकार, वासना इत्यादिकांचा परित्याग करून **एकमेवाद्वितीयं ब्रह्म** ह्यांत विलीन होण्याची तिची तळमळ आहे.

ह्यांची कंजारीणहि ह्याच वर्गांत मोडते. ती तर अगदीं थै थै नाचत येते. तिची भाषा मिसळीची असून अन्तःकरण घुसळून काढते. तिच्या

शद्बरचनेनें नि नादमाधुर्यानें मन वेडावून जातें आणि अर्थ कळो न कळो भारुड ऐकावें वाटतें.

**हो हो री हो, हो हो री हो । लेव रे रसी, हो हो री हो ॥धृ०॥**
**लेनेवाला है पर देनेवाला नहीं । देनेवाला है पर लेनेवाला नहीं ॥१॥**
**नीसंग अडती केतन तोडा आपकारी पाडवा आतां सा न जोडा ॥२॥**
**तेलंगी वाडवा, फाल्गुना फुलवा, साधन करवा, मन आशा फेडवा ॥३॥**
**फुलवा न नवरा, आडतिनी तंगी, नीतंग कोडता, तंगी न आडी ॥४॥**
**जनार्दन पडवा, कंजारीण लडवा, कोंकणी करवा, दातारु बरवा ॥५॥**
**हो हो री हो, हो हो री हो २७२३.**

"अहाहा ! किती आनंद आहे ! अरे या, या. ब्रह्मरस घ्या. काय करावें? अहो, देणारा आहे तर घेणारा नाहीं नि घेणारा आहे तेथें देणारा नाहीं. मी तर निसंगपणें खेळते, घरच पावरते, नि आपलेंच गाणें गाते फिरते. माझ्यापाशीं सहांपैकीं कोणीहि फिरकत नाहीं. मी ममता धुऊन टाकली, वैराग्याचा अग्नि फुलविला, सारी साधनें करून बसल्यें आणि मन आशांसहित दळून भरडून टाकलें. मी विकल्परूपी पतीला कधीं जागे होऊं देत नाहीं. मी शांतिबहिणीशीं नेहमीं खेळत असतें अरे, मी तुला तुझी बहीण भक्ति भेटवितें, तिच्याशीं तू खेळत रहा. मी आडदांड कंजारीण आहे. जनार्दन माझा गुरू आहे. त्या दातारानें कृपा केली नि वांकडी वाट दाखवून दिली". ह्या कंजारिणीच्या वाकडया वाटे-वरील सरळ अर्थ पाहिला म्हणजे ही वरून दिसणारी कंजारीण परब्रह्माची कशी पुजारीण आहे ह्याची प्रचीति येते. ह्या कंजारिणीची शेजारीण एक कोल्हाटीण आहे. २७२४. ती ब्रह्मसुखास्वादाच्या गोष्टी सांगणारी असली तरी तिची भाषा सभ्यतेला शोभणारी नाहीं. हिला दुरूनच वंदन करूं.

अशा रीतीनें संसार नि सांसारिक व्यक्ति, त्यांचीं कामें, करमणुकी यांवर नाथांनीं भारुडें रचिलीं. त्यांत वेडी, भटीण, भोळी थट्टा, येडकामदन, घाणा, विटीदांडू, चेंडूफळी एकीबेकी इ. अनेक विषय आहेत. जिज्ञासूंनीं तीं मुळांत वाचणेंच उत्तम. या सर्वांतून अध्यात्माचें सूत्र अनुस्यूत असून परमेश्वर सर्वत्र भरलेला आहे नि तो भक्तीनें वश होतो, हेंच सांगितलें आहे.

आतां दुष्ट दुराचाऱ्यांसंबंधीं नाथांनीं काय लिहिलें तें थोडक्यांत पाहूं. या प्रकारांत भांड, थाक, निर्लज्ज, गांवगुंड, कुंटीण, सौरी, जगझोडी इत्यादि मंडळी आणि यांचा सण होळी, ह्यांनीं लाज वाटून अंगाला लावली असल्याकारणानें ह्यांची भाषा पाहणें नकोच. नाथांनीं ह्यांच्या योगें हेंच दर्शविलें कीं अशी स्थिति परमार्थांत व्हावी. नाथांचा भांड 'चिदंबुदकी भंग' खाल्लेला मगनमस्त आहे. त्याचें मन शुद्ध असून भाषा मात्र जगविरुद्ध आहे. तो 'माया' सोडून द्या म्हणतो. 'थाक' प्रपंचांतील भ्रांती सोडा म्हणतो. 'निर्लज्जेचें' सांगणें ब्रह्मसुखासाठीं लाज सोडणें. अहंकारभ्रतारास हिनें वधिलें असून, बोधाची तेलफणी करून ही भक्तिज्ञानाच्या देवळांत जाणारी आहे. ही निर्लज्जा कोणास वंदनीय नाहीं? हिचा वाच्यार्थ नका भावार्थ घ्या. ह्यांच्या होळीचेंहि नाथांनीं वर्णन केलें तें अत्यंत सुंदर आहे. नाथ म्हणतात देहचतुष्टयाची होळी रचून ती ज्ञानाग्नीनें पेटवा आणि नामाची बोंब मारा. संत शिमगा असा साजरा करतात.

> सत्त्वगांठी उमगा तेणें सफळ होईल शिमगा
> तुम्ही हेंच गाणें गा, तुम्ही हंसूं नका, हंसूं नका ॥१॥
> भूतसभेचीं कारटीं, विषयगौऱ्या चोरटीं।
> उतरा कुकर्माची रहाटी, तुम्ही हंसूं नका हंसूं नका ॥२॥
> जागोजागीं थांबा, भवाच्या मिळोनी मारा बोंबा।
> न जळे एरंडाच्या कोंबा, तुम्ही हंसूं नका हंसूं नका ॥३॥
> गांवचा पाटील कोळी, काळोबाची पिकली पोळी, ।
> तुमची पाजळूं द्या होळी, तुम्ही हंसूं नका हंसूं नका ॥४॥
> ओटींत घेउनि गुलाल, सख्या मेहुणीसंगें भुलाल।
> तिचा नवरा मोठा जलाल, तुम्ही हंसूं नका हंसूं नका।
> एका जनार्दनीं पोस्त, गाणें गातां हालमस्त।
> नाहीं तरी भडवे समस्त, तुम्ही हंसूं नका, हंसूं नका ॥६॥

कुंटीण, जगझोडी, सौरी ह्यांचं नातंगोतं एक नि भावभाषा एक. बोलून चालूनच ह्या स्वैरिणी, ह्या काय नि कसें बोलतील ह्याचा नेम

भांड २४६८,२६२०, थाक २४६९, निर्लज्ज २४८६ गांवगुंड २६४१,२६४२ होळी, शिमगा २६४३,२६४४, जगझोडी २६७२, कुंटीण २६७८, सौरी २२१२-२२२५.

नाहीं. पण नाथांच्या ह्या स्वैरिणी परम योगिनी आहेत. त्यांचें बोलणें म्हणजे गूढगुंजन आहे. ही परमार्थपर भाषा उकलायला मोठी अवघड आहे. पण साधुसंतांच्या अनुभवाच्या खुणांवरून ही उकलतां येते. हा सारा त्यांचा आत्मानुभूतीचा आविष्कार आहे. तो शब्दांनीं वर्णन करून सांगणें अशक्य. अनुभवांनींच तो जाणायचा असतो. ह्यांतील सुसूत्रता आणि सुसंबद्धता ही विशेष गोष्ट असते. हीं वर्णनें भरमसाट आणि पिसाट कल्पनेची पिशाच्च संतता तर अगदींच नव्हेत. नाथांच्या पुष्कळशा भारुडांतून हीं आढळतात. त्यांतील शब्दरचना प्रसंगोपात्त वेगळी असली तरी अनुभवांची स्थिति सारखीच आहे. अर्थात स्थिति भिन्न असते तेथें अनुभवहि तदनुरूप भिन्नच असतात. पण त्या त्या स्थितींतील ते ते अनुभव सर्वत्र सारखेच आढळतात. कल्पनातीताचें काल्पनिक वर्णन करणारें हें गूढगुंजन नसून अनुभूतीच्या भट्टींतून तावून निघालेलें हें आत्मरंजन आहे. अस्तु. नाथांची 'जगझोडी' त्यांनीं तिचें **'नांव ठेविलें लाडी'** तिला आणि **'सद्गुरुमाय कुंटीण'** यांना वंदन करून पुढे चला नि स्वैरिणींचे बोल ऐका. एक म्हणते, **भोळा दादला बाई म्यां केला, संसार सारा नागविला** दुसरी म्हणते, **मी निसंग झालें नि परब्रह्मीं रतलें** तिसरी म्हणते, 'माझें सौरीचें बोल ऐकून तुम्ही तसें वागूं नका. योग मार्गीं लागूं नका, त्यानें कित्येक वाया गेले.' तुम्ही आपले **संतपाय धरा नाहीं तरी उभ्या बाजारीं फजीतीचा होईल थारा.** चौथी म्हणते, **मी सुखाची कन्यका झालें वाढविली घरीं वाढविली घरीं। देखतां पाहतां उचलून उचलून नेली चोरीं.** यास्तव **एकाजनार्दनीं दास भवीं भुलूं नका.** मी देहबुद्धीच्या नादीं लागून अविद्येच्या घरांत नांदत होतें, तों षड्विकारांनीं मला पाशांत गोंवलें, नि मग मी वाटेल तशी वागूं लागलें. तुम्ही तसें होऊं नका. एकाजनार्दनाप्रमाणें दास व्हा. संसारांत भुलून पडूं नका. पांचवी म्हणते, **मी कासरा लावून सासरा मारला, नि दादला टाकून आल्यें; आतां भेद उरला नाहीं.** अर्थात ज्ञानाच्या योगानें मी प्रपंचाचा निरास केला आणि अहंकाराचा वास पुसून टाकला. मी आतां भेदातीत झाल्यें; 'एकोऽहं' अशी झालें. एकीनें **सौरी होऊन संसार गोड केला.** एक जातीभ्रष्ट होऊन दारोदार हिंडते आणि **चाळ सख्या रामा सुख**

**होईल आम्हां** असें अखंड नाम **घाचेनें** गातें; एक सौरी **निरंजनी आतां निर्गुण पंथ आमुचा** असें गीत गाते आणि एक **भावाची मी सौरी झाल्यें, आलें संतापायीं**, असें आपलें आत्मनिरूपण करते. अशा प्रकारें नाथांच्या **ह्या** सौरी आत्मज्ञानाच्या वाटा चोखाळलेल्या, योगाभ्यास करून ब्रह्मानंदात **मग्न** असलेल्या आणि संसाराला तिलांजली दिलेल्या अशा आहेत. त्यांचा उपदेश मोठा मंगल आहे. गूढगुंजनानें ह्या अहंमौढ्यभंजन करतात आणि निगूढतर मार्गावरील खुणा दर्शवितात.

संसारांत वर दर्शविलेल्या क्रियाव्यक्तींच्या व्यतिरिक्त प्राणीसृष्टि नि भूतसृष्टीचाहि सबंध येतो. नाथांनीं त्याहि मार्गानें जनतेस जागृतीचा धक्का दिला. यांतील सर्प आणि पोपट आपण पूर्वीं पाहिलेच आहेत. आतां इतरांचा विचार करूं. नाथ म्हणतात, 'कामक्रोधांचा विंचू चावला म्हणजे तम घाम येतो, त्यावर सत्त्वाचा अंगारा लावावा.' टिटवी ही **यमाची तराळीन** आहे. तिची टिवटिव मृत्युसूचक असते. तेव्हां जागे व्हा; सार्थक करा. बुलबुल हिंदींतून सांगतो, "अरे टोंग्या, तुझें जप तप खोटें; तूं आशेंत फसला आहेस." अन्तःकरण शुद्ध नसल्यामुळें यातना भोगीत असलेली वटवाघुळ गुरूस शरण जाऊन जन्ममरण चुकविते. साऱ्या प्राण्यांतून नाथांनीं अशा सूचना दिल्या नि शेवटीं 'सगुण' 'निर्गुण' ह्या दोन्हीं पांखरांचें विवरण केलें. **सगुण-पांखरूं** ( श्रीकृष्ण )

**कृष्णा एक पांखरूं आहे, तें मुखावीण चारा खाय रे**<br>
**डोळे नाहीं परि तें पाहे, वाचेवीण सोय गाय रे १ ॥**<br>
**सख्या त्याचें नांव कान्होबा, कृष्ण म्हणती सर्व रे**<br>
**त्याचें वास्तव्य कोठें आहे? पर नाहीं परी तें उडे रे २ ॥**<br>
**तिहीं लोकीं हिंडते, त्रिभुवन त्याला थोडें रे ;**<br>
**त्याचें नखांत आकाश बुडे, तें सन्मुख चहूंकडे रे ३ ॥**<br>
**अहो त्याला मायबाप , दोन्हीं नाहीं रे**<br>
**एकपणेंवीण पाहती , जनार्दनाचे पाय रे. ४ ॥**

## निर्गुण-पांखरूं

**राईएवढें पांखरूं दादा, त्रिभुवन त्याचा थारा ॥धृ०॥**<br>
**नर आणि नारी त्या बा पांखराचा चारा ।**

---

विंचू २५८७, टिटवी २६६७, बुलबुल २६६९; वटवाघूळ २६७०, पाखरू २६७१; २६८६.

पिंडीं आणि ब्रह्मांडीं त्याचा
अनुभव घेतां चुकेल चौऱ्यांशींचा फेरा ॥ १ ॥
एकवीस स्वर्गांवरतीं त्या बा पांखराची उंची
डोळ्यांतील बाहुलें त्या बा पांखराची निंची
सप्तहि सागर पांखरूं घेऊन गेलें चुंची ॥ २ ॥
पिंड आणि ब्रह्मांड मच्छिंद्रनाथानें दाविलें
त्याच्या अनुग्रहें गोरक्षनाथानें ओळखिलें
तयाच्या प्रसादें एकाजनार्दनीं गाईलें ॥ ३ ॥

एवंच, प्राणीसृष्टिहि समाजजागृतीच्या कामीं त्यांना साह्यकर्ती झाली. तीहि परमेश्वरस्वरूप असून समाजास नीतिसदाचाराचे नि भक्तीचे पाठ देते.

प्राण्यांप्रमाणें भुतांच्या कल्पनेचाहि त्यांनी उपयोग करून घेतला. पण हें भूत मात्र फारच वेगळें आहे, सर्व भूतांचें भूत आहे. हें लागलें म्हणजे संसाराचें येणे जाणे उरत नाहीं. हें भीमातीरीं पंढरपुरीं राहतें नि हेंच वैकुंठपुरींहि राहते; हें सर्वत्र राहतें. हें भूत मोठें दारुण आहे. पूर्वी ह्यानें मोठमोठे झडपिले ते पुन्हां संसाराला आले नाहींत. हें भूत जसें अलौकिक, तसा ह्याला झाडण्याचा उपायहि अलौकिक आहे. सांसारिक लोक अनेक उपाय, मंत्र, तंत्र इत्यादि करून भूत झाडतात. कित्येक झाडांना तें सोडतें नि कित्येकांना सोडीत नाहीं. पण हें भूत झाडण्याचा एकच उपाय आहे; आणि तो म्हणजे ह्याचा अंगीकार करावा. नाथांचें भूत सगुण निर्गुण दोन्ही स्वरूपांत आहे. हें भूत झपाटतें कसें आणि ह्यानें झपाटलें म्हणजे काय अवस्था होते ती नाथांनीं स्वानुभवानें सांगितली आहे. "मायेच्या मेळ्यांत मी इंद्रियाचा गोंधळ घालीत होतें, तेव्हां कशी तरी बोधाच्या पाळीवर गेले आणि तेथें अवचित संचार झाला. मला माझीच झडपणी झाली; तिजवर उपाय कांहींच चालेना. आतां देहबुद्धीची सांडणी लौकर करा ( सांडणी=उतरून टाकणें ) अहो! हा मन्मथ मोडून पडला. कल्पना उधळून गेली. देहाची शुद्ध नाहीं राहिली. विदेही झाल्यें. आता मी आपणाशींच खेळतें, द्वैताला शिवत नाहीं. मी वासनेचें मूळच

---

भूत, भूतझडपणी २४७१, २४७२, २५८८, झाडणी २४७५,

जाळून टाकलें आहे. कानीं शब्द पडतांच शब्दाच्या मागें पुढें तेंच असतें, नि शब्दांच्या आंतहि तेंच बसते आणि स्वतःच विदेहीपणानें ऐकतें. मी अमूप चराचर पाहतें, पण तेथेंहि तेंच तें दिसतें. ह्याची दृष्टि तेजाळ असून, ह्यानें नामरूपाची होळी केली; आणि हें आपणच आपणास पाहतें. ते कठीणांतलें कठीणपण आणि मृदूंतलें मृदुपण आहे. जें शरीरास स्पर्शतें त्या स्पर्शाचा स्पर्शहि तेंच असल्यानें शरीर डोलत राहतें. वासांतहि तेंच आणि घासांतहि तेंच. ह्याला भोजन फार आवडतें. तें गगनच खाते आणि प्रपचाचा तर एकच घास करतें. जें रसनेला चाखतां येत नाहीं त्याची नेत्रांनीं गोडी घेते. असें जेवून तें सदा तृप्त असतें. चालतांना शरीर चपळ वाटतें नि कर्मांत चचळपणा आला तरी अतर निश्चळ झालें आहे. हातपाय काम करतात, पण करूनहि कांहींच केलें नाहीं असें वाटतें, कांहीं तरी विपरीत केलें असें वाटते. निजलें असतां हें शेजारीं येऊन निजतें नि मग शेजेबाजेचेंहि भान रहात नाहीं; झोंप लागली असतां अंगाला गगन रुतेल, म्हणून हे मायेला मागे सारून मजवळ पहुडतें. मनाच्या पोटांत शिरून मौनाची खूणगांठ बांधतें आणि ती न सोडतांच निःशब्दपणानें गुलगुल गोष्टी करतें. अहो, हे भक्त, संत, ज्ञानी ह्या भूताची झाडणी करायला आले नि अगुणाच्या गुणांत मिसळून गेले. त्यांनीं शिरीं हात ठेवला आणि नांव गाव पुसलें. नांवरूप सांगतांच एकरूप झालें. गुणी आले घरा अन् त्यांचा लागला वारा; संसाराचा पसारा आटून गेला. कामधामांत असा एकच ठसा ठसला; असा एका जनार्दनीं संचारला.”
२४७५.

नाथांनीं केलेलें हें उन्मनी अवस्थेचें वर्णन. त्यांत त्यांचा साग स्वानुभव ओतला आहे. हें भूत लागण्यास सारे साधुसंत प्रयत्न करतात. ज्यांचें सुकृत सफल होतें तेच याच्या तावडींत सांपडतात. नाथांनीं हें भाग्य लुटलें आणि इतरेजनासाठीं फुकट वांटलें. ह्या भूताची अघटित केलि, त्याच्या पोटीं ढालगज जन्मली. नाथांनीं ढालगजेचेंहि वर्णन केलें. ही ढालगज म्हणजे माया आहे.

> **तें रे तें रे तें कान्होबा तें रे तें रे तें ॥ध्रु०॥**
> **पहिलें कोठेंच नव्हतें कांहीं, चंद्र सूर्य तारा नाहीं**
> **अवघें शून्यच होतें पाही, कान्होबा तें रे तें रे तें ॥१॥**

तेथें एक टालगज निर्माण झाली, तिनें पहा एवढी ख्याती केली
इंद्रादिकांस म्हणे बाहुलीं, अमरपुरी तिची घरकुली ॥२॥
ती मूळची कर्णकुमारी, तिचा बाप तो ब्रह्मचारी
तो जन्मला तियेचे उदरीं, ऐसी पाहतां नवलपरी ॥३॥
तिनें बापाचि दादला केला, कोण वाईट म्हणे या बोला?
अवघे तिच्याच बोलणें चाला, तरी कैवल्यसुख तुम्हांला ॥४॥
तो तियेसी शिवला नाहीं, वांझ गर्भिण झाली पाही
व्याली पांच पंचवीस पोरें तेही, ऐशी तियेची नवलपरी ॥५॥
ऐशी व्याली ती सकळ सृष्टी, न पडतां भ्रताराचे दृष्टी ॥
एकाजनार्दनीं या गोष्टी, विचारा सद्गुरुच्या मुखीं ॥६॥

ह्यांत निर्गुण निराकारापासून सर्व सृष्टि कशी उत्पन्न झाली, तें नाथांनीं वर्णिलें. प्रथम सारें शून्य होतें. कांहींच नव्हतें; त्यांतून माया निघाली [ हीच टालगज ] नि तिनें सृष्टि सजिली. ही कर्णकुमारी नि हिचा बाप ब्रह्मचारी. हिला स्वतःला कांहीं करतां येत नाहीं नि तो निर्गुण निराकार हिजशीं संसार करीत नाहीं. पण तो बापच हिच्या पोटीं जन्मतो. शुद्ध चैतन्याचा आत्मसत्तेशीं संयोग होतो. तेव्हां ही रचना करूं लागते. अशी ही बापाशीं विवाह करून त्यालाच आपल्या पोटीं जन्मविते. तिच्या तंत्रानेंच सारें चालतें, नि कैवल्य मिळतें. तो तर तिला स्पर्शलाहि नाहीं. तिची नि भ्रताराची गांठहि अद्याप पडली नाहीं. अन् ती वांझोट झाली, पंचमहाभूतांची पंचवीस तत्त्वांची–पोरांची–माउली. कारण तो झोंपल्याबरच ही जवळ जाते नि तो जागा होतांच दूर पळते. अशी ही टालगज–माया आहे २६८४.

नाथांनीं ह्या खऱ्या भूताप्रमाणें एका खोट्या भूताचेंहि एक भारुड गाइलें आहे. २६५८. श्रीकृष्णाचा एक सखा ' वांकडा ' या नांवाचा असून तो आपल्या धोंगड्या बोलण्यानें तें चित्र रेखाटतो. तेंहि मोठें सुंदर आहे.

धोंगड माझें बोलणें कान्होबा धोंगड माझें बोलणें ॥ ध्रु. ॥
जुनाट ओंगळा काळाचा काफडा डोंगरी राहतो भोंडारे ॥
झडपिला हातें नामयाचि धांवें पाठीसी लागला भिल गोंडा रे ॥

काजळ खोपा नेटक्या रूपा पाहुनि भुलला तोंडा रे ॥
कुल्लाळ हाडाचा बाप चहाडाचा अखंड घडितो मडकीं रे ॥
त्यासी भूतसंचार झाला हिमाचळाचें खडकी रे ॥
भूतवैऱ्याची नवरी पाहुन जिवासि भरली धडकी रे. ॥
कोण्हे एके वेळीं पाठीसी लागली भेडसाविली लेंक लाडकी रे ॥
नगाचे दंदी दिगाचें खांदी हाडे हाडांचा ढेंगा रे ॥
त्यासी भूतसंचार जाहला येोनी जडल्या अंगा रे ॥
सुत अंधाचा परांगनेचा चोर फेडितो कांगा रे ॥
त्यासी एक वृक्ष पुढें भेटला डांगानें मोडला ढांगा रे ॥
सोळा सहस्त्र नारी भोगून ब्रह्मचारी तूं एक म्हणाविसी लंडा रे ॥
वांकड्यानें आह्मणा घातला जाणा उकलील तो विरळागत रे
एकाजनार्दनी विनवीतअसें भूत नव्हे कान्होबाचें सूत रे २६४८

या वाकड्याची भाषा धोगड आणि वांकडी आहे, पण नदी डोंगी परी नीर नोहे डोगें, ऊंस डोंगा परी रस नाहीं डोगा. याची भाषा धोंगड असली तरी भावात फार गोडी आहे. हें भूत म्हणजे कान्होबाचे सूत्र आहे, लीला आहे. त्याच्या मायेचा हा खेळ आहे. वस्तुतः नाथांनीं ह्यांतून हेंच सांगितलें कीं मानवानें ईश्वरसाधन करावें. तीच त्याची खरी स्थिति असून प्रपंचमोहांत गुंतून होणारे क्रियाजात हीच खरी भुताटकी आहे. या मोहानें शिव, विरंची, इंद्र यांचीहि दुर्दशा केली.

नाथांनीं आपल्या अध्यात्मज्ञानाचे लोण समाजाच्या सर्व वर्गांपर्यंत पोंचविण्यासाठीं समाजांतील प्रचलित अशा पुष्कळशा कल्पनांचा उपयोग केला आणि आपला उद्देश सिद्धीस नेला. समाजातील दुःखांना वेशीवर टांगलें आणि दुःखितांचें समाधान करून दुष्टांना, दुःख देणारांना, उपरोध-उपहासाचे फटके लगावून, सर्वांनाच सदुपदेश केला. मुख्य विषय आध्यात्मिक उन्नतीचा असल्याकारणानें निर्गुणाच्या स्वरूपाचें अनुभविक वर्णन करीत असतां, त्यात गूढता पुष्कळच उत्पन्न होते. पण ती अपरिहार्य आहे. त्यांचे कूटाचे अभंग बरेच असून त्यांत कांहीं भारुडेंहि आहेत. त्यांचा अर्थ लावण्याच्या नादीं लागण्यापेक्षां त्यांचा थोडा परिचय करून घेऊन त्यांनीं धर्म, वर्ण जाति यांतील भेदभाव नष्ट करण्यासाठीं कसा प्रयत्न केला ते

पाहूं. " अविवेकानें नवल केलें नि संसार रचिला," "पुरुष हा मायेच्या आवरणांत येऊन प्रपंच रचतो." 'जीवाला शिवरूप होण्याची तळमळ लागते,' ? 'सर्व खल्विदं ब्रह्म' असल्यामुळें जग सारें ब्रह्मच आहे. अविद्येचा मळ न लागतां परब्रह्म साकार सगुण होतें. परब्रह्मानेंच माया निर्मिली, तोच तिच्या पोटीं विश्वरूपानें अवतरतो. त्याला विश्व म्हणावें, कीं माया, कीं परमेश्वर ? बाप, कीं माय, कीं पुत्र ? काय म्हणावें कळत नाहीं. सारें एकच एक. तेव्हां मौनानेंच त्याचें जातक वर्तवावें. चिंचेच्या पानावर देऊळ असावे, नि तें बांधणारानें आधीं कळस करून मग पाया भरावा त्याप्रमाणेंच, मायेचें स्वरूप अनिर्वाच्य आहे. हें आणि अशासारखें गहन तत्त्वज्ञान त्यांत उलगडून दाखविलें, तें थोडें अवघड वाटणारच. अस्तु.

नाथांच्या काळीं हिंदु मुसलमान, इतर जाती नि पंथ फार असून दुरभिमान फार वाढला होता. तो नष्ट करून समता प्रस्थापित करण्याचा नाथांचा कटाक्ष होता. यासाठीं त्यांनीं भारुडांचा बराच भाग खर्ची घातला आहे. हिंदुतुर्कभांडण हें तर प्रसिद्धच आहे. त्यांत नाथांनीं दोघांनाहि उपदेश केला; पण मुसलमानांना त्यांचा आग्रह कसा दुराग्रह आहे, हें झणझणीत अंजन घालून दाखविलें. त्याचा सारांश नाथांच्याच शब्दांत पहा.

**जळीं स्थळीं काष्ठीं पाषाणीं देव। हा तुमचे किताबींचा मुख्य भाव ॥**
**तुमचा तुम्हांस न कळे पहा हो। पूर्ण अभाव तुर्काचा(तर्काचा)॥३८॥**
**थिजलें विघुरलें एक । तैसा सगुण निर्गुण एकत्व देख ॥**
**तुम्ही प्रतिमेचा करतां द्वेष । परम मूर्ख अविवेकी ॥३९॥**
**जी जी नेत करी बंदा। ती ती पूर्ण करी खुदा ॥**
**तुमचें किताबींचा बांधा । तुमचे बोधा कां नये ? ॥४०॥**
**तुमचा अभाव तुम्हांसी प्रकट केला। जवळील खुदा दूर बोभाइला॥**
**येकबार अल्ला, एकबार अल्ला। बाकी हैरान झाला, नाहीं भेटला अद्यापि ॥४१॥**
**दुरीलासी हांक मोठी । जवळल्यासी कानगोष्टी ॥**
**तुम्हांसी निकट नव्हे भेटी। बोरडोनी उठी मुख्य मुलाना॥४२॥**
**खुदा माना पश्चिमेकडे । येर अवघें काय ओस पडे ? ॥**

'मौजूद' म्हणा चहुंकडे । हें धडपुडें तुम्ही नेणा ॥४३॥
'पंच वक्त' खुदाचे झाले । बाकी वक्त काय चोरीं नेले ? ॥
तुमचें शास्त्र तुम्ही भुलले । देवासी केलें एकदेशी ॥४४॥
आम्ही, म्हणतां, पूजितों फत्तरें । तुम्ही कां मुडद्यावर ठवितां चिरे ॥
दगडाचे पूजितां हाजिरे । पीर खरे ते माना, ॥४५॥
केवळ जें कां मेलें मढें । त्याची जतन करितां हाडें
फूलगलफ फत्तरा यावरी चढे । ऊद फुलें तुम्ही वाहतां ॥४६॥
तुम्ही तुरुक परम मूर्ख । नेणा दोष निर्दोष ॥
प्राणी प्राणियातें देतां दुःख । भिस्तीं (बेहेस्त=स्वर्ग) सुख तुम्हां कैचें ॥५४॥
खुदा मारी ते मुरदार देख । तुम्ही मारा ते पवित्र चोख ॥
खुदापरीस तुम्ही जालेती पाक । यवन हलख दोजखीं ॥
'जबे' केलिया भीस्त पावे बकरा । तरी तुम्ही निमाजा, रोजे कां करा?
आपले जबे आपण कां न करा । भिस्ताच्या (बेहेस्त=स्वर्ग.) घरा जावया ॥५७॥
हिंदु मुसलमान दोही । खुदानें पैदा किये भाई
तुर्कांची नपाई पाही । हिंदू धरूनी मुसलमान केला ॥५९॥
हिंदू करतां खुदा चुकला । त्यासी हुनी थोर तुमच्या अकला !!
हिंदूस मुसलमान केला । गुन्हा लाविला देवा !! ६०
ब्राह्मण म्हणे अहो जी स्वामी । वस्तुता एक तुम्ही आम्ही
बेचाव चालला नीतिधर्मीं । जात परब्रह्मीं असेना ॥६४॥

यांत नाथांनीं मोठ्या युक्तिवादानें आणि मिर्भीडपणें मुसलमानांच्या वेडगळ कल्पना दाखवून, ते आपल्या कृतीनें हिंदुधर्माचा तर अपराध करीतच आहेत, पण स्वतःच्या इस्लाम धर्माचाहि कसा उपमर्द करीत आहेत, हें दर्शवून दिलें आणि; तेंहि ज्या भाषेंत त्यांना कळेल त्याच भाषेंत सांगून पटवून दिलें. नाथांचा युक्तिवाद ज्याच्या त्याच्या पात्रतेप्रमाणें असतो. येथेंहि त्याचाच अवलंब करून सांगितलें कीं दोन्ही धर्म समान असून, तत्त्व एक, पण समाज अज्ञानानें द्वेष पसरून धर्मोल्लंघन करतो. अकलगारी भाषेंतहि नाथांनीं दोन्ही समाजांस ज्याच्या त्याच्या योग्यतेप्रमाणें 'अक्कल' शिकविली. ती कवडीमोलापासून लाख मोलाची आहे. ती मुळांतच पहावी. (२७३०-२७३६).

वर्ण, विद्या, वय यांच्या योगानेंहि मनुष्य वृथाभिमानी होतो नि अज्ञान राहतो. त्याचप्रमाणें, मानवी योनींत जन्मल्याकारणानें आपण सर्वांहून श्रेष्ठ आहों, नि इतर प्राणी आपणांहून कनिष्ठ आहेत, असा भेदभाव त्याच्या ठायीं उत्पन्न होतो. त्यामुळे तो इतरांशीं उपमर्दकारक वर्तन करतो. वस्तुतः ह्या सर्वांत कांहीं भेद नाही. सारींच एका परमेश्वराचीं लेंकरे आहेत. ही समतादृष्टि मानवांत निर्माण व्हावी. त्यानें सर्वांशीं प्रेमानें आणि नीतीनें वागावें सर्वांभूतीं भगवद्भाव पहावा. या उद्देशानें नाथांनीं बैल, कुत्रा, पोर, मुलगी आणि महार ही भारुडे रचिलीं आहेत. हीं सर्वतोमुखीं होण्याच्या योग्यतेचीं आहेत. बैलाच्या भारुडांत (२५९१) बैलाकडून ब्राह्मणाचें षट्कर्माचरण, व्रतपानुष्ठानादिकांतील दोष, त्याचा वृथाहंकार इत्यादि गोष्टी चव्हाट्यावर आणल्या असून, कुत्र्याच्या भारुडांत ब्राह्मणाच्या अविवेकाचा नाश करण्याचा प्रयत्न केला आहे.

ये रे कुत्र्या ये । आम्हां विटाळ करूं नको । आपली भाकर घे ॥
दे रे धन्या दे । विटाळ राहिला तुजपाशीं । आवरून आपुला तूं घे
आतां हें कुत्रें मातलें । भीच म्हणून गुंतून राहिले
कूस फार मोठी केली । जीवा तुझी खोटी झाली
उपाशी मरतों (मरतास) पाहीं बरें । अमृताचें सारें
घर एक सकाळ काय खाशी? तूंच मुद्दल कोठें राहशी?
एवढें ज्ञान झालें कोठें? सद्गुरूचें देणें मोठें
सद्गुरु तुला आहे कां रे? सर्वां घटीं तोच कीं रे
आम्ही तर म्हणतों कुत्रा तुला । अविद्येनें धत्तुरा दिला
ब्राह्मणाशीं अविद्या म्हणशी । देहें ब्राह्मण कैसा होशी?
श्रेष्ठ जन्म वेद बोलती । एवढे भले तरी कां मरती? । हरिभक्त अमर होती.
तें कळे कैसें? । आपण व्हावें तैसें । होईनासी कां रे । जात गोत पाही नाशीं कीं रे
हें ज्ञान तुला कशानें झालें? । एकाजनार्दनगुरुकृपेमुळें कळों आलें. २५९२.

आपण पालनकर्ते आहों असें समजून, हीन बुद्धीनें इतर जीवांकडे पाहणाऱ्या विप्रास कुत्रें सदाचार सांगतें कीं महाराज, इतरांस हीन लेखणें

हाच खरा विटाळ आहे. मी माजलें म्हणून असें बोलतें, असें समजूं नका; वस्तुतः हा आपला अहंकारच हें सारे आपणांकडून करवीत आहे. आपला हा देह म्हणजे जीवाला भाजणारी भट्टी आहे. आपण म्हणाल कीं भाकरीचा टुकडा न टाकला तर हें कुतरडें मरेल; पण ही भूल आहे. आत्मा अमर आहे. आपण जर पशुप्राणी इत्यादिकांना दान करून उरलेले अन्न खाल तरच तें अमृत आहे; तरच आपल्या पाकनिष्पत्तीचें सार्थक आहे. असें अन्नदान करण्याचें श्रेय मी आपल्या पदरांत टाकीत आहे. माझ्यासारख्या क्षुद्राला उद्यां आपण हांकून देऊं असा धाक घालता. पण मी आपणांला विचारतों कीं आपणच उद्या कोठे रहाल ? आपली तरी शाश्वती आहे काय ? हें माझे बोलणें ऐकून नवल मानूं नका. ही सारी सद्गुरूची कृपा आहे. माझा सद्गुरु सर्वत्र भरला आहे. सर्वांघटीं तोच राम, भाव शुद्ध, आहे. आपणहि असाच भाव धरावा. मला आपण यःकश्चित कुत्रें मानता; पण हीच तर अविद्या आहे. तिच्या पाशांत आपण जखडले आहां. आपण समजतां आपण ब्राह्मण, विद्यासंपन्न, ज्ञानवान आहों; परंतु महाराज, जन्मानें ब्राह्मण्य येत नाहीं. वेदांत ब्राह्मण श्रेष्ठ असें म्हटले असलें नि ते सत्य असलें, तरी तें ब्राह्मण्य आपणांपाशीं नाहीं. केवळ जन्मानें ब्राह्मण होतो असें वेदवचन असतें तर ब्राह्मण मेले नसते. हरिभक्त अमर असतात. हा अर्थ कळण्यासाठीं आपण तसें व्हावे लागतें. यासाठीं जाती इत्यादि अभिमान सोडावा लागतो, आणि यासाठीं सद्गुरुकृपा संपादावी लागते. अशा प्रकारे कुत्र्याने देखील ब्राह्मणाला सर्वांभूतीं भगवद्भाव पाहण्याचें ज्ञान कथन केलें आहे. मग एखाद्या पोरासोरानें त्यास शिकविलें तर त्यात नवल काय? नाथ पोररूप धारण करून पुढीलप्रमाणें सांगतात.

**ऐक रे ब्राह्मणाच्या कारट्या । वलवल करूं नकोस पोरट्या ॥**
**बोलणें अवघे घोखटया । हित नाहीं. ॥**
**आपुलें तूं हित पाहीं । वेदशास्त्रीं कांहीं नाहीं ॥**
**पुराणें पढोनी केलें काई । हित नाहीं ॥**
**कामक्रोधें शरीर भरलें । ज्ञानवैराग्य हरपलें ॥**
**बोलसी विषयाच्या बोलें। हित नाहीं ॥**
**आपुलें हित करीं कांहीं । सद्गुरूसी तूं शरण जाईं ॥**

**मी-तूं-पणें नुरे कांहीं ॥ हित पाही ॥**
**एका-जनार्दनी पोर । केला सारासार विचार ॥**
**पावला सद्गुरुद्वार । हित जालें.॥** २६५३

शुष्क निरर्थक वेदांची पोपटपंची, खळखळ करणारे **अवखळ** पांडित्य, स्वार्थपरायण पुराणप्रियता हीं काढून टाकून कामक्रोधांना घालविलें नि ज्ञानवैराग्य प्राप्त करून घेतलें तरच सद्गुरुकृपेने मी-तूं-पणाचा भेद नष्ट होऊन स्वहित साधतां येतें. हा लहान पोराचा उपदेश अन्यथा आहे असें कोण म्हणेल? पण या सर्वांपेक्षां महाराने ब्राह्मणबुवांना जें **चरण-**तीर्थ पाजलें तें अधिक अमृतमय आहे २७१९. **कां रें महारा बदमस्ता** ही ब्राह्मणी गुर्की आणि **कां हो ब्राह्मणबुवा भलतेंच बोलतां** ही महाराकडून ब्राह्मणाच्या भलतेपणाची मिळालेली नम्र सूचना आपल्या विरोधी स्वरूपानें कशी उचलून दिसते? पुढें ब्राह्मण रागावून **तुझे बापाचें भय काय?** म्हणून त्याच्या बापाचा उद्धार करतो. महाराला एकपक्षी उद्धार कसा रुचावा? तो आपल्या नि दुसऱ्याच्याहि आईबापांत भेद न पाहणारा आहे. **मायबाप तुमचें आमचें एकच हाय** म्हणून तो ब्राह्मणाच्या उभय कुळांना पाणी पाजतो. मस्तकांतील उष्णता नाहींशी होण्यास एवढा शिंतोडा पुरेसा वाटून ब्राह्मण थोडया सामोपचाराने म्हणतो, **ऐक ऐसे नको बोलों**. त्यावर तोहि सरळ तेंच सागतो, अहो यांत वाईट काय नि भेद कसला? **निर्गुणापासून अवघे झालों**. महारानें असें सगुणांतून निर्गुणांत नेल्यावर ब्राह्मणातील गुणज्ञता जागृत होते. पण संदेहाचें पांघरूण अजून तिनें झुगारलें नाहींच. यास्तव तो शंका घेतो, **निर्गुण तुलाकाय ठावें?** त्यावर महार **आत्मस्वरूपीं शोधून पहावें** असा आत्मगुटिकेचा एक घुटका पाजतो. तेव्हां ब्राह्मणाचा मद खाडकन उतरतो आणि तो प्रांजळपणें मान्य करतो कीं **आत्मस्वरूप आम्हां कळेना.** असा अहंकाराचा लोप झाल्यावर नम्रतेनें जर बाहू न पसरले तर ती नम्रता कसली? महार म्हणतो, **नाहीं तरी संतांशीं शरण जाना.** पण आजपर्यंत तर विद्येच्या मदानें संतांचें अस्तित्वहि अमान्य होतें. तेव्हां त्यांच्यांतील सामर्थ्याची शंका साहजिकच येऊन ब्राह्मण विचारतो, **संतांशीं शरण गेल्यानें काय होतें?** महार म्हणतो, महाराज, जो चुकाया म्हणून

तुमची सारी खटपट आजवर चालली आहे, तो चौऱ्यांशीचा फेरा चुकतो. अशा प्रकारें नाथांनीं महाराला ब्राह्मणाकडून शरणचिठ्ठी देवविली आहे. आतां ह्यांतील मर्म काय सांगावें? हें सारें उघडें परब्रह्म आहे. तें अक्षांनीं पहावें, वाणीनें वाचावें, मनानें मानावें, चित्तानें चिंतावें आणि वृत्तीनें आचरावें.

ह्याचप्रमाणें नाथांनीं पोरा-थोराचा आणि मुली-म्हातारीचाहि प्रसंग चित्रिला आहे. हेंहि पोर फार ज्ञानी आणि निर्भय आहे. जशास तसें उत्तर देऊन अज्ञानाच्या माथीं ज्ञानाचे ठसे उमटविणारें तें आहे. तें म्हणतें, "आपण ब्रह्मस्वरूप आहों, तेथें लहान थोर हा भेद नाहीं. पण हा भेद गळून जाण्यासाठीं सद्गुरु करावा नि आत्मस्वरूप पहावें. नुसतें वयाचें थोरपण हें वहाड्या नि खोटेपण यांचें मायपोट आहे, कारण तेथें ज्ञान अल्प आणि गर्व फार. यास्तव गुरुकृपा पाहिजे. गुरूच्या शक्तीवर विश्वास पाहिजे. विश्वास बसण्यासाठीं पुराणात पुष्कळ उदाहरणें दिलीं. तसा निश्चय करावा नि 'सोऽहं' मंत्रजप करावा. त्याला काळवेळचें बंधन नाहीं. म्हातारपणीं भक्ति करूं म्हणाल तर आयुष्य आपल्या हातचें थोडेंच आहे? यास्तव आतांच भक्तिपंथाला लागा." मुलगी देखील म्हातारीला असाच उपदेश करते. पण बोलून चालूनच ती मुलगी नि जात आडाणी, तेव्हां तिच्या भाषेंत असभ्यता असल्यास ती उपेक्षणीय वाटते. पणती खापराची असली तरी आंतील ज्योत तेजःपुंज आहे, निजधनाचा ठेवा दाखवून देण्यास समर्थ आहे. ही फटकळ पोर म्हातारीला सांगते कीं तूं सर्वांशीं प्रेमानें, समतेनें वाग. स्वार्थी संसारांत सदा गुंतून राहूं नकोस. हा संसार म्हणजे फुटक्या मडक्यांची उतरंड आहे. थोडा इंद्रियनिग्रह करून विवेकवैराग्याला वाढव. एरव्ही ग्रस्त करणारे हे षड्विकार तुला कांहीं सुचूं देणार नाहींत. यासाठीं सद्गुरूचे पाय धर. तनमनधन तेथें लाव. त्यानें संसार सुखकर होईल, अर्थीच आटून जाईल. जगांत पतिव्रता म्हणून तुझी ख्याती होईल आणि पांडुरंग हातीं येईल. नाहीं तर पहा बये, उद्यां येईल काळाचा फेरा आणि संसार जाईल सारा.

नाथांच्या भारुडांचें अन्तरंग हें असें आहे. त्यांत त्यांचा स्वतःचा आध्यात्मिक अनुभव असून तो त्यांनी जनतेच्या समोर सांगितला आहे. यांत समाजोद्धाराचाच केवळ हेतु असल्याकारणानें तो वेगवेगळया प्रकारांनीं आणि कळकळीनें सांगितला, त्यासाठीं सदाचार आणि नीति ह्यांजवरच त्यांचा सारा कटाक्ष आहे. समाजाची नीति जोंपर्यंत सुधारत नाहीं, तोंपर्यंत उद्धाराची आशा व्यर्थ आहे. नीतीची अभिवृद्धि हीच समाजाची समृद्धी आहे, हें ओळखूनच त्यानीं अध्यात्मास असें नीतीच्या समवेत आणून दोघांचा समुचित संयोग करून दिला आहे. आध्यात्माची शिकवण विसरलेला समाज रसातळास जातो आणि नीति नसलेल्या समाजांतून अध्यात्म अस्तंगत होतें. ज्ञानेश्वरादिकांची आध्यात्मिक शिकवण नामदेवांनीं समाजांत पसरली, पण पुढें कालाच्या ओघांत समाज दुरावत गेला; तेव्हां फिरून तिच्या योगाने समाजाची जोपासना नाथांनीं केली. ज्ञानेश्वरीचा प्रभाव नुसत्या वाचनानें किती लोकांत पडणार? आणि ज्ञानेश्वरी कितीकांना कळणार? समाजाला कळणारी भाषा नि पेलणारें तत्त्वज्ञान त्या काळीं पाहिजे होतें. अर्थात तत्त्वज्ञान तेंच असलें तरी नाथांनीं तें इतक्या खेळकर पद्धतीनें सांगितलें की समाजास तें सहज पचविनां आलें. अहो, घरीं तेंच नि दारीं तेंच, दळतांनाहि तेंच नि खेळतांनाहि तेंच, कामांतहि तेंच नि धामांतहि तेंच, संसारांतहि तेंच नि बाजारांतहि तेंच असें सर्वत्र तेंच तें करून सोडलें. समाजास त्यानीं पटवून दिलें की त्याच्यावांचून तर कांहींच नाहीं, मग आंधळया कोशिंबिरीचा खेळ खेळण्यापेक्षां डोळे उघडून वागलेलें काय वाईट? आपण आचरीत तर आहोतच, मग त्याची ओळखदेख कां नको? अशी समाजांत नाथांनी जागृती केली. निगूढ असलेलें अध्यात्म जनांत प्रगट केलें. महाराष्ट्रांत आणि मराठी वाङ्मयात तरी निदान अशी अलौकिक कृति पूर्वींहि कोणी केली नाही आणि नाथोत्तर कालींहि कोणीच केली नाहीं. नाथांच्या पूर्वीं ज्ञानेश्वर माउली झाली, पण तिची सावली अल्पकाळच लाभली. तिलाहि "घरीं दारीं योगी खेळविला पांडुरंग," असा लीलाविलास करतां आला नाहीं. नाथाचें अलौकिकत्व ह्यांत आहे. त्यांनीं संसारांत राहूनच ब्रह्मपद प्राप्त करून घेतलें आणि इतरांनाहि तसेंच आचरण्यास सांगितलें. त्यांच्या सांगण्यावागण्याचें सार पुढीलप्रमाणें आहे.

नीति सांगतों ऐका एक । दास सभेचा सेवक ॥
मन टाळूं नका एक । कोणी एक कोणी एक धृ० ॥
सांडावरून जाऊं नये । लांच खाऊं नये ॥
चोहोंट्यांत राहूं नये । कोणी एक कोणी एक ॥ १ ॥
अक्रीत घेऊं नये । इमान सोडूं नये
बैमान होऊं नये । कोणी एक कोणी एक ॥ २ ॥
सज्जनाशीं विटूं नये । नीचासवें बाटूं नये
तस्कराशीं पुसूं नये । कोणी एक कोणी एक ॥ ३ ॥
भक्तिमार्ग खंडूं नये । कुभांडपासी तंडूं नये
खळासंगें भांडूं नये । कोणी एक कोणी एक ॥ ४ ॥
सत्पुरुषासी छळूं नये । शिवेचा गुंडा टाळूं नये
केला नेम टाळूं नये । कोणी एक कोणी एक ॥ ५ ॥
सद्‌गुरुसेवा सोडूं नये । कुळधर्मासी मोडूं नये
पापद्रव्य जोडूं नये । कोणी एक कोणी एक ॥ ६ ॥
संपत्ति आलिया माजूं नये । अभिमानानें फुगूं नये
सभा देखून लाजूं नये । कोणी एक कोणी एक ॥ ७ ॥
असत्यवाद करूं नये । खोटा संग धरूं नये
भोचकाशीं(?) मैत्री करूं नये । कोणी एक कोणी एक ॥ ८ ॥
भलते भरीं पडूं नये । अनाचार करूं नये
कपट मनीं धरूं नये । कोणी एक कोणी एक ॥ ९ ॥
जन्मा आलिया स्वभावें । कांहीं सार्थक करावें
ऐसें मनीं विचारावें । कोणी एक कोणी एक. ॥ १० ॥
एकाजनार्दनीं भावें । संतचरणीं लीन व्हावें
सदा हरिनाम उच्चारावें । कोणी एक कोणी एक ॥ ११ ॥

हेंच सांगण्यासाठीं भारुडांची रचना झाली. असें वागल्यावर संसार सुखावह कां बरें होणार नाहीं ?

## नाथांचें कवित्व

नाथांच्या ठायीं साधुत्वाचा परम विकास आढळतो, तसाच कवित्वाचाहि पूर्ण विलास दृष्टोत्पत्तीस येतो. भारुडांचा हा व्याप पाहिला म्हणजे प्रामुख्यानें एक गोष्ट दृष्टींत भरते, ती त्यांतील विषयवैचित्र्याची होय.

हें विषयवैचित्र्य परिधान करून त्यांची प्रतिभा समाजांत संचार करते नि सारें जीवन आलोडून काढते; आणि एकंदर जीवनाचेंच कवन करते. प्रत्येक भारूड हें जीवनाचें व्यक्त नि साक्षात्कारी स्वरूप आहे. ह्या योगानें त्यांनीं एकंदर सामाजिक जीवन हाच आपल्या काव्याचा विषय केला आहे. यांत गांवगुंडापासून फकीरकलंदरापर्यंत, सासुरवाशिणीपासून हुंडगी-कंजारणीपर्यंत, भटाब्राह्मणापासून महारामांगापर्यंत, जोगिणीपासून कुंटिणी-पर्यंत, पोरापासून थोरापर्यंत, मुलीपासून म्हातारीपर्यंत, गारुडयाडोंबाऱ्या-पासून कोल्हाट्याकैकाडयापर्यंत, बैलकुत्र्यापासून विंचूसर्पापर्यंत, पिंगळ्या-पोपटापासून टिटवीवटवाघुळीपर्यंत, दळणकाडणापासून समाधीसाधना-पर्यंत समाजांतील साऱ्या जीवनक्षेत्रांचा समावेश आहे. देव-धर्म, नीति-रीति, आचार-विचार, सरकार-दरबार, खेळ-करमणूक इत्यादि सर्व कांहीं आहे. त्यांत व्यवहार आहे, अध्यात्म आहे, मनोरंजन आहे, मौढ्यभंजन आहे, आणि गूढगुंजन आहे. यावरूनच त्यांच्या खऱ्या कवित्वाची साक्ष पटते. विषयांचा व्यापच एवढा विशाल आहे कीं, तो समाजाला सर्वतोपरी वेढून घेतो, इतकेंच नव्हें तर एकंदर मानव्याचें आवाहन करतो. विश्वाशीं तादात्म्य पावल्यावांचून अशी वृत्ति उपन्न होत नाहीं. नाथांच्या जीवनावरून देखील हीच गोष्ट प्रतीत होते. **यस्मिन् सर्वाणि भूतानि आत्मैवाभूद्विजानतः** असें ते सर्व विश्वच आपणांत पहात होते, आणि आपणच विश्वरूपानें नटलो आहों, ह्याचा ते प्रत्यहीं जीवनात अनुभव घेत होते. त्या अनुभवानें पचलेलें, पचविलेलें ज्ञानच ते अशा काव्यरूपाने आचरीत होते.

ईशावास्योपनिषदांत कवीचीं लक्षणें एका श्लोकांत दिलीं आहेत. **कविर्मनीषी परिभूः स्वयंभूर्यथातथ्यतः। अर्थान् व्यदधात् शाश्वतीभ्यः समाभ्यः** तो आत्मविद् कवि म्हणजे क्रान्तदर्शी असावा, मनाचा स्वामी असावा, सर्वातिक्रमकारी नि सर्वांना व्यापून रहाणारा आणि शाश्वत-काळपर्यंत पुरेल इतकी सामुग्री यथायोग्यपणें मिळविलेला असावा. ह्या लक्षणांच्या अनुरोधानें कवीकडे पहावें लागतें. कवि हा शहाणा असतो नि बोलका असतो. तो क्रांतीचे बोल बोलतो नि जीवनांत क्रांति घडवून आणतो. पण ती प्रथम त्यानें पाहिली, ओळखली पाहिजे आणि केली गाइली पाहिजे. एरव्हीं बोलाचीच कढी बोलाचाची भात, जेवूनिया तृप्त

कोण आत्मा? त्यांनी एकत्वांत अनेकत्व आणि समष्टींत व्यष्टि पाहून ते जीवनाचें जीवन स्वयमेव बनले होते. ते क्रांतद्रष्टे होते. देहाच्या नि दैहिक जीवनाच्या जवनिकेला दूर सारून पलीकडील जीवनाचा आस्वाद त्यांनी घेतला होता. तें इतरांस दर्शविण्याचें सामर्थ्य त्यांच्यांत होतें. एवंच: कवीनाम् 'कविशिरोमणि' असें त्यानाच यथार्थपणें म्हणतां येते. कवित्वास आवश्यक दुसरी गोष्ट 'मनीषी' असणें. मनाच्या मागे लागून त्याच्या तंत्राप्रमाणें न नाचतां त्यालाच आपल्या आधीन करून घेऊन वाटेल तसें वाकविणें, वागविणें यांतच खरा पुरुषार्थ असतो. जो आपल्या मनाचा धनी तोच साऱ्या जगाचा धनी. तोच इतरांचीं मनें जाणतो आणि त्यांना आपल्या मनाची, त्याच्या मनाची आणि जगन्मनाची जाणीव करून देऊं शकतो. ज्याला आपलेंच मन नीट कळत नाहीं, तो इतरांच्या मनांतील गुतागुत काय उकलणार? असला हा काव्यप्रकार म्हणजे केवळ अव्यापारेषु व्यापार होणार. नाथांचे मन त्यांच्या मुठींत होतें नि ते विश्वमनाशीं मौनानें गुजगोष्टी करीत होते. कवीचा तिसरा गुण तो परिभूः असावा. कवीच्या कक्षेंत येणाऱ्या सर्व विषयांना अन्तर्बाह्य व्यापून कवीनें असलें पाहिजे. विषयाच्या मर्यादांच्या पेक्षां त्याची आकलन शक्ति मोठी तर असलीच पाहिजे, पण त्याच्या अंतरंगांतहि शिरून त्याचा कोन कोपरा त्यांला धुडांळतां आला पाहिजे. तरच वाचकाला त्या विषयवस्तुचें सम्यक् ज्ञान तो देऊं शकेल. एरव्ही आधळ्या माणसानें हत्तीच्या बाह्य आकारावरून त्याची परीक्षा केल्यासारखेंच होणार! कलावंत जसा कलावस्तूच्या निरनिराळ्या स्वरूपाकडे, आकारविकारांकडे दुरून आणि जवळून आणि समोवतीं फिरून, वेगवेगळ्या ठिकाणांवरून पाहतो. आणि शेवटीं तिच्या अंतरंगांतहि शिरून तिचें अंतरंगहि निरीक्षण करतो, तशी कवीची दृष्टि बाह्य परिवेषाना सामावून घेण्याइतकी सग्राहक आणि अंतरंगांतील भिन्नभिन्न भावांचें अभिव्यंजन करण्याइतकी सूक्ष्म असावी लागते. पण त्याच समवेत कवि स्वयंभूः हि असला पाहिजे. सर्वसंग्रहक वृत्तीप्रमाणें अन्यनिरपेक्ष अशी स्वतंत्र वृत्ति कवीला अत्यंत आवश्यक आहे. आत्म्याच्या व्यापकपणाचा अनुभव जसा अवश्य तसें त्याचें स्वयंपूर्णत्वहि अत्यंत आवश्यक आहे. कवीला अपूर्णत्वाला पूर्णत्व द्यावयाचें असतें. पण तो

स्वतःच अपूर्ण असला तर एकादशीच्या घरीं शिवरात्र जाण्यासारखाच काव्यप्रकार निर्माण व्हायचा. एका अपूर्णांत दुसरें अपूर्ण मिसळलें तर एरव्हींच्या गणितांत तीं दोन्हीं मिळून थोडें तरी पूर्णाच्या जवळ जातात; पण ह्या काव्यप्रांतांत कवीच्या अपूर्णत्वाशीं वाचकाच्या अपूर्णत्वाचा संयोग झाला म्हणजे उलट प्रकार होतो. दोघांचें अपूर्णत्व मिळून मोठें नि भयानक अपूर्णत्व उत्पन्न होतें, यास्तव कवीला स्वयंपूर्णतेची तर फारच आवश्यकता असते. आणि शेवटीं एवढी सिद्धता झाल्यानंतर सांगायची एक गोष्ट म्हणजे त्यानें शाश्वत काळपर्यंत पुरेल इतकें भांडवल स्वतः मिळविणें, आणि तेंहि यथायोग्यपणें. । नाथांच्या जीवनांत ह्या सर्वांचा परिपोष झालेला आढळतो.( त्यांच्या व्यापक जीवनांतूनच काव्याचा उगम झाला आहे. त्यांची विषयाचीं निवड, त्याजकडे पाहण्याची व्यापक, विशाल नि अंतर्भेदी दृष्टी, त्यांच्या ज्ञानाची परिपूर्णता आणि अपूर्णाला पूर्ण करण्याचें सामर्थ्य हीं त्यांत पदोपदीं प्रत्ययास येतात. आणि इतकेंहि असून वर जगदुद्धाराची तळमळ ही त्यांस विशेष पावनत्व देते. नाथांना प्राप्तव्य असें काय होतें? जें काय करायचें, सांगायचें ते जगत्कल्याणासाठीं. त्यायोगें भारुडांतील ह्या अगदीं साध्याहि विषयांचें उदात्तीकरण झाले आहे. परिसाचा स्पर्श झाला म्हणजे लोखंडाचें सोने होते, तद्वत् नाथांच्या कवित्व-स्पर्शानें भारुडांना उदात्तता आणि त्यासमवेतच चिरंतनत्वहि प्राप्त झाले आहे. कवित्वाचा साक्षात्कार पटण्यास यापेक्षां आणिक कशाची आवश्यकता असते? ।

विषयाचें उदात्तीकरण हें आत्मीयतेंतून निर्माण होतें. काव्य हें आत्माविष्कार असतें. आपणच ह्या सर्व विश्वाच्या रूपानें विलास करतों, ही महत्तम नि अत्यंत उदात्त भावना कवीच्या अन्तःकरणांत जितक्या अधिक प्रमाणांत वसत असेल, तितक्या अधिक उत्कटतेनें ती बाहेर उसळून येते. सर्व विश्वाशीं एकरूप पावलेला कवि आपल्याच आनंदांत निमग्न असतो. तो आपल्याशींच सारे खेळ करतो, कधीं हंसतो, कधीं रुसतो, कधीं गातो, कधीं नाचतो; आणि सदा-सर्वदाच गुंजन करीत फिरतो. त्याची ही सर्व क्रिया आपली आपणाशींच चालली असल्याकारणानें ती जशी मनांत येईल तशीच

जनांत प्रगट होते. हिच्या प्रगटीकरणाच्या वेळीं जो विषय तिच्या पथांत येईल त्याला दिव्यत्व देऊन ती चकासित करते. ह्याच वेळीं ती काव्याच्या स्वरूपाने लौकिकांत प्रगट होते आणि ते ते विषय तिच्या आविष्काराचें भाजन बनतात. नाथाचीं भारुडे हीं अशा व्यापक तन्मयतेंतून अवतरलीं. यास्तवच तीं त्या त्या विषयव्यक्तींच्या अन्तर्मनाचा ठाव घेणारीं झालीं आहेत. 'हठादाकृष्ट' अशी तन्मयता त्याची नव्हतीच. एखादा विषय काव्यास निवडावा, त्याचें चिंतन करीत बसावे नि तसल्या उपरान्तींच्या तन्मयतेंतून काव्याची प्रसूति व्हावी, हा त्यांच्या प्रतिभेचा धर्म नव्हता. अशी 'हठादाकृष्ट' निर्मिति असली म्हणजेच तिच्या कलात्मक मांडणीचेंहि प्रयोजन असतें. एरव्ही तिची आवश्यकता प्रतिपादन करण्याचें कारण काय ? नाथांनीं जीवनाच्या बाहेरून जसा त्याचा अनुभव घेतला होता, तसाच त्याच्या अन्तर्यामीं शिरूनहि तो आस्वादिला होता. ते स्वतःच जीवन बनले होते. अशी स्थिति असल्याकारणाने ह्या व्यापक जीवनास ह्या विषयांचा स्पर्श होताच त्यावर उठणारे हे तरंग म्हणजेच हीं भारुडें होत. अर्थात् हें प्रत्येक भारुड म्हणजे त्या त्या जीवनाचे दर्शनच होय. असें हें दर्शन जेव्हा सर्वव्यापी जीवनांतून अभिव्यक्त होतें, तेव्हां तें स्वयं-पूर्ण आणि स्वत्वसंपन्न असते. तें जसें आविष्कृत होते तसे तें कलात्मकच असतें. जीवन हें सर्वत्र पसरलेलें असून ते अनंत मुखांनीं प्रगट होण्याचा प्रयत्न करतें. निसर्गाचीं निरनिराळीं दृश्यें हीं जीवनाचीं नवनवीं दर्शनें असून तीं स्वयंपूर्ण असतात. नदनद्या, गिरिगव्हर, वृक्षलता, पानफूल ह्यातून जो जीवनाचा अव्यक्तावस्थेतील प्रवाह व्यक्त अवस्थेंत येतो, त्यांत कोठें न्यूनता नसते. त्या त्या स्थलीं ते ते जीवन स्वयंपूर्ण असून स्वतःचा साक्षात्कार सम्यक्पणें आणि स्वयंभूपणें करवून देतें. यांतच कलेचा उगम आहे. ह्या साक्षात्कारालाच कला म्हणतात. कला कोठून बाहेरून आणावी लागत नाहीं, ती जीवनातच असते. ती जीवनाचें व्यक्त- आणि साक्षा-त्कारी स्वरूप असते. नाथाचे जीवन सर्वव्यापी असून त्यांची आत्मीयता सर्वत्र पसरली होती; आणि तिजमधूनच ह्या बाह्य विषयांच्या संस्पर्शानें त्यांच्या जीवनावर हे भारुडाचे तरंग उठले असल्याकारणानें ह्यांची नैस-र्गिक आविष्कृती हीच कलात्मकतेनें अभिव्यक्ति झाली आहे.

नाथांची ही कलाकृति रसिकजनसंवेद्य होण्यासाठीं अनेक कल्पनांचा आश्रय करते. त्यांचा कल्पनासंभार फार प्रचंड आहे. निर्गुणनिराकारावर केलेल्या देवांच्या आणि देवींच्या कल्पना आणि त्या सर्वांवरहि पुन्हा एकत्वाची कल्पना हीच मुळांतच किती भव्य आणि अनुभवाच्या मुशींतून निघाली आहे! महालक्ष्मीचें वर्णन, फुलवरा, जोगवा, मोतीं, जातें, संसार, सर्प, चोळी इत्यादिकांमधील त्यांची कल्पना पाहिली म्हणजे तिच्या दिव्यतेनें नेत्र दिपून जातात आणि भव्यतेनें मन मोहून जातें. ह्या कल्पनाविलासांत उपमादृष्टांत फारसे नाहींत आणि उत्प्रेक्षेसारखी चमक बिजलीहि क्वचितच आढळते. पण त्यांचा मुख्य भर रूपकावर आहे. क्षुद्र वस्तूंवर अत्यंत भव्य उपमानाचे आरोप नि अव्यक्तांवर व्यक्तांची प्रतिष्ठापना करण्यांत ते अत्यंत निष्णात आहेत. ह्या रूपकांच्या पुढे जाऊन ते रूपातिशयोक्तिहि करतात; आणि त्याहि फार सरस नि समुचित असतात. पण त्यांचा मुख्य नि आवडीचा अलंकार रूपकच. त्यांचीं काहीं उदाहरणें पहा:— विषयउंडी, कामाचा चेडा, शांतिगाय, असत्याची कढी, सोहं-ढोलकें, प्रपंचवेळू, अहंभावभ्रतार, प्रपंचलुगडें, देहडेरा, मुक्तीची ध्वजा, भक्तिफरश, विकल्प-उडीद, संदेह-तेल, संदेह-श्वान, दंभ-सासरा, कल्पना-सासू ज्ञान-पुत्र, अभिमान-जीवडा, अहं-गांवगुंड, प्रबोध-लाडू, इच्छा-मुरळी, पूर्णत्वाची पुरणपोळी, अज्ञान-पोन, पंचतत्त्वांचे अंगुळें, बोध-बुधली, ज्ञानदिवटी, अनुहात-चवडंक, ज्ञानकोटंबा, विषयाचें सासर, बोधाचें कुंकू, भक्तीची कांठी, ज्ञानाचें कुरकुरें, प्रेमाचा खुळखुळा, ममताई-देशपांडीण, क्रोधाजी-नाईक, नामाचा चौघडा, जनाबाई-घड्याळमोगरी, ज्ञान कुदळ, सोहं दोर, शांतिक्षमेची मोट, विवेकाचें खुरपें, अलक्ष फळ, जीवशिव खुंटे, प्रपंच दळण इ. इ. अशीं हीं अनंत रूपकें सहज केलेलीं पाहिलीं म्हणजे त्यांचा रूपकांचा प्रपंच किती प्रचंड होता ह्या कल्पनेनेच मन थक्क होतें. यांत अचेतनावर सचेतनाचा आरोप आहे. आणि अव्यक्तांवर व्यक्तांचाहि आहे. नाथांनी कामक्रोधादिकांवर जे आरोप केले आहेत ते तर अगदीं तत्कालीन जिवंत अशा कार्यकारी अधिकाऱ्यांचे नि वतनदारांचे आहेत. हीं रूपकें त्यांनीं दोन्ही पद्धतींनीं केलीं आहेत; एक तर दोन्ही वस्तु एकरूप वर्णून उ० ज्ञानदिवटी; आणि दुसरी त्यांची

फोड करून उ० विवेकांचें सुरपें. पण कशाहि प्रकारें तीं रचिलीं असलीं तरी त्यांची निवड अगदीं यथार्थ आहे. ज्या व्यक्तीवरील व वस्तूवरील भारुड असतें त्या व्यक्तीच्या व्यवहारांतील वा धंद्यांतील वस्तूंचेच त्यावर आरोप केलेले असतात. खेळांत खेळांच्या वस्तूंचीं नि क्रियांची रूपकें तर चौघडा हा विषय असतां घड्याळ मोगरी, सनई, तुतारी, झांज, कहाळ इत्यादि वस्तूंचीं रूपकें ते करतात. त्या योगानें त्या त्या वस्तूची ओळख पटण्यास आणि तत्संबंधीं आत्मीयता वाढण्यास सुलभ जातें. त्याच प्रमाणे हीं रूपके अगदीं साधीं नि नित्याच्या परिचयातलीं आहेत. ह्या योगाने अध्यात्माची चटकन ओळख होते आणि अध्यात्मांतील वस्तूंचा व्यवहारांत कसा उपयोग करावा याचेंहि ज्ञान सहज होतें. त्यासमवेतच जीवनांत अध्यात्म कसा भरला आहे हें कळून अध्यात्मविषयींचा परकेपणा नि बुजरेपणा दूर होतो. ह्या रूपकाच्या साह्यानेच त्यानीं भावचित्रणें आणि व्यक्तिचित्रणे अगदीं मोजक्या शब्दांत केलीं. बोधाचें कुंकू लावून एका हातीं भक्तीची काठी, काखेंत ज्ञानाचे कुर्कुलें आणि दुसऱ्या हातीं प्रेमाचा खुळखुळा घेऊन नाचणारी नवलाई इतक्या थोडया शब्दांत निर्मिणें हें नवलच नाही काय ?

## नाथांचीं शब्दचित्रणें

नाथांच्या ह्या भारुडी रचनेंत अनेक शब्दचित्रणें आहेत. यांत तर त्यांनीं पुष्कळ केला रूपकांचा आश्रयहि केला नाही. केवळ वर्णनशैलीच्या नि सूक्ष्म अवलोकनाच्या साह्यानेंच त्यांनीं अत्यंत मनोज्ञ आणि जिवंत चित्रणें निर्माण केली. **आतां मान भाव झालों भिक्षा वाढा बाई, भिक्षा वाढा बाई॥ धृ ॥ मुलींचाची मानभाव वस्त्रें केलीं काळीं। कोरकें मागून झोळी भरली उलटी काठी धरली ॥ १ ॥ सोन्यारुप्याचे देव आम्ही मोडूनियां खाऊं । दगडाचे देव आम्ही दृष्टी न या पाहूं ॥ २ ॥ एकाजनार्दनीं मानभाव झाला । झोळीवरती झोळी ठेवुनि गडबडगुंडा केला ॥ ३ ॥** २५५८. हें मानभावाचें वर्णन किती थोडया शब्दांत मानभावांची ठसठशीत आणि यथार्थ कल्पना आणून देणारें आहे! तसेंच तें डोंबाऱ्याचें चित्रण, तें काय थोडें जिवंत आहे ? त्याचा तो आरंभ पहा:--

**काळे ढोल लागे ढोल तुझा वस्ताद खोल, तरीच मशी बोल नाहीं तर**

**वाया फोल जाईल रे गव्हारा** २६५०. आणि तो गारुडी! तो तर काय अगदीं आपणांसमोर आपला खेळच करतो आहे असें वाटतें. त्याची ती भाषा, तें गुरुस्मरण, तो जंगलचा जिवडा, तें **चल चल चल**, तो **हंडीबाग**, तीं प्रश्नोतरे, **बाप बडा क्या बेटा बडा** इ. इ. वर्णन म्हणजे अगदीं सजीवतेची मूस आहे. अशीं एक का दोन, किती तरी शब्दचित्रें नाथानीं भारुडांत निर्मिलीं आहेत. त्या त्या चित्रणात त्या त्या व्यक्तींचे स्वभावविशेष, आचारविचार, बोलण्या चालण्याची धाटणी, त्यांचा तो वाच्य आणि अवाच्य विनोदहि त्यांच्याच शब्दात वर्णिला आहे. त्यायोगें तीं अगदीं चलन वलन करणारीं आणि हमून खेळून काम करणारीं सजीव पात्रें वाटतात. आणि इतकेंहि करून त्याच्या भाषेत कांही अधिक उणें नाहीं की कृत्रिमता नाही. वरवर दिसणारा बाष्कळपणा वा निरर्थक रचना उ० एकाचे दोन, दोनाचे तीन, तिनाचे चार, चाराचे पाच, पाचाचे पचवीस इ. सारे शब्द सार्थ असून साभिप्राय आहेत नि साभिनिवेश आहेत. ह्यांत नाट्याला केवढ्या मोठ्या प्रमाणात त्यानी अवसर आणून दिला आहे. अशा प्रकारची शब्दचित्रणें, भावदर्शनें आणि व्यक्तिरेखा ही नाथांनीच मराठी वाङमयांत इतकी विविध, विपुल नि वैशिष्टयपूर्ण निर्मिलीं. त्याच्या पूर्वी हें कार्य कोणी केले नाहीं आणि नंतर आजपर्यंतहि कोणास करता आलें नाही. हें सामर्थ्य कवीच्या वाणींत जितके अधिक, तितकी त्याच्या काव्यांत आकर्षकता अधिक आणि रसवत्ता अधिक. **अल्पाक्षरत्व** हें काव्याचें महत्त्वाचे अंग नाथानीं अगदीं काळजीपूर्वक पाळले आहे हें यांत स्पष्ट दिसतें.

शब्द-चित्रणाच्या जोडीनेंच भारुडातील संवादचातुर्याचाहि उल्लेख करणें अवश्य आहे. ह्या संवादांच्या योगान प्रसंगाचें चित्रण आणि स्वभावाचें आलेखन नाथांनीं केले आहे. हे संवाद अनेक प्रकारचे आहेत. कांहीं हिंदु-तुर्क, महार-ब्राह्मण असे व्यक्तीव्यक्तीमधील आहेत, तर कांही बैल-ब्राह्मण, कुत्रा-माणूस असे मानवेतर प्राणी आणि मानव यांमधील आहेत, आणि कांहीं बोधअहंकार असे अव्यक्त गुणधर्मांमधील आहेत. ह्या संवादात दोन पात्रें समोरासमोर येऊन कधीं भाषण करतात, तर कधीं एकच 'संवाद' करते. आपणच प्रश्न करायचा, त्याचें उत्तर दुसऱ्याने दिलें असे कल्पायचें आणि

त्यावर पुन्हा आपलें भाषण चालू करायचें. ह्या योगानें एक पात्र अदृश्य असूनहि भाषण करीत आहे असा भास निर्माण होतो आणि वाचकाची उत्सुकता पुढील भाषण ऐकण्यास उत्कंठित होते. असा हा संवाद-प्रकार म्हणजे आजच्या ' नाट्यछटा ' होत. हा वाङमय-प्रकार नाथांनीं साडे-तीनशे वर्षांपूर्वीं आरंभून चांगला नांवारूपाला आणला होता. हे सारे संवाद अत्यंत चटका लावणारे असून फार मनोरंजक आहेत.

## नाथांची भाषा

ज्यानीं रामायण, भागवत यांजसारखी प्रचंड रचना केली नि अवां-तरहि पुष्कळच वाङमय निर्मिलें त्यांच्या भाषेचें वैभव किती असेल म्हणून काय सांगावें? त्यांची भाषा संस्कृतसंपन्न असून मराठीच्या प्रौढपणाची पूर्ण प्रचीति आणून देते. पण भारुडातील भाषा केवळ सुसंस्कृतता अथवा प्रौढपणाच दर्शवीत नाहीं, ती मराठीचे साऱ्या प्रकारचे विलास प्रगट करते. ती तेलंगी, कानडी, हिंदी ह्या शेजारिणींचा नि पाहुण्यांचाहि परामर्ष घेते आणि आपले अवखळ आणि प्रसन्न दोन्ही भाव व्यक्त करते. नाथाना शब्दांची कधीं वाण पडलीच नाहीं. मराठीनें आपलें सारें भांडार त्यांच्या-समोर उघडें केलें आहे. वर्ण्य विषयाशीं तद्रूप झाल्याकारणानें त्या त्या समयीं उदित होणारे भाव व्यक्त करणारे शब्द त्याच्यापुढें आपोआपच येत. शब्दांची जडण-घडण करण्याचे परिश्रमहि नाथांना पडलेले दिसत नाहींत. इतकेंच नव्हे तर त्यांनीं कधीं कधीं भाषा उलटीहि वापरली आहे. ती चमत्कृती उत्पन्न करीत, निगूढ तत्त्वाचे अवगाहन करून त्यास पुन्हा अगम्य स्वरूप देते. कूटाचे हे असे प्रसंग वगळले तर ती अगदीं पात्र, प्रसंग, विषय यांना अनुसरून असते. यास्तवच तिचें वेगवेगळें स्वरूप वाचकांस पहावयास सापडतें. आदिमाया, जोगवा, फुलोरा, भूपाळी यांतील भाषा भिन्न भिन्न असून गारुडी, पोर, महारीण, कंजारीण, विंचू, सासरवाशीण, जोहार, जातें, खेळ इत्यादींतील भाषा भिन्न भिन्न स्वरूपाच्या आहेत. साराच मराठमोळा असला तरी जिचा तिचा भाव निराळा, वेष निराळा आणि साज निराळा आहे. एकीचे रंगढंग दुसरींत नाहीं सांपडायचे. साऱ्याच स्त्रिया असल्या तरी भोळी, भटीण, वेडी यांची पुरणपोळी खाण्याची, हांडाभर पाण्यानें न्हाण्याची आणि लोण्याचा गोळा गिळण्याची भाषा

महारीण, कंजारीण यांना येणार नाहीं. महारीण पैजार मारते, टांगीं धरून ओढते, गुरगुर करते, मरदु नव्हे असें अवाच्य बोलून तोडीं माती पडो असे शिव्याशाप देते; तर कजारीण हो हो रि हो, हो हो रि हो करीत पडवा, वाडवा, अडती, कोडता, तंगी, तोडा, अडी असे उद्गार काढते. सौरी आणि सासरवाशीण ह्याच्या मुखीं एक भाषा शोभत नाहीं हें काय नाथ जाणत नव्हते? तें शिकावें तर त्यांच्याचपासून. उघडा माथा असलेली, पदर गळालेली, आला गेला न म्हणणारी सौरी आणि कामक्रोधादि दीरभाव्यांच्या रगाड्यांत चितानणंदुलीचे चिमटे सहन करून माहेराकडे डोळे लावून बसलेली सासरवाशीण यांची भाषा अर्थातच त्यांच्या पायरी प्रमाणानें आहे. कधीं ती विनोदाच्या गुदगुल्या करते आणि हास्याचे तुषार उधळते आणि कधीं अद्भुताचा नेत्र दिपविणारा झगझगाट प्रगट करते; कधीं विरोध-उपहास आणि वर्मकर्मे काढून रौद्ररूप धारण करते, आणि कधीं मुक्या मनाचे बोल बोलून करुणवत्सलता प्रगट करते; आणि कधीं शांतीच्या शीतळ छायेंत भक्तीच्या कळ्याकुसुमांचा झेला गुंफिते. अशी नाथांची भाषा त्यांच्या भावनेचा आवेग सहन करील अशी आहे. ती कधीं सालंकृत आणि कधीं निरलंकृतहि असते; पण बहुधा ती अनुप्रासांचा मजुळ नाद घुमवीत रूपकांच्या पायांनीं चालते आणि पात्रांच्या मुखानें बोलते. त्याच्या भाषेंत भावना आणि नाद हीं संवादित्वानें नांदतात. पात्रांच्या नाचऱ्या आणि बुजऱ्या जीवनाप्रमाणे त्याची भाषाहि नाचरी आणि लाजरी अशी उभय स्वरूपांत व्यक्त होते. पण लाजरी असतांनाहि ती आपला भाव कधीं बुजवीत नाहीं. भारुडातील भावना जशा सकस आणि चौफेर उसळणाऱ्या आहेत, तसाच भाषेचा नादहि भावसंगत आहे ह्यामुळेंच पात्राच्या संस्कृतीनुसार त्यांच्या भाषेत कणखरपणासमवेत ग्रामीणांचा ग्राम्यपणा आणि क्वचित अश्लीलपणाहि आहे. एकंदरीनें पाहतां त्यांच्या भाषेंत इतरत्र जो अवकाळ-चवकाळपणा दिसतो, तो येथें नाहीं. येथें अगदीं मोजक्या आणि वेंचक शब्दांची संयोजना आहे. एवंच त्यांच्या भाषेंत कल्पनाविलास आहे आणि साधेपणाची सहजसुंदरता आहे, शब्दचित्रणाचें सामर्थ्य आहे आणि व्यक्तिनिर्मितीची कला आहे, अल्पाक्षरत्व आहे आणि सत्यार्थत्व आहे; आणि अनुभवाची ओल तर तिच्या मुळाशींच आहे.

अनुभवांतून तिचा जन्म झाला असून ज्ञानाचें पयःप्राशन करून ती पुष्ट झाली आहे आणि अन्तःकरणांतील तळमळीची उसळी घेऊन ती जीवनाच्या प्रांगणांत भारुडाचे खेळ खेळते.

## समारोप

नाथांचीं एकंदर भारुडें जरी आपणांस ह्यांत दर्शवितां आलीं नाहींत, तरी त्यांनीं ज्या विशिष्ट धोरणानुसार आपली रचना केली तिचा आपण यथाशक्ति परामर्ष घेतला. नाथ अद्वैती, भक्तिमार्गी, परमयोगी, गृहस्थाश्रमी, संत होते नि फारच थोर होते याविषयीं कोणास शंकाच नाहीं. त्याना निर्गुण अभिप्रेत होतें कीं सगुण हेहि आतां सांगण्याची आवश्यकता दिसत नाहीं. सगुण निर्गुण एक. निर्गुण दुष्प्राप्य, सगुण सुलभ. योग्याना देखील जेथें स्थिर होण्यास प्रयास पडतात तेथें इतरे जनांचा प्रश्नच नाहीं. योग्यालाहि समाधीचे क्षण वगळल्यास मोहाचे अनंत प्रसंग असतात. यासाठीं त्यांना देखील नाथांनीं भक्तिमार्गच उपदेशिला. मग प्रपंच–प्रवाह–पतित प्राण्यांना दुसरा कोणता आधार ते देणार? भक्तिमार्ग हाच सर्वांचा राजमार्ग. पण नाथांच्या शिकवणीचें एक वैशिष्टय आहे. त्यांनीं प्रपंच कधीं दूषिला नाहीं. ज्ञानदेवादि सर्व संत-मंडळींनीं देखील हाच सिद्धांत प्रतिपादिला. पण नाथांचा ठसठशीतपणा नाथांतच.

मोठमोठयांचाहि संतांच्या कार्यासंबंधीं दिशाभूल झाली आहे. संतांचें सागणें सर्वांचेंच सारखें. प्रपंच सुटतां सुटत नाहीं. परमार्थ साधतां साधत नाहीं. मग 'इदंच नास्ति परं न लभ्यते' अशी परिस्थिति होणार, समाज तोंडघशीं पडणार. आणि संत तसा उपदेश करतील असें शक्य तरी आहे काय? त्यांना साऱ्या समाजाचा नि एकंदर मानव जातीचा उद्धार करावयाचा होता. यास्तव हातचें सोडून ज्या पळत्याचा ठाव ठिकाणा अज्ञात आहे, अशाच्या मागें लागण्यास ते निश्चित सांगणार नाहींत. आणि त्यांनीं केलेंहि तसेंच. प्रपंच सोडा म्हणून कधींच सांगितलें नाहीं, आणि कोणींहि सागितलें नाहीं. ज्याला सांगितलें त्याची विशिष्ट भूमिका लक्षांत घेऊन त्यांनीं सांगितलें. पण

तो वैयक्तिक प्रश्न होय. एकंदर समाजास त्यांनीं 'स्वे स्वे कर्मणि' लक्ष लावून वागण्यास सांगितलें. हें लक्ष, ही एकतानताच आत्मीयता उत्पन्न करते आणि तीच पुढे विश्वव्यापक होते. हेंच परमार्थसाधन. प्रापंचिक मोहांत गुंतून न पडता, वर्णधर्मानुरूप, जातीव्यवहाराला अनुसरून आलें कर्म कर्तव्यबुद्धीने करीत राहणे हीच त्यांची शिकवण.

कर्म टाळणे अशक्य असतें. हंसत तरी करावेंच लागतें, नि रडत तरी करावेंच लागतें. मग त्याचे स्वागत का न करा! ह्या तत्त्वज्ञानाच्या बैठकीमुळेंच जगांतील कर्मप्रवृत्ति टाळण्यापेक्षां ती आपल्या आत्मसाधनेच्या उद्दिष्टाकडे वळविण्याचाच त्यांनीं प्रयत्न केला. कर्मप्रवाह बंद होणें शक्य नाहीं. तो एकीकडून बंद केला तरी दुसरीकडून उसळून बाहेर येणार. तेव्हा अशक्याचे मार्गीं लागण्यापेक्षां शक्य आणि उपयुक्त याचाच अवलंब करणें योग्य असतें; नि तेंच त्यांनीं केलें. समाजाकडे नि कर्माकडे पाहण्याचा त्याचा दृष्टिकोण हा असा होता. यास्तवच त्यांना तत्कालीं होत असलेलीं राज्यपरिवर्तनें ह्या दृष्टीनें विशेष महत्त्वाचीं वाटलीं नाहींत.

राजा आणि राज्यसंस्था कोणतीहि असली तरी कर्मप्रणाली बहुधा एकच असते. आपले राज्य असलें म्हणजे दुष्प्रवृत्ति नष्ट होते आणि परक्यांचें असलें म्हणजे ती उतास येते अशांतला भाग नाहीं. तींत फार थोडें अंतर असतें. दगडापेक्षा वीट मऊ इतकेंच तें अंतर. जगाच्या इतिहासानें त्यांना तें दर्शवूनहि दिलें होतें. किंबहुना सुखाच्या काळांतच सावध राहण्याची फार आवश्यकता असतें. यादवांच्या राजवटीचें उदाहरण नाथांच्या पुढें होतेंच. त्या काळीं किती तरी पंथ, उपासना, व्रतें इ. उत्पन्न झालीं होतीं नि सोंग ढोंग माजलें होतें. या उलट मुसलमान राजवटींत तीर्थस्थानांचाहि उपमर्द, हा त्यांचा पराक्रम. पण समाज! समाजांतील दुष्प्रवृत्ति पूर्वींचीच होती. राजवटींची खादेपालट झाली म्हणजे असा उपसर्ग अधिक उण्या प्रमाणांत सर्वत्रच होत असतो; पण समाज प्रवृत्ति सहसा आमूलाग्र पालटत नाहीं.

राजसंस्थेचा आणि समाज संस्थेचा संबंध तुटलेला होता. राजांची कारभारदानादि गोष्ट सांभाळली म्हणजे त्याचा नि समाजाचा

फारसा संबंध नसे. समाजाची संघटना विघटना ही आर्थिक व्यवस्थेवर बसविलेली नसून गुणकर्मावर बसविलेली आहे. आणि त्यांतहि सर्वच कर्मांचें सारखेंच महत्त्व असल्याकारणाने प्रत्येक कर्मानें सारखाच उद्धार होतो अशी पूर्वाचार्यांची समजूत आणि शिकवण. यास्तवच राज्यपरिवर्तन हें नीतीचें अवमूलन नि उन्मूलन होण्याचें मूलकारण नसून मानवी मन, सामाजिक मन साधुसंत मानीत. त्याचप्रमाणे नाथांनींहि मानलें. राज्यपरिवर्तन हें उपरें कारण असतें. तो वरचा पापुद्रा आहे. तें निमित्तकारण आहे. मुसलमानी राजवटींत मुसलमानानीं आपल्या दुष्टाव्यानें त्यांत थोडी भर घातली इतकेंच. वेदविप्रांचे अपमान, जीवहत्या, निर्घृणता-असत्यवाद, फसवेपणा, व्यभिचार अनीति इत्यादि गोष्टी पूर्वीप्रमाणेंच धुडगूस घालीत होत्या. मुसलमानांनीं गावें जाळलीं म्हणजे प्रजेचीं घरें देवस्थानें, मठ जळत आणि हिंदूंच्या जाळपोळींत तीं धड रहात असें कांहीं नाहीं. किंवा मुसलमानांच्या योगाने स्त्रिया भ्रष्ट होत किंवा पळविल्या जात आणि हिंदूंच्या कडून हें दुष्कार्य होत नसे अशांतला कांहीं भाग नाहीं. यास्तवच नाथांचा नि संतांचा लढा ह्या अन्तस्थ दुष्प्रवृत्तींच्या विरुद्ध असे.

समाजाचा हृदयपालट होईपर्यंत त्याचा सर्वोदय होण्याची आशा अशक्य. म्हणूनच नाथांनीं तत्कालीन मुसलमानी राजवटीविषयीं फारशी कुरकूर न करतां ह्या प्रवृत्तींविरुद्ध एवढा खटाटोप केला. ह्या वृत्ति-पालटांत त्यांनीं मुसलमानी समाजहि समाविष्ट केला आहे. मुसलमान व्यक्ति जरी राजे आणि कांहीं अधिकारी असल्या तरी एकंदर मुसलमान-समाज आणि हिंदूसमाज सारखाच दुष्प्रवृत्त होता. ह्या अनीतीच्या आणि अरेरावीपणाच्या मुळाशीं राजवट नसून खरीखुरी पशुवृत्ति आहे हें यांनीं ओळखलें होतें. याचीं तत्कालीन आणि सद्यःकालीन दोन ठळक उदा-हरणें देण्याजोगीं आहेत. नाथांनंतर शिवाजी महाराजांनीं स्वराज्य स्थापिलें. महाराजांच्या राजधानीजवळ संतशिरोमणी तुकाराम महाराज रहात होते, त्याचप्रमाणें समर्थहि रहात होते. पण तुकारामांचा उपदेश पहा आणि समर्थांचा आदेश ऐका. तुकारामांनीं आंतील गाभ्यासच हात घातला आहे. समर्थ केवळ मुसलमानी राजवट नष्ट करावी असें म्हणतात. ती नष्ट

होतांच समर्थांचें कार्य संपलें, पण तुकोबारायाचें चालूंच होतें. शिवाजी महाराजांचें, गोब्राह्मणप्रतिपालकाचें राज्य आलें तरी तुकारामांना समाज पूर्वींप्रमाणेंच दुष्प्रवृत्त वाटत होता. आणि इकडे समर्थांना काय वाटलें? त्यांनाहि तेंच दिसून आलें.त्यांनींहि स्वसमाजास नि जनतेस तोच उपदेश केला. ह्याचा अर्थ हा की समर्थांनीं प्रथम ह्या बाह्य परिवर्तनाचा विचार केला आणि नंतर कां होईना, पण अन्तःप्रवृत्तींचा विचार त्यांना करावा लागला. हेच समर्थांचें खरें कार्य होते. दुसरें उदाहरण आधुनिक काळाचें पहा. राजकीय आणि सामाजिक सुधारणा करणारांतहि असेच दोन तट होते. राजकारणाचें कार्य जनतेची सत्ता स्थापन होऊन स्वातंत्र्य मिळण्यापुरतें होते, तें आता एका दृष्टीनें संपलें. पण समाज सुधारण्याचें काम मानवाची सर्वांगीण उन्नति होईपर्यंत चालूच राहणारें आहे. त्यासाठीं समाजाचें हृदयपरिवर्तन अत्यंत अगत्याचें आहे. आधुनिकांतील एका व्यक्तीला जो महात्मेपणा प्राप्त झाला, त्याच्या मुळाशीं राजकारणापेक्षां मानवतेचें प्रेमच अधिक असलेलें जगाला दिसेंल; आणि महात्माजींनींहि हृदयपरिवर्तनालाच प्रामुख्य दिलें होतें. कारण दुष्प्रवृत्ति ह्याच सर्व अनर्थांचें मूळ आहेत. हे कार्य संतांनीं आतांपर्यंत केलें. नाथांनींहि तेंच केलें; आणि त्याचसाठीं आपली भारुडांची निर्मिती केली. त्यांनीं हें कार्य करून अनाथ समाजाला सनाथ केलें आणि स्वत्वाचें जीवन जगण्याची सरणी दाखविली. समाजाच्या शिरावर नाथ होते म्हणूनच त्या काळीं शेंडया मुंडया ठिकाणीं राहिल्या आणि मानवतेच्या ध्वजा फडकूं लागल्या. धन्य ते नाथ! त्यांच्या चरणीं शतवार नमन असो.

---

प्रस्तुत निबंधांतील भारूडाचे आंकडे 'एकनाथ कृत अभंग' या निर्णय सागराच्या १९०३च्या गाथेवरून घेतले आहेत.

# नाथांचीं चरित्रें • • •

श्री र. ह. कोटणीस
कैवल्यधाम सांगली.

**जनार्दनाचा एकनाथ । ध्वजा लाविली भागवत**
— श्रीतुकाराम महाराज.

ज्या भागवत धर्माचा पाया श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं घातला, ज्याचा विस्तार श्रीनामदेवमहाराज यांनी केला, श्रीनाथमहाराजांनीं ध्वजा फडकविली व श्रीतुकाराममहाराज हे ज्या मंदिराचा कळसच होऊन बसले, अशा तऱ्हेची या संत मंडळींनीं उभारलेली भागवत धर्माची भव्य इमारत पंढरपूरच्या प्रशस्त वाळवंटांत आजमितीसहि पहावयास मिळत आहे.

या लेखात नाथाच्या चरित्रावर कोणी कोणी श्रम केले आहेत, व त्यांतून नाथाचें काय स्वरूप प्रगट झालें आहे, हें आपण संकलितपणानें पाहणार आहोत. नाथाचे चरित्र अपार व **न भूतो न भविष्यति** इतक्या दर्जाचें असल्यानें कोणालाहि त्यांचें चरित्र गावें व जगांत धन्य व्हावें, असें वाटणे स्वाभाविकच आहे. या दृष्टीनें नाथ हे सकलसंतप्रिय होते. प्रत्यक्ष श्रीदत्तमहाराज हे त्यांचे घरात द्वारपाळ होऊन राहिले होते, ज्याचा अनुभव श्रीदासोपंतासारख्या सत्पुरुषांनीं स्वतः घेतलेला आपल्या पदात ग्रथित करून ठेवला आहे. ते म्हणतात **दत्तात्रय धरुनि द्वार। रक्षि होऊनि चोपदार। चमत्कार हाचि फार। दासोपंत चोजविला रे ॥१॥ नमो एकनाथपंत संत साधु भला रे ॥ध्रु०॥** या शिवाय मुक्तेश्वर, कृष्णदयार्णव, श्रीधरस्वामी, देवदास, एकेश्वर अवधूत, अमृतराय, मोरोपंत, बाळाजीपंत पराडकर वगैरेची कविताहि त्यांच्या संबंधीं उपलब्ध आहे. श्रीतुकाराममहाराज, निळोबाराय वगैरें संत प्रभृतींनीहि त्याचा मोठ्या आदरानें गौरव केला आहे. एका अभंगांत श्रीतुकाराममहाराज म्हणतात—

**शरण शरण एकनाथा। पायीं माथा ठेविला ॥१॥**
**नका पाहूं गुणदोष । जालों दास पायांचा ॥२॥**
**उपेक्षितां मज । तरी लाज कवणासी ? ॥३॥**
**तुका म्हणे भागवत । केलें श्रुत सकळां ॥४॥**

वारकरी संप्रदायांत पंचायतनांत जाऊन बसलेले श्रीनिळोबारायहि एका अभंगांत श्रीनाथांचें गोड वर्णन करतात म्हणून त्यांचा अभंग खालीं देत आहे —

**धन्य धन्य एकनाथा। तुमचे चरणीं माझा माथा॥१॥**
**दासोपंताचा अभिमान। गेला होतांची दर्शन॥२॥**
**दत्तात्रेय चोपदार। तेथें उभे कांठीकर॥३॥**
**यवन अंगावरी थुकला। प्रसाद देऊनि मुक्त केला॥४॥**
**निळा शरण तुमच्या पायां। अनन्यभावें नाथराया॥५॥**

अशा प्रकारें निरनिराळ्या संताचे अभंगातून नाथप्रेम उमटलेलें आपणांस दिसेल. पण त्यांत एखाद्या महत्त्वाच्या मुद्याचाच भाग येऊन गेलेला असतो. त्याला चरित्र म्हणतां येणार नाही. क्वचित् प्रसंगींच चरित्राचा निष्कर्ष आपणास त्यात सापडेल.

नाथाचे बिनतोड आणि उत्तमोत्तम चरित्र म्हणजे नाथांचा गाथा किंवा याहि उप्पर श्रीमद्भागवताचे एकादश स्कंधावरील टीका. ज्याचा साराश —

**मुक्तिवरील गुरुभक्ती। उद्धवें मागितली प्रेमप्रीती॥**
**हाचि भागवताचा कळस। पिका आला ब्रह्मरस॥१॥**

असा श्रीतुकाराममहाराजानीं आपल्या अभंगांत माडला आहे. प्रपंच आणि परमार्थ, प्रेम आणि भक्ति, जीव आणि ब्रह्म याचा समन्वय म्हणजे नाथ चरित्र असें म्हटल्यास यथायोग्य होईल. कुलवृत्तात, जन्म, बालपण, शिक्षण, जीवनक्रम, चमत्कार वगैरे म्हणजे चरित्र हा एक लौकिक भाग झाला. किंवा सनावळ्या म्हणजे इतिहास ही एक इतिहासाची एकदेशी कल्पना झाली. पण ज्याला नाथाचे अध्यात्मजीवन पहावयाचे आहे तो इतिहास जन्म आणि निर्याण यांत येत नाहीं. तो त्यांच्या अलिकडचा व पलीकडचा आहे. या दृष्टीनें त्यांतील चमत्कारांचें, स्थलांचे, सनाचें वगैरे महत्त्व हें एकदेशी कांहीं घटकांना उपयुक्त असें ज्यानें ज्यानें जो जो डोळा उघडला आहे त्याप्रमाणें त्याला त्याला राहील. पण नाथ ज्या अध्यात्माकरतां जन्मास आले त्या दृष्टीनें पाहिलें तर नाथांचें अंतरंग हें नाथाचें चरित्र. तें त्यांच्या वाङ्मयांत किंवा त्यांचे आध्यात्मिकजीवनक्रमास धरून जर कोणी चरित्र

लिहिलें असेल तर त्यांत प्रतीत झालेलें खात्रीनें दिसेल. या दृष्टीनें आपणांस पुढील आढावा घ्यावयाचा आहे. नाथांची चरित्रे बहुतांनीं लिहिलीं आहेत. त्यात मुख्यतः श्रीकृष्णदासजगदानंदनंदन, श्रीकेशवबुवा, श्रीमहीपतिबुवा श्री. सहस्रबुद्धे, ह. भ. प. पागारकर व ह. भ. प. आजगांवकर याचा उल्लेख करणे जरूर आहे.

नाथचरित्र म्हणजे आध्यात्मिक जीवन. अर्थात् हा ओलावा ज्यात जास्त असेल तें चरित्र अमोल आहे यात संशय नाही. नाथांच्या अद्भुत गोष्टी, नाथाचे संबधीं स्थलकालदर्शक चिकित्सेने व संशोधनानें काढलेला इतिहास, नाथाचे चमत्कार किंवा सिद्धांतप्रतिपाद्यविषय म्हणजे नाथचरित्र काय? नव्हें. तर नाथाची आध्यात्मिक उन्नति आणि त्यांचे धागे दोरे व त्यात नाथाना प्रत्यक्ष अनुभवाला आलेले व नाथाचे शिष्यवर्गास आलेले आध्यात्मिक दाखले, म्हणजेच नाथचरित्र. नाथमहाराजांचे सानिध्यांत कित्येक जीवाना उपरती झाली असेल, कित्येकांच्या जीवनांत क्रांति झाली असेल, तर कित्येक साधुकोटीलाहि जाऊन पोंचले असतील. पण त्याची दखल नाथाना नव्हती. हें पाहिलें म्हणजे मोठें आश्चर्य वाटेल. कृष्णदयार्णवासारखे तर नाथाचे दृष्टानानें साधु झाले. यापेक्षां त्यांचा काय महिमा वर्णावा!

नाथांच्या चमत्कारांत बरेच भाग पडतील. कांहीं उपरतीचे आहेत, कांहीं जीवनांत क्रांति झालेले आहेत, तर कांहीं आध्यात्मिक उन्नतीचेहि आहेत. नाथांचे अंगावर जो यवन थुंकला पण नाथ रागावले नाहींत व तो त्यांना शरण गेला, ही गोष्ट उपरतीपर आहे, गावबानें रामायण, तो अपंडित असूनहि नाथांचे वचनाप्रमाणें पुरें केलें ही जीवनांतील क्रांति दर्शविणारी गोष्ट आहे, तर नाथांच्या कावडीची गोष्ट व त्यात निदर्शनास येणारी सर्वात्मता म्हणजे आध्यात्मिक उन्नतीची साक्ष आहे. जीवनांत क्रांति होणें हाच अध्यात्माचा इतिहास आहे. त्या दृष्टीनें पाहिलें तर याखेरीज चमत्कारांना फारसें महत्व रहात नाहीं. त्या गोष्टी सत्य असल्या तरी त्या ज्याच्या त्याच्या पुरत्याच असतात. नाथमहाराजांनीं स्वर्गांतील पितर खाली आणले ही गोष्ट सत्य असली तरी त्याचा आपणांस आज प्रत्यक्षांत काय उपयोग आहे? पण नाथमहाराज हे नाथ कसें झाले हें ज्याचे त्यांचे

जीवनक्रमांत ओतलें गेलें तो आमच्या वाचनांत येईल तर केवढा उपयोग होईल बरे. याचा अर्थ स्वर्गांतले पितर खालीं आणतां येतील असा नव्हे. कारण ती कृती भगवंतांनीं नाथाच्या करितां केली. आम्हीहि अहंत्वाची जाणीव बाजूला ठेवली तर न जाणो, भगवान तशा तऱ्हेचे अनुभव आपणांसही देईल. पण हे अनुभव घेण्याकरितां अध्यात्म हें अध्यात्मा करितां, शोक मोह विवर्जित होण्याकरिता व शाश्वत सुखाच्या प्राप्तीकरितां आहे. व्यवहाराकरितां परमार्थ नसून परमार्थाकरिता व्यवहार करावयाचा हें नाथमहाराजांनीं आचरून दाखविले आहे. या तऱ्हेचा जीवनक्रम, नाथाचे वर श्रीजनार्दनस्वामींची कृपा, त्याची दिनचर्या व आध्यात्मिक साक्षात्काराचें कांहीं प्रसंग ज्यांत ओतले असतील तें चरित्र, हें केव्हांही श्रेष्ठ ठरेल कीं नाहीं याचा वाचकांनीच विचार करावा.

नाथांचें वाङमय हेंच त्याचें चिरकाल स्मरण किंवा अप्रत्यक्ष इतिहास हें निर्विवाद होय. त्यांचें अंतरंग याच्या इतके कोण सांगेल? त्याचें अतरंग हेच जर त्याचें चरित्र नव्हे, तर मग विन अंतरंगाचें कोठें पहावे? पण हा अप्रत्यक्ष इतिहास पेलेल व त्यांत यथार्थ नाथदर्शन होईल इतकी पात्रता किती जणाची असणार ? या दृष्टीनें जर त्याचें अंतरंग उपासकांच्या पचनी पडेल अशा भाषेत व गुरुकृपा, दिनचर्या, साधनसिद्धता व आध्यात्मिक दाखले अशा तऱ्हेच्या विषयाचा परिपोष करून जर वठविलें असेल तर तें अधिकच ग्राह्य होणार नाहीं का? खात्रीनें होईल. तें वाचतांना नाथाचें यथार्थ अतरंग जाणण्याची पात्रता येऊन व ती कळ साधून नाथाचे दिव्यदर्शन त्या वाङ्मयातच झालें पाहिजे. इतकी पात्रता आपल्या ठिकाणीं येईल. अशा तऱ्हेचा प्रयत्न एक श्रीकृष्णदास जगदानंदनंदन यांनीच केलेला आहे, असें अपणांस दिसून येईल. तें थोडया विस्तारानें आपण पुढे पाहूंच.

नाथाचे कालीं केवळ अध्यात्मजीवन प्रवृत्तीची किंवा इतिहास चिकित्सेची मंडळी फार कमी. यामुळें पुराणांतूनच हें रसायन खुद्द नाथांनाहि घ्यावे लागले. किंबहुना या अध्यात्माची चटक लोकांना लागण्याकरितां प्रथमतः त्यांच्या नित्य कीर्तनांत प्रसादार्थ प्रत्येकांना ओगराळे भरून साखर देण्याचा उपक्रम ठेवावा लागला. नाथांनीं ज्या गौळणी

व भारूडें लिहिलीं तीं समाज पाहूनच. **प्रवृत्ति सोडोनी कैसें निवृत्तीसी आले** हें दाखविण्याकरितां त्यांचीच भाषा वापरून आपलें रसायन त्यांना द्यावे म्हणून लिहिलें. अर्थात् ऐतिहासिक अगर निव्वळ सांप्रदायिक दृष्टींचा तो काल नसल्यानें पहिले नाथचरित्रकार श्रीकृष्णदास जगदानंद-नंदन यांचे ओवीबद्ध दिनचर्यायुक्त अध्यात्माचा ठसा उमटविणारे नाथचरित्र त्यांच्या प्रसिद्धिविन्मुखतेनें मागें पडलें.

पुराणाच्या वळणावर केशवबुवा किंवा महीपतिबुवा यांनीं लिहिलेलीं चरित्रें लोकप्रिय झालीं यांत नवल नाही. आणि प्रामुख्याने त्यांच्या लिखाणांचाच गाजावाजा सर्वत्र झाल्यानें इतिहास संशोधकाचें लक्षहि वरील चरित्रकाराचें चरित्रांत अलक्ष झाले, ते आजवर. म्हणजे अध्यात्मप्रवण श्रीटाकीमहाराज यानीं अध्यात्माचा डोळा देऊन ती दृष्टि उत्पन्न होऊन मग त्या सशोधनावर येईपर्यंत हें चरित्र अंधःकारांतच राहिलें. केशवबुवानी जें नाथचरित्र लिहिलें आहे. यामुळेच त्या काळीं त्याचा इतका बोलबाला झाला कीं महीपतिबुवांनाहि तो ग्रंथ प्रमाण मानावा लागला. केशवबुवा हे नाथ-सांप्रदयापैकीं असून त्यानी देवगडावर शके १६४२ मध्यें ३१ अध्यायाचें सुरस नाथचरित्र रचिलें. महीपतिबुवानीं **भक्त-विजय** (अध्याय ४५/४६) व **भक्तलीलामृत** (अध्याय १३ ते २४) या दोन ग्रंथांत तें वर्णिले आहे. भक्तविजयांत तें त्रोटक रीतीनें गोवलें असून भक्तलीलामृतांत तें विस्तारपूर्वक वर्णिले आहे. **भक्तविजय** शके १६८४ मध्यें लिहिला असून भक्तलीलामृत शके १६९६ मध्यें समाप्त झाला. केशवबुवा यांनीं लिहिलेलें नाथचरित्र सांप्रदायशुद्ध असून महीपतिबुवांनीं संतलीलामृतांत केशवबुवांचाच कथानुक्रम उतरला आहे. केशवबुवाकृत नाथचरित्र व महीपतींच्या भक्तलीलामृतांत जें १२ अध्याय श्रीनाथचरित्र आलेलें आहे तें जर जवळ जवळ ठेवून पाहिलें तर असें स्पष्ट दिसेल कीं, केशवबुवांचा ग्रंथ पुढें ठेवूनच महीपतिबुवानी नाथाचे चरित्र गाइलें आहे. महीपतिबुवांनीं नाथचरित्राला २३५८ ओव्या दिल्या असून केशवानीं २६४४ दिल्या आहेत. केशवकृत नाथचरित्र हें महीपतींच्या पूर्वींचें आहे. या दोन चरित्रांचा आधार घेऊन श्री. सहस्रबुद्धे यांनीं नाथचरित्र लिहिलें आहे. किंबहुना नंतरच्या सर्व नाथचरित्रकाराना तत्पूर्वींचें श्रीकृष्णदास जगदानंदनंदन

यांनीं लिहिलेलें नाथांचें चरित्र उपलब्ध झालें नसल्यानें वरील दोन ओवी-बद्ध ग्रन्थच प्रमाण मानावे लागले आहेत. दोन्ही ग्रंथ अत्यंत भाविकपणानें लिहिले गेले असल्यानें स्थलकालांत मागे पुढें झालें असल्याचा संभवहि आहे. पण तो विषय इतिहास संशोधकांचा असल्यानें आपण त्यांत न शिरणेंच बरे. कांहीं असले तरी केशवबुवानींहि त्याकाळीं माहिती मिळवितां येईल तेवढी गोळा करून व काही ऐकिवांत असलेल्या गोष्टींचा परामर्ष घेऊन मगच त्यांनीं हा ग्रंथ लिहिला असला पाहिजे. हें उघड आहे. श्री. सहस्रबुद्धे यांनीं प्रथमच नाथचरित्र गद्यरूपांत लिहिलें असल्यानें त्यांचा ग्रन्थ नतरच्या चरित्रग्रंथकारांनीं प्रमाण मानला हें योग्यच आहे. ह. भ. प. पागारकर व आजगांवकर यांनीं त्यांच्या ग्रंथांच्या प्रमाणभूतपणाबद्दल उल्लेख केलेला त्यांच्या प्रस्तावनेंतून पहावयास सांपडतो.

ह. भ. प. पागारकर यांनीं नाथांचे चरित्र केशवबुवा व महीपतिबुवा यांच्या लिखाणाच्या आधारेंच वर्णिले असून नाथांच्या ग्रंथातरीं नाथाचे उद्गार जागोजागीं विपुल प्रमाणांत दिले आहेत. शक्य तेथे नाथाचें मनोगत नाथाच्याच मुखांतून प्रगटविले आहे. यामुळें रसाळपणा व चिकित्सकपणा यांचा उत्कृष्ट मिलाफ त्यांत झाला आहे. फक्त नाथमहाराज हें नाथ कसें झाले एवढाच मजकूर त्यात विस्तारानें आला नाहीं. त्यांच्या गुणांचा विकास झाला हें दाखविलें आहे, पण ते गुण ज्या आचारांतून प्रगट झाले तो भाग माझ्या पाहाण्यांत नाहीं. विशेष कोणत्याहि चरित्रांत प्रामुख्यानें आलेला असा आढळला नाहीं. तो फक्त श्रीकृष्णदास जगदानंदनंदनकृत नाथचरित्रातच उत्कटत्वाने आला आहे. नाथांचें चरित्र नाथांच्या भाषेंत हें वैशिष्ट्य आहे खरें, पण नाथांनीं सहज ओघांत प्रगटविलेला स्वानुभव सांकेतीकच असणार व तो स्वानुभवी पुरुषांनाच कळणार इतरांस तो अगम्य होय.

**मुळीच्या मुळीं एका जन्मला । मायबापें थोर धाक घेतला ॥ १ ॥**
**कैसें मूळ नक्षत्र आलें कपाळा । स्वयें लागलों दोहींच्या निर्मूळा ॥२॥**
**शांती करतां अवघ्यांची जाली शांती । मुळी लागोनीयां लाविली स्यातीं ॥३॥**
**एकाजनार्दनीं मुळीच्या गोठी । मायसगट सगळा बापचि घोंटी ॥४॥**

ह. भ. प. पांगारकर नाथचरित्र पान २१०

यावरून यांतील सखोलपणा आपल्या दृष्टीस पडेल.

संतसेवक जगन्नाथ रघुनाथ आजगांवकर यांनीं जें नाथचरित्र लिहिलें आहे त्यांत बहुतेक सर्व कथा दंतकथा व अलौकिक चमत्कार यांचा त्यांनीं समावेश केला आहे. नाथमहाराज समाधिस्थ झाल्यावर कित्येक वर्षांनीं दुसऱ्या कांहीं सत्पुरुषांस त्यानीं दृष्टांत दिले; वगैरे गोष्टी त्यानीं प्रयत्नपूर्वक मिळवून त्यांत घातल्या आहेत. हें खरोखरीच कोणींहि वाखाणावें असें वैशिष्ट्य आहे. पण त्या नाथांच्या कृपेला पात्र होण्यास आम्हीं काय केलें पाहिजे? नाथांना प्रिय तें आम्हांला प्रिय व आम्हांला प्रिय तें नाथांना प्रिय असें झाल्याखेरीज अनुभव पुस्तकांतला पुस्तकांत निराळाच राहणार! त्या वाचनानें आपण भाविक बनूं. आपली दृष्टीहि निवळेल. पण ज्या आचाराच्या मेळानें आपणांस तें नाथचरित्र उकलणार त्याचा अभाव त्यांतही राहिलाच आहे. अध्यात्मचरित्राचा विषय दृष्टीचा डोळा उघडून पाहील त्यालाच कळणार आहे. आणि तो सर्वांच्या नजरेंत कदाचित अधिक उठावदारपणानें भरणारही नाहीं. पण त्यामुळें त्याचें महत्व इतिहासज्ञ, तत्वज्ञ, शास्त्रज्ञ व संशोधक याहूनहि अधिक आहे, असें आपणांस अनुभवाअंतीं म्हणावें लागेल. श्रीकृष्णदास जगदानंदनंदन हे त्या काळांतले चिकित्सकच होत. त्यांनीं नाथचरित्र शके १६२० चे सुमारास लिहिलें असावें. हा काळ श्रीतुकाराममहाराज यांचे नंतर येतो. त्यांनीं श्रीतुकाराममहाराज यांचा उल्लेख आपल्या ग्रंथाच्या ५० व्या अध्यायांत ५० व्या ओवींत केला आहे. **जगप्रसिद्ध तुकावाणी। पांडुरंगीं रंगली वाणी । ज्याचे कागद न भिजती जीवनीं । गेला निघोनी देहासहित ॥** ५० ॥

या काळांत जर हे चरित्रकार असते तर त्यांना इतिहासाचार्य राजवाडे, भावे, वगैरेंच्या माळिकेंत बसवावें लागलें असतें. कारण निव्वळ भाविकपणा त्यांच्या ठिकाणीं दिसत नाहीं. ते अश्रद्धावानहि खचित नाहींत. तर ते डोळस श्रद्धावान आहेत. असें त्यांनीं लिहिलेल्या ग्रन्थावरुन दिसतें. अर्थात चिकित्सक श्रद्धा आणि गुरुकृपेनें अध्यात्माचा डोळा उघडल्यानें "नाथमहाराज नाथ कसे झाले" या विषयाशीं तादात्म्यता या दृष्टीनें त्यांचा सर्वांत अधिक गौरव करावा. इतिहास, चिकित्सा व श्रद्धा यांच

समन्वय होणें कठीण. पण तो त्यांनीं आपल्यांत उतरवून चरित्राचें रूपानें प्रगट केला आहे.

श्रीकृष्णदास जगदानंदनंदन यांनीं लिहिलेला **प्रतिष्ठान चरित्र** नामक ग्रंथ हा सर्व ग्रंथांत प्रमाणभूत मानण्याजोगा ग्रंथ आहे. हें कोणासही कबूल करावें लागेल. व या करितांच मुम्बईचें सुप्रसिद्ध संत परममित्र श्रीटाकीमहाराज यांनीं याचें प्रकाशनाचे बाबतींत पूर्णतः लक्ष घातलें. हें चरित्र श्रीमहीपतीचेंहि आधीं लिहिलें गेलें असून हेच प्रथमतः लिहिलेलें आहे. हें निर्विवाद आहे. फक्त इतिहास संशोधकांचे दृष्टींत हें येऊं शकलें नाहीं. म्हणून तें इतके दिवस मागें पडलें. चरित्र ओवीबद्ध असून श्रीनाथमहाराजांचें चरित्राचा ठसा अंतःकरणात बरोबर उमटावा अशीं त्यांत भाषाशैली आहे. श्रीनाथमहाराज हे नाथ कसें झाले याचें वर्णन, त्यांची साद्यंत दिनचर्या आणि गुरूभक्तीची तपस्या दिग्दर्शित करून त्यांनीं साधार दाखविलें आहे.

**येकनाथासी नित्य नेम । गुरूभजनीं अधिक प्रेम ॥ नुलंघी आज्ञेची सीमा । हा स्वधर्म भक्तीचा ॥२॥ ब्राह्म मूहूर्तीं उठोन । मलमूत्र क्षाळून ॥ भस्मस्नान करून । गुरूभजन नित्य करी ॥३॥ स्वामी कारितील मुख प्रक्षाळण । येका तस्त पुढें ठेवी आपण ॥ स्वामीचा उगाळु संपूर्ण । बाहेरी जाण जाऊं नेदी ॥१८॥ आले जनार्दन मंदिरासी । येका सादर सेवेसी ॥ उष्णोदक पात्रासी । भरूनि स्नानासी देतसे ॥३१॥ अवघे वारंवार करिती नमन । येका अखंड दंडायमान ॥ अनन्य भावें भक्तिपूर्ण । नाटोपे जाण कोणासी ॥४१॥ लाज सांडोनि सकळिक । येका गोमुखी जाला देख ॥ उच्छिष्ट सेवावया निःशंक । येका येक धाविन्नला ॥५१॥ देखोनि येकनाथाची भक्ती । परस्पर आश्चर्य करिती ॥ ऐसी कोणी गुरूभक्ती । नाहीं त्रिजगतीं पै केली ॥५७॥ येकनाथें केलें जें जें । जनार्दनासी वाटलें वोझें ॥ यालागीं त्याचे काजें । ध्यावया लाज सर्वथा ॥५८॥ मनीं विचारी जनार्दन । हा जीवनमुक्त साधू जाण । याचे ऐकतां येक वचन । चिन्मात्रीं मन बुडुनी जाय ॥९६॥ चिन्मात्रीचें देखणेंपण । प्रत्यक्ष येकनाथ आपण ॥ ऐसे बोलोनि जनार्दन । आलिंगन दीधलें ॥९७॥ गुरूशिष्या आलिंगन । तेणें जीवशिवा समाधान ॥**

**दोघांचें दोनीपण। गेलें निघोन सर्वथा ॥९८॥ येका विराला जनार्दनीं। कीं जनार्दन हारपे येकपणीं॥ सच्चिदानंद जनीं वनीं। तत्क्षणीं विस्तारला ॥९९॥** (अध्याय ३ रा)

नुसत्या चमत्कारावर त्यांनीं मुळींच भर दिला नाहीं. चमत्कार गारुडीहि करतो. तो साधु होत नाहीं. चमत्कार करणारे साधु नव्हेत. पण साधु चमत्कार करतात. त्याची दखल त्यांना नसते. कारण ते भगवदिच्छेनेंच होतात. ज्याला त्याचा पूर्व पुण्याईनें अनुभव येतो, त्याची निष्ठा अढळ होऊन तो त्याचे कृपेला व अनुभवाला पात्र होतो. असो.

कोल्हापूर संस्थानापैकी बुवाचें वठार म्हणून जें एक खेडें आहे. तेथें श्रीनाथमहाराज याचे वंशाची एक शाखा असून त्यांतील विद्यमान गृहस्थ ह. भ. प. शामराव लक्ष्मणबुवा गोसावी याचे संग्रहांत मूळ पोथीची प्रत कैक वर्षे पडून होती. तेही सर्व नाथांचेंच वंशज. यामुळें त्यांना ती प्रसिद्ध करावी असें वाटलेच नाहीं. या चरित्राची सुवाच्य नक्कल ज्यानें केली, त्यानें आपलें नाव **शामभटात्मज रामभटेन लिखितं** असें देऊन शक १७१७ राक्षसनाम संवत्सरे आषाढ शुक्ल दशमी रविवार असा लेखन-समाप्तीचा काल सांगितला आहे. ग्रंथाचा मूळ लेखक प्रत्येक अध्यायाच्या शेवटीं **म्हणे कृष्णदास जगदानंद। नंदन श्रीनाथ पदारविंद। सेवोनि चरण मकरंद। सच्चिदानंद स्वयें जाला॥** असा आपला निर्देश करतो. ग्रंथातील भाषाशैली एकनाथी वळणावरच आहे. ग्रंथलेखनाचा काळ ग्रंथकारानें दिला नाहीं. ग्रंथाची नक्कल करणारा रामभट बिन शामभट यानें ही नक्कल **उद्धवात्मज शामजी गोसावी वठारकर** यांचे करितां लिहिली असा उल्लेख केला आहे. श्रीनाथमहाराज याचे या शाखेचे वंशावळीवरून पाहतां उद्धवात्मज शामजी हे श्रीनाथमहाराजाचे पासून सहावे पुरुष आहेत. अर्थात् प्रत्येक पिढी सुमारें तीस वर्षांची धरल्यास उद्धवात्मज शामजी यांचा काळ १६७० चे सुमारास येतो. असें जें विधान माझे परमस्नेही सांगलीचे सुप्रसिद्ध विद्वद्रत्न कै. राजकवि साधुदास यांनीं **प्रतिष्ठान चरित्राच्या** प्रस्तावनेंत केलें आहे, तें योग्यच आहे. कै. साधुदास यानीं कयास बांधल्याप्रमाणें ग्रंथाचा रचनाकाल १६२० चे आसपास असला पाहिजे, हें उघड आहे. अर्थात् यावरून श्रीनाथमहाराज यांचे

जुन्यांतले जुने सुप्रसिद्ध चरित्रकार जे केशव ( शके १६८२ ) आणि महीपति ( शके १६८४ ) यांच्या श्रीनाथमहाराजचरित्रलेखनापूर्वी कमींत-कमी ५० । ६० वर्षे तरी हें नाथचरित्र निःसंशय लिहिलें गेलें आहे. चरित्रांतील बारिकसारीक तपशीलावरून मोठ्या परिश्रमानें ही माहिती चरित्रकारांनीं गोळा केलीं असावी असें निःसंदिग्धपणें दिसून येते. चरित्रकारानें श्रीनाथांचे नातू श्रीउद्धवमहाराज यांचा ग्रंथारंभीं निष्ठापूर्वक उल्लेख—

**जगीं श्रेष्ठ हा उद्धवो राजयोगी । मनोवृत्ति हे अर्पिली पांडुरंगीं ॥**
**कथा कीर्तनीं गातुतो नित्यरंगीं । तयातें स्मरें मी सदा अंतरंगीं ॥१॥**

ह्या श्लोकांत केला आहे. त्यावरूनहि ग्रंथाच्या रचनेचा काळ शके १६२० च्या सुमाराचा किंबहुना थोडा आधीचाच मानणे योग्य होत आहे.

ग्रंथांतील ओवीसंख्या ११३० असून ११ अध्यायांत चरित्र गुंफलें आहे. दिनचर्येचे तपशील जे चरित्रकाराला, तो नाथांचे पश्चात् थोडयाच काळांत लेखनास प्रवृत्त झाल्यानें, मिळाले ते आरशासारखे आपल्या भाषेंत त्यानें उत्कटत्वाने रेखाटले आहेत. प्रपंच परमार्थ नाथांनीं कसा केला व **एकाजनार्दनीं सार । ब्रह्मरूप हा संसार ॥** हें त्यांचे वचनच त्यांनीं कसें सार्थ करून दाखविलें आहे, हें कोणालाहि कळावें असा मेळ त्यांत साधला आहे. केशवबुवा व महीपतिबुवा हें मोठे भाविक असल्यानें त्यांचा भर चमत्कारावर होता. पण त्या कालांतहि आधुनिक चिकित्सकांनासुद्धां पटेल अशा तऱ्हेचें अध्यात्माचें चरित्र व अनुभव इतिहासवजा कृष्णदासजगदानंदनंदन यानीं आपल्या ओवीबद्ध ग्रंथांतहि उतरविला आहे. त्याचे गोडवे कै. साधुदास यांच्या सारख्या सरस्वतीच्या लालांनीं गाइले आहेत. हें खरोखरीच त्या ग्रंथाचें वैशिष्ट्य आहे.

श्रीकृष्णदासजगदानंदनंदन यांनीं वर्णिलेल्या गोष्टींत व केशव महीपति, ह. प. भ. पांगारकर व आजगांवकर प्रभृति मंडळींनीं लिहिलेल्या, चरित्रांत दिलेल्या गोष्टींत पुष्कळ ठिकाणीं तफावत दिसून येते. परंतु श्रीकृष्णदासजगदानंदनंदन हे चरित्रकार श्रीनाथमहाराज यांचे काळाला

अत्यंत जवळ व पहिले चरित्रकार असल्यानें त्यांतील गोष्टीच प्रमाणभूत मानल्या पाहिजेत. त्यांतील कांहीं गोष्टींचा निर्देश अप्रस्तुत होणार नाहीं. इतर चरित्रकारांनीं श्रीनाथ आपल्या आजोबांना सोडून श्रीजनार्दनस्वामी-कडे पळून गेले असें विधान केलें आहे. पण चक्रपाणींनींच त्यांना श्रीजनार्दनस्वामीकडे जावयास सांगितलें अशी खरी स्थिति आहे. (अध्याय १ ला.) श्रीकृष्णदासजगदानंदनंदन म्हणतात.

**मग पाचारूनी येकनाथ। चक्रपाणी जाला सांगत। म्हणे आमुच्या वंशांत। तूं येकत्वें येकला ॥२५॥ म्हणे आमुचे भरले पूर्ण दिवस। आम्हां जाणें निजधामास। आतां तुझ्या संरक्षणास। तुज कोण्हास निरवावें ॥२६॥ तरी आहे येक विचार। अमरावती[१] नाम नगर। जेथें जनार्दन साधू थोर। अति उदार सुखदाता ॥२७॥ श्रीदत्तात्रेय आदिपुरुष। तोचि चंद्रशेखर प्रत्यक्ष। त्या चंद्रशेखराचा निःशेष। पूर्ण शिष्य जनार्दन ॥ २८ ॥×××॥ जनार्दना शरण जासी। सर्व सुखाचें सार लाधसी। हें सत्य मानलें आम्हांसीं। निश्चयेंसी निर्धार ॥ ३२ ॥**

इतर चरित्रकारांनीं श्रीनाथाचें कुटुंब कर्नाटकांतील आहे. असें अंदाजिक विधाम केलें आहे. पण या चरित्रकारानें श्रीनाथांच्या पत्नी गिरिजाबाई या दौलताबाद येथील त्रिविक्रमशास्त्री यांची कन्या असा निश्चित उल्लेख करून सदर लग्न श्रीजनार्दनस्वामींनीं आपल्या नजरेखालीं घडवून आणिलें, असें सांगून लग्नाचा बारीकसारीक तपशीलहि दिला आहे. तो जिज्ञासूंनी अध्याय ४ मध्यें अवश्य पहावा. परिसाभागवताची गोष्ट श्रीनामदेवांचे नांवावर सर्वत्र प्रसिद्ध आहे, पण या चरित्रकारानें ती श्रीनाथचरित्रांत दिली आहे. (अ. ७) गोष्टीच्या अंतरंगघटनेवरून ती नाथचरित्रकाळींच घडली असणें अधिक संभवनीय वाटते, असा शेरा कै. साधुदासांचे सारख्या चिकित्सक-गुरुभक्तांनीं व जाड्या लेखकांनीं मारून ठेवला आहे, तो योग्यच आहे.

---

१ हल्लीचें अहमदनगर.

प्रपंच करून परमार्थ हेंच या ग्रंथांतील लिखाणाचें पूर्णतः वैशिष्टय असल्यानें, व बहुजनसमाज प्रापंचिक असल्यानें, प्रपंचांत कोणता दृष्टिकोन ठेवावा व आचारविचार कसा सोज्वळ असावा, निःसीम गुरुभक्ति म्हणजे काय वगैरे या ग्रंथापासून शिकण्याजोगें असल्यानें सर्वांनाच हा ग्रंथ वाचनीय आणि पूजनीय आहे असें अनुभवास येईल. या दृष्टीनें मुंबईचे ह. भ. प. मंगेश रामचंद्र टाकीमहाराज यांनीं हा ग्रंथ (प्रतिष्ठान-चरित्र) उजेडांत आणून आणि वठार येथील हल्लीचे मठपति ह. भ. प. शामराव लक्ष्मणबुवा गोसावी यांनीं या ग्रंथप्रकाशनास परवानगी देऊन सर्व मुमुक्षूंच्यावर फार काय अखिल महाराष्ट्रावर पर्वतप्राय उपकार करून ठेविले आहेत. हें कोणांसहि व कधींहि विसरतां येणार नाहीं.



# नाथांचे जोहार • • •

श्री. अमृत बापूजी रसाळ
नगर.

**जोहार मायबाप जोहार । मी एकनाथ स्वामींचा महार ।**
**नाथ-जोहाराचा विचार । संतासमोर मांडतो कीं जी मायबाय ॥१॥**

**संतसेवक**

श्रीएकनाथगाथेच्या शेवटीं उपदेशपर रूपकें ह्या नांवाचें एक स्वतंत्र·प्रकरण आहे. त्यास गारुड—भारुडहि म्हणण्यांत येतें. त्यांतून अनेक धार्मिक पंथियांच्या बाह्याचरणावर, सामाजिक चालीरीतींवर आणि तत्कालीन गावच्या व्यवहारावर उपरोधिक व विनोदात्मक रूपकें योजून अलंकारिक भाषेनें भागवत धर्मानुसार नरदेहाच्या ऐहिक पारमार्थिक कर्तव्याचे विवेचन असतें. साहित्य शास्त्रांत रूपक ह्यानांवाचा अर्थालंकार आहे. या अलंकारानें भाषेला सुंदरपणा येतो, रुक्ष व क्लिष्ट विषय हृदयंगम व सोपा होतो. जोहार ह्या रूपकांत नरदेहसंस्था हें उपमेय समजून त्यावर नाथकालीन ग्रामसंस्थेच्या उपमानाची एकरूपता दाखवली आहे. नाथांच्या काव्यांत रूपक अलंकाराचा भरणा विशेष असतो. नाथभागवताच्या प्रत्येक अध्यायांत आरंभींचें नमन सद्गुरूवरील रूपकांनीं सजलेलें आहे. त्यांचें रुक्मिणीस्वयंवर हें जीवशिव—ऐक्यावर उत्कृष्ट रूपकानें शृंगारविलेलें आहे. त्याचप्रमाणें गाथ्यांतील गारुड—भारुडें रूपकात्मक असून त्यापैकीं 'जोहार'· रूपकाविषयीं प्रस्तुत लेखांत विचार करणें आहे. या प्रत्येक रूपकारंभीं 'जोहार' ह्या शब्दाची योजना केलेली आहे. वरिष्ठांस वंदना करितांना महारलोक जोहार असा नम्रतापूर्वक उच्चार करितात. तशा उच्चारानें महाराकडून त्याची जबानी वदविली. यावरून ह्या प्रकरणास जोहार असें म्हणण्यात येतें. 'योद्धार' ह्या संस्कृत शब्दापासून जोहार शब्द साधल्याचें कोणी म्हणतात. पण वरिष्ठांचा जयजयकार असो, अशा अर्थाचा जयहर हाहि मांगलिक गर्जनेचा शब्द प्रचलित आहे. महारलोक ज्योहार, जोहार (तालव्य) असाच सहज उच्चार करितात. तो जयहर शब्दाशीं विशेष मिळता

व सुलभ तद्भव असल्यामुळें जोहार शब्दाच्या मूलपीठिकेस अधिष्ठान होऊं शकेल. वरिष्ठांस जोहार म्हणून प्रणाम करण्याची चाल क्षत्रीय रजपुतांत फार प्राचीन आहे. त्यांच्या पदरीं स्तुतिपाठक भाट असत. ते दरबारीं व इतरत्र जोहारानें धन्यास नमन करीत. ओसवाळ मारवाड्यांत एकमेकांस जोहार करण्याचीं चाल आहे. श्रीकृष्णानें अर्जुनास विश्वरूप दाखविलें (गीता-११) त्यावेळीं अर्जुनानें जोहार करून देवाचे चरण वंदिले असें ज्ञानेश्वर म्हणतात. **मग तैसाची भेण भेण। पुडती जोहारौनी चरण। म्हणे जी आपण। ऐसे बोलिले** [ज्ञानेश्वरी ११।४९०]
वरील ओवींतील 'जोहारौनि' या पदावरून महाराष्ट्रांतहि नमस्काराप्रमाणें जोहार म्हणण्याचा शिष्ट संप्रदाय होता, असें दिसतें. शिवकालीन कागद-पत्रांतून जोहार केल्याचे उल्लेख मिळतात. संतांच्या धार्मिक चळवळींत ती चाल मागें पडून रामराम, दंडवत, नमस्कार इ० म्हणण्याची प्रथा पडली. तें कांहीं असो. जोहार घालण्याची पुरातनरीति महारांनी सांभाळून ठेविली होती, व अद्यापिहि आहे, एवढें खरे. महारलोक वरच्या जातीस नमन करितांना जोहार म्हणतात. पण आपसांत एकमेकास 'नमस्तु, म्हणून वंदि-तात.

अंत्यज, अनामिक हे शब्द महार शब्दाचें पर्याय होत.महार हा जाति-वाचक शब्द मराठी भाषेंत रूढ आहे. नाथांनीं तोच जोहारांतून योजिला आहे. अलींकडे गांधीजींच्या प्रचारकार्यात तो 'हरिजन' म्हणून प्रचारिला जात आहे. तो शब्द महत्, महत्तर याचें महार असें रूप झाल्याचें दाखवितात. तथापि ह्या शब्दाचें रूपांतर गांवबलुत्यांचें नांवांत सांपडतें. लोहार, कुंभार, चांभार, महार हीं जातिवाचक बलुत्यांचीं नांवें त्यांच्या धंद्यांवरून पडलेलीं उघड दिसतात. तीं लोहकार, कुंभकार, चर्मकार व महाकार ह्या मूळनामांत मराठींन येतांना उपांत्य 'का' ह्या अक्षराचा लोप झालेला आहे. महाकार यांत मूळ शब्द महत् -- मोठा असाच आहे. पण कर्म धारय समासांत तो विशेषण असतां त्याचें महा असें रूप होतें. आणि कार कारू या कर्तृत्वाचक विशेष्याचें मागें तें घेऊन महाकार असा शब्द होतो. शेवटीं वरील जातिवाचक शब्दगटाप्रमाणें 'का' तेवढा लुप्त होऊन महार असा शब्द मराठींत तद्भव रूपानें आलेला आहे.गांवचीं व सरकारचीं

लहान मोठी बरीवाईट सर्व कामें त्यास करावीं लागतात. बाराबलुत्यांत महार प्रमुख असल्यामुळें त्यास नाईक, नायक 'नाक' म्हणतात. कारू-नारु, म्हणजे काम करणारे व न करणारे यातील तो महाकारु थोर काम करणारा असा ग्रामराज्यांतील महत्वाचा घटक मानिला गेला आहे. नाथांनीं कल्पिलेला महार खेडयापाड्यांतील महाराप्रमाणे 'गेला महार केला जोहार,' याम्हणी प्रमाणें सागकाम्या कामचुकारू नसून तो संतावरचा जनार्दन सद्गुरूचा आत्मनाक नांवानें मूर्तिमंत सद्विचारच, जणूं काय वरिष्ठांसहि भागवत धर्म सागणारा असा कल्पिला आहे. अर्थात मागासलेल्या व्यक्तीस संतसमागानें थोरवी प्राप्त होते हेंहि नाथास जनतेला सुचवावयाचें होते. नाथांनीं महाराकडून पन्नास वेळ जोहारपूर्वक विधायक सूचना एखाद्या थोर उपदेशकाप्रमाणें पण अत्यंत कळकळीनें व नम्रभावें मांडिल्या आहेत. हे जोहार एका व्यक्तीपुढें घातलेले नाहींत. ठाणेदार, देशमुख प्रभृति जमेदार, संतसभासद, शिवाय वतनदार इत्यादि ग्रामसंघटनेंतील प्रत्येक घटकास गांवगुंडी चाळे कळून यावे, यासाठीं त्यांत अनेकत्व व पौनरुक्त्य आलें असलें तरी जीवाच्या बोधासाठीं एकच गोष्ट अनेकवार सांगावी लागते, ह्या संतप्रथेला धरूनच वरील प्रकार आहे.

पन्नासापेक्षांहि जास्त जोहार घालण्याचा नाथांचा हेतु शेवटच्या म्हणींवरून व्यक्त होतो. त्यांचा सारांश:—

जीवास दुर्लभ मनुष्य देह प्राप्त झाला आहे. तर ऐहिक पारमार्थिक हित करून घ्यावें. केवळ सांसारिक विषयांत कामक्रोधादिकांच्या तावडींत सांपडून आत्महत्यारी होऊं नये. जीवाला प्रपंचांत राहूनहि आत्मानुसंधान साधतां येते. हें पटवून देण्यासाठीं तत्कालीन ग्रामसंस्थेच्या अव्यवस्थित कारभाराचें उदाहरण घेऊन गांवच्या जमेदार मंडळीच्या कारभाराचा ठाणेदारावर वाईट परिणाम होतो, तसाच विषयांत गर्क झालेल्या जीवावर दुर्धर प्रसंग ओढवतो, हेंच निरनिराळ्या जोहारांतून सांगितलें आहे. अशिक्षितास ही सहज समजेल अशा बोलभाषेंत जोहाराची रचना केली आहे. प्रत्येक कडवें चारचरणी नाथपद्धतीच्या दीर्घ ओवीप्रमाणें असून

१ देशमूख, शेटे, महाजन, पाटील देशपांडे हे जमेदार. २ रात्र थोडी सोंगें फार हीं म्हण.

'जोहार मायबाप जोहार' असा जोहाराचा आरंभ करून चौथ्या चरणांतीं 'कीं जी मायबाप' असें पालुपद असतें. जोहारांतील विषयाप्रमाणें ८ चरणां पासून ३१।३५।३६ चरणांपर्यंत एखाद्या जोहाराची मांडणी असते. जोहारांतील ओव्यांत फारशी गेयता नाहीं. धनगरांच्या ओव्याप्रमाणें किंवा भाटाच्या बानीप्रमाणें अंगविक्षेपांत आविर्भावानें म्हणण्याचे तें एक प्रकारचें गद्यकाव्य म्हणतां येईल. प्रत्येक जोहारांत स्वतांचा व प्रतिपक्षाचा विषय-मांडणारें एकच पात्र (महार) स्वसंवादि असते. ह्या लक्षणावरून हल्लीच्या 'नाट्य छटा' नांवाच्या श्राव्य-दृष्ट नाट्यविभागांत जोहारांची गणना करण्यासारखी आहे. दिंडी भजनाची मिरवणूक संपण्याच्या वेळीं नाथांचीं गारुड भारुडें विश्रांतीच्या प्रसंगीं म्हटलीं जातात. एकच भजनीमाणूस महार व वरिष्ठ यांच्या संवादाचा जोहार अंगविक्षेपांत म्हणून विनोदानें करमणूक करून दाखवितो. एकनाथ स्वतां श्रीजनार्दनस्वामीच्या दिमतीस असतांना दौलताबाद सुभ्यांतील खेडयापाडयाच्या पाटलापासून कसब्याच्या देशमुख, शेटे, महाजन व कमाविसदारापर्यंतच्या कार्यकर्त्यांशीं ताकीदपत्रें, वसुलीचे हुकूमनामे रयतेचीं व मिरासदारांचीं कौलपत्रे इत्यादि पत्र व्यवहारांत वाकबगार झाले होते व त्यामुळेंच फारशीमिश्र मराठी (दरबारी) भाषा त्यांना जोहारादिकांतून सहज वापरतां आली. नाथांच्या कोणत्याहि मुख्यग्रंथांत ज्ञानेश्वरांप्रमाणेंच फारशी शब्दांचा त्यांनीं उपयोग केला नाहीं. पण जोहारादि रूपकांतून प्रचारांत रूढ अशा फारशी शब्दांचा भरणा विशेष दिसून येतो याचें कारण वर दिलें आहे.

संत नामदेव, ज्ञानदेव, भानुदास यांनीं ही रूपकात्मक पद्य रचना केलीं आहे, पण जोहारावर कोणी रूपक केलें नाहीं. ज्ञानदेवांच्या नांवावर त्यांच्या गाथेंत एकच जोहार आहे. त्यांत हुद्देदार, बखेडा, रयत, शेखदार, हुजूर इ. एकनाथी पद्धतींचे अनेक फारशी शब्द आहेत. तो ज्ञानदेवांचा नसावा, क्षेपक असावा. एकनाथी धर्तीवर रचिलेला उघड दिसतो. एकंदरींत ह्या जोहाराची मांडणी नाथपूर्वकालीन संतांची नसून एकनाथांची ती स्वयंस्फूर्ति असल्यानें जोहाररूपकाचें जनकत्व नाथरायांकडे निश्चित असे. दामाजीची रशीद भरणारा विठनाक महार त्यानें बादशहापुढें जोहार करून साक्षात्काराची प्रचीति बादशहास आणून दिल्यापासून जोहाराकडे नाथांचें

व इतर संतांचें लक्ष वेधलें. नाथांनीं ह्या मंगळवेढ्याच्या विठनाक महाराकडून बिदरच्या बादशहापुढें त्यानें केलेल्या जोहारांत दामाजीपंताचा-निरोप विदित करण्यांत एक स्वतंत्र जोहार नमूद करून ठेविला आहे (नाथगाथा २२।३८८८ जोहार पहा). जोहाराच्या प्रत्येक ओवीच्या चौथ्या चरणाचे अर्धांतर विधायक सूचना पूर्ण होतांच 'की' हें अव्ययासारखे अक्षर योजून नंतर 'जी मायबाप' ह्या आदरार्थी वाक्यानें कडवें किंवा ओवी पूर्ण केलेली असते. मराठींत कीं हें अव्यय कारणबोधक व स्वरुपबोधक अशा अर्थानें येतें. क्वचित हिंदी भाषेतील षष्ठी विभक्तीच्या की प्रत्ययानें

**'सियापति रामचंद्रकी जय। कपीवर हनूमानकी जय।**

अशा जयजयकारात की हा षष्ठीचा हिंदींतील प्रत्यय घातला जातो. पण, **जोहार मायबाप जोहार। मी जनार्दनाचा एका महार। सांगतों तुमचे नगरीचा समाचार। ऐकाकी जी मायबाप॥**

प्रत्येक कडव्या अंतीं की आहे. (निरनुस्वार) तिचा व्याकरण दृष्टया काय उपयोग? वाक्याला तरी तिनें कोणती शोभा आणिली तें समजत नाहीं. फार तर 'की' ला पादपूरणार्थक म्हणून समजण्यांत येईल. पण ती मूळ मराठी भाषेंतील नाहीं. कानडी संघर्षणांतील हेल काढून उच्चार करण्याच्या लकबेनें अशिक्षित मराठी बोलणारात वाक्यांतीं जातों की बोलतों की, असा पर्याय कानडी सरहद्दीच्या प्रांतांतील महार, वाणी यांच्या मराठी बोलींत विशेष दिसतो. तो महारीव बोलींत गौरवार्थक म्हणून नाथांस उचित वाटला.

**सारे कडेचे पोहणार। दहा आणि पांच पोर। एकनाथ करितो जोहार। अक्कल धरा की, जी मायबाप॥** (नाथगाथा ३८७२)

जी मायबाप, जी धनीसाब, जी अन्नदाता अशा अलोकीने व मर्यादेनें होकारार्थी वरील वाक्यें उच्चारावीं लागतात. तेव्हां त्यांतील रहस्य कळतें.

आतां जोहार या रूपकांत त्या वेळचें गावचा कारभार पहाणारे मंडळ यासच ग्रामपंचायत ग्रामकार्यकारी मंडळ अशीं नांवें होतीं. ह्या मंडळाची थोडक्यांत ओळख करून देऊं. ऐतिहासिक दृष्टया गांवपंचायत संस्थेचें अस्तित्व अशोकपूर्वकालीन आढळतें. आपल्या देशांतील निरनिराळ्या राजवटींत तिचें रूपांतर व संकोच झालेला दिसतो. एका काल-

खंडांत ही ग्रामसंस्था म्हणजे उत्कृष्ट लोकराज्यच होती. त्या काळीं प्रत्येक गांव गोकुळाप्रमाणें आनंदांत नांदत होता. मुख्य सरकारचा ग्रामसंस्थेवर विश्वास असे. तिची सर्वांगीण भरभराट करण्यास राज्यकर्ते फार झटत. प्रजा ही राज्यसंस्था टिकविण्यासाठीं जिवावर उदार असे. त्या राज्य-व्यवस्थेस रामराज्याची उपमा यथार्थ होती. ती ग्रामव्यवस्थेची स्थिति पालटत पालटत आज नामशेष झाली आहे. तींतील साक्षात कार्यकर्त्यांचीं नावें देशमुख[1], देशपांडे, शेटे, महाजन हल्लीं कुलवाचक आडनावें होऊन राहिलेलीं आहेत! अहमदनगरच्या निजामशाहीच्या पडत्या काळांत म्हणजे एकनाथ महाराजांचे वेळीं ही गांवपंचायत राज्यकर्त्या सरकारच्या धोरणानें फारच खालावली होती. तिचे तें हिडीस रूप नाथाच्या दृष्टीसमोर असल्यानें शरीरसंस्थेवर ग्रामसंस्थेचें रूपक करण्याचा योग त्यास प्राप्त झाला. निजामशाहींत ग्रामव्यवस्थेचे बहुतेक अधिकार सरकारनें आपणाकडे घेतले. देशमुखदेशपांडयाकडील वसूलीच्या कामावर ठाणेदार म्हणून स्वतंत्र अधिकारी नेमिला. तो बहुधा हिंदू असे. न्यायमनसुबीची पंचायतीकडून चालणारीं कामें काढून तीं काजीसाहेबांकडे सुपुरुद करण्यांत आलीं. पोलीस खात्याच्या कामीं कोतवाल नांवाचा मुसलमान अधिकारी नेमिला. देशमुखीचीं वतने देशमुखांपैकीं मुसलमान झालेल्यास बहाल करण्यांत आलीं. पुष्कळशा पाटिलक्या सय्यद घराण्यांत जाऊन मुल्लाना (बकरे कापून देणारा) नवाच १३ वा बलुता गावकींत सामील झाला. याप्रमाणें गावकमीटीकडील महत्वाचीं कामें सरकारकडे गेलीं. जळींपळींचे[2], जातिजमातीचे आणि लांडीलबाडीचे निवाडेकरण्यापुरतेंच काम गांवपंचायतीस उरलें. वसूलाच्या महत्त्वाच्या कामीं ५-६ वर्षाच्या कराराने नेमिलेल्या अधिकाऱ्यास सारावसूलीसबधाने देशमुख, देशपांडे[3], शेटे[4] महाजनं[5] पाटील त्या मंडळींनीं पूर्ण मदत करण्याविषयीं मुख्य सरकारकडून सक्तीच्या

१ गावची वसाहत करणारा, पडीत जमिनी वहितीस देणारा, शेतसारा वसूल करून सरकारांत जमा करणारा गावचा प्रमुख कारभारी

२ जळी — जाळपोळीचे
पळी = पळपुटी स्त्री

३ शेटे = व्यापार, बाजार यावरचे कारभारी
४ देशपाडे = देशमुखाचा कारकून

५ महाजन = गावची सर्व व्यवस्था पहाणारा

ताकिदी येत. जमीन सारा व इतर करवसुलीचीच तेवढी मुख्य सरकार काळजी घेत असे. रयतेच्या सुखसोयींकडे आणि गांवकमीटीच्या कारभाराकडे सरकार अगदींच लक्ष पुरवीत नसल्यानें ग्रामपंचायतीवरील सरकारी दाब नाहींसा झाला. त्यामुळे ते कधीं ठाणेदारांशीं मिळून, तर कधीं तुटक राहून, आपापल्या स्वार्थाचे उद्योग करू लागले. सारावसूलीची जबाबदारी ठाणेदारावर होती. कसूर झाल्यास ठाणेदारास कडक शिक्षा भोगावी लागे. गांवपंचायत अशा हुकुमानें बाधली गेली नव्हती. त्याची जिम्मेदारी वंशपरंपरागत असल्यामुळें शेतकरी कुळें त्याच्या खटपटीने मिरासदार बनलीं होतीं. अतिवृष्टि - अनावृष्टीने पीक गेल्यास सारा तहकुबी - सुटीचे रिपोर्ट ठाणेदारामार्फत जमेदारास करावे लागत व शेतकरी त्याच्या धोरणात असत म्हणून ठाणेदारास जमेदारांच्या तंत्राने वागावें लागे. शेतकऱ्याकडून जमेदारांनीं लाचलुचपती घ्याव्या व त्यायोगे ठाणेदारास खुश ठेवावे. त्यामुळें ठाणेदार आळशी, चैनी, ऐषारामी बनून आपली जबाबदारी ओळखीनासा झाला, तसे गावचे मेंबरही स्वार्थपरायण होऊन ठाणेदारास जुमानीनासे झाले. कुळास फिसात देणें, वसुलीस अडथळे आणणे, खोटे रिपोर्ट करणें, अशा मतलबाच्या कारस्थानांत जमेदारांच्या बायका देखील भाग घेत. त्यामुळें गावच्या कारभारात अंदाधुंदी झाली. जो तो जमेदार आपल्या मतलबापुरत्या कामाकडे पाही. त्यामुळें निजामशाही बरोबरच हीं ग्रामसंस्थेची लोकशाही गडगडली, ती अद्याप सांवरली नाहीं. त्या ग्रामसंस्थेतील खालची पायरी असा जो महार तो मात्र इमानें इतबारें कर्तव्यदक्ष राहिला. अद्यापहि तो अंशतः तसाच आहे. महार हा गांवच्या काळीं - पांढरीचा[1] पुरा माहितगार असून जमेदारांच्या घरचीं सर्व कुलंगडीं तो जाणून होता. ठाणेदाराच्या आणि जमेदारांच्या स्वभावाची त्याला पारख होती.

गांवचे वस्तीकर मिरासदार, वतनदार, जमेदार, ठाणेदार आणि सरकार यांचीं अनेक कामें त्यास रात्रंदिवस करावीं लागतात. असा कष्टाळू कामगार ग्रामसंस्थेंत आणि बलुत्या आलुत्यांत दुसरा कोणी पहाण्यांत येणार नाहीं; म्हणून नाथांनीं त्याचा गौरव केला. त्याला उपदेष्टा बनविला. इतकेंच

---

१ पांढरीत (गावात) घर, काळीत (रानात) मालकीचे शेत असते, तो. मिरासदारास जमिनीचे पुष्कळ हक्क व सवलती होत्या.

नव्हे तर आपणास **एका महार, जनार्दनाचा महार,** म्हणवून घेऊन महाराची भूमिका एकनाथांनीं स्वीकारिलेली दिसेल. महारजातीवर ह्या संत महात्म्याचें जें अलोट प्रेम होतें त्याचें वर्णन करावें तितकें थोडेंच होईल. प्रस्तुतच्या जोहार रूपकांतून जीवाला पारमार्थिक उपदेश करण्याचाच नाथाचा मुख्य उद्देश आहे. सद्विचाररूपी महाराकडून जीवास म्हणजे जिवाजीपंतास सुचविले जातें कीं **जोहार जिवाजीपंत ठाणेदार। तुमचे गांवची वस्ती खबरदार। पहावया वागणूक साचार। मज धन्यांनीं रवाना केलें की जी मायबाप॥ धन्यांनीं सांगितलें मला। जिवाजीस आपण गांव दिला। तेणें गांवांतील वसूल बुडविला। ऐसें हें बरें नोहे की जी मायबाप॥** (३८७८) ईश्वरेच्छेनें जीवास नरदेह प्राप्त झाला. पण तो परमेश्वरास विसरल्यानें नरदेहाचें त्याजकडून सार्थक झालें नाहीं हें चांगलें झालें नाहीं. **जीव शीव अधिकारी। नगराचे मुख्य कारभारी। जीवाजी तेथें वहिवाट करी। शिवाजी उगेच पहाती की जी मायबाप॥५॥ जीवाजींचे कारभारी। कामक्रोधादि अधिकारी। मनावाटेल तैशापरी। गांवांत नाचती की जी मायबाप॥५॥ जीवाजीचें नचले कांहीं। मानाजी देती ग्वाही। दंभाजीची भल-भलाई। सहज जाली की जी मायबाप॥**(३८८४)जीव शरीरस्थ षड्विकारांच्या स्वाधीन झाल्यावर त्याचें त्यापुढें कांहीं चालत नाहींसे होऊन शेवटीं जीवाला दुःख भोगावें लागतें. **गांवांत वस्ती भरपूर आहे। तंववर तुम्ही आपलें हित पहावें। जरा आलिया उपायें। कांहीं न चालें का जी मायबाप॥**(३८८७) बालपण खेळात गेलें, तरुणपण विषयोपभोगांत घालवून पुढें वृद्धाप्य आल्यावर निरुपाय होतो. मग **डोळेगांवची लागती कवाडे। नाकापुरी शेंबुड पडे। तोंडापुरची बत्तीस खेडे। ओस पडतील कीं जी मायबाप** (३८८७). अशा केविलवाण्या जराग्रस्त जीवास दुःखपरिहारक असें सर्वोत्कृष्ट १ औषध सूर्यवंशीचा महार सांगतो, नव्हे देतो. "**भक्तीचा करून काढा। तयासी देतो धडपडा। नामस्मरण निकाढा। उतारा दिला की जी माय॥प** (३८८७)

ह्या निर्वाणीच्या उपायाचा अनुभव सर्वांनीं करून पहाण्यासारखा आहे.

**जोहार मायबाप जोहार। देशमुख देसाई ठाणेदार। जिवाजीपंत हुद्देदार। करिती कारभार गांवचा की जी मायबाप॥१॥**

**गांवची पांढर परिपूर्ण । नांदती शेटे आणि महाजन । जिवाजीस अभय देऊन । पाठविलें धन्यांनीं की जी मायबाप ॥ २ ॥**

ह्या गांवपंचाकडून काळीपांढरीचा कारभार चांगला सुरळीत चालू होता. पण जिवाजीस अभयपत्र देऊन मुख्य सरकारनें कायापुरचें कमावीसदार नेमिलें प्रथम जिवाजी दरोबस्त कारभारी आपुल्या हातीं घेऊन वागूं लागले, म्हणजे जीव इंद्रियें आवरून राहूं लागला. तोंवर ठीक होतें.

**पण जोंवर नव्हती आवाजीची भेट । तोंवर जीवाजीनें भरली पेठ । जाहला सर्व गांवांत बोभाट । आवाजीचें नांवें की जी० ॥ ५ ॥**

जीव स्त्रीरंगांत निमग्न झाला कीं त्यास सद्विचार सुचत नाहीं. तो स्त्रैण बनून निजरूपास विसरतो. अबला प्रबला झाल्यानें

**आवाजीनें नाशिला गांव । मोडला धन्याचा ठाव । शेवटीं जिवाजीचें वैभव । जाईल की, जी, ॥**

जीव कामाधीन झाला कीं क्रोधलोभादि विकार प्रबल होतात तेथें जीवाचें काहीं चालत नाहीं. ग्रामराज्यातील कारभारी असेच शिरजोर होऊन ठाणेदारास धाब्यावर बसवितात. ह्या उदाहरणानें निराकार शुद्ध ब्रह्म मायाशक्तीने साकार होऊन भक्ताला त्या विकारी कारभाऱ्यांच्या वागणुकी दाखवितात. ( जोहार ३८९४ पहा. )

**कामाजी बाजींनीं काय बरवें केलें । आपआपणाशीं नाडिलें । नाहीं याशीं विचारिलें । मागें पुढें की० जी० ॥ ९ ॥ मदाजी बाजीचें तरी वेगळेंच थोंब । सारा देतां उगीच बोंब । धन्यासी कधीं सोम । जन्म नाहीं की जी ॥१०॥ अंताजी महाजन तो आपले ठायीं । नगर नाग घलें याचे पायीं । पहातां कवडी याचे पदरीं नाहीं की जीं० ॥ ११॥ पहा दंभाजी चौधरी । याची वेगळी सरोभरी । आतां किती याचें घरीं । येरझारी शिणावे की जी मायबाप ॥१२॥ विकल्प शेटचा सदाच घाण अखंड पहातां आपुला मान । तोंडावरी बसेल वहाण । मग डोळे पुसतील की जी० ॥ १३ ॥ जिवाजी बावा म्हणे । आम्ही त्यांत रहाणें । आतां कोणाकोणाची दुखवूं मनें । शेवटीं त्यासीच पुसणें होईल की जी० ॥१४॥**

---

१ गांवांतील गांवठाण पांढरी व शेतातील जमिनीस काळी म्हणतात.

२ चौधरी वजनामापाचा कारभारी. चतुर्धर या पासून. पाटलाचा मदतगार.

वरील त्रिकाराष्टक मंडलांत देहभ्रामक सुखांत रहातो, पण त्यास सरकारबाकी देण्याची बुद्धि होत नाहीं. म्हणजे ऋणत्रयाची फेड करण्याचें त्यास पूर्ण विस्मरण होतें.
जीवाच्या विस्मरणांत मनबुध्यादि इंद्रियांना आत्मस्वरूपाची व खऱ्या-स्वहिताची जाणींव रहात नाहीं. हें गांवकारभाऱ्याच्या उदाहरणावरून महार पटवून देतो. उपाय सांगतो **जोहार मायबाप जोहार। गांवचे देसाई, ठाणेदार। सबनीस[1] आणि शेखदार। करिती रयतेचा कारभार परी धन्याचा विचार न करिती ॥ ( ३८९५ ) यासाठीं खरीप रब्बी पिकाचे दाणे। सारा सारून भराकेणे। रुजू घेतील यमाजी संपूर्ण। पण बाकी निघतां नेतील बांधून की जी मायबाप ॥३॥** येवढयानें होणार नाहीं तर **नेऊन घालतील खोडाबिडी। बाकी न चुकेची दमडी। मग काय तुमची गोडी। एकाजनर्दनी करा जोडी की जी ॥४॥**

याप्रमाणें ठाणेदाराचे जसे मुख्य सरकार हाल करिते तद्वत् परमेश्वराला विसरलेल्या जीवाला मरणोत्तर यमयातना भोगाव्या लागतील. काम विकारानें भल्या भल्यास तोंडघशीं पाडिले तेथे सामान्य जीवाची बिशाद काय? **कामाजी कातेवाल यानें नागविलें बहुताशीं। हरिहरांची अब्रू घेतो भय नाहीं त्याशी। जमदग्नीदुर्वास नाडिले महा महा ऋषीं। क्रोधाजी फौजदार तोही मिळाला त्यासी। ( ३८९६ ) लोभाजी चौधरी याला पैशाची हाव। अहंकार पाटील त्यासी कांपे सर्व गांव। दंभाजी नाईक सर्व करिती हावहाव। दया नाहीं रयतेवर केला उजाडची गांव** ॥४॥ अंदाधुंदीच्या कारभारामुळे कसब्यासारख्या मोठ्या गांवाखालील खेड्याची सुद्धां भारी दैना झाली. **मनाजी पंत ठाणेदार जाड। मुलख आवघा केला उजाड। दाहीपेठ्यांचा बाजार जड। उचापतीखाली बेजार केला की माय बाप (३८९८). चरण पेठ्याची हाल पैल मोडली। सुराबाजीची चऊ उडाली। कारणपुरी बधीर झाली। मार मारूनी की जी ॥१३॥ निशक्त झाले चरणपूर। दाढापूर झाले चूर। नैनपेठा डोळसपूर खालीं बदनूरकी जी ॥१४॥** देहांतील अंतःकरणवृत्ति दुर्मार्गवर्तिनि झाल्यावर ज्ञानेंद्रियें कर्मेंद्रियें यांची कशी वासलात होते तें वरील जोहारांत

१ हिसाबनीस, हिशेबी कामगार.

आहे. आतां ह्या देहगांवच्या गावगुंडांच्या गडबडींत नी जीवाच्या धडपडींत गुंतून न रहातां त्यांतून मुक्त होण्याचा राजमार्ग आत्मनाक महार दाखवीत आहे तो पाहूं.

**विठनाक महार म्हणतो करा भक्तीची कुळवाडी। धरा हरिनामाची गोडी। नाहींतरी चौऱ्यांशीची बेडी। पायीं पडेल कीं जी मायबाप (३८८३)**

**तेथील मार्ग सपाट। विष्णुलोकीं वाजवाघाट। मग धुडधुडा वाट धावाल की जी०** ॥८॥ त्या राजमार्गांतील ९ टप्पे विवेकनाक भागवत धर्मानुरूप सांगत आहे. प्रथम जीवानें **श्रवणाची धरावी वाट। कीर्तनाचा चढावा घाट। विष्णुस्मरणाचा संघाट आहे की जी मा०** ॥३८८९॥ **पुढें आहे विश्रांतिचें स्थान। सज्जनाचें पादसेवन। दास्यत्व अर्चन वंदन। ध्यान मार्ग की जी०** ॥२२॥ **तेथें जातां न लगे उशीर। समीप जनार्दनदातार। सख्यभक्तीचें मंदीर। आहे की जी०** ॥२३॥ यानतर सद्गुरु जनार्दनाचा एक्यामहार वारकऱ्याची रहाणी सांगतो (वैष्णव) **द्वारीं असावें तुळशी वृंदावन। करावें अतीथीचें पूजन। संतासी रिघावें शरण। हें लक्षण भक्तीचें की०** (३८९१) **तुळशीमाळा घालावी गळा। लावावा गोपीचंद टिळा। मुखीं नामस्मरण माळा। असावी की जी०** ॥५॥ **व्रत करावें एकादशी। जागर करावा सारे निशीं। द्वादशी क्षीरापती आवडेशी। आदरें सेवावी की जी०** ॥६॥ **ऐसी वैष्णव भक्तीचीं लक्षणें। सांगितली सर्व खुणें। हें वर्म जे नेणती। अधम साधनें करिती की जी०** ॥७॥ भक्तीच्या नांवाखालीं निरनिराळे सांप्रदायिकांचें वर्तन कसे असतें पहा. अंतरीं कांहींच नसून नुसताच बाह्याचार दाखविणे हा केवळ अधर्म होय. सांप्रदायिक म्हणून घेण्यांत अर्थ काय? **आम्ही ब्राह्मण म्हणती। स्नानसंध्या वेदपठण न करिती। अशौच कर्म जारण मारण जपती। मोहन स्तंभादिक की जी०** ॥९॥ **पोट भराया फकीर जाला। अल्ला अल्ला म्हणतां जन्म गेला। नसोनी दोष अंगीं लाविला। हैदोस हैदोस म्हणती की जी०** ॥१३॥ **आम्ही जंगम झालों म्हणती। शिव उपासना न करिती। पोटासाठीं भिक्षा मागती। शंख वाजविती भं भं की जी०** ॥१६॥ **झालों म्हणती मानभाव। अंतरीं शुद्ध नाहीं भाव। वर मुंडिती मस्तक वाव। गुरुशिष्यभाव दाविती की जी मायबाप** ॥१७॥ याप्रमाणें संन्यासी, जोगी,

जति, संत इ० उगेच सोंग मिरविणाऱ्यावर नाथांनीं कडक पण यथार्थ टीका केली आहे. ( ३८९१ पहा ) **एकविध भक्ति करावी** असें तोंडानें सागणारे देखील शरीरास कांहीं व्याधि **होतांच देवऋषी पहाती** आणि त्याच्या मागीनें **निंब नारळ उद सामान । मेंढरें कोंबडे मारिती जाण । वेताळ महिष सुर पूजन । नग्न होऊन करिती की जी० ॥ २४ ॥** तसेंच एका मुख्य देवास विसरून, सोडून कधीं बहिरुबा, तर कधीं खंडोबा, नाहीं तर दावलमलिक, अशा व्यभिचारी भक्तींत धावपळ सुरू होते. व कोणीच त्याप पावत नाहीं **ऐकोनी कीर्तन श्रवण । गीता ज्ञानेश्वरी मनन । आश्विनमास आलिया जाण। शक्तिपूजन करिती की जी० ॥ २७ ॥ एकविधा भक्ती करावी । वाट आणिकाची न पहावी । शुभाशुभ येती बरवीं । ते प्रारब्धदशेप्रमाणें की जी० ॥३१॥** याप्रमाणें गांवगाडयाची कहाणी सागणारा व भक्तिमार्गाचा प्रेमळ उपदेश करणारा जो विवेकनाक त्याचा जीवनक्रम कसा चालत होता हें त्याच्या तोडजबानीवरून पाहूं. वेसकर महार म्हणतो मी गावकीच्या अनेक **कामाधामाचा उलंघ करितों। आल्यागेल्यासी जबाब देतों। साऱ्या रयतेचीं घरें राखितों । हे कष्ट सान की जी० ॥३८९२॥ कितीकासीं लाकडं द्यावीं । शिंगशिंगूटी ग्याव पुरवावीं। फजीतीची राबणूक सोसावी। सान की जी ॥१७॥ मेखा पायबंद तोबरे माथां । जीव कष्टला बिगारी वहातां वहातां । जीव कष्टला चौऱ्यांशीलक्ष गांवें हिंडतां। हें दुःख सान की जी०॥१८॥** गावकीव आणि सरकारी कामाचे इतके श्रम करून देखील शेतकरी बलुते देईनासे झाले. **ते कुळवाडी थोटपणाशीं आले। पांढर टाकूनी पळाले । तरी मिराशीचे लिगाड की जी० ॥१९॥** मिरासदार शेतकरी पण शेतांतील पिकें काढून घेऊन सारा न देतां गांव सोडून पळून गेले तरी त्यांना असतील तेथें तगादा करावा लागतो. मी ह्या जमेदार लोकांच्या **अखंड दारीं पडला असतों। प्रेमाचा तुकडा मागून खातों। सारी रात्र गोंवरापाशी जागतो । धन्याला दुवा देतों की जी ० ॥ ३८९४ ॥ पाटलाचा नांगर**

---

शिंगशिंगूटी– ( १ ) बैलाच्या शिंगात सर बाघणे, शिंगे साफ करणें
**गोंवर–** ( २ ) हिवाळ्यात दारापुढें चावडीपुढे, लोकास शेकण्यासाठीं वेसकर आगटी करितो ती. शेण वाळवून गोंवर होतो.

**शेट्याची तागडी। आईबाईची बांगडी। अांत माझी पांचाची घडामोडी। करितों की जी ॥३८७०॥** याप्रमाणें गांवच्या अनेक कामांत महारास, त्यांच्या बायका महारिणी जरूरीप्रमाणें मदत करीतात. अशा महारणीकडून नाथांनीं ९ जोहार वदविले आहेत. नमन करितांना महारणी आपल्या पुरुषाप्रमाणें जोहार म्हणत नाहींत. 'पायां पडतें,' 'पायां पडनं यतेय' असें म्हणतात. ती आपल्या पतीस धनी म्हणून संबोधिते व महार आपले बायकोस नवरी, अस्तुरी, लक्षुमी अशा नांवांनी संबोधितो. महार महारणीच्या जोहारांचा उद्देश आणि निष्कर्ष एकसारखाच आहे. तथापि महारणीच्याही मुखज-बानीनें तिची आध्यात्मिक भूमिका व पिढीजात गृहस्थितीवर दरिद्रिनाराय-णाची कृपा नाथांच्या विनोदपूर्ण भाषेंत ऐकण्यासारखी आहे. ती सांगून जोहारांतील गांवगाड्याचें गुऱ्हाळ आवरतें घ्यावयाचें आहे.

## महारणीचें आत्मवृत्त

महारानें जीवास आत्मस्वरूपाची खूण सांगितली, भक्तिमार्गाचें वर्म व आचार सांगितला, संतांचा निरोप कळविला; पण आपण आदि-पुरुष, आदिनारायण असा स्पष्ट खुलासा केला नव्हता. तो म्हारीण स्वःताच्या संबंधांत करीत आहे. ती म्हणते **जोहार करिते धनी। पाया पडनीं महारिणी। विसरूं नका धन्याचे स्मरणीं। मी महारिण नोहे लहान। ब्रह्माविष्णु शिव आदि करून। माझे म्यास केले सगुण। आधीं होते ते निर्गुण की जी०॥** (३९०१) **जोहार मायबाप जोहार धनी। मी निराकाराची महारिणी। माझ्या धन्यासी निद्रा लागली म्हणोनी। संतसभेसी आलें की जी मायबाप** (३९०६) **माझे धनी एकुलते एक होते। तंव त्याशीं करमत नव्हतें। मग मी येऊनीया तेथें। उभी ठाकलें की जी मायबाप ॥ २॥ मग म्या येऊनीया काय केलें। धन्यास थापटून निजविलें। एवढें जगडंबर उभें केलें। परि सत्ता त्यांचीच की जी ॥३॥ 'एकोहम्, एकाकि नरमते, बहुस्याम् प्रजायेय'** या श्रुतिवचनांचा महारणीच्या तोंडून नाथांनीं केलेला अनुवाद वरील जोहारांत आहे. यावरून महारिणीची भूमिका लक्षात येईल. ती अनादिमूळमाया, परमात्म्याची चिच्छक्ति होय. सर्व सृष्टीचा पसारा हें प्रकृति कार्य होय. आतां ती माया आपल्या लग्नापासून माहेरच्या आठवणी व ऐश्वर्य

(३) बागड्या भरण्यासाठी घरी कासार आणणे.

संतांपुढे सांगत आहे. तुम्ही (संत) म्हणाल मी (महारीण) कोण कोठील काई । मी तो आहे अनादिसिद्ध बाई (जगज्जननी) । माझें नांव तो असे जनकाई । हा (पुरुष) तो जांवाई माझ्या बापाचा की जी मायबाप ॥३९०९।२॥ हा तर फिरत फिरत आला । एकही नवरी नये याच्या मनाला । माझें स्वरूप पाहुन बोलता झाला । मम जनकासी की जी० ॥३॥ माझें स्वरूप देखिलें पां नयनीं । मी तो केवळ लक्षुमीची ज्येष्ठ भगिनी । दुसरी उपमा शुरुपनखेच्यावानी ॥३॥ माझें स्वरूप देखिलें जेव्हां का । त्यानें माझ्या बापास मोजिला पैका । एक ढब्बु पैसा वरी एक आडका[1] । वीस कवडया की जी०॥५॥ लग्नविधीच्या ह्या बोलीचाली नंतर लग्नाचा मुहूर्त ठरविण्यांत आला. आषाढमासीं धरिलें लग्न । थींत आमावस्या पौर्णिमा पूर्ण । भद्राव्यतिपात जाणून । कुयोगी लग्न धरिलें की जी ॥६॥ नवरदेवाने आपल्या नववधूस व तिच्या आईबापास गरीबीचा आहेर देखील केला नाहीं. महारीण म्हणते आमच्या धन्यानें लग्नांत करणी केली मोठी । माझे बापास काळी ना जुनी लंगोटी। माझे आईस नाडि याची[2] ओटी । मग कैची की जी० ॥ बहु रेलचेल याच्या बोलाची । ढेंगू मेंगू दक्षिणा कैची । पहा गोष्टी कैशा करितो उंची । लुच्चावाणी की जी॥८॥ लग्न करून मज घरा आणिलें। घर पाहुन बहुत संतोष झाले । बहुंकडून वारा भराभर चाले । ऐसें देखिलें की जी॥९॥ हा तंव शांखाचा शांखपाळ । याच्या घरीं नांदती कडकडीत तिन्ही काळ । याच्या घरीं पैशाचा दुष्काळ । मग तेलामिठाचा विचार कैसा होईल की जी ॥ नाथकाळीं महारांचीं लग्नें कोणत्या मुहूर्ती व कशा थाटांत होत होतीं हें नाथांनीं वरील ओव्यांत विनोदानें सत्य कथिलें आहे. लग्नांत नवरीकरितां जांवईबुवांनीं एक ढबू पैसा ( २ तोळे तांब्याचें नाणें ) वर एक आडका [ सर्वांत लहान तांब्याचें नाणें ] किंवा २० कवड्या एवढीच काय ती मोठी रकम खर्चिले दिसतें. नवरीच्या बापास लंगोटी व आईस कमरेस गुंडाळण्याची नाडीसुद्धां दिली नाहीं, फार काय सांगावें? सर्व महारांचा कुलोपाध्याय जो ढेंगूजीमेंगूजी यास अल्पस्वल्प दक्षिणाहि दिली नाहीं. ढेगो आणि मेघो हे मानभाव पंथाचे

---

१ ताब्याचे नाणे. दाम. २ कमरेला बांधण्याची नाडी.

अंत्यजवर्गांतील प्रचारक मूळ पैठण-देवगिरीचे रहाणारे. त्यांनीं अनेक महारांना मानभाव पंथाची दीक्षा दिली. महारांचीं लग्नें लावून ते दक्षिणा घेत. महार जातीवर दक्षिणा घेण्याचा व पूजाअर्चा घेण्याचा टेगूमेंगूस हक्क आहे व तो अद्याप महारांनीं पाळिला आहे. टेंगूजी मेंगूजीच्या समाधी पुणताम्ब्याजवळ डोमेश्वर [कमालपूर] येथें आहेत. महार यात्रेकरू आणि मानभाव लोक त्याचे दर्शनास जातात. टेंगूजीमेंगूजीच्या शाखेस मानभाव लोक आपल्यांतील हीन पंथ समजतात. शेवटीं महारीण कंटाळून म्हणते **आतां असो हा संवाद । याचा आमचा** (प्रकृतिपुरुषांचा) **जन्मोजन्मीचा संमंद । संतसभेसी केला विनोद । सहज रीतीनें की जी ॥** (३९०९।१५) **एका जनार्दनी जोहार । रात्र सरली सोंगें आहेत फार । संतासी दंडवत वारंवार । मी करितें की जी ॥१६॥** याप्रमाणें महारणीने आपली करुणकहाणी सपविली. नाथांनींहि येथेच जोहारातील रूपकांची पूर्णता केली आहे. कदाचित् आणखीहि जास्त जोहार वदविण्याची नाथांना इच्छा असावी, पण वेळेच्या अभावीं तो विचार रहित करावा लागला; हें **रात्र सरली सोंगें आहेत फार** ह्या नाथोक्त म्हणी वरून उघड होतें.

असो, या प्रकरणातील सुमारे ५० जोहारातील विचाराचा धांडोळा घेण्याचें लेखकास सामर्थ्य नाहीं, व येथे स्थळवेळहि नाहीं. यास्तव झाली तशी अल्प सेवा श्रीनाथचरणी जोहारून केली. ती नाथदर्शनात रुजू व्हावी असा दर्शनमंडळास लेखकाचा सविनय "जोहार की जी मायबाप'

---

# योगेश्वर श्रीएकनाथ • • •

श्री. चैतन्यानंदयति.
प्रतिष्ठान.

खरें श्रीनाथदर्शन होण्यास नाथवाङमयांतील लहानसे दोनच ग्रंथ पुरेसे आहेत. नाथांचें हृद्गत, अधिकार, यांची यथार्थ कल्पना 'स्वात्मसुख' व 'आनंदलहरी' या छोट्या पण तेजस्वी ग्रंथांवरून आपणास येईल. नाथांचें हृदय, साक्षात्कार, आत्मदर्शन, जनीजनार्दनभावाचा अनुभव आणि विकास यांची माहिती होईल. आत्मसाक्षात्कारानंतर ऋषींची वाणी वेदवाणी ठरली, त्यांचा प्रत्येक शब्द महामंत्र ठरला, नाथांची प्रत्येक ओवीहि त्याच अर्थानें महामंत्र आहे. इतकेंच नव्हे तर वेदातील प्रमेये गूढ असून पचण्यास कठिण आहेत तर नाथवाङ्मय सुलभ आणि सोपें असें आहे. या वाङमयाचा खराखुरा अभ्यास करील तो 'याचि देहीं याचि डोळां' जीवन्मुक्तहि होऊं शकेल. वेदाभ्यासकाला 'अह' पणाची बाधा असते. या नाथऋषींच्या वेदाभ्यासाची जादू काहीं और आहे. 'दंभ' विरतो, त्याचा मागमूस उरत नाहीं. वेदाभिमानी कर्मठ होतात, विधिनिषेधांत जखडले जाऊन देहाभिमानी बनतात अर्थांत ते नास्तिकच होत. कर्मोपासक असूनहि तो सत्य अर्थानें नास्तिक असतो. आत्मबोधांतून उपासना रहित दिसला तरी तो आस्तिक ठरतो. हेंच मुख्य मर्म नाथांनीं आपल्या वाङमयातून प्रगट केलें व जनतेला ब्रह्मसुखाचा मार्ग मोकळा केला. याच साठीं वेदवाणीपेक्षांहि एका परीनें नाथवाणीचें माहात्म्य कांकणभर अधिकच म्हणावें लागेल.

**वेदें लाविलें भिक्षेसी । तैसा मी नव्हे संन्यासी ।**
**न जाळूनी जाळिलें सर्व कर्मासी । मी नित्यसंन्यासी गृहदारीं ॥**

या आत्मानुभवाची छातिठोक ग्वाही त्यांनीं हस्तामलकाच्या मुखानें दिली आहे. **आकाश सर्व कर्मीं व्याप्त । परी पापपुण्यें नव्हे लिप्त । आत्मा आकाशा अलिप्त । तोही कर्मग्रस्त कर्मठीं केला ॥ जेथें भेदाचे**

**अतिकुतर्के । मिरविती सोविळे स्वयंपाक । ते ते मुक्त मानिती लोक । बाप कवतिक कल्पनेचें ॥** कर्मठांचा तिरस्कार आणि कर्मनिष्ठांचा आदर नाथांनीं वरील प्रमाणें केला आहे. नुसत्या घोकंपट्टीनें लाभ काय ? श्रुति म्हणतेच ना ? **स्थाणुरयं भारहारः किलाभूदधीत्यवेदं नविजानाति योऽर्थम् । योऽर्थज्ञ इत्सकलं भद्रमश्नुते नाकमेति ज्ञानविधूतपाप्मा ॥** ( निरूक्त ) नुसत्या पठणानें कर्मठपणा वाढला आणि परिणाम काय ? **एक मानिती कर्म श्रेष्ठ । वाढविती कर्म कचाट । विधिनिषेधीं रुंधिली वाट । बुडाले कर्मठ कर्मामाजी ॥** यावरून नाथांनीं कर्मांचा तिरस्कार सांगितला असें वाटेल, परंतु तसें नसून त्यांनीं मूलतत्त्वाला हात घातला आहे. ज्ञानेश्वर महाराजांच्या **तैसे ज्ञानी जे होति । ते वेदार्थातें विवरिती । मग अपेक्षित तें स्वीकारेती । शाश्वत जें ॥** या वचनानुसार जगताच्या आदिकारणाची ओळख पटवून घेऊन वेदासहि टकमक पहावयाला लावलें आहे. **अविद्याभेद सबळ ज्यासी । वेदू नियामक म्यां केला त्यासी । मद्रूपीं अभेदता ज्या भक्तासी । मिणधा त्यापासी वेदवादू ॥ भा. १३ । ४६५ ॥** हेंच नाथांचे अबोल बोल ! शाब्दिकज्ञान किंवा कोरड्या प्रवचनी विद्वत्तेनें पंडितता येत नाहीं.तिथें कृति पाहिजे. **पाठकाः पठिताश्च येचान्ये शास्त्रचिंतकाः। सर्वे व्यसनिनो मूर्खा यः क्रियावान् स पंडितः॥** नाथ शद्बपंडित नव्हते. क्रियावान कर्मनिष्ठ होते म्हणूनच कर्मठांनीं त्यांचा छळ केला; परंतु शेवटीं हार खावी लागली,

महान् भागवत, महान् ज्ञानी, महान् कर्मनिष्ठ असे अनेकांनीं नाथांचें वर्णन केलें आहे. प्रत्येकाच्या वर्णनाप्रमाणें नाथ होतेच. परंतु त्यांच्या वर्णनांत एकदेशीयता आहे. कारण नाथ महान योगी होते आणि त्यांच्या योगांतच वरील सर्व गुणाचा समन्वय झाला आहे. योगबलाने ते वेदांचे मुकुटमणि झाले, किंकर बनले नाहींत. सूक्ष्मबुद्धीने आत्मतत्त्व संशोधन योगसामर्थ्यानेच करतां येते. तें त्यांनीं केले. **एष सर्वेषु भूतेषु गूढोत्मा न प्रकाशते । दृश्यते त्वग्रया बुद्धया सूक्ष्मया सूक्ष्मदर्शिभि ॥** (कठो.) या योगबुद्धीसाठीं योगाभ्यासच केला पाहिजे. हा योग सिद्ध न होण्याचीं कारणेंहि आहेत, **जो प्राणियां कामीं भरु । देहाची वरी आदरू। म्हणोनि पडिला विसरू । आत्मबोधाचा ॥ज्ञा. ४।२०॥** योगाचें ध्येय आत्म-

प्राप्ति म्हणजे देहातीत अवस्था. देह माझा नव्हे, मी देह नव्हे असे विचारयुक्त वैराग्य ज्याला गवसलें तोच योगाधिकारी! जन्मयोग्यांपैकीं नाथ होते. बाळपणींच गुरुशोधार्थ त्यानीं घर सोडलें. श्रीजनार्दनस्वामींच्या सहवासांत घरगुती कामें करीत अध्यात्मज्ञान मिळविलें. स्वामींनीं योगांतील प्रमेयें उकलून दाखविलीं आणि एकांत पहाडांत योगाभ्यासाम बसविलें. '**गुरुशुश्रूषया ज्ञानं शांतिं योगेन विंदति।**' शुश्रूषेनें आत्मबोध व योगानें शांति अशी ही परंपरा आहे. **तैवि अज्ञान अभिमान आहे.। तो सर्वथा तत्काळ जाये। ज्ञानाभिमान कठीण पाहे। गोंविता हे मुक्तत्वें** ॥ भा.। १२। ६११ ॥ या ज्ञानाभिमानाचा निरास करून शांति प्राप्त होण्यासाठीं अभ्यास म्हणजेच योग आचरिला पाहिजे. **ह.** म्हणजे सूर्य (पिंगळा नाडी) व **ट** म्हणजे चंद्र [इडा नाडी] या दोन्हींचें ऐक्यम्हणजेच हटयोग. याशिवाय जीवन्मुक्ति नाहीं. नाथानीं ही पराशांति योगानेच मिळविली. पराशांतीशिवाय दुःखनिवृत्ति नाहीं, आणि त्यावांचून मुक्तिसोहळा नाहीं, आणि समाजाची सेवाहि करिता येणार नाहीं. **जरी पूर्वींच झालें आहे ज्ञान। परी वासना उद्भवती पूर्वसंस्कारेंकरून। यालागींही योगसाधन। करावें जाण सिताकांता ॥ तेणें मनोनाश वासनाक्षय। झालिया सुख अप्रमेय। प्राप्त होय निरामय। यालागी उपाय दोन्ही करावे।** ते केव्हा करावे? **वेदांतश्रवणं कुर्वन् योगं समारभेत ॥**' त्यानीं जागादेखील अशीच निवडली. '**उपगव्हरे गिरीणां संगथेच नदीनाम धिया विप्रो अजायत** ॥ ऋ० ॥ नाथानीं जन्मापेक्षां गुणांवरच भर दिलेला आहे. **मुळीं अवघे तीन गुण। गुणयोगें वर्णजन्म। त्रिगुणीं चारी वर्ण। जन्म लक्षण घडे कैसे** ॥ भा. १९। ४९१ ॥ योगाभ्यासांतील अनुभवाचे दिग्दर्शनहि ते करितात. **दृढ प्राणायाम साधिल्यापाठी। थोरला देवो धावे भेटी। भेटलिया न सुटे मिठी ॥ ऐसा बळी सृष्टी प्राणायामी** ॥भा १९।४९१॥ योगाभ्यासाच्या अभावीं ब्रह्मज्ञानचा अहंकार वाढला असता. **अनुभवा आलें ब्रह्मज्ञान। तेणें अंगीं ये जाणपण। तेथ संचरे ज्ञानाभिमान। तेणें वीर्य क्षीण ज्ञानाचे ॥ जंव जंव ज्ञाता निरहंकार। तंव तंव ज्ञानासी वीर्य थोर। त्याची होतां कृपा मात्र। बोध साचार शिष्यासी ॥ भा. २९। ८३७। ३८** ॥ ब्रह्मानुभवानंतर सूक्ष्म अहंकाराचा निरास झाल्या-

वर आत्मसुख लाभेल. त्यांत स्थिर होण्यास कोणतीहि वृत्ति शिल्लक राहतां कामा नये सिद्ध असणारा योगी च्युत कसा होतो? अहंकार वाढीस लागला कीं साक्षी विलीन करण्याच्या अभ्यासांत शिथिलता येते व रसास्वाद निर्माण होतो. रसास्वाद हा पुढील प्रगतीला बाधक असतो. ज्ञानशक्ति सदुपयोगांत वाढली जाते. दुरुपयोगांत सूक्ष्म अहंकार प्रबल असतो. याचसाठीं नाथांनीं हा सूक्ष्म अहंकारहि आत्म्यात विलीन करून टाकला. द्वैताची जाणीव असेपर्यंत साधकाने एकांत सोडतां कामा नये. एकातानें त्यास सोडलें पाहिजे. एकनाथाना योग-साधनानें जें कळलें ते श्रुतीच्या शब्दांत असें सांगितलें जाईल. **इदंब्रह्म, परंब्रह्म, सत्यंब्रह्म, प्रभुर्हिसः। कलोब्रह्म कलाब्रह्म सुखंब्रह्म स्वयं प्रभम् ॥ एकं ब्रह्म द्वयंब्रह्म मोहो ब्रह्म शमादिकं। दोषो ब्रह्म गुणो ब्रह्म दमःशांतं विभुःप्रभुः ॥ लोको ब्रह्म गुरुर्ब्रह्म शिष्यो ब्रह्म सदाशिवः। पूर्वंब्रह्म, परंब्रह्म शुद्धंब्रह्म शुभाशुभं ॥ जीवएक सदाब्रह्म स्वयंब्रह्म सनातनम्** हें शाब्दिक ज्ञान प्रत्यक्ष अनुभवात श्रीएकनाथांनीं योगांनीं मिळविलें. स्थूलाभिमानी विश्व, सूक्ष्माभिमानी तैजस, कारणाभिमानी प्राज्ञ महाकारणाभिमानी प्रत्यगात्मा याचे अनुभवाच्या आड येणारे सूक्ष्म व स्थूल पडदे फाटल्यावांचून 'जनताजनार्दन' आणि कार्यकारणहि जनार्दन हा अनुभव येणें अशक्य. आपल्या कडकडीत अभ्यासातून नाथानीं हें मिळविलें. **तेथें देवाचें देवपण सरे। भक्ताचें भक्तपण विरे। तऱ्ही भजन उरे। निर्विशेषीं ॥ स्वा. सु ॥९२॥** नाथाची प्रकृति भक्ताची म्हणून त्यांच्या स्वात्मसुखांतहि तोच स्वभाव ठरला. **अन्वयें माझी पूर्ण भक्ति। व्यतिरेकें शुद्ध स्वरूपस्थिाते।** हाच नाथाचा योगाभ्यास, आत्मलहरीचा तरंग, महावेद-मंत्र आणि अनुष्ठानाची सिद्धि! **जन जनार्दन। अभिन्नित हे ज्यासी आकळे खूण। स्वात्मसुख जाण। तो लाभे ॥ स्वा. सु. ५०९ ॥**

हें कसें घडते? देहस्थ दशधाप्राणवृत्तीपैकीं अपान अधोवाहक प्राण ऊर्ध्व वाहक यांचें योगानें ऐक्य होतें याला एकाग्रता हवी.! एकाग्रतेने **संकल्पु उठूंचि न लाहे। जेथें उठि तेथें ठेचित जाये। विवेका चेनि बळें पाहे। मोकळु होये मनाचा ॥ भा. १३। ११२ ॥** याचांचून प्राणापानांचें ऐक्य अशक्य! आणि हें ऐक्य म्हणजेच योग.

**या दोघांसी करी बुझावण । तो माझा पढियंता तूं जाण। त्या सर्वस्व दे मी आपण । योगसाधन या नांव ॥ भा १२।३२५ ॥** आत्मचिंतनाच्या एकाग्रतेंत हा सहज साध्य आहे. आपल्या शरिरात ७२००० नाड्या आहेत. त्या सर्व अधोवाहिनी आहेत. त्यांच्या हेलाव्यानें मनाची एकाग्रता बिघडते. त्याचें भ्रमण घडतें. कल्पानुकल्पें हें चालत आलें आहे. लक्ष-चौऱ्यांशीचा फेरा तो हाच. अधोवाहिनींचें रूपांतर ऊर्ध्वगतींत झाल्या-वांचून तें अशक्य ! समर्थ म्हणतात **अधोमुखें भेद वाढतो । ऊर्ध्वमुखें भेद तुटतो ॥** तें प्राणवायूस उद्देशूनच आहे. वायूची अधोगति म्हणजे प्रकृतिविकास–द्वैत–आणि ऊर्ध्वगति म्हणजे प्रकृतिलय, अद्वैत. शरीरांतील ७२००० नाड्यापैकीं सोळा हजार एकशे आठ मुख्य. श्रीकृष्णानें या नाडयांवर आधिपत्य मिळविलें म्हणूनच कल्पक कथाकारांनीं त्याच्या राणिवसा १६१०८ संख्येचा वर्णन केला. यातहि ११० मुख्य, त्यातहि १० मुख्य आणि त्यांतूनहि इडा, पिंगला, सुषुम्ना या तीन महत्त्वाच्या ! या तिहींवर प्रवृत्तिनिवृत्तिव्यवहार आधारलेला आहे. या तिहींमध्यें देखील सुषुम्ना प्रमुख असून ती ऊर्ध्वगामी झाली तर प्रवृत्तीचा निरास होऊन आत्मस्वरूपांत विलीन होतां येते. नाथांनीं याच मार्गानें आपला सर्व संसार ब्रह्मस्वरूप केला होता. **प्रपंच परमार्थ दुजेपण । हें तो बोलणेंचि अबद्ध जाण ॥** नाडया अधोवाहिनी असतांना होणारे कर्म हें ब्रह्मकर्म नव्हे ! कारण तेथे द्वैत असतें. म्हणूनच **यथासांग तें कर्म कांहीं घडेना । घडे कर्म त्या पुण्य गांठीं पडेना ॥** असें समर्थांनीं म्हटलें आहे. जीवात्मा मलिन असतो, पापपुण्यांकित असतो. ब्रह्मकर्म स्थूलात्मक कर्म नसून जीवभावलीनतेनंतर त्याची उत्पत्ति व तोच त्याचा लय ! हीच ब्रह्मस्थिति. प्रपंच किंवा परमार्थांत या अवस्थेंतून जें जें कर्म होईल, मग तें राज-कारण, समाजसेवा, आपलें, दुसऱ्याचें, देवतार्चन, किंवा नुसती बडबड तें तें सर्व ब्रह्मकर्मच ! संकल्प, विकल्प, पाप,पुण्य यांचा तेथें वास नसतो. श्रुतीनेंहि या ब्रह्मनाडी–सुषुम्नेचें–महत्त्व वर्णिलें आहे. **शतंचैका हृदयस्य नाड्यस्तासां मूर्धानमभिनिःसृतैका । तयोर्ध्वमायन्नमृतत्वमेति विष्वङ्ङन्या उत्क्रमणे भवंति ॥ कठ. ॥** अनंत नाडयांतून अनंत प्रवृत्तीनें वाहणाऱ्या प्राणास सुषुम्नाप्रवाही करावयासाठीं यमनियमादि संभाळून प्राणा-

याम करणें हेंच साधन होय. वायूचें एकीकरण होऊन तो प्राणापानांत मिळतो. नदींत ओढे मिळतात त्याप्रमाणें मुख्य अशा प्राणापानांत व्यान, उदान, समान व उपप्राण कृकल, धनंजय आदि मिळतात. जीव अज्ञानी ठरतो तो प्राणापानाची विरुद्ध दिशा असते म्हणून. या दोघांचे ऐक्य म्हणजेच आत्मानुभव. मनासह प्राण आत्म्यात विलीन होणें हीच जीवन्मुक्ति! या अवस्थेनंतर आयुर्मर्यादेपर्यंत प्रकृतिधर्मानुसार चालणारी चेष्टा म्हणजेच पराभक्ति. नुसत्या योगांत पुढे प्राण नि मागें मन असते तर ज्ञानयुक्त योगांत पुढें मन नि मागे प्राण असतो. ज्ञानरहित योगानें **मनुष्याणां सहस्रेषु** सिद्धि मिळते. याच्या उलट ज्ञानोत्तर योगाचें असतें. चांगदेवासारखे ज्ञानरहित योगी सिद्धि मिळूनहि व्यर्थ ठरले; परंतु ज्ञानोत्तर योगाने ज्ञानेश्वरासारखे महात्मे चांगदेवा सारख्या एकाचाच नव्हे तर संपूर्ण जगाचा उद्धार करण्यास समर्थ बनले. याच परंपरेतील महान योगी श्री एकनाथ ठरले. आमच्या पूर्वकालीन ऋषींचा हाच योगसोपान ! शरीरानें नाहीं तरी नाथ ग्रथरूपानें आज आपणापुढे आहेत. त्यांच्या लिखाणातूनहि हीच गोष्ट आपल्या प्रत्ययाला येईल.

केवळ योग साधनेंतच प्राणायाम आहे आणि कर्म उपासना भक्तिमध्यें तो नाहीं अशी समजूत चुकीची ठरेल. वैदिक प्रत्येक कर्मांत प्राणायामाचा आदेश देण्याचा उद्देश काय सागतो ? तीन प्राणायामांत महान शक्ति व्यापलेली आहे. प्राण सुषुम्नाप्रवाही ऊर्ध्वगत होतो आणि निपजणारें कर्म ब्रह्मकर्म ठरतें. तीच खरी संध्या, तीच खरी उपासना. त्याशिवाय नुसत्या नाक धरण्याच्या नाटकानें प्राणायामाची विटंबना आणि कर्माची कवाइत मात्र होईल. नाथानीं ही फलप्राप्ति मिळविली. म्हणूनच **झाली संध्या संदेह माझा गेला** असे उद्गार त्यांच्या तोडीं शोभतात. प्राणायामांत शक्ति आहे. ती द्वैताचे भस्म करिते; आणि प्रत्यक्षानंद भोगविते. हा आनंद नाथांनीं प्राणायामाच्या साधनानेच लुटला. प्राणोपासना म्हणजे प्राणापानाचें एक्य ! यातून कुंडलिनी ऊर्ध्वमुखी होते. सुषुम्नेचे द्वार खुलें होतें प्राण सुषुम्नाप्रवाही होतो. शरीरातील सप्तधातूंचा भाग कुंडलिनीच्या तेजानें भस्म होतो. शरीर हलकें होऊं लागतें. षट्चक्र भेद

होतो आणि प्राण ब्रह्मरंध्रात विलीन होतो. यांतहि दोन प्रकार पडतात. पूर्व मार्गानें चालणारा प्राण आधीं चक्रभेद करून नंतर मेरुदंडाच्या बावन ग्रथींचा भेद करीत जातो, तर पश्चिम मार्गानें चालणारा प्राण आधीं मेरुदंडाचा भेद करून नंतर चक्रभेद करीत जातो. सहा चक्रांपैकीं आज्ञाचक्राचा भेद हा अत्यंत कठिण आहे. पश्चिम मार्गानें जातांना आज्ञाचक्राची अडचण टाळून विशुद्धचक्रांतून मागील बाजूने मार्ग मोकळा होऊन ब्रह्मरंध्रात विलीन होता येते. हा मार्ग मोकळा होण्यास उड्डियान बंधाचा अभ्यास आवश्यक आहे. पूर्व मार्गानें जाताना प्राण जालंधर बंधास धक्का देऊन सरळ करितो. पश्चिम मार्गानें प्राण चालला असतां मागील धक्क्यानें मानेस वांकवितो. अनहद चक्रातून प्राणवायु पुढे चालला म्हणजे समाधि अवस्था प्राप्त होते; हीच सविकल्पता. पूर्व मार्गापेक्षां पश्चिम मार्ग हा सुलभ म्हणून याच मार्गाचे वर्णन बहुतेकांनीं केलें आहे. पूर्व मार्गाची कठिणता नाथांनींहि वर्णन केली आहे. **आज्ञाचक्र अति अवघड। नुघडे काकी मुखाचें कवाड। न चळे प्राणाची चडफड। मार्ग अति गूढ लक्षेना॥ तें आज्ञाचक्र गा द्विदळ। केवळ हंसाचें राऊळ। तेथ पाववया योगबळ। अति प्रबळ पाहिजे॥ हें स्थान पाववयासाठीं। योगी झाले महाहटी। अभ्यास करितां अति संकटी। ते ही शेवटीं न पावती॥ भा. १२।३४२-४४॥** नाथांच्या अभ्यासात याच चक्राचें भेदन झालें होतें कीं काय हेंहि पहावे लागेल. नाथ हटयोगी नव्हते. ज्ञानयोगी नव्हते. या योगाच्या अंगभूत हटयोगाची प्रक्रिया प्रवाहित झाली होती. एकनाथ ज्ञानयोगी असल्यानें इडापिंगलेची गति थाबून प्राणापानाचे ऐक्य झालें व कुंडलिनि (ज्ञानचक्र) जागी होऊन प्राण सुषुम्नेंत प्रवाही होऊन विशुद्ध चक्रापर्यंत मनाच्या मागें आला. कारण ज्ञान योगात पुढे मन नि मागें प्राण असतो. आधींच नाथ आत्म्याशीं अभिन्न म्हणून विशुद्ध चक्रात प्राणसंचार झाल्याबरोबर मन आत्म्यांत लीन झाले आणि निर्विकल्प अशी व्यतिरेक समाधि प्राप्त झाली. याच स्थितींत गळ्यांत साप गुंडाळला वगैरे आख्यायिका घडल्या आहेत. विशुद्ध चक्रातून काकीमुखाचे द्वार उघडून मनामागे प्राण चालला असता त्यास कष्ट जाणवत नाहींत. कारण त्यावेळीं केवळ आनंदच असतो,

म्हणून विशुद्ध चक्रांतून पुढें जाण्यास प्राणास अडथळा होत नाही. परंतु नुसत्या प्राणाचे तसें नाहीं. प्राण पुढे असणें म्हणजेच हठयोग. प्राणाचें प्राधान्य असल्यानें स्वतःच्या शक्तीने काकीमुखाचे द्वार खुलें करून जावें लागतें. आणि ते अत्यंत कठिण आहे. कारण पहिल्यांत आत्मभाव तर दुसऱ्यांत जीवभाव असतो. आत्मभावनेंत आत्म्याचें आकर्षण म्हणून तो यशस्वी होतो. तर जीवभावनेंत स्वतःच्या सामर्थ्यानें जाऊं इच्छितो म्हणून या चक्रांत तो हताश होतो यास उद्देशूनच नाथ म्हणतात. **हें पावावया माझें स्थान। अतिगुह्य आहे अनुष्ठान। सोहं हंसाचें साधन। सावधान जो साधी॥ प्राणाचे नि गमनागमनें। सोहं हंसाचे नि स्मरणें। साव-धानें जो साधू जाणे। तेणें पावणें हें स्थान॥** नाथांनीं योगाचा आदरसत्कार केला आहे. **सांगतां आज्ञाचक्राची संस्था। पुढें गोडी लागली पंथा। मागील विसरलों जी कथा। क्षमा श्रोतां करावी॥ भा. १२।३५२॥** योगाभ्यास हे नाथाचे मुख्य कर्मच होते. साध्या चर्चेंतसुद्धां नाथ योग-मय होतात. **करितां चक्राचें निरूपण। योगारूढ झालें मन। विसरूनि मागील निरूपण। गेलें निघून शेवटा॥** १२।३५१॥ नाथाची योगप्रियता यावरून आपणास दिसेल. योगामुळे प्राप्त काय होते तेंहि पहा **तेथ नाना भोग समृद्धि फळे। आणिती ऋद्धिसिद्धि पाळें॥** १२।३४८॥ या गोष्टी सहज साध्य आहेत. परंतु नाथांनी यांचा तिरस्कार केला आहे. **जो का ऋद्धिसिद्धीसी भुलला। मी सिद्ध या श्लाघे आला। तो आज्ञा चक्रावरूनी चेवला। केल्या मुकला कष्टासी॥ भा. १२।३४९॥**

नियमित वागणाऱ्या सर्वसाधारण मनुष्याच्या वायूचें वाहतुकीचें प्रमाण बारा अंगुळाचें असतें. व तो इडा पिंगला व अधोमुखी सुषुम्ना-वाहक असतो अभ्यासाने जेव्हा याची गति एक अंगुल कमी होते तेव्हां कुंडलिनि जागृत सुषुम्नेंचे द्वार खुले होतें. मूलबंध सिद्ध होऊन सुषुम्नेत तो एक अगुल प्रवेश करितो. नैसर्गिक निष्कामता लाभते, अनासक्ति प्राप्त होते, व तो कर्मयोगी बनतो. पूर्वमीमांसाप्रमेयांचा साधकबाधकपणा अधिकारवाणीनें निवडितो, इंद्रियाचा स्वामी होतो, निष्काम बनत ऊर्ध्वरेता होतो, आसनसिद्धीत बिंदुजय होतो व हलके-पणा येतो. या मूलाधारालाच पूर्वमीमांसा म्हणतात. प्राणाची गति सुषुम्नेंत

दोन अंगुले वाढली व इडापिंगलावाहक दहा अंगुलें राहिली म्हणजे योगानंद लाभतो, उत्साह येतो. तीन अंगुलांनी वाढ झाली कीं बुद्धिविकास होतो, कवित्वशक्ति येते, त्याचे शब्द प्रसादपूर्ण होतात, स्वाधिष्ठानचक्र शुद्ध मंडल होतें, तर्कदुष्टता नाहींशीं होते, आरोग्यलाभ होतो. रसायन,कायाकल्प यावेळीं योग्य ठरतात. **विष कीं आहारी पडे** ते याच वेळीं. या स्वाधिष्ठानासच न्याय किंवा तर्क म्हणतात. या पायरींतूनच नाथवाङ्मयाचें स्फुरण झालें. चार अंगुलें प्रवेश झाला कीं वाचासिद्धि होते. प्रत्याहाराची दृढता या गतींतच सिद्ध होते. धारणेस आरंभ होतो. मणिपुर चक्रांत प्राण येतांच सांख्यशास्त्राचे प्रमेय उकलूं लागून आत्मानात्म विचारात तो मग्न होतो. हेच सांख्यशास्त्र. धारणेची दृढता होते. प्राणाची गति सुषुम्नेंत आठ अंगुले वाटते. जिकडे धारणा दृढ होईल तिकडे सिद्धि लाभेल. वैखरी मध्यमेंत लय पावते. मननांत तो रमतो. सिद्धींची खळबळ येथें उडते. नाथांनी भागवताच्या १५ व्या अध्यायांत याच सिद्धींचे वर्णन केलें आहे. **उद्धवा गा त्याच्या ठायीं। अनिवार सिद्धि उपजती पाहीं ॥१५** प्राणापानाच्या ऐक्यांत वृत्तीचे अनेक मार्ग बंद होतात. आत्मनिष्ठा बाणते. नाडयांची गति ऊर्ध्व होते. आणि सर्व विकार शांत होतात. '**सिद्धि अष्टादश जाण**' म्हणून नाथांनीं लिहिलें आहे. त्यांचे वर्णन नको. आपण त्यांच्या उगमाकडे जाऊं या.

जगदुत्पत्तीचें मूळ जीवसंकल्पात आहे. हा संकल्प दुःखाचें मूळ व अज्ञान! हा जीवसंकल्प विलीन होऊन आत्मसिद्धीची प्राप्ती होणे म्हणजेच जन्मसार्थक!! सत्यसंकल्पात कनिष्ठ, मध्यम व उत्तम असे तीन प्रकार आहेत. कनिष्ठता ज्ञानाच्या पाचव्या भूमिकेत असते (असंसक्ति). मध्यमता ज्ञानाची सहावी भूमिका ( पदार्थभाविनी ). उत्तमता ज्ञानाची सातवी भूमिका (तुर्यगा). तुर्यगेमधील संकल्प तात्काल फलद्रूप होतो. पदार्थभाविनीमध्यें संकल्प अल्प काळानें प्रगट होतो. असंसक्तींतला संकल्प अधिक अवधि घेतो. सत्वापत्ती ही चौथी भूमिका असली तरी सत्यसंकल्पप्रगटन तेथे नाहीं. कारण ती भूमिका विक्षेपतेची आहे. जीवभावना नष्ट होत असली तरी जीव जाग्रत असतो. पण तो ब्रह्मनिष्ठ असतो. पुढील तीन भूमिका ब्रह्मवेत्त्याच्या म्हणजे जीवन्मुक्ताच्या असतात.

याशिवाय नाथांच्या उल्लेखित सिद्धींचे विवेचन करण्याचें कारण नाहीं. याच सत्यसंकल्पानें ब्रह्मांडाचे धनी आपण होऊं शकतो. नाथांच्या योगाभ्यासात जसजसा योगानंदाचा विकास होत गेला तसतसा क्षुद्र सिद्धींचा त्यानीं तिरस्कार केला आहे.

मागें उल्लेखिलेला विषय पुढें चालवावयाचा म्हणजे प्राण अनहद चक्रांत आला कीं कुंभक दृढ होतो. प्राणानंद भोगण्यास मिळतो. योगवेत्त्यांचे हेंच योगचक्र. ध्यानाची दृढता होते. मध्यमेची मिळणी पश्यंतींत होऊन प्राणाशीं ऐक्य होते. साधक प्राणगतींतून ध्यानमग्न आणि पश्यंतींतून निदिध्यासमग्न होतो व पूर्णानंदीं पोचतो. **तेथ मनाचे खेळुगेपण । कुमार अवस्था बाणली जाण । तंव डोलत पुढें चाले प्राण । अनाहत स्थान ठाकिलें ॥ भा. १२ ॥** बाळहट्ट जसा इतर खेळण्यानी नाहींसा होतो त्याप्रमाणें प्राण मनास आनंदात मिळवून घेऊन डुलत पुढें चालावयास लागतो. ही प्राणाची तिसरी सर्पाकार गति होय. शरीर नागासारखे डोलूं लागतें. मन बुद्धि इंद्रिये आनंदमग्न असतात. श्रुतिमाउलीने याच अवस्थेची स्तुति गायिली आहे. **एषोऽग्निस्तपत्येष सूर्य एष पर्जन्यो मघवानेष वायुः । एष पृथिवीरयिर्देवः सदसच्चामृतंच यत् । अराइवरथनाभौ प्राणे सर्वं प्रतिष्ठितं । ऋचो यजूंषि सामानि यज्ञः क्षत्रं ब्रह्मच । प्रजापतिश्चरसि गर्भे त्वमेव प्रतिजायसे । तुभ्यं प्राण प्रजास्त्विमा बलिं हरंति यः प्राणैः प्रति तिष्ठसि । .. इदं स्वं प्राण तेजसा रुद्रोऽसि परिरक्षिता । त्वमंतरिक्षे चरसि सूर्यस्त्वं ज्योतिषां पतिः ॥. प्राणस्येदं वशे सर्वं त्रिदिवि यत्प्रतिष्ठितम् ॥** विशुद्ध चक्रांत प्राण आला म्हणजे स्वरविज्ञान होऊन आत्मस्वरूपाचा प्रकाश उत्पन्न होऊन समाधिद्वारांत तो येतो व वेदबोधाची पूर्णता होते. **वेद बोले सर्वाठायीं, एका वांचूनि दुजें नाहीं ॥ एका जनार्दनी बोधु । नाहीं तव न कळे वेदु ॥** हेंच योगवेत्त्यांचें व्याकरणशास्त्र! आज्ञाचक्रांत प्राण आला, नवचैतन्य प्राप्त झालें कीं शरीरावर त्याचे प्रभुत्व स्थापन होते. सविकल्प समाधि या चक्रात लाभते. पश्यंति वाचा परेत लीन होऊन समाधि व साक्षात्कार होतो तरी देखील तो पराभक्तीचा अधिकारी होऊं शकत नाहीं. महाकारणांतील प्रत्यगात्माभिमानी येथेंहि शिलक असतो. नाथ म्हणतात **ब्रह्माहमस्मि हा**

**अभिमान। शुद्ध ब्रह्म नव्हे जाण॥** व्यतिरेकांतून साक्षात्कार झाला तरी साक्षी विलीन होत नाहीं. सविकल्प समाधि ही साधनाच ठरते. वेदविचारांचा अंत येथे होतो. हेंच योगवेत्त्याचें वेदांत किंवा उत्तरमीमांसा शास्त्र. द्विदलांतून सहस्रारमध्यें प्राण विलीन झाला म्हणजे ती निर्विकल्प समाधि व परातीत पूर्णब्रह्मस्थिति ( सिद्धता ) प्राप्त होते. ही समाधि व्यतिरेकांत दृढ झाली कीं तिचा विकास व्यापक अन्वयांत होतो, व पाचवी उन्मनी अवस्था प्राप्त होऊन सहजसमाधि किंवा सहजस्थिति प्राप्त होते. हीच सिद्ध किंवा जीवन्मुक्त अवस्था. **साक्षि व वृत्तीचें कारण, उन्मनीते निवृत्ति जाण, तेथें विरे जाणपण, विज्ञान तें॥ वृत्ति रहित जें ज्ञान, तेंचि पूर्ण समाधान, जेथें तुटे अनुसंधान, माया ब्रह्मीचें ॥दासबोध॥** समर्थाची हीच सहजस्थिति ! व्यतिरेक समाधींत लीन झालेल्या चार वाचा येथें अभिन्नत्वानें पुन्हां विकसित होतात. **तेवीं अविद्यें सवें, चौघी वेंचती जीवें, तत्वज्ञानाचेंनि नांवें, उठतीचि या ॥ ७ । ३ । अमृ० ॥** नाथांनी योगाची पराकोटी गाठली, व्यतिरेक दृढ करून अन्वयास अभिन्न झाले. महाराष्ट्रांत ज्ञानोत्तर भक्तीची ध्वजा फडकविली. **नव्हता ब्रह्मज्ञान । श्वानसूकरा समान ॥ पशुवत् जिणें । वाया जेंवि लाजिरवाणें ॥** ब्रह्मज्ञान होईपर्यंत भक्तीचा उदय नसतो मूर्ति हीच देव आणि तिची पूजा हीच भक्ति असे मानणाऱ्यासंबंधी नाथ म्हणतात, **प्रतिमाची देवो, ऐसा ज्याचा भावो, तो न करी निर्वाहो, आम्हांलागीं ॥** नाथाना व्यतिरेकांत आत्मसाक्षात्कार होऊन अन्वयांतहि चहूंकडे जनार्दनच दिसूं लागला. ते स्वतः जनार्दनच झाले. या पराभक्तीचें स्वरूप **आतां कैसेनि पूजूं देवा, माझी मज घडे सेवा ॥ तोडूं गेलों तुळशीपान, तेथें पाहतां मधुसूदन॥ अन्न गंध धूपदीप, तें हि माझेंचि स्वरूप ॥ एका जनार्दनी पूजा । पूज्य पूजक नाहीं दुजा ॥** असें आहे. नाथांनीं याचा अनुभव घेतला. आजची आमची भक्ति विभक्तीचें दर्शन. या भक्तीचें स्तोम म्हणजे अधःपातच. **मी भक्त ऐसें म्हणावें, आणि विभक्तिपणें भजावें, हें अवघेंचि जाळावें, विलक्षण ॥ समर्थ ॥** भेददृष्टी नाथानीं सोडली. उच्चनीच भाव नाहींसा केला. **नर अथवा नारी, असो भलते याती, वंदावे विभूति म्हणूनिया ॥**

किंवा वेदभाषेंत **नमस्तक्षभ्यो रथकारेभ्यश्च वो नमो। नमः कुलाले भ्यः कर्मकारेभ्यश्च वो नमो॥** कोठे प्राचीन ऋषिवर्यांची आणि राजर्षि श्रीएकनाथासारख्यांची सामाजिक समता आणि निरहंकार थोरवी आणि कोठे आजचा एकदेशीय स्वार्थी आणि अज्ञानी वर्गास धिक्कारणारा, नीच मानणारा विप्रसमाज! आपण उद्धरून इतराच्या उद्धारास प्राणार्पणाच्या दृढतेने सहाय्यभूत होणारे तें वेदाध्ययन व ज्ञानबोध आणि स्थूलात्मक थोरवीनें अहंकारी घोकंपट्टीनें अधःपातास कारणीभूत होणारे संकुचित पांडित्य. नाथांनी वेदाध्ययनानें अभिमान स्वीकारला नाही तर चारही देहांतील अभिमानी नाहींसें करून, ज्या वस्तूचें नेतिनेति म्हणून वेद अनुसंधान करितो त्या आत्मवस्तूंत ते विलीन झाले. योगाभ्यासानें नाथांनीं खराखुरा वेदार्थ जाणला. **आम्ही ब्रह्मपुरीचे ब्राह्मण। याति कुळ नाहीं लहान। आह्मा सोवळें ओवळें नाहीं। विटाळ न देखों कवणे ठायीं॥ आम्हां सोयरे जे झाले। ते यातिकुळावेगळे केले॥ एका जनार्दनी बोधु। यातिकुळाचा फिटला संबंधु॥** हाच नाथाचा वेदाभ्यास! योगाभ्यासांतून नाथानी घेतलेली वेदाची ही गोड रुची वर्णनातीत आहे. प्राणायामाच्या अभ्यासानें कुंडलिनी जागी होतेच. ती केवळ योगनिष्ठेंत जाग्रत झाली तर एखादी सिद्धि प्राप्त होईल, अज्ञानात जाग्रत झाली तर भ्रामक स्थिति होईल, आणि ज्ञाननिष्ठेंत जाग्रत झाली तर आत्मस्वरूपाला पोंचवील. कारण कुंडलिनी जागी होताच सुषुम्नाप्रवाह ऊर्ध्व होतो आणि अनेकात्मक वृत्ति स्थगित होऊन एकाकार बनते. ती ज्या निष्ठेंत असेल त्याच निष्ठेंत स्वाधीन होते. तिचा त्यांतच लय होतो. म्हणूनच अज्ञान अवस्थेंतील योग हा घातक समजला जातो. याचसाठीं कुंडलिनी विचारपूर्वक जाग्रत केली पाहिजे. ज्ञाननिष्ठेंतून ती जागी झाली तर आत्मप्राप्ति आहेच; परंतु योगनिष्ठेच्या सिद्धिहि त्यास येऊन मिळतात. आतां नाथवर्णित सातव्या सिद्धींचे वर्णन करूं. **काळासी वश्य नाहीं होणें। आपुलिये इच्छेनें मरणें। हे सातवी सिद्धि जाणणें। स्वछंद मरणें ती नांव ॥आ. १५॥** जीवन आणि मृत्यु श्वासाच्या गतीवर अवलंबून आहेत. नियमित वागणाऱ्या मनुष्याच्या श्वासाची नित्य संख्या २१६०० आहे. ही संख्या नित्य असली म्हणजे पुरुष शतायु होतो, हा शास्त्राचा

साधारण सिद्धान्त आहे. अनियमित मनुष्याचा श्वास अधिक संख्येनें चालतो म्हणून त्याचें आयुष्य घटतें. प्राणायामानें हाच श्वासोच्छवास कुंभकात आला कीं त्याची गति स्थिर होते व आयुष्यमान वाढतें. आणि अभ्यासानें प्राणाची गति पूर्ण स्वाधीन झाली कीं तो इच्छामरणी होऊं शकतो. नियमित श्वासापेक्षाहि याची गति कमी होते व शेवटीं तो पूर्ण होतो. नाथांत या सातव्या सिद्धीचा समावेश झाला होता म्हणून ते इच्छामरणी होते. ज्ञानेश्वरादिकांचें प्राणोत्क्रमण याच सिद्धींतून समजावें. नाथांनीं हठयोगाच्या प्रमाणांतून सहा चक्रांच्या देवता वर्ण व्यंजन मातृका याचें वर्णन केले आहे. **हीं साहीं चक्रें अनुक्रमें जाण। चार मातृका अठ्ठावीस वर्ण। सोळाही स्वर संपूर्ण। हंस लक्षण प्रातीचें** ३३५-१२भा॥ हें वर्णन केवळ हठयोगासाठींच आहे, ज्ञानयोगासाठीं नाहीं. कारण हठांत जीवभावना असते. हा जीवभावनेचा संकल्प त्या चक्रांतील देवतेस स्थापन व अर्पण करून उत्तरोत्तर पुढील देवतेस भावनार्पण होण्याचें असतें. शेवटची भावना आज्ञाचक्रांत हंसरूपांत जीवत्म्याचें पूर्णार्पण करून साक्षीचा अनुभव घेण्याची असते. ज्ञानयुक्त ध्यानयोगात असें नसते. आत्मभावना अगोदरच असल्याने सर्व चक्रांच्या देवता ब्रह्माधिष्ठितच असतात. आत्मनिष्ठेत द्वैताला जागा नसल्याने वेगवेगळ्या देवतेचें ध्यान संभवत नाहीं म्हणून एका ब्रह्मध्यानांतच सर्वांचा समावेश होतो. या साही चक्रातील दैवतांचा पसारा असा:—

**मूलाधारे वारिजपत्रे चतुरस्रम् वं शं षं सं वर्णविशालं सुविशालम्।**
**रक्तं वर्णं श्रीगणनाथं भगवंतम्। आत्मारामं ब्रह्मस्वरूपं प्रणतोऽस्मि॥१॥**

**स्वाधिष्ठाने षट्दलपद्मे तनुलिंगे बा दिं लां तं वर्णविशेषं सुविशेषं।**
**पीतं वर्णं पशुपतिरमणं दुहिलांतं। आत्मारामं०॥२॥**

**नाभौ पद्मे पत्रदशांके डफ वर्णे लक्ष्मीकांतं गरुडारूढं नरवीरं।**
**नीलं वर्णं निर्गुणरूपं निगमाक्षं। आत्मारामं०॥३॥**

**हृत्पद्मान्ते द्वादशपत्रे क ठ वर्णे सांबं शैवं पूर्णमयंतं शशिवर्णं।**
**स्वर्गस्थितं ज्योतिः स्वरूपं शिवशक्तिं। आत्मारामं०॥४॥**

**कंठस्थाने चक्रविशुद्धे कमलांते चंद्राकारे षोडशपत्रे स्वरवर्णे।**
**मायाधीशं तेजःस्वरूपं भगवंतं। आत्मारामं०॥५॥**

**आज्ञाचक्रे भृकुटिस्थाने दुहिलांतं हं क्षं बीजं ज्ञानसमुद्रं गुरुमूर्तिम्।**
**विद्युद्वर्णं ज्ञानमयंतं विषमाक्षं। आत्मारामं० ॥६॥**
**मूर्ध्निस्थाने वारिजपत्रे शशिबीजं शुभ्रं वर्णं पत्रसहस्रं सुविशालं।**
**अहम् बीजाक्षं वर्णसहस्रं तुर्यन्तम्। आत्मारामं० ॥७॥**
**ब्रह्मानंदं ब्रह्ममुकुंदं भगवंतं सत्यंज्ञानं ज्ञानमयंतं स्वयमेवं।**
**परमात्मानं ब्रह्ममुनीद्रं भसिताङ्गम्। आत्मारामं० ॥८॥**
**शांताकारं शेषशयानं सुरवंद्यं कांतानाथं कोमलगात्रं कमलाक्षं।**
**चिंताहरणं चिद्घनपूर्णं द्विजराजं। आत्मारामं० ॥९॥**
**चित्योंकारे ध्वनिनादेच स्वरछंदे, आकारान्ते क्षर वर्णान्ति गुण.रूपं।**
**वेदार्थं ज्ञानस्वरूपं निजबोधम्। आत्मारामं० ॥१०॥**

नाथांनीं भक्ति, ज्ञान आणि योग या त्रिवेणीसंगमांत उडी घेतली आणि मग लोकसंग्रह केला. नुसत्या शब्दज्ञानानें लोकसंग्रह होत नाहीं व झाला तरी टिकत नाहीं. 'मी कोण' याचा बोध होईपर्यंतचा लोकसंग्रह म्हणजे कीर्तीचें दिग्दर्शन! हा बोध झाला परंतु दृढता आली नाहीं तरी देखील **प्रचारक वक्ता** हा अहंकार बळावतो म्हणून तोहि लोकसंग्रहास पात्र नाहीं.

**नवल अहंकाराची गोठी। विशेषें न लागे अज्ञानापाठीं। सज्ञानाचे झोंबे कंठीं। नाना संकटीं नाचउनीया॥** अहंकाराच्या निरासासाठीं एकांताचें अनुसरण अवश्य आहे. या दृढतेसाठींच नाथांनीं एकांत योगाभ्यासात काढला. दृढतेनंतर आत्मआपणास विसरून अनासक्त कर्मयोगच शिल्लक राहिला. **उरलो उपकारापुरता** ही तुकोबाची उक्ती व नाथांचें कार्य हे एकच! आपणास बोध नसतो म्हणून भक्ति, ज्ञान व योग यांत आम्हाला भेद दिसतो. एक गौण एक विशेष अशा दृष्टीनें ज्ञानी योग्याचा, योगी ज्ञान्याचा आणि भक्त दोघांचा उपहास करितो. वस्तुतः या तिहींचें ऐक्य झाल्यावर पर्याय शब्द वेगळे असले तरी वस्तु एकच. योग म्हणजे वियोग नाहीं, तादात्म्य म्हणजे अभिन्नता, भक्ति म्हणजे अविभक्तता म्हणजेच सर्व मिळून अभिन्नता, म्हणजेच एकता. या अभिन्नतेतून जें सहजकर्म – कर्मातीत कर्म – मग ती उपासना, भक्ति स्वतःसाठीं किंवा समाजासाठीं असो – म्हणजे सर्व कर्मयोगच किंवा कर्मनिष्ठाच! ज्ञानरहित

कर्म हीच कर्मठता. ही बाधक असते. ज्ञानयुक्त कर्म हीच कर्मनिष्ठता ही साधनयुक्त आहे. ज्ञानोत्तर जें कर्म तें दिव्यकर्म! तेच प्रकृतिधर्मानुसार देहप्रारब्ध असेपर्यंत होत असलेलें कर्म! नाथ या दिव्यकर्माचे प्रतिनिधि होते. अशा दिव्यकर्मीयांकडूनच लोकसंग्रह होऊन सामाजिक सुव्यवस्था घडते. यांचे शब्द म्हणजेच वेद! हेच धर्माचे परिवर्तन करूं शकतात. **वेदशास्त्रविदो विप्रा यं ब्रूयुः सप्त पंच वा । त्रयो वाऽपि स धर्मः स्यादेको वाध्यात्मवित्तमः** ॥ बृ पा. स्मृ. ६ ॥ अशांच्या हातूनच साधक-बाधक विषमता नाहींशी होते, समाजात समता नांदू लागते. यांनाच अवतारीपुरुष म्हणतात. **देहसामर्थ्यानुसार । सकळ करी जगदीश्वर । थोर सामर्थ्यें अवतार । बोलिजति** ॥ दासबोध ॥ या समर्थोक्तीनुसार नाथांना आपण अवतारी समजतों. वाङ्मयस्वरूपानें आजहि ते मार्गदर्शन करीतच आहेत.

नाथांनीं शेवटची समाधि असंगवशितासिद्धीच्या बळानें घेतली. ही गोष्ट त्यांच्या योगेश्वरत्वाची ग्वाहीं आहे. पाण्यात जाऊन प्राणायाम-पर होऊन घेतलेली ही समाधि होती. आरंभीं प्राणोत्क्रमण झालें, परंतु एका माउलीस तो अपशकुन वाटल्यानें त्यांना उठावें लागलें आणि मग ही समाधि त्यांनीं घेतली असें म्हणतात. नाथांचे प्रेममय दिव्यजीवन त्यांच्याच कृपेनें सर्वांना लाभो आणि ते समाजाला मार्गदर्शक ठरो एवढी सदिच्छा व्यक्त करून श्रीसद्गुरु एकनाथमाउलीच्या चरणकमळीं ही लेखनमाला समर्पण करितों.

---

# भावार्थरामायणाचें अज्ञात उत्तरकांड ••

श्री. विश्वेश्वर अंबादास कानोले,
नांदेड.

श्रीएकनाथमहाराजांच्या भावार्थरामायणाच्या शेवटील भागाच्या कर्तृत्वाविषयीं कांहीं गूढ प्रकार दिसून येतो. नाथांनीं युद्धकांडाच्या ४० व्या अध्यायापर्यंत रचना केल्यानंतर आपला काळ समीप आला हें जाणून राहिलेला भाग गावबा नांवाच्या आपल्या एका लाडक्या शिष्यास पूर्ण करावयास सांगितला व त्यानें नाथांच्या पश्चात् अवशेष युद्धकांड व उत्तरकांड लिहून ग्रंथ पूर्ण केला ही घटना सर्वांस माहीत अशीच आहे. ग्रंथपूर्तीची ही जबाबदारी गावबानेंहि इतक्या यशस्वितेनें पार पाडली कीं शेवटचीं कांडें वाचतांना जणू काय ती नाथांचीच रचना आहे असें वाटावें. हा श्रद्धेचा भाग सोडला तर ग्रंथसमाप्तीचें कोडें वाटतें तेवढें सोपें आहे असें आम्हांला वाटत नाहीं. रामायणाचा शेवटचा भाग एकट्या गावबानेंच पूर्ण केला किंवा अजून कांहीं लेखकांनी त्यास जोड दिली हांहि एक महत्त्वाचा प्रश्न आहे. छापलेल्या भावार्थरामायणाची निर्णय-सागरी किंवा कोणतीहि प्रत पहा आणि युद्धकांडाचे ५१ ते ५४ अध्याय ज्यांत अहिमहीची कथा आहे– पहा, म्हणजे तींत, मूळ रामायणांत नाहीं म्हणून "'जयरामसुत' नामक कवीने वरील आख्यान मागाहून रचून समाविष्ट केल्याचें दिसेल. याचें स्पष्टीकरण ही ५४ व्या अध्यायाच्या शेवटीं केल्याचें दिसतें. गावबाचेच नांव 'जयरामसुत' असावें, हा कै. पांगारकरांचा तर्क तितकासा पटत नाहीं. 'जयरामसुत' किंवा 'जयरामात्मज' असें नांव कित्येक हस्तलिखित बाडांत आढळून येतें. या वस्तुस्थितीवरून युद्धकांडांत तरी नाथांची रचना कुठवर असावी, गावबाच्या रचनेचा प्रारंभ कुठून असावा, जयरामसुतासारख्यानी अजून मागाहून जोडलेल्या पुरवण्या असाव्यात कीं काय इत्यादि अनेक प्रश्न आपणापुढे उभे ठाकतात.

४४ व्या अध्यायापर्यंत रचना झाल्यानंतर आपल्या देहावसानाची नाथांना कल्पना आली म्हणावे तर तसा सूचक उल्लेख शेवटीं कुठें तरी

आतीं करावयास पाहिजे होता. परंतु ४४ वा किंवा त्यापुढील अध्याय वाचतां या घटनेचा उल्लेख कोठेंच आढळत नाहीं. श्रीनाथमहाराज प्रत्येक गोष्ट जरूर त्या ठिकाणीं व मोठया साक्षेपानें मांडतात. श्रीरामचंद्र प्रभूनें पाठपुरावा करून ग्रंथ माझ्याकडून लिहवून घेतला असे उद्गार ग्रंथांत सांपडतात. मग नाथांनीं ग्रंथ अपूर्ण राहिल्याची किंवा स्वताच्या निर्याणा-चीच गोष्ट गुप्त कां ठेवावी ? याचे एकच कारण संभवतें. ग्रन्थाचा अमुक भाग नाथांचा नाहीं असें भाविक वाचकांना वाटूं नये व संपूर्ण रचना नाथांचीच आहे, या श्रद्धेला धक्का बसूं नये म्हणून ही घटनाच मुळांत दड-वून ठेविली असावी. एरव्ही अत्यंत चिकित्सक वाचकाशिवाय व ही घटना अज्ञात असलेल्या विद्वानासहि ही रचना नाथांची नाहीं हें सहजासहजीं ध्यानांत येण्यासारखें नाहीं. तथापि ४५ व्या अध्यायांतच पुढील कृति नाथांची नसावी याचें प्रत्यंतर पहावयास मिळतें.

**यापरी मी अनाथ । भवदरिद्रें होतों पीडित । एका जनार्दनीं येथ । केला सनाथ त्रिजगती ॥ १८७ । ४५ ॥**

**माझी मिरासी मूर्खपण । नेणें पदबंध व्याख्यान । माथां हात ठेवोनी जनार्दन । वदवी रामायण निजसत्ता ॥ जनार्दनाची कृपा ऐसी । मूर्खांहातीं रामायणासी । वदविलें रामकथेसी । कथा ऐसी संतांची ॥ सद्गुरूची कृपा घडे । तें पांगुळ पर्वत चढे । एकनाथें तेणें पाडें । केलें मजसरतें ॥ अ. ९२**

हे सूचक उद्गार गावबाचें अस्तित्व प्रगट करणारे आहेत. जरी तो स्वतःचा उल्लेख कटाक्षानें टाळण्याचा गावबाचा प्रयत्न असला तरी वरील प्रमाणे सहजोद्गार आपोआप आलेले सांपडतात. यावरून त्याच्या अस्तित्वाची कल्पना झाल्यावाचून रहात नाहीं. एरव्हीं पुढील भागांत गावबा, ' एका जनार्दन ' हेंच नाव आदरपूर्वक विस्तारितो. गुरुपरंपरा व मर्यादेचा हा संकेत पाळलेला दिसतो. रचना करण्याच्या आधीं गाव-बानें नाथांच्या, सर्व ग्रंथाचा बारकाईनें अभ्यास केला असावा असें दिसतें. उद्गार, कल्पना, रचना, यांतील साम्य दोन्ही रचनेंत पुनः पुन्हा जाणवतें. अर्थात् नाथचरित्रकारांनीं दिलेली गावबाच्या ग्रंथपूर्तीची माहिती सत्य असावी असें समजण्यास हरकत दिसत नाहीं.

कै. भावे, कै. पांगारकर, श्री. अजगांवकर इत्यादि अभ्यासकांनीं गावबाची हकीकत जशीच्यातशीच मान्य केली आहे. नाहीं म्हणावयास संतवेदकार कै. गोविंद गोपाळ टिपणीस यांनीं सन १९१६ मध्यें 'संतांचा परिचय' म्हणून मनोरंजनांत जी लेखमाला लिहिली होती त्यांत प्रस्तुत विषयाचा ऊहापोह करितांना गावबाच्या गोष्टीवर दंतकथेचा शेरा मारला आहे. नाथासंबंधींच्या आख्यायिका नाथाच्या मोठेपणाला गौणपणा आणण्यास कारणीभूत झाल्या आहेत असेंहि त्यांनीं विवेचिलें आहे. भावार्थरामायण पूर्ण करण्याच्या आख्यायिकेसंबधीं ते लिहितात, ' ही आख्यायिका केवळ महिपतीसारख्या जुन्या ग्रंथकाराच्या आधारानें दिलेली आहे. परंतु ती खरी मानण्यासारखें एकहि प्रमाण खुद्द भावार्थरामायणांत आढळत नाहीं. (गावबाच्या रचनेंत) या गोष्टीचा ओझरता तरी उल्लेख असावयाला पाहिजे होता. पण तसेंहि नाहीं....ती साफ खोटीच असली पाहिजे. हा संपूर्ण ग्रंथ स्वत: एकनाथांनींच लिहिला आहे याबद्दल आम्हांला तरी मुळींच संशय नाहीं. 'श्रीरामच आपणाकडून लिहवीत आहेत.'...असें नाथानीं लिहिलें आहे. **न लिही म्हणतां हें चरित्र। श्रीराम हृदयीं हृदयस्थ। तो राहूं नेदी निवांत। अंतरीं करित महाभार ॥१३॥ देहगेहाची आवडी । सांडवोनी स्त्रीपुत्रांची गोडी।** ... या ७३ व्या अध्यायाच्या उपसंहारातील ओव्या पाहतां (व गावबाला स्त्रीपुत्र नव्हते ही गोष्ट ध्यानात घेता) ही गोष्ट स्पष्ट होणारी आहे. जयरामसुतानें सप्तकांडरामायण नाथांनीं रचलें असें म्हटलें आहे. **एकनाथीं रामायण। केलें सप्तकांड कथन ॥२३३॥** जयरामसुत असें म्हणतो तर गावबाची गोष्ट म्हणजे एक दंतकथाच आहे असें म्हणण्याला काय हरकत आहे ? (मनोरंजन १९१६ पुस्तक २१ वें लेखांक ८) टिपणिसांचें लिहिणें चिकित्सक असलें तरी नितर्कें ग्राह्य वाटत नाहीं. नाथांच्या घरीं अनेकजण असतील मग गावबाचाच भावार्थरामायणाशीं काय संबंध ? कांहीं तरी कार्यकारणभावावाचून गावबाचें नांव या थोर कृतीशीं जोडलें जाणें शक्य दिसत नाहीं. स्वतःस विसरून रचना करतो तेव्हां ग्रंथांत नामरूपासह गावबा आढळणें शक्य नाहीं. **स्त्रीपुत्रादिकांचि गोडी** इत्यादि शब्दानें नाथाची वाणीच तो उच्चारितो. **एकाजनार्दनाचे रंकाचे रंक। त्या बालकाचे वाचे अच्युत देख। म्हणोनी गुरुमहिमा अधिक।**

तेणें निर्दोष पैं वाणी ॥ उ. कां. अ. १९३ ॥ असे कांहीं सूचक उद्गार वगळले तर गावबाचें अस्तित्व ग्रंथांत दाखवितां येत नाहीं. जयराम-सुताचा उल्लेख नाथविषयक श्रद्धा व आदर भावनेचाच आहे. म्हणजे गावबाची गोष्ट दंतकथा नव्हे तर सत्यकथा आहे हें निर्विवाद आहे.

## नवीन उत्तरकांड ! नवाच 'गावबा' !!

भावार्थरामायणाच्या उत्तरकांडाची एक नवीनच संहिता आम्ही आज आपणांपुढें ठेवीत आहों. एकच गावबा आजपर्यंत आपल्यापुढें होता, आतां अजून एक गावबा त्याच्या जोडीला बसूं पहात आहे. संशोधनहि कधीं कधीं नाट्यपूर्ण होऊन बसते. उपलब्ध झालेलें हें उत्तरकांड भावार्थ-रामायणातील प्रसिद्ध उत्तरकांडाहून सर्वस्वी निराळें आहे. देवस्थळीसंपादित निर्णयसागर-प्रत व सुपेकर-प्रकाशित प्रत दोन्हींपेक्षां हें उत्तरकांड सर्वस्वीं भिन्न असेंच आहे. छापील उत्तरकांडाचे ७७ तर या नूतन उपलब्ध उत्तरकां-डाचे १७ च अध्याय आहेत. प्रत्येक अध्यायाच्या शेवटीं **एकाजनार्दना शरण । उत्तरकांड रामायण । संसार रोगाचें नाशण । रसायन मोक्षाचें** ॥ ही नाथां-चीच ठराविक ओवी आढळते. कर्त्यानें आपलें नाव कोठेहि सूचित केलें नाहीं. वरील ठराविक ओवीनंतर **इति श्रीभावार्थरामायणे उत्तरकांडे येकाकार टीकायां** .. असाच उल्लेख आढळतो. ग्रंथ खरोखरच अपूर्ण राहिला होता ही गोष्ट या उपलब्धीने निःसंशय सिद्ध होते. गावबाची कथा आपण ऐकत होतो. अजून कुणी असा उपक्रम केल्याचें आपणांस ठाऊक नव्हतें. ग्रंथपूर्तीचा आदेश नाथांनीं गावबास दिला तर श्रीनृसिंहसरस्वति यांचा ग्रंथप्रसाद प्रस्तुतच्या लेखकास लाभला ही गोष्ट चिंतनीय आहे. हा नवा गावबा कोण असावा ?

**उपलब्धिः**—भावार्थरामायणाचीं बाल, अयोध्या, अरण्य, सुंदर, व किष्किंधा हीं त्रुटित कांडें आणि प्रस्तुतचे उत्तरकांड हीं नांदेड येथें उपलब्ध झालीं. ग्रंथ छापला गेला असल्याने आरंभीं तिकडे लक्षच गेलें नाहीं. शेवटचा उल्लेख चाळताना नृसिंहसरस्वतीच्या प्रसादाचा उल्लेख वाचून जिज्ञासा वाटली. प्रतलेखकानें तो उल्लेख केला असावा असेंहि वाटलें. इतर कांडें छापील प्रतीशीं ताडून पाहिलीं. तों तीं सारखींच निघालीं. उत्तरकांडाच्या

तुलनेंत मात्र बुचकळ्यांत पडलो: विषय एकच असला तरी रचनासाम्य कोठेंच आढळेना.!' अध्यायांची संख्या १७ च दिसली; ओव्यांची संख्याहि त्याच प्रमाणें ! अर्थात् छापील उत्तरकांडाहून अगदींच स्वतंत्र असे हे उत्तरकांड असल्याचें आढळलें. गावबाप्रमाणेंच अजून कुणा भक्तानें ग्रंथपूर्तीचा हा उपक्रम केला असावा असें दिसतें. अध्यायाची रचना एकाजनार्दनाच्या नांवावर केली असल्यानें हा नवा गावबा कोण हें हुडकणें सोपें काम नाहीं. उपलब्ध कांडात युद्धकांड नाहीं. तें मिळतें तर ४४ व्या अध्यायानंतर ची रचना पडताळून पाहतां आली असती. कदाचित ग्रन्थकाराचा निर्देश हि सांपडता. पण त्या अभावी हें अशक्य आहे. प्रस्तुतेंच उत्तरकांडहि तिसऱ्या अध्यायापासून पुढें आहे. पहिले दोन अध्याय गहाळ आहेत. केवळ ३ ते १७ अध्याय शाबूत आहेत. त्यातहि ३, ४, ५ या अध्यायाचीं पानें एका बाजूनें कुरतडलीं गेलीं आहेत. कित्येक चरण त्यांत गेले आहेत. बाल-सुंदर काडाचें हस्ताक्षर व उत्तरकांडाचें हस्ताक्षर एकाच लेखकाचें दिसत नाहीं. उत्तरकाडाचें हस्ताक्षर सामान्य, गिचमिड व अशुद्ध असें आहे. त्यातहि एकहातीं काम दिसत नाही. हस्ताक्षरें दोघ तिघांचीं वाटतात. सुंदरकाडाच्या शेवटीं ' हस्ताक्षर गोपजी देवराम देशमुख परगने सारखाड सरकार नादेड भाद्रपद वद्य त्रयोदशी हस्तनक्षत्र सन ११२४ ते दिनीं प्रसंग संपूर्ण ' असा उल्लेख आढळतो. उल्लेखावरून रुव्वादोनशें वर्षांपूर्वींची हीं पोथी दिसते.

**विशेष** :– अक्षर गिचमिड, अशुद्ध, लेखकाचे नांवस्थळकालनिर्देश यांचा अभाव, ' येकाकार टीका ' असाच उल्लेख, नांवाचा चुकूनहि उल्लेख तर नाहींच पण सूचनाहि नाहीं. इतके सर्व असूनहि साहित्य-दृष्ट्या हें उत्तरकांड एक अपूर्व घबाडच म्हणावें लागतें. रचना ओजस्वी व प्रासादिक. कर्ता हुडकणें कठिण आहे. परंतु भाषा, रचनाशैली पहातां हा नाथांचा नवा गावबा ओळखला जाऊं शकेल. काहीं संकल्प मनात धरून हा ग्रन्थ, कर्त्यानें पंचगंगासंगमावर नरसोबाच्या वाडीस श्रीनरसिंह-सरस्वतींच्या सांनिध्यांत लिहून संपविला. येथेंच श्रीनरसिंहसरस्वतींचा दृष्टांत स्वप्नानें ग्रन्थास आशीर्वाद मिळाला. १७ व्या अध्यायाच्या शेवटीं उल्लेख आला आहे.

**येका जनार्दना शरण । उत्तरकांड रामायेण । संतकृपेनें जाले संपुर्ण । सकळ लोक तारक ॥ २०१ ॥ पवित्र सरिता कृष्ण वेणी । पंचगंगा समस्थानीं । नृसिंह सरस्वतीचे चरणीं । ग्रंथप्रसाद लाधला ॥२०२॥ तेथ जाली देववाणी । ग्रंथ पावावा प्रतिस्ठानी । येकनाथाचिये सदनीं विस्तारले जनसुखे ॥ २०३ ॥......**

इती श्रीभावार्थरामायेणे उत्तरकांडे येकाकार टीकायां श्रीराम-निजधाम-गमनोनाम सप्तदश प्रसंगा ॥ २०५ ॥ ग्रन्थसमाप्तीची ही कारण-परंपरा महत्त्वाची आहे. नाथांनीं ग्रन्थसमाप्तीचें काम पार पाडावयास गावबास सांगितलें असतांना तेच काम दुसऱ्या व्यक्तीनें करावयाचें प्रयो-जन काय ? आणि ते हि पैठण सोडून पंचगंगासंगमावर श्रीनृसिंहसरस्व-तींच्या सांनिध्यात ! पैठणास अनेक संत, विद्वान असतां नाथांनीं गावबा सारख्या सामान्याला उरलेल्या ग्रन्थाच्या पूर्णतेचें काम सागावें ही गोष्ट कियेकांना रुचली नसावी. हेंहि संभवनीय आहे. गावबाची रचना प्रस्तुत रचनाकर्त्यास मान्य झाली नसावी असें वाटतें. आपणहि हें काम करावें अशी प्रेरणा त्यास झाली असावी आणि निष्ठेनें पण स्वतंत्रपणें त्यानें तें पार पाडलें असावें. अर्थात ही कामाठी त्यानें पंचगंगासंगमावर तडीस नेली. नाथाच्या कृपेनें गावबाची कृति सर्वमान्य झाली तर प्रस्तुतचें उत्तरकांड मात्र काळाच्या उदरात पडून राहिलें.

## नाथांचा नातू महाकवि मुक्तेश्वर हाच दुसरा गावबा काय ?

श्रीनृसिंहसरस्वतीचा प्रसाद लाभलेल्या या उत्तरकांडाचा कर्ता कोण हें सहजासहजीं समजणें शक्य नाहीं. वारंवार वाचून, शैली लक्षांत घेऊन अनुमान करतां येतें. मुक्तेश्वरी रचनेचे विशेष लक्षांत ठेवून यांतील प्रसंगवर्णन, संक्षेपविस्तार, सृष्टिवर्णनें, रसाविष्कार हीं पाहिलीं असतां याची प्रचीति येते. नाथाच्या हयातींत मुक्तेश्वर पैठणासच होते. भारताची रचना पैठणातच झाली. नाथनिर्याणानंतर मुक्तेश्वरानें पैठण सोडलें असण्याचा संभव आहे. मुक्तेश्वराचे वडील व गुरु चिंतामणि विश्वंभर यांचें देहावसान पैठणासच झालें कारण तेथें त्यांची समाधि अद्यापि दाखविली जाते. मुक्तेश्वराचें कुळदैवत कोल्हापूरची महालक्ष्मी व सुवर्णपुरीचा भैरव असल्याचें त्यांच्या आदिपर्वांत उल्लेखिलें आहेत. नाथांच्या निर्याणानंतर मुक्तेश्वर

कोल्हापूरकडे पंचगंगाकाठीं रहावयास गेले. मुक्तेश्वरांची समाधि नरसोबाच्या वाडीजवळ तेरवाड या गांवीं आहे. तेथें पंचगंगा आहेच. ते दत्तभक्तहि होतेच. **श्रीदत्तांघ्रिपद्मभ्रमर । विनवी कवि मुक्तेश्वर** ॥ असे उल्लेख त्याच्या भारतात आहेतच. तेरवाडला आल्यानंतर नरसिंहवाडी व औदुंबरक्षेत्रीं तो वारंवार जात येत असावा. भावार्थरामायणाची ही रचना करण्यासाठीं नृसिंहसरस्वतींच्या पादुकांच्या सांनिध्यांत ते मुद्दाम जाऊन राहिले असावे असें दिसतें. या उपक्रमास संतांचे अनुमोदनहि मिळालें असावें. '**येका जनार्दना शरण । उत्तरकांड रामायेण । संतकृपेनें झालें पूर्ण । सकळ लोक तारक** ॥ असें तो म्हणतो.

प्रस्तुतचें उत्तरकांड मुक्तेश्वराचें असावें ही गोष्ट अंतस्थ प्रमाणावरून व अनुमानानें सिद्ध करतां येते. प्रारंभींचे दोन अध्याय गहाळ असल्यानें उपोद्घाताच्या प्रत्यक्ष पुरान्यास आपण मुकलों आहों. शेवटचा अध्याय संपवितांनाहि मागील प्रत्येक अध्यायाप्रमाणे 'एका जनार्दना'च्या नांवाव्यतिरिक्त दुसरा उल्लेख आढळत नाहीं. अर्थात् गावबाप्रमाणेंच याहि ग्रंथकर्त्यानें नाथनिष्ठेचा संकेत व परंपरा कटाक्षानें पाळलेली दिसते. पंचगंगेचा व नृसिंहसरस्वतीचा उल्लेख मात्र महत्त्वाचा ठरतो. पैठणचा उपक्रम मुक्तेश्वरास मान्य असता तर त्यानें भावार्थरामायणाच्या पूर्ततेचा निराळा खटाटोप करणेंच शक्य नव्हतें. हें काम मुक्तेश्वरानें स्वयंप्रेरणेनें व नाथनिष्ठेनें पार पाडलें किंवा मतभेद व चुरस वाटून हा नवा उपक्रम केला याबद्दल निश्चितपणें काहीं सांगतां येत नाहीं. नाथनिर्याणकाळीं मुक्तेश्वर पैठणास होते किंवा तत्पूर्वीच ते पंचगंगेच्या कांठीं रहावयास गेले हें कळण्यास मार्ग नाहीं. तथापि नाथांसंबंधीं परमावधीचा आदर असलेला त्यांचा नातू नाथनिर्याणप्रसंगीं पैठणासच असावा असे वाटतें. नाथनिर्याणानंतरच ते तेरवाडला गेले असावे. दत्तभक्त मुक्तेश्वराच्या भारतांत श्रीपादश्रीवल्लभ किंवा श्रीनृसिंहसरस्वती यांचा उल्लेख आढळत नाहीं. वृद्धपणीं तो या विभूतींच्या क्षेत्रस्थानीं राहिला असावा. नृसिंहसरस्वतीचा प्रसाद लाभून "ग्रंथ प्रतिष्ठानक्षेत्रीं नाथमंदिरांत विराजमान व्हावा" असा आदेश मिळूनही काळाच्या उदरांत तो दडून राहावा हें केवढें आश्चर्य! नाथाच्या भावार्थरामायणाबरोबर गावबाचें नांव व कृति अमर ठरून हजारो भाविकांच्या

पारायणातून गेली आणि मुक्तेश्वरांची कृति त्याच्या मूळ ठिकाणीं किंवा प्रतिष्ठानक्षेत्रीं अज्ञातच राहिली. तीनशे वर्षांनंतर मुक्तेश्वराच्या कृतीची गिचमीड व अशुद्ध नक्कल नांदेड येथें एका गळहाट्यात उपलब्ध होते हें दीर्घकालीन मंदभाग्य होय. भावार्थरामायणपूर्णतेचे दोन भिन्न उपक्रम एकाच काळात झाले असणेंहि शक्य आहे. नाथनिर्याणाचा व ग्रंथपूर्णतेचा प्रसंग व प्रश्न ताजा असतांनाच गावबा आणि मुक्तेश्वर या दोघांच्या भिन्न कृती निर्माण झाल्या असाव्या हें उघड आहे. औचित्य निघून गेल्यानंतर असा उपक्रम वस्तुस्थितीस धरून वाटत नाहीं. सुंदरकांडाच्या शेवटीं प्रतलेखकाने जो काल दिला आहे तिच्यावरून ही नकललेली प्रत २५० वर्षांहूनहि जुनी असावी हें सिद्ध होते. अर्थात् उत्तरकांड रचनेचा प्रसंग मुक्तेश्वरापर्यंत पोहोंचण्यास कांहीं हरकत दिसत नाहीं. हें उत्तरकांड मुक्तेश्वराचेच असावें याचें महत्त्वाचे गमक म्हणजे याची भाषा हें होय. याचा कर्ता मुक्तेश्वर ठरला तर पंचगंगा व नृसिंहसरस्वतीचा आदेश याचें महत्त्व पटेल. म्हणून हे कर्तृत्व ठरविण्याचे मुख्य प्रमाण भाषा हें होय. मुक्तेश्वराच्या वाणीचे व प्रतिभेचे बहुतेक गुण सदरी उत्तरकांडांत आपणास पदोपदीं सापडतील.

आरंभीं सांगितल्याप्रमाणें या उत्तरकांडाचे १७ अध्याय असून तीन ते १७ असे १५ अध्यायच आज उपलब्ध झाले आहेत. अध्यायवार विषय व ओव्या खालीलप्रमाणें आहेत :—

| अध्याय | ओव्या | विषय |
|---|---|---|
| ३ | १६७ | कुबेर निबर्हेण नाम त्रितियप्रसंगः |
| ४ | १४१ | इतिश्री....रावण....(फाटलेला भाग) |
| ५ | १४३ | रावण मानहरनो नाम पंचम प्रसंगः |
| ६ | १२९ | रावण इंद्रजयो नाम शष्टम प्रसंगः |
| ७ | ९० | सुग्रीव बिभिषण किस्किंधा लंकागमनो नाम सप्तम प्रसंगः |
| ८ | १६८ | सीतापरित्यागो नाम अष्टम प्रसंगः |
| ९ | १७४ | श्वानउद्धरणो नाम नवमः प्रसंगः |
| १० | १४६ | कुशलवजनन लवणहननो दशम प्रसंगः |

| अध्याय | ओव्या | विषय |
|---|---|---|
| ११ | १५६ | दंडकारण्योपाख्यान येकादश प्रसंगः |
| १२ | १४१ | लवनिग्रहणो नाम द्वादश प्रसंगः |
| १३ | १७० | सौमित्र पराभवो नाम त्रयोदश प्रसंगः |
| १४ | १२० | रामविजयो नाम चतुर्दश प्रसंगः |
| १५ | १९४ | सीता पातालप्रवेशो नाम पंचदशप्रसंगः |
| १६ | १२५ | लक्ष्मणनिर्वाणो नाम षोडष प्रसंगः |
| १७ | २०४ | राम निजधामगमनो नाम सप्तदश प्रसंगः |

एकूण २६६८ ओव्या

गहाळ झालेल्या पहिल्या दोन अध्यायांची ओवीसंख्या प्रत्येकीं १५० याप्रमाणें ३०० धरली तर हें उत्तरकांड अडीचहजार ओव्याचें असावें असे दिसतें. इतर कांडांप्रमाणें या उत्तरकांडांत मूळ संस्कृत श्लोक व त्याखालील टीका असा क्रम आढळत नाहीं. ओव्याहि एकनाथाप्रमाणे चार चरणी यमकाच्या नसून मुक्तेश्वरी ३॥ चरणी आहेत. मुक्तेश्वराच्या भारतांत जसे मूळ संस्कृत श्लोक नाहींत तसेच यांतहि आढळत नाहींत हे लक्षांत ठेवण्यासारखें आहे. वाल्मिकी उत्तरकांडांतील कथाभाग कधीं संक्षिप्त तर कधीं विस्तार करून चातुर्याने गोविला आहे. अध्यायाच्या शेवटीं दिलेल्या विषयाहून किती तरी महत्त्वाचे दुसरे प्रसंग त्या त्या अध्यायांत नमूद आहेत. विषय पुष्कळ आणि अध्याय-संख्या केवळ १७ अर्थात् अध्यायाच्या नामकरणानें विषय व प्रसंगाची कल्पना येत नाहीं. मुक्तेश्वरी रचनेचें वैशिष्ट्य व साम्य पाहण्यासाठीं प्रस्तुत उत्तरकाडातील कांहीं उतारे आपण पाहूं. त्यावरून याचा कर्ता मुक्तेश्वरच किंवा इतर कोणी दुसरा याचा निर्णय रसिक आपोआपच ठरवतील. तिसऱ्या अध्यायाचीं पाने कुरतडली गेलीं असल्यानें चवथ्या अध्यायापासून पुढें काहीं प्रसंग आपण पाहू.

× × ×

१. रावण पुष्पक विमानांत बसून त्रैलोक्यविजयासाठीं बाहेर पडला. सहस्रार्जुनाच्या माहिष्मति राजधानीस आला. आता हें वर्णन पहा —

**रावण म्हणे माझिये सरी । दुजा नुपजे पृथ्वीवरि । बाहू पिटोनी**

पुढारीं । वाट धरी महिजेया ॥८८॥ विमानी लोटुनी शार्वरी । प्रातः-
कालाचे अवसरी । माहिस्मति नाम नगरी । रेणातिरी प्रसिद्ध ॥८९॥
तेथ राजा सहस्त्रार्जुन । सहस्त्रा कराचा भुतलमान । ज्याच्या द्दष्टी
झुंजार आन । लोकत्रई जाण असेना ॥९०॥ विशाल नर्मदेचें पुलिन ।
बाणलिंग सुंदर गहण । विमानि उतरोनि रावण । केलें स्नान विधियुक्त
॥९१॥ नित्यनेम सारूनि वोजा । रत्नसिंहासनी गिरिजा । सहशंभु
केली पूजा । आपुलिया कार्याकारणे ॥९२॥ अष्टदिशीं अष्टरत्नदीप ।
दाविति चंद्रसुर्याची वोप । मंगल वाद्यें हो अमुप । रक्षोगणी साक्षेपें
वाहिली ॥९३॥ जांबुनद सुवर्णलिंग । तळी पटकुळे चांग । मंडपी
जोडिले पद्मराग । सुरंग रंगें झळकति ॥९४॥ न्यास ध्यानादि विधियुक्ति
रुद्रमंत्राच्या आवृत्ति । अकरा वेळा उमापति । श्रृंगोदके अभिशेचिला
॥९५॥ शुद्धोदके स्नान आचमन । धुवट वस्त्रे परिधान । त्यावरी लोपिले
बावन । हरिचंदन मलयज ॥ ९९ ॥ कुंकुम चंदन कस्तुरिका । कर्पुरांग
जवादि बुका । लोपुनिया गिरिनायेका । पंचधान्यें अनेक अर्पिली ॥९७॥
लक्ष बेलाचीं सुपत्रें । चंपक मल्लिका शतपत्रें । निलोत्पलें अतिपवित्रें ।
रातोत्पलें समस्त वाहिली ॥ ९८ ॥ अर्पिला दिव्य परिमल धुप । लक्ष-
वाती पात्री प्रदीप । अमृत फुलाचा अमुप । महा नैवेद्य अर्पिला ॥९९॥
तांबोल अर्पूनिया हातीं । प्रदक्षणा सहस्त्रवर्ति । संख्या लक्ष दंडाकृति
दंडवत निस्छित घातली ॥ १०० ॥ तया अंतरी सरिताजली । सहस्त्र
कामिणीच्या मेली । कार्तवीर्य जलकल्लोळी । जलक्रीडा खेळतु ॥१०२
रक्षणें ठेविली चहूद्वारीं । महावीर शस्त्रधारी । वारा पक्षी हालता दुरी ।
विंधोनी करी पाडती ॥ १०३ ॥ जल रोधीतां सहस्त्र करी । ते फुगोनी
चालिले वरी । रावणलिंगाचें सिरी । लोट आला अद्‌भुत हो ॥१०४॥

० ० ०

रावण व कार्तवीर्याचें युद्ध :—

कालावरी महाकालु । कीं मेरुवरी विंध्याचलु । ऐरावति विशालु
सुप्रतिकु ज्यापरी ॥ ११७॥ महोदधीसी रत्नाकरू । तिमिंगलावरी
महामकरू । कार्तवीर्य दशासिरू । तेवि झुंजारी मिसळले ॥ ११८॥ सह-
स्त्रवेळा परस्परी । घाये साहिले उभय करि । यावरी वज्रलाता उरावरी
कार्तवीर्ये ताडिला ॥ ११९ ॥ बळि बांधेला मधुसूदनें । तेवि रावण

सहस्त्रार्जुने । बांधोनि आनिला द्वो नयेने । ऋषिदेवादेखता ॥१२३॥ मुगुट पाडुनी भूमिसी । लोंबत झोंबत मुक्तकेशी । नेता दशा प्रता ऐसी । दृष्टी भासे जणाते ॥ १२५ ॥

० ० ०

३. पराजित रावणास पुलस्ति ऋषि म्हणतात —

ईश्वरें दिधली संपत्ति । विवेकें भोगिजे बुद्धिवंती । मदे मातला अनर्थी । ईश्वरें दिधली संपत्ति । विवेके भोगिजे बुद्धिवंती । मदे मातला अनर्थी । ईश्वर घाली निर्धारे ॥ ३४ ॥ पौलस्ति म्हणे गा रावणा । बोलिले ते बोधिले मना । बुद्धि सांगतो सुजना । गुरुस्वरूपीं मानावा ॥३५ भुतमात्रे जनेदि खेद्रु । न किजे विष्णुसी विरोधु । परनिंदेचे पापशब्दु । जिव्हे स्पर्शो न द्यावे ॥ ३७ ॥ दया धर्मि ठेविजे बुद्धि । गर्वे न पडिजे उन्मादि । तरि धृवा ऐसे अढळपदीं । अनंत काळे सुख भोगा ॥ ३८ ॥ आम्हा वडिलाचा उपदेशु । मानाल धरुनी दृढ विस्वासु । तरी हृषिकेश व्योमकेशु कृपेने तुम्हा रक्षवी ॥

० ० ०

४. पांचव्या अध्यायारंभीं ईश्वरीलीलेच हे वर्णन पहा :-

ईश्वर नृपाचें भांडार । हें ब्रह्मांड विस्तार ॥ माजी रत्ने मनोहर । नानाविध देखजेति ॥१॥ एकाहुनि येक अधिक ॥ तुम्हा ऐसि अमोलिक । जे तेजागळी गुणाधिक । पुण्ये जोडती सभाग्या ॥२॥ विशाल पृथ्वीचा पालडा ॥ धातला महामेरुचा धडा । तरी मोला नये पाडा । नाहीं गाढा आहिकु ॥ ३ ॥ विस्मयो करावया पुरा । कारण नाहीं महेश्वरा ॥ नानारत्ना वसुंधरा ॥ बोलती यथार्थ ॥४॥ हें नवल मानावया । ठाव न दिसे रामराया ॥ महाविष्णूची अगाध महिमा ॥ काय कोठे कळेना ॥५॥ त्रैलोक्य पीडकु बलिस्ट ॥ गर्वे रावण अतिवरिस्ट । कार्तवीर्ये केला भ्रस्ट । अर्धक्षण न लागता ॥६॥ त्याचे आंगीचे पिशाचवारे ॥ झाडिले ब्राह्मणाचे कुमरे ॥ तेहि रूप तुझेच खरे ॥ निजनिर्धारे श्रीरामा ॥

० ० ०

५. वालीरावण झटापट :— रावण उतरोनि भुतली । त्वरे पातला वालीजवळी । घिस भुजाचे महाजाळी । इच्छि कवलु कपिते ॥२०॥ येरे

**पसरोनि वामहस्तु । मेडुकप्राय लंकानाथु । कवळुनि घातला कक्षे आतु ॥ जो काळाते सुटेना ॥२१॥ उपजता अजेचें लघुबाल । काखे धरी अजापाल । चलवली परी तया बल । सुटावया असेना ॥२२॥ रावण घालिता कक्षापुस्टी । राक्षस पळती बाराबाटी । व्याघ्र झोंबलिया हरणाकंठी ॥ मृग पळति दशदिशा ॥२३॥ व्यसनी पडलिया यजमान । पळति आश्रित ब्राह्मण । तेवि सापडता दशानन । रक्षोगण पळाले॥२४॥**

६. पुलस्तीचा रावणास पुनश्च उपदेशः–**म्हणे शंकरकृपा कामधेनु । अवचट लाधलि चुकोनु । सत्त्वगुणाचे मेळवणु । दाऊनि दोहन करावे ॥३६॥ शंकरवर तो रस उत्तमु । सत्क्रियेचा पंथ नेमु । भंगो नेदिजे तरी मोक्षधर्मु । आरोग्य लाहिजे हो ॥३७॥ प्राप्त झालिया चिंतामणी । बैसोनी नौकायानी । हाते झेलुनी सिंधू जीवनी । पाडूनिया बोळविला ॥३८॥ तैसे केलिया रावणें । सिक्षेने दीक्षा नाही घेने । आमुच्या उपदेशाची वचने । व्यर्थ गेली सर्वहि ॥३९॥**

७. रावणाने यमावर आक्रमण केलें. वातावरणात व्याधींचें सैन्य यमाकडून आलें. औषधि, घृत, रस, चूर्ण, मात्रा व मंत्र यांची माहिती दिली आहे. त्यात 'फिरंगी' हा एक रोग सांगितला आहे :– **उठली फिरंगियाची कटकें । आधीं झडपुनि नेती नाके । लिंग वृषण मग हस्तकें । धड तोडुनी टाकिती ॥४९॥** महारोगासारखी ही व्याधि परदेशातून आली असावी असें वाटतें.

८. रावणानें स्वर्गावर स्वारी केली. कैलासवनांतील वसंतऋतु पहा :– **वना पातला वसंतकालु । नाना पुष्पांचा परिमळु । घेऊनिया मंदानिळु । वासु आला घ्राणाते ॥ शोडष कळी विराजमानु । उगवला कुमुद्वतिचा रमनु । पुत्र देखोनि सुखसंपन्नु । भरिते दाटे समुद्री ॥७८॥ वराति करूनिया वदनें । चकोर करिती अमृतपाने । चक्रवाक सखेद मने । प्रिये वियोगे तळमळीति ॥८०॥ सोमकांताच्या पर्वता । सितळ जळें वाहिती सरिता । तेथे विलासियाच्या वनिता । विरहताःपा सांतविती ॥ महुरे महुरले अमृविटप । कोकिळा करिती पंचम आलाप । मलयानिळ निरविता ताप । चंदनवना झगडोनि ॥ कैरवणि वरि झुंकारे । भ्रमर गाति मधुर स्वरें । पद्मिनी त्यागिले दिनकरे । लाजा वदन झांकिती ॥ चंपक कर्पुर केतकी केळीं । शतपत्र जाति पडळा बकुळी । मदन कव–**

णाचे अनळी । वसंतपुजा कवणाते ॥८४॥ मयुर राजहंस कपोते । कस्तुरिमृग क्रीडती तेथे । जवादि माजरे अंगाते । स्पर्शे परिमळ चर्चिती ॥८५॥

९. सातव्या अध्यायांतील हें सूर्यास्तवर्णन बघा:—

यावरी पश्चिम दिशेच्या घरा । आवंतणें पातले दिनकरा । घेउनी पंक्ति किरण पंक्तिकारा । समुद्रस्नाना उतरला ॥ ५२ ॥ उभा राहोनी अस्ताचळी । सागरी दिधली बुटकुळी । वरुण दिसेच्या राउळीं । सुख भोजना बैसला ॥५३॥ जेविता येती पारिखे लोक ॥ म्हणोनी तमाची जवनिक । संध्याराग निजसेवक । आड बांधे हस्तकी ॥५४॥ रक्षावया ब्रह्मांड घर । मागें ठेविले तारका चंद्र । अरुणोदयाचा विकार । सूर्यागमन सूचवीती ॥५५॥ चकोर म्हणती न ढळों शशीं । कोंके पाचारिती सूर्याशी । कुमोदे हास पद्माशी ॥ म्लान वदन देखोनी ॥५६॥ पद्मिणी बोले कुमुदिनीशी । कासया उतावेळा होसी । अवद्से सरिसी । उसणें देसी प्रभाते ॥५७॥ असो हें अड ताळ बोलणें । वेताळकि वंदीजन । स्तवनवाद्यें गायन । जागविती प्रभूतें ॥५८॥

० ० ०

१० श्रीरामसीतेची अशोकवनक्रीडा :—

हातीं धरूनी लावण्यखाणी । श्रीराम प्रवेशे अशोक वनीं । मंदार पारिजात श्रेणी । कल्पवृक्ष साजिरे ॥१॥ आम्र निंबू कपीथ बेल । क्षीर बोरि खर्जुरी रसाळ । कनकजंबू सदाफळ । नारिंगी त्या सदाफळा ॥२॥ दाट लागल्या नारीकेळी । अंजीर लवले सुपक्क फळी ॥ मघमघींत सुपरिमळी रायकेळीं फळभारे ॥ शर्कराद्राक्षी मंडपातळी । रसपाट लोटले खळाळी । तेथें नाना विहंगम कुळीं । स्वानंदी सकळी नाचिजे ॥४॥ कल्पलतिका लवंग लतिका ॥ अमृतवळी सुवर्ण लतिका ॥ कर्पुर वली नागलतिका । सुवर्ण वर्णे शोभती ॥५॥ विचित्र रत्नाचिया वेदिका । नीळमणीच्या जळवापिका । तेथें हंसकारंडका । चक्रवाका सुखवस्ती ॥ ६ ॥ श्रीराम जनक सीता जननी । वृक्ष प्रत्यक्ष लागती चरणी ॥ पक्क फळांचिया श्रेणी । शाखीं हस्ते वोपिती ॥७॥

११ श्रीरामाचें जानकीसौंदर्यवर्णन :-

प्रितीनें बोले वल्लभे प्रती । लाजोनी तुझिये दंतपंक्ति । दाळिंबे उलली ते भासती । बीजरत्ने सुढाळे ॥१४॥ पहावया तुझे चारु नयन । पातले हरिणी आणि हरण । गुण हारी वसऊनी वन । तपश्चर्या आचरती ॥१५॥ मध्यरचना अतिसाजरी । देखोनि लाजले वन केसरी। निघोनिया वनगिव्हरी । ते हि करिती तपाते ॥१६॥ मध्य पहावेयाची आशा । जडले मेखळेचिया ठसा । प्रसन्न करावया महेशा । वाहनझाले दुर्गेचे । ॥१७॥ लाजोनि तुझिया गौर वर्णी । खेद केकती गर्भपर्णी । रक्त पदरीं झाकुनी वदनी । धुळि धूसर उधळिले ॥१८॥ अंगकांतीस उपमा अपुरी । म्हणूनी चंपक वळिले भ्रमरी । गुणवर्णना अहोरात्री । पद्मिणींतें सांगती ॥ १९ ॥ अवलोकितां तुझें वदन । शकले हो अमृतकीर्णे । नित्य काळजी वाहे मन । तोच काळ बोलिजे ॥ २० ॥ अधर सुरंग आणि कोमळ । देखता बिंब रातोत्पळ । खेद वावोनी प्रबळ । अति कठीण तयावेळीं ॥२०॥ युद्धी देवाचेनि घाते । दैत्य मारिती त्या अमृताते । वांचवावया मुख-चंद्राते । पीयुष भीक्षा याचितु ॥२२॥ तोच मुक्ताफळ दैत्यगुरु । तुझें नासिकीं मनोहरु। निकट मदनाचा कुमरु। माणिकरूपे तव भ्राता ॥२३॥ श्वासोश्वास सुगंध थारू। लाजोनी वसंत कुसुमाकरू। दाहा मासा मग पामरु । मुख दाखवी आपुले ॥ २३ ॥

० ० ०

१२. श्रीरामचंद्राची सभा :-

छप्पन देशींचे राजेश्वर । शहाण्णव कुळींचे राजकुमर । मंडळीक सेनाधर । नमस्कारा पातले ॥ ५८ ॥ भाळे स्पर्शोनिया क्षिति । उभे ठेले जोडल्या हस्ति । भाट नागरी वर्णिती । वाड प्रताप पवाड ॥५९॥ पहिले वर्णिती चौघेजण । साही दाविती अर्थज्ञान। अठरा करिती गुणकीर्तन। तऱ्ही स्तवन सरेना ॥ ६० ॥ चौघे म्हणती नेति नेती । साही साधिती सिद्धांत युक्ति । नामरूपादि गुणकीर्ति पडली गुंती। अठराते ॥६१॥ टाळ मृदंग सुताळ ध्वनी । पूर्वे नाचती नाचणी । उत्तरे गंधर्वाची गाणी । तंतु वितंतु सुस्वरें ॥६२॥ दक्षिणे नटवे शंकर-गण । गणेश मुख्य षडानन । शंकर गुणाचे कीर्तन । रागानंद परिसावी ॥६३॥ निकटवर्ति ऋषिपंक्ति । शास्त्रचर्चा करिती बहुति । पूर्वपक्षावरी सिद्धांती । करिता नव्हे निश्चयो ॥ ६४ ॥ गौतम जैमिनी याज्ञवल्की।

पातंजल कपिलादि शाब्दिकी । युक्ति चालूनि अनेकी । स्वस्वपक्षा साधिती ॥६५॥ दशावधानी श्रीरामचंद्र । सकळकळी पूर्णभद्र । सर्वहितोच महासमुद्र । संतोषवी सर्वांते ॥ ६६।८

१३. सीतेस वनात सोडून जातांना लक्ष्मणाची वनस्थांना विनंतिः—

नमन करूनिया वृक्षी । म्हणे उपकार जन्मला तुमचे कुशी । हे जानकी मृगाक्षी । स्नेहभावें अहोरात्र रक्षावी ॥ ५७ ॥ निरवितसे पक्षियाते । प्रतिपाळिले शकुंतलेते । तैसेच माझिये सीतेते । संरक्षावे समस्ती ॥ ५८ ॥ विनती श्वापदगणा । तुम्ही रक्षावी मृगलोचना । पाववाया विष्णुसदना । हाच उपाय तुमते ॥ ५९ ॥ नमस्कारी सहस्रकीर्णा । म्हणे वडिली करावी करूणा । तुझी वंशज कुळांगना । वनसंकटी संरक्षी ॥ ६० ॥ भाळी वंदुनी वसुमती । म्हणे तुझी कन्या तुझे हाती । दिधली असे;तां प्रिती । परम स्नेहें पाळावी॥६१॥

१४. रामचंद्राचें अगस्तिआश्रमात आगमन.—

उमावनी नंदवनी । जे वृक्ष वसति पाताळ भुवनी । ते तरूवर अगस्तीच्या काननी । सदाफळी फळले असे ॥ ७० ॥ तेथ सरोवर महाविशाळ । दुग्धरसा सारखे जळ । सुवर्ण कमलाचा परिमळ । दाहींदिश्या कोंदल्या ॥ ७१ ॥ तेथ हंस कारंडक । चकोर चातयुत चक्रवाक । क्रीडा करिती अनेक । शुंडा कमळें कवळिती ॥ ७२ ॥ तूं विश्वात्मा विश्वभरू । जगदात्मा जगद्गुरु । तूं आमुचा अनर्घ्य तारू । आजी थडिये लागला ॥ ७४ ॥

१५. लव बंधन पावला हें ऐकून कुशाचा संताप :—

ऐसे ऐकता तात्काल । कोपें जाला प्रलयानल । म्हणे जाळीण ब्रह्मांड गोल । अयोध्येसवे ये काळी ॥ ३३ ॥ बाळकें दाविता पुरुषार्थ । संतोषोनि द्यावें उचिता । शस्त्रें ताडुनिया नेता । करूणा नये कटकाते ॥ ३४ ॥ या दोषाचे प्रायश्चित । भोगविन श्रीरामसहित । तरिच जानकीचा सुत । सूर्यवंशीक्षेत्रीया ॥३५॥ जानकी म्हणे वेल्हाळा । भुकेला आलासी सेवी फळा । म्हणे क्षुधिता धरुनी नेलिया बाळा । फळ आहारा न करी ॥३६॥ दंडूनिया वैरियाते । सोडून आणिल बंधूतें । तिघे बैसोन सांगाते । अमृतफल आरोगू ॥ ३७॥ तूणीर बांधोनिया पुस्टी । कनक धनुष्ये संजिले मुस्टी । चरण वंदिले ललाटी । जानकीचे सद्भावे ॥ ३८ ॥

१६ लवाचा हा पराक्रम बघा :—

आश्चर्य करी शत्रुघ्नवीर । म्हणे कोपुनि प्रळया रुद्र । बाळवेशें हा संव्हार । करावया पातला॥२३॥ वज्रे भंगिजेति पर्वत । तेवि कुंजर मदोन्मत्त । बाणी त्रासिले न धरत । सैरावैरा धावती ॥२४॥ बाणी तुटले शुंडादंड । विखंड खंड झाले दंत । कुंभ फुटोन वाहे रक्त । गायमुखा सारिखे ॥२५॥ प्रळय वाताच्या झडाडे । समुळ उमळति झाडें । तेवि राउत आणि घोडे । रणीं पाडिले अपार ॥२६॥ महामेघाचिया झडी । गृहे खचोनी पडती गाढी । तेवि रथाचिया कोडी । खंड विखंड पडलिया ॥२७॥ शेत सांवगी कृशीवळ । तेवि पडले पायदळ । व्यःपुनिया रणमंडळ । सिर कणसें पसरलीं ॥२८॥

१७ शत्रुघ्न मूर्छित झाल्यावर लक्ष्मण युद्धासाठीं निघाला :-

आज्ञा होता तात्काळिक । निघता झाला पुर्णा नायक । जैसा प्रळयीचा पावक । क्षोभे विश्व भक्षावया ॥ असंख्य चतुरंग सेना । जे न क्षवे सहस्त्रनयना । सप्तसमुद्रींच्या जीवना । लोटल्या कोण आवरी ॥५७॥ बळे लोटिता ऐरावता । मेरु हृदयी ताडिती दंता । शुंडा झेलुनी पर्वता । सुर्यमंडळा ताडिती ॥५९॥ ऐसीया कुंजराचिया चळथा । पुढें चालिल्या रहिता । अंकुश धरा महावंता । हांव आगळी झुंजाची ॥६० घंटा घागरिया नेपुरें । माथा उधळाति सेंदुरें । सुवर्ण तगटी पताका चिरे । देखोनि विजु चंवकति ॥६१॥ इंद्रकोप वर्णांजुळी । सुवर्णपात्री सखोल घेळी । येका येका पुढे वोळी । अष्टादशा सेवक चालती ॥६२॥ लोहशास्त्री खिळिले दंत । सुवर्ण बंदि रत्नखचित । कर्णी चामरें सुशोभित । श्वेत कृष्ण बहुरंगी ॥६३॥ ऐरावत पुंडरिक । वामन कुमेदो जन देख । पुष्पदंत सार्वभोम सप्तक । सुभप्रतिक आठवा ॥६४॥ अष्टादिगजी धरीली क्षिति । ऐसे बोलिजे ग्रंथ कीर्ती । ना ते पराभऊनी शक्ति । आठहि दिशा पळविले ॥६५ शुंडा घालुनि घनमंडळीं । हस्ती वोढुनि पाडिले तळी । दानोदकाचे जळी । नाना धान्ये निपजती ॥६६ गर्जना नव्हे ते करिती स्तुति । म्हणती सरली जळसंपत्ती । आड करुनी चित्रा स्वाती । वरुशे येक लपाले ॥६७॥ असो ऐसे कुंजरभार । पुढे चालिले शतसहस्त्र । वायुवेगी अश्वस्वार । महा झुंजार ब्रिदांचे ॥ ६८

१८ कुशाचें लक्ष्मणास उत्तर :-

सौमित्र म्हणे रे बाळका । सोडी वारु अमोलिका । तुझी माता पावे शोका । ऐसे न करी शाहानिया ॥४१॥ कुश म्हणे गेलिया प्राण ।

प्रेते मारिता प्रयास कोण । तुझे पापे रघुनंदन । यशकीर्ति नागवला ॥४२॥ वनीं त्यागिता जनकबाळा । अवलक्ष्मीने घातली माळा । आता नव्हे रे निकुंबळा । मागील शक्राजिताची ॥४३॥ पारू म्हणता पंचवटी । पळसी मृगाचे पाठीं । मर्कटाचेनि बळे सृष्टी । यश मिरवा वाउगे ॥४४ अतिकाया रावण कुमरु । तो मी नव्हे निशाचरु । वाल्मीक ऋषींचा किंकरू । धनुर्धर कुशनामा ॥ ४५ ॥ वनीं सांडिता विजयलक्ष्मी । तेंव्हाच दरिद्र जोडिले तुम्ही । अपजयो पावाल संग्रामी । चौघे बंधु निर्धारे ॥४६॥

१९ लक्ष्मणाशीं रामपुत्रांचें युद्ध :—

सुमित्रे अवलंबोनि कोप । प्रगट केले शेषरूप । सहस्र मुगुटावरी दीप । सहस्रमणि झळकती ॥१४९॥ जानकी पुत्रे सहस्रबाणी । सहस्र किरीट पाडिले धरणी । गगणमार्गे उसळले मणि । नक्षत्रगणासारखे ॥ ५० ॥ मुखो जपोनी अग्निमंत्र । धनुष्यी जोडिले पावकास्त्र । रणी माजला हो अग्निहोत्र । प्रळयानळासारिखा ॥५१॥ कबळी पितळे महा-ज्वाळ । रथ सारथी अश्व सबळ । भस्म जालिया सौमित्रबाळ । आनिके रथी आरूढला ॥५४॥ उर्ध्व कवच धनुश । बाण तुणीर खर्ग घोश । सौमित्र म्हणे हा हुताश । शांत होय कैसेनी ॥५३॥ सेनावणी माजला वनवा । वडवानळ उदकार्णवा । सौमित्रे स्मरूनी राघवा । वरु-णास्त्र प्रेरिले ॥५४॥ गगनी माजला महाघण । शांत जाला हुताशन । कुशें स्मरोनिया पवन । वायोस्त्र प्रेरिले ॥५५॥ प्रळय वाताचेनि झडाडे । गगनी भोंवती हस्ती घोडे । शुष्कपर्णाचेनि पाडे । रथ पादांति भ्रमति ॥५६॥ पावकास्त्र सोडी शेष । वज्रास्त्रातें मोकली कुश । सौमित्र म्हणे येथें यश । साध्यता मार्ग दिसेना ॥ ५७ ॥ अस्त्रें कुशल जानकी पुत्र । बाण योजिलें नादास्त्र । तेणे भुलला सौमित्र । देहस्मृति विसरला ॥५८ ब्रह्मांडघटी भरला नादू । तेणे फणिपाळ पावला वेधू । देहभावी जाला मंदू । धनुष्यबाण गळाले ॥ ५९ ॥ नाद सरे भुले सर्प । तेवी भुलला भुजंग भूपू । नेत्री लाऊनी सत्कृपू । सहस्र मोळी-डोलवी ॥६३ कुंडलोत्कार करूनी गात्रें । रणी पहुडला हो सौमित्र । जैसे गुंडाळिले सूत्र । चक्राकार ज्यापरी ॥ ६४ ॥ ते वेळी जाला हाहाकार । म्हणती पडला मुख्य धुरु । सूर्यवंशीचा शृंगारु । दीक्षा गुरु क्षत्रिया ॥६७॥

२० भरतास कुश म्हणतो :—

**कुश म्हणे 'भरथराया। नमन कीजे तुझिया पाया। वोवाळुनी सांडिजे काया। तुजवरूनी वाटतसे ॥२५॥ पित्याने वोपिली असता मही। कांक्षा न धरिसी कांहीं। निराहारी तापसदेहि। चौदा वरुषे त्यां नेमे ॥२७॥** परंतु इतर वीरांची हजेरी व सुग्रीवादिकांस हा आहेर बघा, **म्हणे कपिकुळा अधमा। बंधुघाती प्लवंगमा। बंधुपत्नी भोगिता कर्मा। पापशंका तुज नाहीं ॥३३॥ तुझेनि संगे पापपुरुषा। कलंक लागला सूर्यवंशा। अधर्म घाती राम ऐसा। शब्द उरला बहुयुगी ॥३४॥ अंगदें मारूनिया हांक। बळे लोटिला सन्मुख। देखोनिया नरनायक। म्हणे हे नव्हे शिष्टाई ॥४०॥ सभामंडप नव्हे निरुता। बाणमंडप हा तत्वता। याते स्पर्शता माथा। रणसमुद्री हारणे ॥ अरेरे जांबुवंता वृद्धा। होई परता बुद्धिमंदा। भंगोनिया द्वितिये पादा। पंगु करिण निर्धारे ॥४२॥ कुश म्हणे हनुमंता। मौन्य धरूनि राहे परता'।** कारण काय ? तर **मजहुनी अधिक कोटिगुणी। तुझा मोह वाहे जननी। हे वर्म जाणोनिया मनी। हात माझे न चालती ॥४७॥**

२१ भारताप्रमाणे इतर टीकाकाराच्या वाल्मिकीविरुद्ध लिखाणाचा उल्लेख येथेंहि आला आहे, **कुशाचिये तीक्ष्ण बाणी। श्रीराम मूर्छित पडला रणी। ऐसे बोलिला जयमुनी (जैमिनी)। तें मी नाहीं बोलिलो ॥८५॥**

२२ अश्वमेधासाठीं कुणाकुणाला बोलवावयाचे तें पहा :—

**श्रीराम म्हणे अगा भरथा। मूळ धाडी सकळ आप्ता। लंकेहूनी लंकानाथा। परिवारेसी आनावे ॥ १ ॥ तेहि मजलागी वेचिले प्राण। सुग्रीव सखे वानरगण। त्याते देउनी अमान। येकायेका आनावे ॥ २ ॥ जनकराया युद्धजीतू। प्रतर्दन कासीनाथू। कौसल्या राजा परम आप्तु। वहिले येथ पाचारा ॥ ३ ॥ छप्पन देशिचे राजेश्वर। शहण्णव कुळीचे राजकुमर। सूर्यवंशाचे द्विजवर। यज्ञकार्यार्थ आनावे ॥४॥ कन्याकुब्जाते भुक्त। कामरुपी उत्कलस्छ। पंचगौड हे समस्त। यज्ञकार्यार्थ आनावे ॥ ५ ॥ गुर्जर मऱ्हाट प्रबल। कर्नाटक अंध्र मल्या (ल्या) ळ। पंच द्रवीड धर्मशील। दक्षनाईत पाचारा ॥ ६ ॥ बदरीवनी द्वारकावनी कामीकवनी अद्वैतवनी। तपोवनी कर्दलीवनी। वसती ते ते आनावे ॥७॥ दंडकारण्य निमिशारण्यी। धर्मारण्यी वेदारण्यी। कर्मारण्यी ब्रह्मारण्यी।**

**वसती ते ते पाचारा ॥ यमुना गोदावरी । सरस्वती शोणभद्रा परिसरी । शरयुतिरि मानस सरी । वसती तेहि पाचारा ॥९॥ ताम्रपर्णि पुण्य-कावेरी । तुंगभद्रा मलापहारी ॥ कृष्णावेणी भीमातीरी । वसती ते ते पाचारा ॥ १० ॥ गोदातापी पयस्विनी । नर्मदातीरी स्नानपाणी । क्षीप्रा-चर्मण्वति जीवनी । वासकर्ते पाचारा ॥११॥ निवृत्ति श्रीशैल्य गोकर्णी। सेतुविरूपाक्ष प्रयागस्थानी । भास्करक्षेत्री वसते मुनी । परम आदरे आनावे ॥ १२ ॥ कृष्णागरु चंदनकाष्ठी । विशाल शाल तरु तळवटी । सुवर्ण रजताचिये तलवटी । चित्रविचित्र शृंधारा ॥ १८ ॥ येके कांचाची वोतिवें । हरिताल हिंगुले चित्रावे । तळवटी उपरि भाग बरवे । प्रवाल सीली उभारा ॥ १९ ॥**

२३. श्रीरामनिर्याणाच्या वेळीं सर्व अयोध्या विमानात बसली परंतु मत, पंथ, जाती व सामाजिक उच्चनीचतेच्या कल्पना लोकानीं तेव्हांहि सोडल्या नाहींत. पहा हा वैकुंठगमनाचा थाटः—

**विमानी होउनिया दाटी । परस्परें कलहो उठी । सबळ निर्बळाते लोटी । ऐसी गोस्टी न व्हावी ॥१३॥ जेवी वाराणसीच्या पंथी । स्थळा कारणे कलहो करिती । हात पायें मस्तक फोडिति । सुखी वस्ती क्षणमात्रे ॥३१॥ दुती आज्ञा वंदुनी मौळे । सुविस्तीर्ण वोपिले स्थळे । तऱ्ही कर्म संस्कार बळे । अविद्या धर्म न वचति ॥ ३२ ॥ अग्निहोत्री आचारशीळ । विमानी मागती सोवळस्थळ । आम्ही मेलियाहि विटाळ । अग्नीचाहि मानीत असो ॥ ३३ ॥ वज्रसोवळी अमुची माता । चतुर्थ दिवसीं नातळे भर्ता । ईश्वरे तोषुनी तिचिया चित्ता फळे स्वभावे दीधली ॥३४॥ विमानीं बैसता क्षुद्रजाती । आम्ही उडी घालुनि क्षिति । नलगे वैकुंठाची वसती । ग्रामवस्ती सांभाळू ॥३५॥ सावनी म्हणती आमुते भिन्न । नेमुनि दिधले पाहिजे स्थान । जतन जाले पाहिजे धन । झणे चोरून जन नेती ॥ ३६ ॥ वही घेऊनिया हाती । विमानी उधार मागती । अंगिकारिलीया रघुपती । आण घालिती आग्रहो ॥ ३७॥ वैष्णव म्हणती आलिया शैव । आम्ही- ने येऊं जी राघवा । शैव म्हणती या वैष्णवा । दवडून बैसवा आम्हासी ॥ ३८॥ श्रीपाद म्हणती नारायेण । विमानी बैसता वैस्याजन । विष्णुलोका आमुचे गमन । न घडे ऐसे दिसताहे ॥ ४० ॥ वैस्ये म्हणती श्रीपाद-स्वामी । नारायण स्वरुप तुम्ही । भुनीं भेद भासता अम्ही । प्राप्ती**

**केची स्वामीया ॥ ४१ ॥ पंडित म्हणती स्वमुर्ख । शास्त्रहीन गोसावी लोक । ते म्हणती हे बहिर्मुख । आत्मानुभव या नाही ॥ ४२ ॥ कोरडी शद्बाची ठण ठण । येकनिस्ठी नाही मन । अवघ्या आधी याते पतन । आम्ही पावन हरिनामे ॥ ५० ॥**

२४ शेवटीं स्वर्गांत पोंचल्यावर :-

**वैकुंठ पेठ नगर बाह्यप्रदेशी । सुवर्ण भूमिके रत्नरासी । गृहे नेमुन स्वप्रकाशी । सर्वा समान दीधले ॥ १८१ ॥ तेथ अमृताचे पाट । कल्पतरु लागले दाट । सुरभी कामधेनूचे थाट । इच्छिले रस वोपिती ॥८२॥ चिंतामणीच्या गृहगोपुरी । सकळ ऐश्वर्य भरले पुरी । अयोध्या-वासीं सुखनिर्भरी । जीवमात्र वसिवले ॥ ८३ ॥**

मुक्तेश्वराच्या वर्णनशैलीशीं, प्रस्तुतच्या अज्ञात उत्तरकांडांतील वर दिलेलीं अवतरणें कितपत जुळतात याचा निर्णय वाचकांना घेतां येईलच. परंतु या अज्ञात उत्तरकांडात मुक्तेश्वर खरोखरीच दिसतो असें सुस्पष्ट होण्यासाठीं मुक्तेश्वराच्या भारतातील आणि प्रस्तुत उत्तरकांडांतील साम्य दर्शविणारीं कांहीं स्थळे आम्ही पुढें देतों. त्यावरूनहि हा मुद्दा अधिक स्पष्ट होईल. उत्तरकांड आणि महाभारत याचा कथाभाग भिन्न असला तरी निरूपणशैली, शब्दसंहति, वर्णनवैशिष्टयें यांत विशेष वेगळेपणा जाणवत नाहीं. शब्दविशेष, कल्पना, रूपकें, आणि वर्णनें याची धाटणी येथून तेथून सारखीच आहे, असें पदोपदीं अनुभवास येते. सृष्टीवर्णनें शृंगारकरुणरसादि वर्णनें, युद्धप्रसंग, भोजनपक्वान्नें, या ठिकाणीं मुक्ते-श्वराचे विशिष्ट शब्दप्रयोग, कल्पना, रूपकें, त्यांत अवश्य दिसल्यावांचून रहात नाहींत. **दिव्यगंध दिव्यसुमनें, दिव्यशस्त्रे दिव्याभरणें**।, **पुढें चामके चंद्रवदना, डोळसा, ऋपि गर्जति आशिर्वादे, जयजयकार करिजे विबुधे॥**, **देव पुष्पकी देववृंद, दिव्यसुमनें वर्षले, कीर्तीनें भरला ब्रह्मांडगोल, ब्रह्मांडघट, वज्रमुष्टी, पृथ्वीतटी, हृदयस्फोट, युद्धकदना मिसळले, रंहिवर खंडविखंड केले.** असे मुक्तेश्वराचे अनेक आवडते शब्द उत्तरकांडात इतक्या वैपुल्यानें आढळतात कीं, त्यावरून प्रस्तुत कांडाचा कर्ता मुक्तेश्वर नसावा असें म्हणण्यास जागाच उरत नाहीं. सृष्टीवर्णनाचे दोन उतारे पहा.

**१. यावरी पातला वर्षाकाळ। पंचम ऋतु झाला प्रबळ। सुटला पश्चिमेचा अनिळ। मेघमाला मोकली ॥ १९२ ॥ इंद्रचाप धरूनी मुष्टी। रोहिणी मृगाचिया पाठी। मेघधारा जीवन वृष्टि। करित वेगे पातला ॥१९४॥ विद्युल्लतांचे कडकडाट। घनगर्जना गडगडाट। गंगादि सरितांचे संघाट। महापूर माजले ॥ १९८ ॥ अठरा भार वनस्पति। अंकुरवसने वेढिली जगती। फळशाका धान्य संपत्ति। पृथ्वी पिके जगाते ॥ १९९ ॥ वनपर्व अ० १०**

**१. वना पातला वसंत काळु। नानापुष्पांचा परिमळु। घेउनिया मंदानिळु। वासु आला घ्राणातें ॥ ७८ ॥ शोडशकळी विराजमानु। उगवला कुमुद्वतीचा रमणु। पुत्र देखोनी सुखसंपन्नु। भरिते दाटे समुद्री ॥ ७९ ॥ वरती करूनीया वदने। चकोरे करिती अमृतपाने। चक्रवाक सखेदमने। प्रियेवियोगे तळमळती ॥ ८० ॥ सोमकांताच्या पर्वत्ता। सीतळे जळे वाहती सरिता। तेथ विलासियांच्या वनिता। विरहतापा सांतविती ॥ ८१ ॥ महुरे महरळे आम्रविटप। कोकिळा करिती पंचम आलाप। मलयानीळ निरवी ताप। चंदनवना झगडोनी ॥ ८२ ॥ कैरविणी वरि झुंकारे। भ्रमर गाती मधुर स्वरें। पद्मिनी त्यागिले दिनकरे। लाजा वदन झाकिती ॥ ८३ ॥ चंपक केतकी कर्पुर केली। शतपत्र जाति पटळावकुळी। मदन कवणाचे अनळी। वसंत पूजा कवणाते ॥ ८४ ॥ उत्तरकांड अ० ६**

इंद्रास जिंकण्यास निघालेला रावण कैलासाच्या रमणीय प्रदेशांत तळ देतो तो वसंत ऋतु आणि ती सायंकाळ कवीनें येथें सुंदर वर्णिली आहे. वरील दोन्ही उताऱ्यांत अमुक एक मुक्तेश्वराचा नाहा असें कुणासहि एकदम म्हणवणार नाहीं. मुक्तेश्वराची लेखणी प्रसंगानुसार पशुपक्षी, वृक्षवल्लरी, तडागतटिनी यांचीं शब्दचित्रें रेखिल्यावांचून पुढें सरकत नाहीं. अजून कांहीं साम्यस्थळें पहाण्यासारखीं आहेत.

**२ अमृतोदक देव तटाणि। तैसी सरिता प्रवाहे जीवनी। माजी विकसल्या कमळिणी। स्वेत रक्त बहुवर्णी ॥ १६२ ॥ तेथ हंसकारंडक। चकोर मयोर चक्रवाक। सदा फळीं फळले रुख। आम्रजंबू फणसादि ॥ ६३ ॥ वनपर्व अ० ७**

**२ उमावनी नंदनवनी। जे वृक्ष वसती पाताळभुवनी। ते तरुवर अगस्तीच्या काननी। सदा फळी फळले असे ॥७०॥ तेथ हंसकारंडक।**

चकोर चातयुत चक्रवाक। क्रीडा करीती अनेक। शुंडा कमळें कमळिती ॥ ७२ ॥ उ० कां०

३ द्राक्षी फळाचे मंडप दाट। तळीं वाहती रसाचे पाट। आम्र निचोळ स्वाधिष्ठ। हेम जंबू दाडिंब ॥ क्षीरबोरी अमृतफळी। रंभा खर्जुरी नारिकेळी। बिल्व आमळिकी पोफळी। माहुळिंगी सुफलित ॥ लवंगलतिका नागलतिका। बकुळशतपत्रमल्लिका। जातिकंकाळे मल्लिका। पारिजात वेष्टति ॥ सभा. प. अ० २

३. शर्कराद्राक्षी मंडपातळी। रसपाट लोटले खळाळीं ॥ कल्पलतिका लवंगलतिका। अमृतवल्ली सुवर्णलतिका। कर्पुरवल्ली नागलतिका। सुवर्ण वर्णे शोभती ॥ आम्र निंबु कपीथ बेल। क्षीरबोरी खर्जुरी रसाळ। कनकजंबु सदा फळ। नारिंगी त्या सदा फळा ॥ उत्तरकांड अ० ८

४ रातोत्पळे नीळोत्पळें। पीतोत्पळे स्वेतोत्पळें। अष्टदळें द्वादशदळें। सहस्रदळें मघमघती ॥ उत्तरकांड अ० ९

४ सरिता सरोवरींचीं जळें। पद्मगंधें सुशीतळें। रातोत्पळें नीळोत्पळें। सीतोत्पळें कनकाचीं ॥ आदिपर्व अ. १५

भारताप्रमाणे उत्तरकाडात स्त्रियाचीं वर्णनें फारशीं आढळत नाहींत. श्रेष्ठ स्त्रियाच्या वर्णनात 'रंभा ऊर्वशी तिलोत्तमा' यांची उपमा देण्याचे मुक्तेश्वराचे वैशिष्ट्य आहे.भारतांतहि हा विशेष आहे. तर उत्तरकांडांतहि आहे.

५ रंभा ऊर्वशी तिलोत्तमा। सौंदर्यें सुवर्णाच्या प्रतिमा। दमयंतीचा पवित्र महिमा। लोकत्रयीं आगळी ॥ वनपर्व

५ रंभा मेनका ऊर्वशी। जियेपुढें दिसती दासी। ऐसी लावण्याची रासी। वेधु लागे जया ते ॥ उत्तरकांड

उमा रमेचा दृष्टात एखाद्या पवित्र स्त्रियांच्या वर्णनात देणें हेंहि मुक्तेश्वरी वैशिष्ट्य आहे. भारताप्रमाणें येथेंहि तें सांपडतें.

६ असंख्यात ऋषीचिया नारी। पाहो पातल्या भूमिकुमारी। जैसी वेढूनिया गौरी। सिद्ध यक्षिणी मातृका ॥ जेवि कां श्रीशैल पर्वती। अनेक सिद्धगणांच्या पंक्ति ॥ उत्तरकांड

६ रिद्धिसिद्धिमाजी रमा । मातृकामंडळीं जैशी उमा । तैसी सखियामाजी प्रतिमा । दमयंतीची देखिली ॥ भिल्लीवेषें शैलबाळी । रिद्धिसिद्धि मातृकामेळी । सहस्त्र स्त्रियांचे मेळीं । महावनी विचरत ॥
वनपर्व

यज्ञसमारंभ, विवाह यांच्या निमंत्रणाचीं आमंत्रणें पाठवितांना छप्पन्न देशींचे राजेश्वर । शहाण्णव कुळींचे राजकुमर । ही त्यांची वाक्रूढ ओवी भारतांत दहापांच ठिकाणीं आली असून प्रस्तुत उत्तरकांडांतहि ती ठराविक स्वरूपांत आली आहे :—

७ छप्पन्न देशींचे राजेश्वर । शहाण्णव कुळींचे राजकुमर । प्रीति भक्ति जोडोनी कर । धर्मराजा ओळंगती ॥ सभापर्व अ० २

छप्पन देशींचे राजेश्वर । शहाण्णव कुळींचे राजकुमर । शालक समंधीक श्वशुर । द्रुपदादिक पाचारा ॥ सभापर्व अ० ९

छप्पन देशींचे राजेश्वर । शहाण्णव कुळींचे राजकुमर । मंडळीक सेनाधर । नमस्कारा पातले ॥ उत्तरकांड अ० ८

छप्पन देशींचे राजेश्वर । शहाण्णव कुळींचे राजकुमर । सूर्यवंशाचे द्विजवर । यज्ञकार्यार्थ आणावे ॥ उत्तरकांड अ० १५

मुक्तेश्वराच्या देशवर्णनातहि ठराविक पद्धति आहे :—

८ कान्यकुब्ज तैल भुक्त । कामरूपी उत्कल बहुत । पंचगौड असंख्यात । ब्राह्मण संगीं चालले ॥ गुर्जर महाराष्ट्र कर्णाटक । आंध्र चोळ मळयाल देख । पंचद्रवीडही अनेक । धर्मसंगीं चालिले ॥ वनपर्व अ० १

८ कानकुब्जा तैलभुक्त । कामरुपी उत्कलस्थ । पंचगौड हे समस्त । यज्ञकार्यार्थ आणावे ॥ गुर्जर मऱ्हास्ट्र प्रबळ । कर्णाटक आंध्र मळयाळ । पंचद्रवीड धर्मशील । दक्षणाइता पाचारा ॥ उत्तरकांड अ. १५

इतर देशांचा उल्लेख करतांना महाराष्ट्राचा 'मऱ्हास्ट्र प्रबळ' हा, प्रस्तुतचा उल्लेख चिंतनीय आहे. श्रीरामचंद्रानें अश्वमेध आरंभ करण्यासाठीं ज्या देशांना निमंत्रणें देण्याची आज्ञा केली त्यांत हा उल्लेख आला आहे. मुक्तेश्वराचा महाराष्ट्र अभिमान त्याच्या ग्रंथांत अनेक ठिकाणीं सापडतो. महाराष्ट्र जे सर्व राष्ट्रांसि राजे । जयाच्या भयें व्यापिले देख

काजे ॥ हे संक्षेप रामायणातील उद्गार व महाराष्ट्र भुजा । संहितसाहि म संडवी ॥ (आदिपर्व अ. ३१) हें यानें केलेल्या मराठ्यांच्या कडव्या व चिवट स्वभावाचें वर्णन प्रसिद्ध आहे. येथेंहि मुक्तेश्वराच्या महाराष्ट्र अभिमानाची 'मऱ्हाराष्ट्र प्रबळ' या उल्लेखानें आठवण झाल्यावांचून रहात नाहीं. कै. पांगारकरांच्या मतें मुक्तेश्वराचा काल हा श्रीशिवाजी महाराजांचा उदयकाल होय. स्वराज्याचा उषःकाल आणि महाराष्ट्र प्रबल होत असल्याचें गोड दृश्यहि मुक्तेश्वरानें पाहिलें असावें असें आम्हांस वाटतें. प्रा. पंगूंच्या मतें 'पांगारकरांच्या मताप्रमाणें मुक्तेश्वराच्या ग्रंथांत स्वराज्योन्मुख महाराष्ट्राचें चित्र नसून मुसलमानी सत्तेनें गांजिलेल्या मनःस्थितीचें प्रतिबिंब आहे.' 'शिवाजी महाराजांच्या चळवळी पैठणपर्यंत पोंचल्या नव्हत्या' असें राजवाड्यांचें मत आहे. अर्थात हीं सर्व वस्तुतः अनुमानेंच होत. श्रीनाथमहाराजांचें निर्याण शके १५२१ मध्यें झालें, तेव्हां मुक्तेश्वराचें वय अजमासें २५ वर्षांचें धरलें तर त्याचा जन्म शके १४९५ येतो. शके १५५०-५० मध्यें मुक्तेश्वरी भारत झालें. अर्थात १५६० त्याचा शेवटचा काळ असावा. म्हणजे ५ वर्षें आगेमागे असलीं तरी मुक्तेश्वराचें आयुष्य ६० वर्षें धरल्यास महाराष्ट्र स्वराज्योन्मुखतेच्या काळीं हा तेजस्वी तारा महाराष्ट्राच्या क्षितिजावर उगवलासें दिसतें. कै. पांगारकर व प्रा. पंगू यांच्या मतांत अर्धें अर्धें सत्य आहे. आपल्या पूर्व-वयांत मुक्तेश्वरानें मुसलमानी आमदानींतील होरपळलेला महाराष्ट्र पाहिला आणि उत्तरवयांत तो श्रीशिवाजीमहाराजाचा स्वराज्योदयहि अनुभवीत आहे. म्हणून दोन्हीं प्रकारचीं प्रतिबिंबें त्याच्या काव्यांत दिसतात. संक्षेपरामायण आणि भारत यांतील उल्लेखापेक्षां प्रस्तुत उत्तरकांडांतील 'मऱ्हाराष्ट्र प्रबळ' हा उल्लेख अधिक निःसंदिग्ध व महत्त्वाचा वाटतो. वर्णमैत्रीत किंवा अंत्य यमकासाठीं म्हणूनहि असा शब्द उपयोगिला जाणें कांहींच्या मतें अशक्य नाहीं. परंतु प्रस्तुतचा उल्लेख तशा पद्धतीनें नसावा. पहिल्याच चरणांत तो आल्यानें त्याची सहे-तुकता दिसते. नाथनिर्याणानंतर पंचगंगेच्या तीरीं, कोल्हापूर प्रांतांत श्रीनरसिंहसरस्वतीच्या सन्निध प्रस्तुत उत्तरकांड पूर्ण झालें. म्हणजे ह याचा शेवटचा ग्रंथ असावा. मुक्तेश्वराची हयात ६० । ६५ वर्षें हें देखील

अनुमानच. कदाचित ती अधिकहि असावी. अर्थात् महाराष्ट्र अभ्युदयाचें चित्र त्यानें कोल्हापूर प्रांती जवळून पाहिल्यानें प्रस्तुतचा सहजोद्‍गार त्यानें काढला. हा स्वतंत्र विषय येथें विस्तारभयास्तव लांबविणें नको.

मुक्तेश्वराच्या वनपर्वाच्या पंधराव्या अध्यायांत रामकथा आली आहे त्या कथाभागाशीं प्रस्तुत उत्तरकांडाची तुलना करून पहाणें मनोरंजक ठरेल.

१ दक्षणकासी क्षेत्र गोकर्ण। तेथे पातले चौघेजण। तपश्चर्या अति दारूण। देह दंडणी मांडिली ॥ २० ॥ लोहकंटकावरी अंगुष्ठ। ठेऊनि रावण एकनिष्ठ। लक्ष जयाचा शेवट। होता हवन आरंभि ॥ २१ ॥ छेदुनि दहा सहस्र सिरें। हवनीं होमिलीं अपुल्या करें। पुढती ब्रह्मि-याचे वरें। उद्भवती तत्काळ ॥ २२ ॥ दहा सहस्र वर्षे होता। तया प्रति पावला विधाता। म्हणे कष्टो नकोरे आतां। इच्छितार्थ मागिजे ॥ २६ ॥ अमरत्व निर्भयत्व। तिही लोकींचे आधिपत्य। देई म्हणोनि मागे तत्त्व। दशानन ब्रह्मियातें ॥ २७ ॥ वन पर्व अ० १५

१. अनुताप धरुनिया पोटीं। पश्चिम ...समुद्रतटी। गोकर्ण तीर्थी धुर्जटी। महाबल स्व... ..दीला ॥५४॥ जयाते म्हणती दक्षणकासी। दरूषणे मोक्ष प्राणीयासी। ...... निरोदक निराहारी। .. .....नचळे जैसा गिरी। दहा सहस्र वरुषें वरी। तपश्चर्ये बैसला ॥ दहा सहस्र आपुली सिरें। शस्त्रें खंडी आपुलेनी करें। हवनी होमिता निष्ठुरें। अधैर्य कांहीं असेना ॥ ६२ ॥ दहा सहस्र वरुषें पूर्ण। होता पातला चतुरानन। म्हणे जे जे इच्छी मन। ते वरदान माग ते घेई ॥ ६३ ॥ अमरत्व निर्भयत्व। तिही लोकींचे आधिपत्य। मागता सत्यलोकनाथ। ........म्हणे त्रिवाचा ॥ ६७ ॥ उत्तरकांड अ० ३

२. देवगंधर्वाचिया नारी। दासी केल्या लंकापुरी। नागकन्या कोटीवरी। राक्षसाघरी कामिणी ॥ ४७ ॥ तिही लोकींच्या सुंदरी। हिरोनी आणिल्या वळात्कारी। अइंसी सहस्र सुधल्या घरीं। जाति पद्मिनी भोगावया ॥ ४८ ॥ आक्रांतले तिन्ही लोक। दीर्घ स्वरे करिती शोक। क्षोभुनी वैकुंठ नायक। चतुरानना पाचारी ॥ वनपर्व अ० १५

२ देवी गंधर्व विद्याधरी। नागकन्या गुणसुंदरी। बंदी धरुनी बळात्कारी। लंकापुरी आनिल्या ॥ ११८ ॥ वनिता केलिया बळात्कारी।

त्या माजी मुख्य मंदोदरी। एकाकी शतसहस्री। दीव्यादासी डोळसा॥ ॥ ११९ ॥ निवडोन त्रैलोक्याच्या नारी। त्या माजी जाति पद्मिनी चतुरी। ऐसी सहस्र संख्या घरी। स्त्रीया केल्या रावणे॥ १२१ ॥ पीडा पावता अद्भुत। विश्वी माजला आकांत ॥ उत्तरकांड अ० ३

मुक्तेश्वरी महाभारतात आदिपर्व अ.२९, सभापर्व अ.९ व वनपर्व अ.११ यांत भोजनांचीं आणि पक्वान्नांचीं वर्णनें आलीं आहेत. तीं प्रस्तुतच्या उत्तरकांडातील भोजनवर्णनाशी ताडून पाहणेहि उचित आहे.

अश्वमेधाचा एक वर्षाचा दीर्घ सोहळा! त्यांतील भोजनाचा थाट पहा:—

१ कर्दली फळें आम्रफले। द्राक्ष दाळिंबे रसाळें। जंबु फणस नारिकेले। माहुलिंगे कपिथ्थे॥ बदरी खर्जुरी नारंगे। अंजिरे कमरंगे मातुलिंगे। जंबीर साखर निंबे सुभंगे। गंगाफले अपार॥ युक्षदंड काले शुभ्र। रसपानी तोषले विप्र।..  .....॥ उत्तरकांड अ० १५

१ फणस दाळिंब जांभळे। द्राक्षें नारिंग अमृतफळे। अंजिरे केळे नारियेळे। माहुलिंग खर्जुरी॥ कपीथ्थ गंगाफळे सरसे। युक्षदंड युक्षरसे॥..... .॥ आदिपर्व अ० २९

२ सोमकांतीची कासारे। दधि मधुघृत क्षीरे। पूर्ण भरीली महाथोरे। क्षीरसिंधु सारिखी॥ निर्मलस्फटिकेचे रांजनी। भरल्या अप्रदा सिखरिणी॥ गोधुम सुपुष्ट सोनसले। भक्षभोज अति सोज्वले। वलवटे ऐसी मुक्ताफले। अरूवरपणे आगळी॥ उत्तरकांड अ० १५

२ शर्करेचीं वाळवंटें। घृतसरिता धावती लोटें। दुग्धनदीच्या संगमीं बेटे। पायसान्न सिखरिणी॥ दधिमधूचें सरोवर। समुद्रतुल्य महाथोर। कोरूनि कनकाचे गिरिवर। हेमरांझणी सिखरिणी॥ खाजा करंजा अमृतफळे। फेण्या घृत पुरिया हंस केळे। खर्जुरी द्राक्षफळ सुनिळ। गोधुम सारे निर्मिली॥ सभापर्व अ० ९

दुर्वास ऋषींना प्रभुरामचंद्रानें दिलेली ही मेजवानी पहा:—

१ उष्ण वाफा सपरिमल। वसंत लाजोनी विजनी लोल। सीतें मालतीची मुकुले। अवलोकिता निवती डोळे। स्फटिकाचलास म्हणे काळे। नेत्र आगळे ओदनी॥ म्नोलीय दाळीची वरान्नें। ओदन सिरीं

बैसली भाव। रजताचलावरी सुवर्ण। विष्णु प्रसाद ज्यापरी॥ स्वच्छ घृताचे लोट। वटक मिळाले येक वाट। शाका वाढिल्या स्वादिष्ठ। घमघमीत सुवासे॥ स्वेत उष्णा सुस्वाद भरिता। कथिका लाजवी अमृता॥ दधि मधु दुग्ध सारे। आइळीली वळवटे सुकुमारे॥ उत्तरकांड अ० १६

१. अमृत प्राय सिखरिणी। कथिका आणि शाखाचिया श्रेणी। उष्ण वाफा धांवती गगनी। घमघमीत सुवास॥ कनकताटी चंद्रकळा। तेवी वोदन वोभराळा। लाजवीत मालती बकुळा। तैसि सिते सोज्वळे॥ सोलीव दाळीचीं वरानें। वरी भासती सुवर्ण वर्ण। मुक्ताफळे उपमेसमान। तेवि वळवटे शोभती॥ वनपर्व अ० ११

मुक्तेश्वरी भारतांतील मल्लयुद्धवर्णनें प्रख्यात आहेत. युद्धांचीं वर्णनें असलेलीं त्याचीं पर्वे उपलब्ध नाहींत. प्रस्तुत उत्तरकांडांत युद्धांचीं वर्णनें आहेत. त्यांतील कांहीं वर्णनें आपण मागील उताऱ्यात पाहिलीं आहेतच. लवकुशयुद्ध वर्णन, करितांना 'पायी तोडर माथा बिरदे। येमी पत्राली दळांची वृंदे। गर्जना करिती सिंहनादे। ग्रासुं म्हणती परदळा॥ शहानया नफेरी तुरंगे। ढोलगी डबिडी पावे श्रृंगे। मेघावळीसे साजमि मागे। महा निशाने लागली॥ शत्रु भाजांची नयने। प्रवाह झाली अश्रु होऊनी॥' अशा प्रकारचें वर्णन पाहिलें म्हणजे श्रीशिवछत्रपतींच्या यशस्वी स्वाऱ्यांपैकी एकाचे चित्र तर आपण वाचीत नाहींना असें वाटूं लागतें. एरव्ही लवकुशाच्या युद्धांत 'शत्रुभाजांचीं नयने, अश्रुमय' होण्याचा कसा संभव असूं शकेल? भारतातील साम्य अशा युद्धांसें नाहीं. तरी बारकाईनें पाहतां कांहीं आधार मिळतो!

१ प्राणविरहित राघव दळ। खोज करिती देव सकळ। अशुद्ध नदीचे खळाळ। समुद्राउजूं लोटले॥ उत्तरकांड अ० १३

१ अशुद्ध नदीचे खळखळाट। पुसती सागराची वाट। मार्गी वाहावया नीट। अपार प्रेतें चालती॥ आदिपर्व अ० ३१

२ अंकुश लाऊनि माहाती। पुढे लोटले भद्रजाती। असंख्य रथ जुडुनी रथी। सीतकुमार वेढिला॥ अस्वस्वाराचिया थाटी। नग्नशस्त्रे झळकती मुष्टी। वणवा पर्वताने वेष्टी। तेवि चौंफेरी माजले॥ लवे सोडुनी बाण मुष्टी। कुंभस्थळी भेदिले किरटी। रक्तमेदाचिये वृष्टी। मुक्ताफळे विखरती॥ उ. कांड १२

२ अंकोशे उवचोनी कुंजर । पुढे लोटले शतसहस्र । खड्गे उच-लोनी अश्वस्वार । म्हणती वेढुनी मारा की ॥ कुंभस्थळे भेदुनी बाणी । मुक्ताफळे सांडिती धरणी । अशुद्धमधधारा सिंचनी । गारावृष्टी ज्या परी ॥ विराट पर्व अ. ६

३ चार्वाक पाखंडाची बळे । जेवि वेदांनी करविखळे । तेवी मुर्त्री असंख्य दळे । संहारनि संग्रामी ॥ उत्तर कांड अ. १३

३ पार्थे एक शतबाणे । छेदूनि सांडिले तत्क्षणे । जैसी कुत-र्कियाची वचने । वेदांतिया विखंडी ॥ विराट पर्व अ. ६

मुक्तेश्वराच्या सभापर्वांतील नारदनीतींतील कांहीं ओंव्या उत्तर-कांडातील ओंव्यांशीं ताडून पहाव्या.

१ आचार दाउनी लोकदृष्टी । अंतरी अनाचार राहटी । ऐसे दांभिक तुझे निकटी । वर्तणार नसती की ॥१२३॥ तोंडें बोलूनिया ब्रह्म । भंगिती सदाचार धर्म । प्रशंसा अभिचारिक कर्म । ते संसर्गी त्यजिले की ॥१२४॥ दाऊनीया योगियांचें चिन्ह । पोशी उदर आणि शिस्न । याचे ठायी तुझें मन । विश्रामत नाही की ॥१२५॥ सुना छळिती सासुवातें । पुत्र अव्हेरिती पितीयातें । सेवक अवगणिती स्वामीतें । ऐसे होत नाहीं की ॥१२८॥ सभा अ० ३

१ सुनासासुवाचें वचन । न भंगती गेलीया प्राण । पितयापुढें कर जोडून । पुत्र सदा तिस्टती ॥३०॥ काया वाचा मन धन । वेचुन करिती सद्‌गुरु भजन । गुरु आज्ञेचें उल्लंघन । करिता राये दंडिजे ॥३१॥ शास्त्र अभिमाने अति उन्मत्त । विश्वीं म्हणवीती ज्ञानवंत । ईश्वरभजनीं नाहिं चित्त । ते पंडित त्यागिलें ॥३२॥ करुनी सांग वेदपठण । नाहीं अर्थ अनुस्ठान । निर्दय भूतदयाहीन । ते पाठक वर्जिली ॥३३॥ वर्ले धर्मे सिबिका यानें । वरी वरी संन्यासीयांची चिन्हें । ते दांभिक रघुनंदनें । राज्यामाजी वर्जिलीं ॥३४॥ उत्तरकांड अ० १६

अजूनहि कितीतरी साम्यस्थळें देण्यासारखीं आहेत परंतु स्थळमर्यादेचा विचार करतां तें अशक्य ठरतें !

## श्री एकनाथ व मुक्तेश्वर

मुक्तेश्वर बुद्धिमान पंडित. ज्ञानेश्वरादिकांच्या ग्रंथाचे अभ्यासी. बहुश्रुत असे ग्रंथकार! नाथाचे तर ते नातूच! अर्थात् त्यांचा कांहीं तरी

काल नाथाच्या सहवासांत गेला असेलच. अर्थातच नाथांच्या भाषेचा संस्कार मुक्तेश्वराच्या भाषेवर अधिकांत अधिक उठावा ही गोष्ट त्याच्या वाङ्मयाच्या अभ्यासकाना सांगण्याची जरूरी नाहीं. सदरी उत्तरकांड हें भावार्थरामायणाचेंच उपांग होय. ग्रंथकाराचें वेगळें नांव नसल्याने प्रथम-दर्शनी ते नाथाचेच ठरलें. तेव्हा आपल्या आजोबाच्या वाङ्मयपूर्तीचें ऋण फेडतांना उत्तरकांडांच्या कर्त्यानें नाथवाङ्मयाचें सखोल परिशीलन केलें असावें हें उघड आहे. कारण त्यातील कल्पना, वर्णनें, संकेत कितीतरी यांत सांपडतात. रुक्मिणीस्वयंवरांतील लग्नमोहळ्याच्या गर्दीत एका संन्यासी श्रीपादांची हकीकत अशी आली आहे.

**वेश्या आणि संन्यासी। मंडपघसनी होते कैसी। कोप आला श्रीपादासी। दंडे वेश्येसी ठोकती॥ येरी हांसोनी कपाळ पिटी। अजूनी क्रोध न संडीपाठी॥ विटंबिली दंड कासोटी। आत्मदृष्टी तुम्हा नाहीं॥ मी उत्तम पैल हीन। विषम भेदाचें अज्ञान। सर्वांभूतीं सम-समान। निजात्मज्ञान तुम्हा नाहीं॥ रुक्मिणीस्वयंवर अ० १८**

अगदीं असाच प्रसंग विमानात अयोध्यावासी जनांना घेऊन जातांना प्रस्तुतच्या उत्तरकांडांत आला आहे. पहा :---

**श्रीपाद म्हणती नारायेण। विमानी बैसता वेश्याजन। विष्णु-लोका आमुचे गमन। न घडे ऐसे दिसताहे॥ वेश्या म्हणती श्रीपाद-स्वामी। नारायण स्वरूप तुम्ही। भुतीं भेद भासता ब्रह्मी। प्राप्ती कैंची स्वामिया॥ भूतीं भासे सर्व समता। तेव्हांच ब्रह्म प्राप्तीची कथा। भूतीं भेद तंव सर्वथा। मोक्षप्राप्ती असेना॥ उत्तरकांड अ. १७**

रामनामाचें वर्णन नाथाच्या भाषाशैलीशीं ताडून पहाताहि हाच प्रकार दिसतो :—

**योगी नेमवेना मन। दान करावया नाहीं धन। करूं जातां तीर्था-टण। शक्तिहीन शरीर॥ तप करिता अति दारुण। साहवेना शीत-उष्ण। कर्म करिता नाही ज्ञान। विधि निषेध कळेना॥ करूनी वेदशास्त्र पठण। साधल्या पंडितपणाचा मान। तंव ज्ञान अथवा धन। येकही अर्थ साधेना॥ म्हणोनी विकल्पी न घालावे मन। नित्य करितां राम-स्मरण। कृपा करील रघुनंदन। ठाव देईल निजपदी॥ येकाजनार्दना शरण। आम्हा तारक रामस्मरण। या वेगळें साधन अन्य। नाहीं जाण सर्वथा॥ उत्तरकांड अ० ७**

नाथवाणीचा संस्कार प्रस्तुत उत्तरकांडांत कितपत आहे तें यावरून समजेल. तरी देखील ग्रंथकर्त्याचें स्वतंत्रपण झांकलें जात नाहींच.

## गावबा आणि मुक्तेश्वर

नाथांच्या भावार्थरामायणपूर्तीचें कार्य मुक्तेश्वर आणि गावबा या उभयतांनीं एकाच काळांत पार पाडल्याचें सिद्ध आहे. गावबाची कृति आज तीनशें वर्षांपासून महाराष्ट्राला परिचित आहे. तर प्रस्तुतचें उत्तर-कांड अगदी नवीन म्हणून विचारवंतांपुढें चर्चेचा आणि कुतूहलाचा विषय ठरणार आहे. मूळ वाल्मिकीच्या उत्तरकांडाचे सर्ग शंभरच्यावर आहेत. त्याचा विस्तार गावबानें ७७ अध्यायांत केला. प्रस्तुतच्या उत्तरकांडांत ती सर्व कथा अवघ्या १७ अध्यायात आणली आहे. यानहि मुक्तेश्वराची संक्षेपविस्तारकुशलता आपणास चांगलीच दिसते. भारत रचना करतांना मुक्तेश्वराची प्रतिभा पर्वांप्रमाणें कमी कमी होत गेलेली आढळते, असें विद्वान म्हणतात. प्रस्तुतचें उत्तरकांड मुक्तेश्वरानें वृद्धापकाळीं लिहिलें असावें अर्थात् यांत त्याची प्रतिभा वयोमानानुसार फारशी मलिन दिसत नाहीं. आतांपर्यंत दिलेल्या वर्णनात्मक उताऱ्यावरून हें सिद्ध आहे. आज आपणांपुढें भावार्थरामायणाचीं दोन उत्तरकांडें आहेत. एक गावबाचें आणि दुसरे प्रस्तुतचें मुक्तेश्वराचें. दोवाच्या वर्णन-प्रसंगाची कल्पना येण्या-साठीं एक प्रसंग आपण घेऊं. काळपुरुषाशीं एकांतात श्रीराम संवाद करीत आहेत. दुर्वासबाहेर आले असून दारावर असलेल्या लक्ष्मणाला श्रीरामाची भेट मागत आहेत.

**१ लक्ष्मणाचें वचन परिसोनी। उद्विग्न झाला दुर्वासमुनी। क्रोधें थरथरा कांपे मेदिनी। भरते आलें तमाचें ॥ नेत्र करोनी आरक्त। हातें हात असे घासीत। दंत ओष्ठ चावीत। गात्रें कांपत सक्रोध ॥ ऐकें सुमित्रानंदना। येच क्षणीं भेटवी श्रीरघुनंदना। नाहीं तरी अयोध्या-भुवना। क्षणामाजीं जाळीन ॥ तदनंतर श्रीरघुनाथ। जाळीन तुजही समवेत। आणिकही शत्रुघ्न भरत। हेही दाहीन निमिषार्धें ॥ करीन ब्रह्मांडाची होळी। सूर्यवंश मेळवीन धुळी। पुत्रपौत्रासहित ये काळीं। भस्म करीन श्रीराम ॥ ऐसे दुर्वास बोलिल्यावरी। लक्ष्मण दीर्घ चिंता करी। म्हणे मरण दोहींपरी। मजलागी ओढवलें ॥ श्रीरामा न जाण-विता मात। ऋषी करील भस्मीभूत। सूर्यवंश होईल शांत। ऐसा**

अमर्ष ओढवला ॥ गेलिया श्रीरामाजवळी । क्रोधें श्रीराम करील होळी । तरी मी एकलाची मर्हातळी । त्यागोनी स्वर्गा जाईन ॥

उत्तरकांड (गावबा) अ० ७५

१ मौन्यें दोउनी हस्तक । म्हणे केउता रघुनायक । सुमित्र म्हणे मी सेवक । आज्ञा मातें सांगिजे ॥ म्हणे बोलणें तें राजयासी । न येतां नगरपरिवारेसी । करून सांडी भस्मरासी । अर्धक्षणु न लागता ॥ मुखीं नेत्रीं 'धडकती ज्वाळा । देखोनी कोपे पन्नगपाळा । म्हणे माझेनी मा (मी) सें सकळा । क्षेम उरे या हातीं ॥ याच्या क्रोधाचा पावक । करील ब्रह्मांडाची राख । मरण पावोनी मीच येक । सकळ लोक वांचो कां ॥ उत्तरकांड ( मुक्तेश्वर ) अ० १६

गावबा आणि मुक्तेश्वर दोघाच्या उत्तरकाडाची संपूर्ण तुलना येथें अशक्य आहे. सहज म्हणून वरील उतारा घेतला आहे. भाविकतेनें गाव-बाची कृति श्रीनाथकृपेनें सर्वमान्य झाली यासाठीं साधेपणाची ती रचना प्रसादमान्य ठरली. आज तीनशे वर्षे श्रद्धेच्या आधारावर लोकमान्यता तिला लाभली. प्रस्तुतचे उत्तरकाड काव्यगुणांनीं अलंकृत असूनहि नाथ-कृतींत समावेशाचा मान पावलें नाहीं. मुक्तेश्वराच्या प्रतिभेचा यांत पसारा आहे. आणि तें मुक्तेश्वराचेंच आहे या दृष्टीनें त्याकडे रसिकांनीं पहावें. गाव-बाच्या उत्तरकांडास श्रीनाथाचा प्रसाद लाभला. तर या उत्तरकांडास श्रीनृसिंह-सरस्वतीचा आशीर्वाद लाभला. दोन्हीहि प्रासादिक, पूज्य आणि वंद्य.

## मुक्तेश्वराचें व्यासानुसरण

भारत रचतांना मुक्तेश्वरानें व्यासाच्या आधारानेंच कथा गुंफण्याचा कटाक्ष पाळला. कथामंगतींत व्यासाशीं आलेला इतरांचा भेद त्यानें स्पष्ट शब्दात उल्लेखिला आहे.

सांडुनि व्यासांची संगती । चालो नये आणिक पंथी ॥ सभा. अ. १२

प्राकृत कवींचा वाग्जल्प । तैल कढईत पाहोनि रूप...। परी तें मूळ भारतीं नाहीं । म्हणोनी असो न बोलो कांहीं ॥ आदि. अ. ४१

बोल बोलती सर्वत्र । सूर्यें दिधलें थालीपात्र । परी तें व्यासाचें वक्त्र । वदलें नाहीं भारतीं ॥ वनपर्व.

याच प्रसगाप्रमाणे प्रस्तुत उत्तरकाडात एक प्रसंग आला आहे. श्रीरामाच्या लवकुशयुद्धात श्रीराम मूर्छित पडले असें जैमिनीभारतात

असल्याचा मुक्तेश्वर उल्लेख करतो परंतु याला वाल्मिकीचा आधार नाहीं असेंहि तो सांगतो. परंतु वाल्मिकानीं हें लिहिलेंच नाहीं अशी तरी खात्री कशावरून? अशा संदेहांत तो दिसतो पहा :–

**कुशाचिये तीक्ष्ण बाणी। श्रीराम पडला मूर्छित रणी। ऐसे- बोलिला जयमुनी। तें मी नाहीं बोलिलों॥ धनुष्य टेकोनी ग्रीवेतळीं। स्तब्ध ठेला रणमंडळी। कांहीं विचार तये वेळीं। हृदय कळमळी स्फुरेना॥ भारती बोलीला जयमुनी। तेच सूदले श्रोतया कर्णी। बदला नाहीं वाल्मिक मुनी। ऐसे कोन्ही न वदावे॥ शतकोटी ग्रंथ त्रैलो- क्यांत। कोणी शोधिला सावचित्त। आग्रह सांडूनी हृदयांत। गुणग्राहिकीं परिसिजे॥ उत्तरकांड अ १४**

हे उद्गार मुक्तेश्वरावाचून इतर कुणाच्या तोंडीं शोभतात.? उत्तर- कांडात प्रसंगानुरोधाने व्यासाचा उल्लेख आणून मुक्तेश्वर म्हणतो.

**वसिष्ठा पासोनि चौथा पुरुष। तया नाम वेदव्यासु। गूढ वेदार्थ रविप्रकाशु। प्रगट करील जगाते॥ जयाचिया उन्मेषसिंधोदका। माजी अठरा पुराणे नौका। नाना अर्थ भरूनी लोका। लक्षचारी वोपिले॥ उत्तरकांड अ. ९** येथे व्यासाचा उल्लेख **गूढ वेदार्थ रविप्रकाशु**। आणि **उन्मेषसिंधु** हे शब्दप्रयोग चिंतनीय आहेत. आपल्या भारतात मुक्तेश्वर **उन्मेष सुवातें झडाडे। व्यासवन वोळला विश्वपाडे॥ उन्मेषवन्हि आगळा झाला। ब्रह्मांड आगटी आतोता**॥असा व्यासांचा उल्लेख करितो. प्रस्तुत उत्तरकांडांत अगदीं त्याच शब्दांत वर्णन करणारा मुक्ते- श्वरावाचून कोण असूं शकेल? मुक्तेश्वरी भारतांत कालविपर्यास सापडतात. प्रस्तुत उत्तरकांडातहि असाच एक मजेदार दोष सापडतो. अगस्ति श्रीरामास अन्नदानाचा महिमा वर्णन करीत असताना **तुलसी समान पुष्प अन्य। नाही नाही सत्य जाण। दानामाजी अन्नदान। उदकदान विशेष॥ गीतेसमान नाही शास्त्र। देवा येक भालनेत्र**। तसें अन्नदान! येथील गीतेचा उल्लेख हा मुक्तेश्वरी कालविपर्यासाचें गमक निश्चित आहे. प्रतिभासंपन्न कवि कोणत्याहि काळाचें वर्णन करो त्यांत तत्कालीन परि- स्थितीचें चित्रण कमी अधिक प्रमाणात आढळतेंच! मागील 'म्हाराष्ट्रप्रवळ' हा उल्लेख हेंच दाखवितो. शंबुकाला शासन करण्याच्या प्रसंगीं राजसभेनें जो निर्णय घेतला. त्यांत कालविपर्यासानें कां असेना यवनाक्रांत महाराष्ट्र

पुढे येतो. '**ब्राह्मणाची तपश्चर्या । हीन वर्तती आचार राया । तैं ब्राह्मण श्रोत्रियाची जाया । म्लेंच्छ भोगी व्यापरी ॥ ब्राह्मण पढे म्लेंच्छशास्त्र । म्लेंच्छ म्हणती ब्राह्मणमंत्र । तया परतें अपवित्र । आन नाहीं भुतळीं ॥ म्लेंच्छ करिती गायत्रीपठण । यवनमंत्र जपे ब्राह्मण । पवित्र राजे त्यांचें हनन । तात्काळिक करावे ॥ उत्तरकांड अ. ११**

मुक्तेश्वर काशीला राहिला होता हें प्रसिद्ध आहे. विमानात जागे-करिता भांडणें चालली तो म्हणतो '**जेवि वाराणसीच्या पंथी । स्थळा-कारणे कळहो करिती । हातपाय मस्तकें फोडिती । सुखी वस्ती क्षणेंमात्र** ॥ हा आपल्या काशीयात्रेचा अनुभव त्याने सांगितला नव्हे काय?

भावार्थरामायणाच्या शेवटील भागाची दोन भिन्न भिन्न उत्तरकांडे उपलब्ध झालीं याचें प्रस्तुत ग्रंथाच्या संशोधनाच्या दृष्टीनें विशेष महत्त्व आहे. या नवीन व अज्ञात उत्तरकांडाच्या अपूर्व उपलब्धीनें ग्रंथ-पूर्तीच्या घटनेवर पुढील काळात पुष्कळच नवीन प्रकाश पडेल असे वाटते. मुख्य म्हणजे भावार्थरामायण नाथाच्या हातून अपूर्ण राहिले ही एक निःसंदिग्ध व सत्य अशी घटना ठरते दुसरी गोष्ट म्हणजे प्रस्तुत ग्रंथपूर्तीच्या बाबतींत गावबा वगैरे संबधीं येणारा उल्लेखहि खराच ठरतो. कित्येक विद्वानाना कधीं कधीं असेहि वाटे की भावार्थरामायणाशीं गावबाचा येणारा संबंध आणि अशा गोष्टी भाकडकथापैकीच असून भावार्थरामायणाची संपूर्ण रचना श्रीएकनाथमहाराजाचीच असावी. वस्तुस्थिति तशी असती तर एकाच भावार्थरामायणाचीं दोन उत्तर-कांडे कां उपलब्ध झालीं असतीं? याचें उत्तर काय? आपल्या भक्त-लीलामृतांत महिपति सांगतच आहेत. **म्हणे आमुचा प्रयाण समयो तत्वतां । सन्निध पातलासे आता । ऐसे येकनाथे सांगता । भाविकासी चिंता उद्भवली ॥७९॥ म्हणे स्वामीच्या मुखे करोनि जाण । संपूर्ण व्हावे रामायण । युद्धकांडाची समाप्ति पूर्ण । झाली अजून नसे कीं ॥८०॥ यावरी उत्तरकांड राहिले समुळ । यास्तव वाटते हळहळ । तरी ग्रंथ सिद्धीसी नेऊनी समुळ । मग प्रयाणकाल नेमावा ॥८१॥ श्रीनाथ म्हणति ऐका वचन । काळासी शिक्षा करोनि जाण । आपुले कवित्व सिद्धीस नेणे । हे अश्लाघ्यवाणे दिसतसे ॥८५॥ युद्धकांडाची पूर्णता । आणि उत्तरकांड तत्वतां । गावजी सिद्धीस नेईल आतां । यासी**

अन्यथा असेना ॥८६॥ ऐसी श्रीनाथाची वैखरी। वदता लोकांसें आश्चर्य अंतरी। म्हणती गावजी तो मुका जन्मवरी। कोणासी उत्तर न बोले ॥८७॥ तो कैसा वदेल रामायण। हे असत्य वाटे आम्हाकारणें। श्रीनाथे गावजीस बोलावून। कृपादान मग करिती ॥८८॥ मस्तकी हस्त ठेवोनि प्रीति। आपुली लेखणी तयासी देती। म्हणे आमुचे देही कवित्व स्फूर्ति। ते तुज प्रति असो कीं ॥८९॥ ऐसा होताचि कृपावर। त्याचे बुद्धीसी तात्काळ झाला विस्तार। गावजीने हाती घेउनी पत्र। ग्रंथीं अक्षरे लिहितसे ॥९०॥ जैसे श्रीनाथांच्या ओवींचे मांडणें। तैसेंची असे त्याचे बोलणे। एक अध्याय सिद्ध होताचि जाण। भाविक जन ऐकती ॥९१॥ म्हणती नाथकृपेने तत्काळ। मुकाहि झाला वाचाळ। बोलणेंहि वाटे अतिरसाळ। तरि ग्रंथहि सकळ करील हा ॥९२॥ एकनाथाच्या देखता जाण। एक अध्याय केला असे त्याने। वरकड ग्रंथ मागुन। सिद्धीसी संपूर्ण तो नेला ॥९३॥ अर्थात नाथाच्या रामायण-पूर्तीच्या बाबतींत गावबा वगैरे संबंधींचा नाथचरित्रकारानी केलेला उल्लेखच शेवटीं खरा ठरतो. जुन्या संतचरित्रकारानीं वर्णन केलेल्या भाविक आणि चमत्कृतिपूर्ण घटनाकडे नेहमीच सशयपूर्ण दृष्टीनें पहाण्याचा अनिचिकित्सक दृष्टिकोण हमखास उपयोगीच पडतो असे नाहीं. केव्हा केव्हा या भाकड समजल्या जाणाऱ्या कथातूनच निर्मळ असे सत्य याप्रमाणे बाहेर पडते. हा बोध या घटनेपासून संशोधकानीं घ्यावयास पाहिजे. भावार्थरामायण बालकांडापासून युद्धकांडाच्या ४४ व्या अध्यायापर्यंत नाथानीं लिहून पूर्ण केल्यानतर शेवटचा भाग श्रीनाथ प्रेरणेने प्रतिष्ठान क्षेत्रांत गावबाने पूर्ण केला आणि तोच भाग, नाथाचे नातु प्रख्यात महाकवि मुक्तेश्वर याना, श्रीनृसिंहसरस्वतीच्या क्षेत्रस्थानीं पुन्हां लिहिण्याची प्रेरणा का झाली याचाहि शोध या अज्ञात उत्तर कांडाच्या सशोधनाने पुढे लागण्याचा पूर्ण संभव आहे. याचीं कारणे पाहताना अनेक तर्क व अनुमानें करता येतील. ग्रंथ-पूर्तीचे काम मुक्तेश्वराने पार पाडावे अशीहि इच्छा नाथानीं प्रगट केली असणें संभवनीय आहे. पण नाथाच्या अंतकालीं मुक्तेश्वर पैठणास नसावा असा योगायोग आल्यानें ग्रंथपूर्तीचें हें काम आयत्या वेळीं गावबाकर

सोपविलें गेलें असावें. मुक्तेश्वरास पुढें ही गोष्ट समजून त्यानें पंचगंगा-संगमावर स्वतंत्र उत्तरकांड लिहून आजोबाची इच्छा पूर्ण केली असण्याचीहि शक्यता आहे. कदाचित् गावबास मिळालेल्या मानाचा मुक्तेश्वरास विषादहि वाटला असेल. नाथांच्या पश्चात् ग्रंथपूर्तीचें होत असलेले लेखनकार्य नाथकृतीस शोभण्यासारखे उतरेल असें मुक्तेश्वरासारख्या महाकवीस वाटलें नसावें म्हणून उर्वरित भाग आपणच मनाजोगता लिहावा असें वाटून नृसिंहसरस्वतीच्या दृष्टांताचा प्रसाद मिळवून ग्रंथसिद्धीचा वेगळा उपक्रम पार पाडला असावा. भावार्थरामायणाच्या इतर त्रुटित कांडाबरोबर हें उत्तरकांडहि त्रुटितच मिळालें. सतरा अध्यायापैकीं सुरवातीचे दोन अध्याय गहाळ झाले आहेत. बाकीचे पंधरा उपलब्ध आहेत. या महत्त्वाच्या पोथींतून इतर कांडाप्रमाणे युद्धकांडाचीं काहीं त्रुटित पानें किंवा अध्याय उपलब्ध होते तर फार बरें झालें असतें. मुक्तेश्वरकृतीच्या पुढील मागील महत्त्वाचा आशय व संदर्भ निश्चित करूं शकला असता. उत्तरकांडाच्या पहिल्या अध्यायातील उपोद्घाताच्या ओव्यात ग्रंथपूर्तीच्या उद्देशाचीं कारणें व उल्लेख यावर प्रकाश पडल्यावांचून राहिला नसता. परंतु प्रस्तुत प्रकारच्या आणखी काहीं प्रति उपलब्ध होईपर्यंत पुढील काळाची वाट पाहणें अपरिहार्य आहे. तोपर्यंत आज हातीं असलेल्या या माहितीवरच समाधान मानणें यावाचून गत्यंतर नाहीं. अर्थात नाथांच्या भावार्थरामायणाच्या शेवटील भागाचे दोन भिन्न भिन्न लेखनप्रकार झाले हें हमखास. गावबा व मुक्तेश्वर हे त्या प्रकारांचे मुख्य संयोजक व लेखक. पैकी गावबाची कृति नाथांच्या भावार्थरामायणाबरोबर आजतागाइत चिरंजीव आहे तर मुक्तेश्वराच्या कृतीस लाभलेला श्रीनृसिंहसरस्वतींचा प्रसाद व आशीर्वाद आज तीन, साडेतीनशें वर्षांच्या दीर्घ कालानंतर पैठणास निघणाऱ्या प्रस्तुतच्या 'नाथदर्शनांतून' खरा ठरत आहे. हाहि एक योगायोगच म्हणावयाचा!

नाथांच्या निर्याणानंतर पैठण सोडून मुक्तेश्वर पंचगंगातीरीं तेरवाडकडे रहावयास गेले. तेथेंच समाधिस्थहि झाले. त्यांची समाधि व वंशज तेथें आहेत ही गोष्ट प्रसिद्ध आहे. तेरवाडहून जवळच नृसिंहसरस्वतींचें क्षेत्र किंवा नरसोबाची वाडी, श्री औदुंबर क्षेत्र हीं दत्तपूजकांचीं स्थानें आहेत. मुक्तेश्वर हेहि दत्तोपासकच! म्हणून वरील क्षेत्रस्थानीं ते

वारंवार येत जात असावे. रामायणपूर्तीच्या निमित्तानें कांहीं दिवस श्रीनृसिंहतीर्थी त्यांनीं वास्तव्यहि केलें. असावें संतकृपेचा आशीर्वाद आपल्या भारताप्रमाणेंच उत्तरकांड संपवितांनाहि त्यांनीं मागितला आहे. मुक्तेश्वरांचें साधुत्व आणि व्यक्तित्व लक्षांत घेतां त्यानें ग्रंथप्रसादाचा केलेला उल्लेख खरा व भरवशालायक मानणें अवश्यच आहे. ग्रंथमाहात्म्य वाढावें किंवा अवतारीपुरुषाचा ग्रंथाशीं उगाच संबंध जोडून उदो गाजवावा, अशा केवळ अंधश्रद्धेच्या परंपरागत कोटींतील मुक्तेश्वर खचित नव्हता. तो सश्रद्ध असूनहि बहुश्रुत व चिकित्सक विद्वान् असा महाकवि होता. पैठणास नाथांच्या सदनीं हा ग्रंथ विराजमान व्हावा. अशी श्रीची वाणी होऊनहि नाथाच्या ग्रंथपूर्तीची ही मुक्तेश्वरी कृति दीर्घकालपर्यंत कालाच्या उदरात अज्ञात कशी राहिली याचें आश्चर्य वाटतें. ग्रंथरूपानें आजोबाचें ऋण फेडल्यानंतर लवकरच मुक्तेश्वरानें तेरवाडास देह ठेविला असावा. त्याच्या पश्चात् त्याचा ग्रंथ त्या प्रांतीं तसाच पडून राहिला असावा. मुक्तेश्वराच्या चहात्यांना त्याच्या स्वतंत्र ग्रन्थपूर्तीची माहिती असलीच पाहिजे म्हणून प्रस्तुत उत्तरकांडाच्या प्रति पुढें कालांतरानें पैठण भागांत आल्या असाव्या. अशा दुर्मिळ पोथ्यांचें साक्षेपी विद्वान् लोकांनीं प्रतिलेखनहि करून ठेवलें असावें. नांदेड येथें उपलब्ध झालेली प्रस्तुतची पोथी ही अशांपैकीचाच एक उपक्रम होय. महत्त्वाची गोष्ट म्हणजे प्रस्तुतच्या उत्तरकांडाची प्रत असलेली भावार्थरामायणाची संपूर्ण प्रत उपलब्ध व्हावयास पाहिजे. त्या दिशेनें प्रयत्न व्हावयास पाहिजेत. अशी संपूर्ण प्रत जेव्हां हस्तगत होईल तेव्हांच ग्रन्थपूर्तीच्या या घटनेवर अधिक स्पष्ट व असंदिग्ध असा प्रकाश पडेल. तोंपर्यंत आज हातीं असलेल्या या त्रोटक पोथींतील माहितीवरच विसंबणें भाग आहे. तीन ते सतरा अशा एकूण पंधरा अध्यायांतून दोन अडीच हजार मुक्तेश्वरी काव्याचा एक अमूल्य असा ठेवा आपणांस उपलब्ध झाला आहे. या उपलब्धीनें मुक्तेश्वराचीं आणखीं ग्रन्थरत्नें किंवा त्याच्या अपूर्ण भारताचीं पर्वे कालाच्या उदरांतून कधीं तरी अशींच बाहेर येतील हा आशादायक विचार मनांत येऊन गेल्यावांचून रहात नाहीं. कसून प्रयत्न मात्र झाले पाहिजेत. 'बहुरत्ना वसुंधरा' म्हणतातच. काय नेम सांगावा? आपलें उत्तरकांड

संपवितांना ग्रंथकर्त्यानें अर्थात मुक्तेश्वराने नाथांच्या भाषेंत पुढीलप्रमाणें ग्रन्थाचा समारोप केला आहे. आपणहि त्याच शब्दांत प्रस्तुतच्या लेखाचा समारोप करूं :- **लाऊनी नेणवेसी लग्न । ग्रंथ परि केला पूर्ण । संती देऊनी आशीर्वचन । विस्तारिला पाहिजे ॥९७॥ दक्षिणकुशी समुद्रोदरी । व्रण उदेला त्रिकुटगिरी । तोच ऋषी शास्त्र धारि । शस्त्रवैद्ये राघवे ॥९८॥ शल्य काढोनी रावण । आंशदे पिंड बिभिषण । भरूनी केले पटबंधन । कोटी कल्पे तुटेना ॥९९॥ निरोगी काढुनी ब्रह्म गोलु । आरोग्य केला लोक सकलु । नाममात्रे एक वेळु । जिव्हा आलुमाळ स्पर्शता ॥२००॥ येका जनार्दना शरण । उत्तरकांड रामायेण । संत कृपेनें जाले संपूर्ण । सकळ लोक तारक ॥१॥ पवित्र सरिता कृष्णवेणी । पंचगंगा समस्थानी । नृसिंहे सरस्वतीच्या चरणी । ग्रंथ प्रसाद लाधला ॥२॥ तेथ आली [illegible]णी । ग्रंथ पावावा प्रतिस्ठानी । येकनाथाचिये सदनी । विस्तारिले अनंसुखे ॥३ श्रद्धा भक्ति जे ऐकती । तया विष्णुलोकीची वस्ती । ऐसे बोलिले श्रीरघुपती । वालिमक साक्ष करूनिया ॥२०४॥ इति श्रीभावार्थरामायणे उत्तरकांडे येकाकारटीकायां श्रीराम निजधाम गमनो नाम सप्तदश प्रसंगः ॥**

## श्रीनरसिंहसरस्वतींच्या वाणीचा साक्षात्कार खरा ठरला

**ग्रंथ पावावा प्रतिष्ठानी । येकनाथाचिये सदनी ॥**

ही श्रीनरसिंहसरस्वतींची दृष्टांतरूपवाणी नाथांच्या पश्चात् आज साडेतीनशे वर्षांच्या दीर्घकालानंतर नाथसदनातून प्रसिद्ध होणाऱ्या श्रीएकनाथदर्शनातूनच खरी ठरावी हा जसा आनंददायक तसाच गमतीचाच योगायोग म्हटला पाहिजे. अवतारी सत्पुरुषांच्या वाणीचा साक्षात्कार हा सामान्य दृष्टीस अगोचर व अगम्य वाटला तरी तो योग्य कालीं खरा ठरल्याशिवाय रहात नाहीं ही गोष्ट नाथांच्या भावार्थरामायणावरील मुक्तेश्वराच्या या अभिनव ग्रन्थकृतीनें जनताजनार्दनाच्या प्रत्ययास आली आहे.

---

# एकनाथांची भाषाशैली • • • •

**प्रा. रामचंद्र कृष्ण लागू**, एम्. ए.
**पुणें २.**

एकनाथांची भाषाशैली म्हणजे एकनाथांची वाङ्मयमूर्ति होय. नाथाचे भागवत, रुक्मिणीस्वयंवर, भावार्थरामायण, तशींच त्यानीं लिहिलेलीं संतचरित्रे व आख्याने, त्याचे अभंग आणि त्यांनीं रचलेलीं भारुडें इत्यादि या सत्पुरुषाचें अफाट वाङ्मय वाचतांना पदोपदीं आपल्याला ग्रंथकर्त्याच्या निर्मल चारित्र्याची आणि साऱ्या विश्वाबद्दल त्याला वाटत असलेल्या कळकळीची आणि वात्सल्याची साक्ष पटते. नाथानीं निर्मिलेलें वाङ्मय हा त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचा फुलौरा असें आपण म्हटलें तर त्यात कसलीच अतिशयोक्ति होणार नाहीं. भागवत, रामायण, रुक्मिणीस्वयंवर वगैरे वाङ्मयकृती नाथाच्या मानसकन्या होत. ग्रंथकर्त्याच्या प्रतिभेचीं हीं नितान्तसुंदर अपत्यें वाचकांना आपल्या जन्मदात्याच्या मौलिक गुणाची सारखी आठवण करून देतात. श्रीयुत वि. ल. भावे यांनीं म्हटल्याप्रमाणें जसा कवि तशी त्याची भाषा. तो जें मनात येईल तें बोलतो, आणि जसे बोलतो तसे लिहितो. एकनाथाची भाषाशैली हें श्रीयुत भावे याच्या विधानाचे एक उत्कृष्ट निदर्शन म्हणून देतां येईल. सारांश काय, एकनाथ ही व्यक्ति आणि एकनाथाची भाषाशैली असा आपल्याला द्विधाभाव करता येणार नाहीं. कालिदासाच्या शब्दांत सांगायचें तर 'वागर्थाविव संपृक्तौ' असेंच त्याचें परस्पर नातें.

प्रतिभासंपन्न लेखकाची भाषा ही कांहीं त्यानीं आपल्या अंगाभोंवतीं लपेटलेली शालजोडी नव्हे कीं वाटेल तेव्हा त्याला ती काढून टाकता येईल किंवा मनास येईल तेव्हां पुनः अंगाभोंवतीं लपेटता येईल. मनुष्याच्या आंगची त्वचा जशी मनुष्याला उपजतच प्राप्त झालेली असते,

---

1 Style is not a coat to be put on and off, to be cut and changed, at the demands of fashion. It is the skin in which an author must live and die. ( A. MacMechan. )

तशीच विचार आणि विकार यांच्याबरोबरच भाषाशैलीचीहि निर्मिति होते. विचारांच्या आणि भावनांच्या विकासाबरोबरच भाषाशैलीचाही विकास होतो. दीपकळीपासून जसें तिचे तेज वेगळें राहूं शकत नाही त्याप्रमाणेच विचार आणि भावना यांच्या व्यतिरिक्त भाषाशैलीचे अस्तित्व असूं शकत नाही. एका[1] जगन्मान्य लेखकानें म्हटले आहे. "शब्द ही विचारांची प्रभा होय." ध्वनि आणि प्रतिध्वनि यांचा जो जिव्हाळयाचा संबंध तोच एकनाथ आणि त्याच्या भाषाशैलीचा.

धीरगंभीर, धीरोदात्त अशी नाथांची प्रकृति. आकाशाप्रमाणें विशाल आणि सर्वव्यापी असें त्यांचें मन. हा ब्राह्मण हा अब्राह्मण, हा शूद्र हा अतिशूद्र अशा प्रकारच्या विषमतेला त्यांनीं आपल्या मनांत कधीं थारा दिला नाहीं. श्राद्धाच्या दिवशीं ब्राह्मणाच्या आधीं अंत्यजांना बोलावून नाथांनीं त्यांना जेवण घातले. उन्हांत तळमळणाऱ्या महाराच्या मुलाचा शेंबूड आणि लाळ पुसून नाथांनीं त्या मुलाला त्याच्या आईबापां-कडे पोचतें केलें. तहानेनें व्याकूळ झालेल्या व्याधिग्रस्त गाढवाच्या तोंडांत नाथांनीं आपल्या कावडींतील गंगोदक घातलें आणि तेथेंच त्यांनीं आपली रामेश्वराची यात्रा संपविली. नाथांच्या भूतदयेला मर्यादा नव्हत्या, आणि त्यांच्या शांतीचा विचार मनांत आणला म्हणजे आपल्याला अथांग साग-राची आठवण होते. देवडीवरच्या यवनानें १०८ वेळां नाथांच्या अंगावर चूळ टाकली. १०८ वेळां नाथांनीं गंगेंत जाऊन स्नान केलें आणि अखेर अपकारकर्त्या त्या यवनाचे उपकार मानले. प्रपंचांत राहून नाथांनां प्रपंचाचा उद्वेग मानला नाहीं. गृहस्थाश्रमाचीं सर्व कर्तव्यें यथासांग पार पाडलीं. नाथाचा संसार म्हणजे कमळाच्या पानावरचा पाण्याचा थेंब. संसारांत राहूनही ते संसारापासून अलिप्त होते.

नाथांना विनोदाची देणगी होती आणि विनोद हें कल्पना-शक्तीचें अपत्य. यामुळें सृष्टींतील व्यवहारांचें निरीक्षण करतांना नाथांची दृष्टि कधीं एकांगी किंवा गढूळ झाली नाहीं. निवांत, संग्राहक, वसुधैव कुटुम्बकम् अशा तऱ्हेची त्यांची नित्याची वृत्ति. जगांतील हरएक व्यक्तीशीं त्यांनीं आपुलकीचें, बंधुत्वाचें नातें जोडले. **आत्मवत् सर्वभूतानि यःपश्यति**

1 Words are the light of thought. –Longinus.

स पश्यति हें नाथांचें ब्रीदवाक्य, तेव्हां त्यांच्या आयुष्यांत उलटसुलट, परस्पर असंबद्ध असें कांहींच सांपडणार नाहीं. नाथांच्या व्यक्तिमत्त्वाचें[1] वर्णन करावयाचे झालें तर तें अविकल, एकसंधी, सर्वांगपरिपूर्ण होतें असें आपण म्हणूं, कारण त्यांच्या या व्यक्तिमत्त्वाला ईश्वरभक्तीचें अधिष्ठान लाभलें होतें. अहोरात्र त्यांचें चित्त ईश्वरभजनांत, हरिगुणसंकीर्तनांत रमलेलें असे. **अद्वय भजनें अखंड स्मरणें वाजवि करटाळी** या नाथांनीं लिहिलेल्या ओळींत त्यांनीं आपल्याला त्यांच्या स्वतःच्या दैनंदिन कार्यक्रमाची माहिती करून दिली आहे.

नाथांच्या भाषाशैलींत त्यांच्या या अविकल, सर्वांगपूर्ण व्यक्तिमत्त्वाचा आविष्कार झालेला दिसून येईल. एखाद्या शान्तपणें, संथपणें वाहाणाऱ्या सरितेसारखी एकनाथांची भाषा. सहजता, सरलता, सुगमता, निर्मलता, वत्सलता, प्रेमलता या तिच्या गुणांमुळें वाचकाचें लक्ष तिच्याकडे ओढलें जातें. श्रीयुत पांगारकर एकनाथांच्या भाषेला गंगोघाची उपमा देतात. एकनाथाचा हा भाषेचा प्रवाह कधीं गढुळलेला दिसत नाहीं, तो कुठें अडखळत नाहीं, किंवा ठेचाळत नाहीं. वाटेत खडक आला तर त्याला हा प्रवाह वळसा घालून जातो, सपाट मैदानांतून वाहातांना तो सरळ, संथपणें वाहातो, तशीच कांटेरी झाडाझुडुपांतून किंवा रेताळ वाळवंटांतून वाहातांना त्याची गति सरळ आणि संथ असते. एकनाथांच्या भाषेचा हा प्रवाह वाटेंत येणाऱ्या अडथळ्यांना जुमानीत नाहीं. निर्भयपणें, आत्मविश्वासानें तो आपल्या ध्येयाची वाट कापीत जातो.

संस्कृत भाषेंत, उपनिषदांत, भगवद्गीतेंत, भागवतांत सांगितलेली वेदांतविद्या अशिक्षित, अज्ञानी, प्रपंचांतील आधिव्याधींनीं ग्रासलेल्या परंतु परमार्थाची ओढ लागलेल्या सामान्य जनांना सहज समजेल अशा भाषेंत उपलब्ध करून द्यायची हें नाथांचें एकमेव ध्येय आणि या एकाच ध्येयानें प्रेरित होऊन नाथांनीं आपले ग्रन्थ लिहिले. एथें—या ग्रन्थकर्तृत्वाच्या बाबतींत—मानाची अपेक्षा नाहीं, कीर्तीची लोलुपता नाहीं, धनाचें तर नांवहि घ्यायला नको. अशा लोकोद्धाराच्या उदात्त हेतूनें लिहिलेले काव्य निर्मळ आणि सोज्वळ निपजलें तर त्यांत नवल तें काय ?

---

1 He had a closely integrated personality.

**माझे वेडे वांकुडे आरुष बोल** असें जरी एकनाथांनीं आपल्या भाषाशैलीचें वर्णन केलें असलें तरी तें त्याचे नम्रतेचें बोलणे. **भवन्ति नम्रास्तरवः फलोद्गमैः** या ओळींत वर्णन केलेल्या विनीत वृत्तीचें ते एक उदाहरण. अक्षरशः त्याचा अर्थ लावायचा नाहीं. कालिदासानें नाहीं का म्हटलें **प्रांशुलभ्ये फले लोभादुद्बाहुरिव वामनः**, त्यामुळें कालिदासाची उंची कमी होती असे अनुमान काढणें वेडेपणाचे होईल. नाथाच्या भाषेत ज्याला वेडें वांकडें म्हणता येईल असें कांहीं सांपडणार नाहीं. एका सुसंस्कृत अभिजात कुळांत उत्पन्न झालेल्या उच्चवर्णीय पंडिताची ती वाणी. तिला आरुष हें विशेषण लावणें योग्य होणार नाहीं.

**हठादाकृष्टानां कतिपयपदानां रचयिता** या श्लोकांत वर्णन केलेल्या कविब्रुवांपैकीं एकनाथ नव्हत. त्यांच्या काव्यांत शब्दाची कसरत सापडणार नाहीं. एकाच क्षणीं पांचपांच सहासहा चेंडू हवेंत भिरकावून लीलेनें अचूक झेलणाऱ्या गारुड्याप्रमाणें शब्दचमत्कृतीचें, अनुप्रासाचे आणि अलंकारांचें इन्द्रजाल ते कधीं निर्माण करीत नाहींत. नाथांना अध्यात्मावें बाळकडू मिळालें होतें, म्हणून त्यांच्या वाङ्मयांत अर्थगौरवाची कधीं वाण भासत नाहीं. भागवताच्या अकराव्या स्कंधावरील टीका किंवा चतुःश्लोकी भागवतावरील टीका या दोन्ही ग्रंथांचा अध्यात्म हाच विषय, तेव्हां नाथांचें या ग्रंथावरील विवेचन अध्यात्मपर झालें तर तें क्रमप्राप्तच असें आपण म्हणूं. पण रुक्मिणीस्वयंवर, गौळणी, भारुडे वगैरे लिहिताना नाथांनीं वापरलेलीं रूपकें, तशाच त्यांच्या उपमा, अध्यात्माच्या परिभाषेंतून घेतलेल्या असतात. भावार्थरामायणांतसुद्धा अशा प्रकारच्या उपमांची आणि रूपकांची गर्दी उसळलेली आढळून येईल. नाथांच्या चित्ताला अध्यात्माचा एकच छंद, तेव्हां त्यांच्या वाङ्मयावर अध्यात्माची दाट छाया पसरलेली दिसून आल्यास त्यांत आश्चर्य करण्यासारखें कांहीं नाहीं. याच्याही पुढें एक पाऊल टाकून आपल्याला असे म्हणतां येईल कीं, **अध्यात्मविद्या विद्यानाम्** असा नाथांचा दृढ विश्वास, आणि प्रपंचाच्या जाळ्यांत गुरफटलेल्या जडजीवांना आत्मज्ञानाचा उपदेश करून त्यांना आपल्या निःश्रेयसाची—अन्तिम कल्याणाची—योग्य कल्पना आणून द्यावयाची हें त्यांचें जीवितकार्य. म्हणून त्यांनीं सरसहा अध्यात्माच्या परिभाषेचा उपयोग केला हें ओघानेंच आलें.

आत्मज्ञानाचा उपदेश संस्कृतांतून केला काय आणि मराठींतून केला काय, दोहोंची फलश्रुति एकच. चांदीच्या पेल्यांतून दिलें काय, नाहीं-तर पितळेच्या पेल्यांतून दिलें काय, अमृताच्या चवींत फरक होणार नाहीं. नाथांच्या भाषेंत सांगायचें म्हणजे **आतां संस्कृता किंवा प्राकृता। भाषा जाली जे हरिकथा। ते पावनचि तत्त्वतां। सत्य सर्वथा मानली** ॥. रुक्मिणीस्वयंवर, गौळणी, भारुडें अशा प्रकारचें नाथांच्या वाङ्मयाचें बाह्यरूप कसेंही असलें तरी त्यात अध्यात्माचें गूढ उकललेलें असते. भागवताच्या एकादश स्कंधावर टीका करून संस्कृत भाषेतलें अत्युच्च तत्त्वज्ञान नाथानीं सर्वांना समजेल अशा मराठी भाषेत विशद करून सांगितलें. मराठींत सांगितलें असले तरी त्यांत यत्किंचित् उणेपणा नाहीं. **शुद्ध मथितार्थ सोलींव** असें त्याचें नाथांनींच वर्णन केलें आहे. एका विश्व-वंद्य ग्रंथकारानें म्हटलें आहे कीं, लेखकाच्या विचाराची भूमिका तत्त्वज्ञान्याची असावी, परंतु त्यानें आपलें तत्त्वज्ञान स्पष्ट करून सांगतांना बहुजन समाजाला समजेल अशा भाषेचा उपयोग करावा. नाथाच्या वाङ्मयाचें कोणतेंही पान उलटून पाहिलें तरी वरील विधानाची प्रचीती आपल्याला येईल.

स्थूलमानानें, सामान्यत: बोलायचें म्हणजे एकनाथांची भाषाशैली वर सांगितल्याप्रमाणें आहे. तथापि प्रशांत, गंभीर, निश्चल अशा जलाशया-वर वेळोवेळीं भीषण लाटाचें थैमानही आपण पाहातों. सोसाट्याचा वारा वाहूं लागला, चक्री वादळानें आपला धिंगाणा सुरू केला कीं, एरवीं निश्चल असलेल्या जलाशयांतही आमूलाग्र क्रांतीची वावटळ सुरू होते. एकनाथांच्या भाषेची हीच स्थिति. निश्चल, अविकृत, एकाद्या निवांतस्थळीं तेवणाऱ्या दीपाप्रमाणें तिची स्थितप्रज्ञासारखी वृत्ति. तरी पण रुक्मिणीस्वयंवर, गौळणी, भारुडें, अर्जे, अर्जदस्त इत्यादि नानापरींचे वेष घेऊन ती आपल्या विविधतेची, वैचित्र्याची, कलाकुसरीची, रंगरंगोटीची साक्ष वाच-कांना पटवून देते. स्वच्छ धवल वर्णाच्या सूर्यकिरणांतही सप्तरंगाची चम-त्कृति दडून बसलेली असते. एकनाथांची भाषाशैलीही आपल्या अंतरंगां-

1. To write well, express yourself like the common people, but think like a wise man. —Aristotle.

तऱ्हा नानाविध वर्णच्छटा प्रकट करून वाचकांच्या मनाला मोह पाडते. तथापि पतंग आकाशांत कितीही उंच उंच भराऱ्या मारीत असला तरी त्याची दोरी पतंग उडविणाऱ्याच्या हातांत असते. तो नाचवील त्याप्रमाणें पतंगाला नाचावें लागतें. त्याचप्रमाणें नानापरींचीं वस्त्रेंभूषणें ल्यालेली नाथांची भाषाशैली आपल्या मूळच्या उद्दिष्टापासून दूर दूर गेली असें आपल्याला वाटलें, तरी सामान्य जनांना हरिभजनाची गोडी लावावी या तिच्या मूळ उद्दिष्टाचा तिला कधींही विसर पडला आहे असें आढळून येणार नाहीं. आपल्या लहरी मुलाला जेवूं घालतांना हा घास काऊचा, हा घास चिऊचा, हा देवबाप्पाचा अशीं नानाप्रकारचीं सोंगे आणून, हावभाव करून आई त्या मुलाचें जेवण आटोपते, तोच प्रकार नाथांच्या भाषाशैलीचा. गौळणी, अभंग, भारूड, गारूड अशा तऱ्हेनें तिची वेषभूषा बदललेली दिसली तरी अध्यात्माच्या, हरिभजनाच्या उद्दिष्टांत फरक होत नाहीं.

एकनाथांनीं लिहिलेल्या रुक्मिणीस्वयंवरात त्यांच्या भाषाशैलीच्या अनेकविध रंगच्छटांची शोभा आपल्याला पाहायला सांपडेल. नाथांचें हें स्वयंवरावरचें काव्य वाचतांना त्यांच्या अंगीं वसत असलेलें कथालेखकाचें चातुर्य आपल्याला अजमावतां येतें, आणि रुक्मिणीस्वयंवरासंबंधीं जें आपण म्हणूं तेंच त्यांच्या प्रल्हादचरित्र, सुदामाचरित्र वगैरे इतर चरित्रें आणि आख्यानें यांविषयींही आपल्याला म्हणतां येईल. नाथांची कथा गतिमान् असते. वाटेंत कुठे ती रेंगाळताना दिसणार नाहीं. उगाच ह्याच्याकडे लक्ष दे, त्याच्याकडे लक्ष दे, अशा तऱ्हेनें गमत रमत केव्हांतरी मुक्कामाला पोंचलें म्हणजे झालें असा बेदरकारपणा त्यांच्या कथेंत आढळून येणार नाहीं. आणि नाथांच्या या झपाझप् पाऊल उचलणाऱ्या कथेला अनुरूप अशी त्यांची भाषाही झपाझप् पाऊल उचलते. प्रसंगवर्णन, वस्तुवर्णन, स्वभावरेखन, विनोद, उपदेश इत्यादि कथेच्या आवश्यक अंगांना नाथ योग्य तो वाव देतात, आणि विस्कळितपणा, निरर्थक पाल्हाळ वगैरे दोषांचा आपल्या कथेला संपर्क होऊं नये याविषयींही ते दक्षता बाळगतात. त्याचप्रमाणें कथेच्या निरनिराळ्या अंगोपांगांशीं नाथांची भाषा तल्लीन झालेली असते. नाथांच्या व्यक्तिमत्त्वाचाच तो आविष्कार.

भीमकराजाची कन्या रुक्मिणी हिच्या विवाहाच्या वेळीं न बोलावतांच श्रीकृष्ण उपस्थित होतात, त्या प्रसंगाचें वर्णन नाथांच्या गतिमान्, झपाझप् पाऊल उचलणाऱ्या कथेचें एक उदाहरण म्हणून देता येईल. **भीमकी विवाह संभ्रम। पाहों आले कृष्णराम। हें परिसोन भीमकोत्तम। दर्शना सकाम उठिला॥ भेरी निशाण मृदंग। नाना वाजंत्रें अनेक। पूजासामग्री घेऊन सांग। समारंभेसी पैं आला॥ कृष्ण देखोनी सावधान। केलें साष्टांग नमन। कृष्णें दिधलें आलिंगन। विस्मित मन रायाचें॥ मूळेंवीण तूं आलासी। परमसुख हें आम्हांसी। शब्देंवीण तूं सोयरा होसी। तूं जाणसी ब्रह्मसूत्र॥ वरवरिष्ठ कृष्णदेवो। मनीं धरूनी हाचि भावो। मधुपर्क विधी पाहावो। पूजाविधान करितसे॥ नानापरींचीं उपायनें। वस्त्रें अलंकार भूषणें। अंगिकारिलीं श्रीकृष्णें। जीवींची खूण जाणोनी.** नाथांच्या कथानकाच्या द्रुतगतीचें हें एक उदाहरण. आणखी हवीं तितकीं देतां येतील.

श्रीकृष्णाच्या द्वारकेचें वर्णन करतांना नाथाचें हृदय आनन्दानें उचंबळून येतें. **द्वारकाबाह्यप्रदेशीं। आराम रमवी जीवशिवासी। वसंत निववी सदां सुमनेंसी। ताप कोणासी असेना॥ प्रेमें विकासलीं कमळें शुद्ध। गुंजारवती कृष्ण षट्पद। ऐकोनी गंधर्व जाहले स्तब्ध। सामवेद मौनावले॥ डोलती द्राक्षांचे पैं घड। मुक्त परिपाकें अतिगोड। सकळ कामाचें पुरे कोड। गोडाही गोड ते गोडी.** आणि श्रीकृष्णाच्या रूपाचें वर्णन करतांना तर नाथांची वाणी अमृत स्रवत आहे असें आपल्याला वाटतें. **अतिसुरंग चरणतळें। उपमे कठिण रातोत्पलें। बालसूर्याचेही उजाळे। तैसी कवळें टाचांचीं॥ पिळून इंद्रनीळकिळी। वोतली कृष्णतनू सांवळी। पाउलें सुकुमार कोंवळी। घोटीं निळीं दोन्हीं भागीं॥ जें जें अत्यंत सुंदर दिसे। तें तें कृष्णाचेनि लेशें। डोळिया तेणें लावलें पिसें। जाली मोरपिसें हरिअंगीं॥ कृष्ण पहावयां लोभा। नयनीं नयनांसी निघती जिभा। श्रवण श्रवणासी वल्लभा। अभिनव शोभा कृष्णाची॥**

प्रसंग जसा असेल, आणि कथेच्या अनुरोधानें प्रीति, क्रोध, ईर्ष्या, असूया इत्यादि विकारांचा जसजसा आविर्भाव होईल त्याप्रमाणें बदलणाऱ्या प्रसं-

गांना आणि मनोविकारांना साजेल असा नाथांच्या भाषेंतही बदल होतो. रुक्मिणीची कृष्णाविषयींची भावना व्यक्त करीत असतां नाथांना मृदुमधुर, अत्यन्त कोमल असे शब्द सुचतात. श्रीकृष्णाला पाठविलेल्या पत्रांत रुक्मिणी म्हणते: **मनें वाचा काया। निर्धारेंशीं तुझी जाया। मी झालेंसें यदुराया। विधिविवाह तुवां कीजे॥** आणि पुढें **मी तंव तुझेंचि अर्धांग। केविं शिशुपाळ शिवेल माझें अंग। तूं शिरावरी असतां श्रीरंग। मी वीरभाग यदुवीरा॥**

प्रेमाच्या, भक्तीच्या वात्सल्याच्या मृदुमृदुल भाषेवर नाथांचें प्रभुत्व होतें. त्याचप्रमाणें आवेशाच्या, क्रोधाच्या, त्वेषाच्या तीक्ष्ण, कटु, भेदक भाषाशैलीवरही नाथांचें स्वामित्व होतें. जेव्हां रुक्मी किंवा शिशुपाल यांचीं निर्भर्त्सना करायचा प्रसंग येतो, त्यावेळीं नाथांनीं वापरलेल्या शब्दांना अग्निस्फुलिंगाचीच उपमा शोभेल. गांवाच्या बाहेर अंबिकेच्या दर्शनाला न जातां एथल्या इथेंच विवाह उरकून टाकूं असें रुक्मीनें म्हटलें तेव्हा भीमकराजा त्याच्यावर उसळून त्याला म्हणतो— **राजा म्हणे कडकटा। व्यर्थ आलासी माझ्या पोटा। नव्हेसी वीरवृत्ती लाठा। अतिकरंटा नपुंसक॥**. तसेंच श्रीकृष्णांनीं रुक्मिणीचें हरण केल्यानंतर यादवांचें आणि रुक्मी, जरासंध वगैरे श्रीकृष्णाच्या प्रतिपक्ष्याचें युद्ध जुंपतें त्या युद्धाचें वर्णन करतांना नाथांच्या भाषेंत एकदम बदल होतो. नाथ लिहितात:— **वीर वीरांतें हाणत। लोहधुरोळा उधळत। वारिया वाट न चले तेथ। वीर अद्‌भुत मातले॥ शस्त्रेंसहित तोडिती कर। मुगुटेंसहित पाडिती शिर। गजांसहित मारिती वीर। सपिच्छी तीर भेदिले॥** बळराम नांगर घेऊन युद्धाला सरसावले त्या प्रसंगाचें खालीं दिलेलें वर्णन पाहा: **हल भवंडी चहुंकडा। वीर पाडिले दडदडां। नांगरें केला जो उवेढा। केशिक गाढा हांकिला॥ सैन्यावरी लोटला देख। ठायीं पाडिले सेनानायक। धरितां न धरवेची तवक। वीर अनेक मारिले॥ रथभूमीसी आफळी। गज शुंडादंडी पिळी। शिरें खेळत चेंडुफळी। रणखंदोळी मांडली॥** ही क्रोधाची, आवेशाची भाषा.

प्रेम तशीच वीरश्री आणखी इतर कोणती का भावना असेना, नाथांच्यासंबंधीं आपल्याला एवढें म्हणतां येईल कीं, या भावना व्यक्त

करतांना नाथांना योग्य शब्दांची, अलंकारांची, कसलीच वाण भासत नाहीं.

नर्मविनोदाचा प्रसंग असेल त्यावेळीं नाथांची भाषा एखाद्या मऊ मखमलीसारखी असते. त्याचे शब्द म्हणजे मंदस्मितच होय असें आपल्याला वाटतें. नाथानीं लिहिलेल्या सुदामचरित्रांत याचें एक उदाहरण आपल्याला सापडेल. सुदाम्यानीं आणलेल्या पोह्याचा एक घास कृष्णांनीं घेतला आणि त्याचा मोबदला म्हणून त्यानीं त्या गरीब ब्राह्मणाला सुवर्णनगरी दिली. आणखी दोनतीन घास घेतले तर त्याला त्रिभुवनाचें राज्य देऊन टाकतील अशी रुक्मिणीला भीति वाटली. तिनें कृष्णाचा हात धरला आणि म्हणाली **आम्हांसी तों कांहीं प्रसाद जी द्यावा । खूण ती केशवा कळली मनीं ॥** रुक्मिणीस्वयंवरांत नाव घेऊन तूं कृष्णाचा पाय माग असे रुक्मिणीला सांगितल्यावर या अनामाचें काय नाव घ्यावें असा तिला प्रश्न पडला. अखेर **वेगीं पाय दे गोपाळा**[1] असे ती म्हणाली; तेव्हां सर्वांनीं आनंदानें टाळी पिटली, आणि ते म्हणाले **भीमकीये भली केली रांडोळी.** रुक्मिणीस्वयंवरातच नाथांच्या विनोदाची एक मनोरम छटा आपल्या दृष्टीस पडेल. रुक्मिणीला रथांत घालून श्रीकृष्ण निघून गेल्यानंतर, रुक्मीच्या सैन्याचे आणि यादवांचें युद्ध जुंपलें. या युद्धांत वीरशाल्व बळिभद्रावर चालून आला, तेव्हा अक्रूर त्याच्या आड आला, बळिभद्राला हें आवडले नाहीं. अक्रूराकडे वळून तो त्याला म्हणाला: शाल्व माझ्यावर चालून आला. तूं कशाला मध्ये पडतोस? शाल्वाचा समाचार मी घेईन:– **शाल्व बापुडें तें काय । कौतुक पाहे पैं माझें.** भागवताच्या २३ व्या अध्यायांत कदर्यूची कथा सांगितली आहे. या कवडीचुंबकाच्या वृत्तीचे नाथानीं केलेले वर्णन वाचून कोणाहि वाचकाला हसूं येईल. नाथ म्हणतात:- **घरीचा भात वेंचेल कांहीं । यालागीं वैश्वदेव करणें नाहीं.** कधीं कोणाला भिक्षा घालायचा नाही म्हणून भिकाऱ्यानीं आणि अतिथीजनांनीं त्याचें घर वर्ज्य केलें होतें. त्याच्या कृपणपणाचा कळस म्हणजे **सणवार दिवाळी दसरा । तें जुने जोंधळे धाडी घरा.** या विनोदांत कडवटपणा आहे. उपहास आणि तिरस्कार यांचीही येथे आपल्याला प्रचीति येते.

---

१ गोपाळ म्हणजे इंद्रियाचा स्वामी, याच अर्थानें रुक्मिणीने गोपाळा असे नाव घेतले कृष्णालाच फक्त ते कळले इतरानी विनोद केला.

रुक्मिणीस्वयंवर नाथांच्या काव्यकथेचा उत्कृष्ट नमुना होय. गौळणी, अभंग आणि पदें हीं नाथांच्या भावगीतांचीं उदाहरणें. नाथांनीं रचलेल्या गौळणींत दिसून येणारें त्यांच्या भाषाशैलीचें अत्यंत मोहक रूप पाहून आपलें मन वेडावून जाते. श्रीकृष्णाच्या बाललीलांचें वर्णन करताना नाथांच्या आनंदाला पारावार राहात नाहीं. ते आपलें देहभान विसरून जातात. किंबहुना असें म्हटलें तरी चालेल कीं नाथांनीं या गौळणी लिहिल्या नाहींत; स्वतः सरस्वतीदेवीनें त्यांच्या हातांतली लेखणी घेऊन ही गौळणी रचण्याची कामगिरी आपणच पार पाडली. **भिंगाचें भिंगुलें खांद्यावर आंगुलें । नाचत तान्हेलें यशोदेचें ॥ कडदोरा विंदलीं, वाघनखें साजिरीं । नाचत श्रीहरी यशोदेचा ॥** हें एक नाथाच्या गौळणींचें उदाहरण. दुसऱ्या एका गौळणींत **गोकुळीं लाघव दावितो चक्रपाणी** अशी सुरुवात करून पुढें कृष्णाच्या नाचाचे वर्णन केले आहे. गोपींनी **नाच रे तूं कृष्णा, मज पाहूं दे नयनीं** असें म्हणतांक्षणींच तो सांवळा सुंदर कृष्ण नाचायला लागला आणि मग **सप्तही पाताळें नाचती हरिचिया छंदें । आकाश धरणी स्वर्गीं देव नाचती आनंदें ॥ वैकुंठ कैलास नाचती, चन्द्रसूर्य रसनायक दीप्ती ॥ ... शेष वासुकी नाचती सर्वेही फणिपाळ । ... उखळें जातीं मुसळें पाळें आणि देव्हारे** – सारें विश्व नाचायला लागलें. नाथांचें वृत्तही नाचायला लागलें. स्वतः नाथ आनंदानें बेहोष होऊन नाचताहेत असेंच आपल्याला वाटतें.

वेदांताचा उपदेश – अध्यात्म – हा नाथांच्या काव्याचा आत्मा होय. तथापि नाथांनीं लिहिलेल्या या गौळणींत अध्यात्माची आणि लौकिक व्यवहाराची जशी एकतानता झालेली आपल्या प्रत्ययास येते तशी ती इतरत्र क्वचितच् कुठे आढळेल. **आवरीं आवरीं आपुला हरी । दुबळ्याची केली चोरी** या गौळणींत वर सांगितल्याप्रमाणे वेदांताचा आणि लौकिक व्यवहाराचा मनोहर मिलाफ घडवून आणला आहे. नाथांची गौळण म्हणते : या कृष्णानें **कवाड भ्रांतीचें उघडिलें । कुलूप मायेचें मोडिलें ... संचित हें शिळें लोणी । याची केली धूळधाणी ... क्रियमाण दूधसाई । तीही मुखीं घोतली ... अखेर आप आपणां विसरलें । कृष्णस्वरूपीं मिळालें ॥** उत्तम काव्य म्हणतात तें यालाच. सैपा ब्राह्मी स्थिति :

**येथें शब्द, अलंकार, वृत्त, काव्य आणि काव्य-रचणारा कवि हीं सर्व एक-मेकांत लय पावलीं आहेत. कलेची समाधि जिला म्हणतात त्या समाधीचें हें उदाहरण.**

गौळणींप्रमाणेच नाथांनीं रचलेल्या अभंगांच्या भाषेचीही मोहिनी आपल्यावर पडते. पंढरीच्या विठ्ठलाचें वर्णन करताना नाथांच्या भावना त्याना आवरत नाहीत. **ब्रह्मानंदीं लागली टाळी तेथं देहातें कोण सांभाळी** अशा विदेही स्थितींत स्फुरलेलें हें काव्य नाथांच्या गौळणींशी स्पर्धा करावयाची हाव धरते. भावाबहिणींतली ही स्पर्धा. नाथांच्या मते पंढरीचा राणा आणि गोकुळीचा राजा हीं एकाच श्रीकृष्णाचीं दोन रूपें. **वैजयंती माळ किरीट कुंडलें। रूप तें सांवळें विटेवरी। वेधलें वो मन नाथांच्या चरणीं। होताती पारणीं डोळियांचीं** ॥ हा अभंग किंवा हा दुसरा **साजिरें सुंदर श्रीमुख पाहातां। नाठवे ती चिंता संसाराची। तो हा पांडुरंग विटेवरी उभा। त्रैलोक्याचा गाभा शोभतसे** ॥ अशा प्रकारच्या अभंगांत नाथांनीं द्वैताद्वैताचा मेळ घातला आहे हें सांगायला नकोच. **आनंद स्वानंद नित्य परमानंद। आनंदाचा कंद विटेवरी। एका जनार्दनीं देखिला तो डोळा। त्रिगुणावेगळा विटेवरी** ॥ हा अभंग द्वैताद्वैताच्या मिलाफाचें उदाहरण म्हणून द्यायला कांहीं हरकत नाही.

नाथांना जेव्हां आपल्या सद्‌गुरूची आठवण होते, जेव्हां ते आपल्या गुरुमाऊलीचें वर्णन करतात, तेव्हा त्याना गहिंवर येतो, आणि वर सांगितल्याप्रमाणें त्यांची उन्मनी अवस्था होते. **सांपडलों होतों भ्रमाचिया जाळीं। मायामोहकल्लोळीं भ्रमत होतों। परी जनार्दनें केलासें मोकळा। दवडुनी अवकळा आशातृष्णा ॥ मीनाचिये परी तळमळ संसारीं ॥ माझें माझें भोंवरीं दृढ धरीत ॥ तें परतें करूनी केलेंसें सरतें। आपणां परौते जाऊं नेदी। जनार्दनाचा एका लडिवाळ तान्हा। पाजी प्रेमपान्हा जनार्दन** ॥ त्याचप्रमाणें **वर्णावी ती थोरी एका सद्‌गुरुची। येरा मानवाची कामा नये ॥ सद्‌गुरु समर्थ कृपेचा सागर मनीं वारंवार आठवावा ॥ सद्‌गुरुचरणीं तल्लीन हे वृत्ति। वृत्तीची निवृत्ति क्षणमात्रें। एका जनार्दनी आठवी सद्‌गुरु। भवसिंधु-पार पावलासे** ॥ हीं नाथांच्या गुरुभक्तीचीं दोन उदाहरणें.

नाथांचीं पदेंहि त्यांच्या उत्कट भावनांनीं रंगलेलीं असतात. **मन रामीं रंगलें । अवघे मनचि राम झालें । सबाह्य अभ्यंतरी अवघें रामरूप कोंदलें ।** हें पद, किंवा **सगुण चरित्रें परमपवित्रें सादर वर्णावीं सज्जनवृंदें मनोभावें आधीं वंदावीं ॥** हें दुसरें. या दोन्ही पदांत नाथांच्या तल्लीनतेची, हरिभजनांत दंग झालेल्या, देहाची जाणीव नसलेल्या, त्यांच्या समाधिस्थ मनाची साक्ष आपल्याला पटते.

नाथांनीं लिहिलेल्या भारुडांत त्यांच्या नाट्यमय प्रतिभेचें आणि सृजनशील कल्पनाशक्तीचें अभिनव दृश्य आपल्याला पाहायला सांपडतें. नाथांचें एकेक भारुड म्हणजे नाटकांतला एक स्वतंत्र प्रवेश. वाघ्या, मुऱ्या, बाळसंतोष, मरीआई, सटवाई, महालक्ष्मी, अंबा, फकीर, डोंबारी, डौर इत्यादि भूमिका घेऊन नाथ हरएक भूमिका उत्कृष्ट तऱ्हेनें वठवून दाखवितात. डौर, डोंबारी, महालक्ष्मी वगैरे वर सांगितलेल्या सोंगापैकीं प्रत्येक सोंगाची भाषा निराळी, वेष निराळा आणि वृत्ति निराळी. तथापि वरवर जरी हीं सोंगे निरनिराळीं दिसलीं तरी या सर्वांचें अध्यात्मरूपी अंतरंग एकच. काहीं केलें तरी नाथ अध्यात्माला विसरायचें नाहींत.

भारुडाचें सोंग नाचवितांना कलाकुसरीला वाव असतो. शब्दचमत्कृतीलाहि येथें पुष्कळ अवसर मिळतो. भारुडाची भाषा रांगडी खरी, पण ज्याप्रकारचें सोंग तशी त्याची भाषा, असा अनुरूपतेचा, औचित्याचा विचार केला तर रांगडी भाषा हा अवगुण न होता भारुडाचा तो गुणविशेषच होय असें आपल्याला कबूल करावें लागेल.

अशिक्षित जनतेला उपदेश करायचा तर तिला परिचित अशा व्यक्तींची योजना करायला हवी, म्हणून नाथ जनतेच्या ओळखीच्या या डोंबारी मुऱ्या इत्यादि व्यक्तींना हाताशीं धरतात आणि त्यांच्यामार्फत ते आत्मज्ञानाचा उपदेश अडाणी जनतेच्या गळीं उतरवितात. वासुदेव, डोंबारी, गोंधळी वगैरे व्यक्ती वेदांताचा उपदेश करायला लागल्या म्हणजे अज्ञानी माणसालाहि वेदांत समजायला वेळ लागत नाहीं. अध्यात्माच्या [illegible] औषधासारखी नाथांनीं वासुदेव, बाळसंतोष, वगैरे लोकांचा जणूं काय [illegible] नाथांची प्रतिभा नाट्यप्रवण असल्यामुळें

१ बाळसंतोष. "[illegible]."

डोंबाऱ्याचें किंवा गोंधळ्याचें सोंग घेतलें कीं त्या क्षणापुरतें नाथ स्वतःच डोंबारी किंवा गोंधळी बनतात. डोंबाऱ्याच्या नाटकी बोलण्यानें, त्याच्या विचित्र हावभावांनीं आणि आरडाओरड करायच्या त्याच्या संवयीनें लोकांचें लक्ष त्याच्याकडे ओढलें जातें. नाचून, धामधूम माजवून, केलेला हा उपदेश जनतेला एकदम पटतो.

हा पाहा नाथांचा डोंबारी (म्हणजे स्वतः नाथच) तो काय म्हणतो तें ऐका :– **लगे ढोल, लगे ढोल। जरी तुझा वस्ताद खोल। तरीच मशीं घोल। नाहींतर वांया फोल॥ जाई जाई रे गव्हाऱ्या (पाव्हण्या).** कोल्हाट्याची भूमिका वठवीत असतां नाथ म्हणतात :– **आम्ही कोल्हाटी कोल्हाटी। आमची उडी उलटी सुलटी। शून्यस्थावर दिधली गांठी। न्यासजंगम केली उफराटी गा। सोहं सोहं वाजे ढोल। आमुचा युगायुगींचा खेळ। परब्रह्म भुललें अकळ। या खेळाचें गुरु जाणे मूळ॥** आतां बाळसंतोषाची भाषा पाहा. **पंच तत्त्वांचें अंगुलें। विषय भोगितां विटलें। वासना कसा जें तुटलें। तें मज देई कां वहिलें॥ प्रपंचभोग गेले भंगी। तेचि दे गा अंगीचे अंगीं। यालागीं नाचतसे रंगी। रंगीं रंगलों श्रीरंगीं॥** भुत्याची एक वेगळीच तऱ्हा. तो भवानीला म्हणतो:- **भवानी मी तुझा भुत्या खरा। अनुहत चवंडक वाजत धुमधुम। होतो घोष बरा॥ बोधाची परडी ज्ञानाचा संबळ। अज्ञान तो पोत बरा॥** यानंतर वाघ्याचें बोलणें ऐका :– **अहं वाघा सोहं वाघा प्रेम नगारा वारी। सावध होऊनी भजनीं लागा देव करा कैवारी॥** आतां हें महालक्ष्मीचें सोंग पाहा. याची काहीं निराळीच रीत. महालक्ष्मीला उद्देशून तिचा भक्त म्हणतो :– **नवखंड पृथ्वी तुझी चोळी। सप्त पाताळीं पाउलें गेलीं। एकवीस स्वर्ग मुगुटीं झळाळी॥** आणि पुढें **चारी पुरुषार्थ [illegible]। सनकादिक तेथें संवळी। तेहतीस कोटी भूतावळी। [illegible] सहस्र ऋषि मंडळी। दिवट्या पाजळोनि तिष्ठती। [illegible] द्वार उघड द्वार उघड॥ ... उदो उदो ऐसा शब्द गाजतो। कामक्रोध दैत्यावर कोरडा। कडाड्या वाजतो। [illegible]॥**

मागें [illegible] नाथांचें एकेक भारूड म्हणजे [illegible] रूपक असतें. [illegible] उपमालंकाराची अखेर [illegible]

रूपकालंकाराची बेसुमार आवड. कांहीं रूपके फुगडी, विटीदांडू, टिपरी, लगोऱ्या इत्यादि खेळावर बसविलीं आहेत, तर कांहीं बैल, गाय, पोपट, टिटवी, सर्प, विंचू, वटवाघुळ वगैरे हिंस्र आणि अहिंस्र प्राण्यावर आधारलेली आहेत. कधीं नाथ संन्यासी होतात, तर कधीं चोपदार, आणि कधीं आधळा, बहिरा, मुका, कुडमुड्या जोशी वगैरे व्यक्तींचें सोंग आणतात. येथेंहि उपदेशाला प्राधान्य. अध्यात्माचें मूळ कुठे सुटले नाहीं. रूपकाच्या आवरणाखालीं आत्मज्ञानाचा उपदेश. सर्पाच्या रूपकात नाथ म्हणतात :- **स्वरूपमंदिरीं होतें मी एकली । माया सांजवेळ अविद्येचे बिळीं । माझें तुझें चालतां पाउलीं । मोहो भुजंगें धरिली करांगुळी ॥ लोभ सर्पे डंखला करूं काय । स्वार्थसंपत्तीनें जड झाला पाय । आशालहरी तापला माझा देह । तृप्ति वारा घाली वो गुरुमाय ॥** विंचवावरच्या रूपकात पहिल्या ओवींतच विंचवाच्या दंशाचा उल्लेख आहे. **सहजीं सहज स्वयें स्थिती । स्वभावें भावना आतंक आली स्थिती । अलक्ष लक्षणा विकार उत्पत्ती । हा हां मज विंचवें खादलें अवचित्तीं ॥** कुत्र्यावरील रूपक नाथाच्या नाट्यमय प्रतिभेचे एक उत्कृष्ट निदर्शन म्हणून देतां येईल. कुत्र्याला हाक मारणारा ब्राह्मण म्हणतो :- **ये रे कुत्तु ये । आम्हां विटाळ करूं नको । आपली भाकर घे ॥** कुत्रा त्याला उत्तर देतो :- **दे रे धन्या दे । विटाळ राहिला तुजखालीं । आवरून आपला घे ॥** अशा तऱ्हेने या रूपकातला कुत्रा आपल्या सोवळ्या धन्याला वेदाताचें रहस्य समजावून सांगतो. **कुठें शिकलास रे बाबा हें तत्त्वज्ञान ।** असें धन्यानें विचारल्यावर तो कुत्रा म्हणतो :- **दुसरें कुठें ? सद्‌गुरूजवळ.**

नाथांनीं लिहिलेल्या जोहारांचा उपदेशपर रूपकांतच समावेश करणें योग्य होईल. या सर्व जोहारांत नाथ महाराची भूमिका घेऊन वेदांतावर प्रवचन करतात. हा महार कधीं निर्गुणपुरींचा असतो, कधीं तो विठू पाटलाचा सेवक होतो, कधीं सद्‌गुरुसाहेबाचा लेंकवळा महार, तर कधीं संतांघरचा महार. त्याचे धनी निराळे असले किंवा त्याच्या वस्तीचीं गावें निराळीं असलीं तरी त्याच्या उपदेशाचें सार एकच. काम, क्रोध, लोभ, दंभ, आशा, तृष्णा, मनीषा इत्यादि फसव्या लोकांच्या नादीं लागून आपलें सर्वस्व गमावून बसलेल्या जिवाजीपंतांना त्यांच्या मूळ स्वरूपाची

ओळख करून द्यायची. जोहारांच्या उपदेशाचें हेंच सार. **जोहार मायबाप जोहार। मी जनार्दनाचा एक महार। सांगतों तुमचें नगरीचा समाचार। तो ऐका की जी मायबाप॥ नगररचना केली। बारा वेशी तया ठेविली। नवखिडक्यांची चाली। तेथें ठेवीली कीं॥** हें एक जोहाराचें उदाहरण :— **जोहार मायबाप जोहार। तूं कोण्या गांवीचा महार। पुसाल जरी साचार। तरी सादर परिसा कीं जी मायबाप॥ निराकार माझा मूळचा ठिकाणा। भक्तासाठीं सोडिला जाणा। वस्ती करूं कायापुरीच्या खुणा। सांगेन की जी मायबाप॥** हें एक दुसरें जोहाराचें उदाहरण. नाथाच्या जोहारांत मनुष्यदेहावरचीं किती तरी रूपकें सांपडतील! कांहीं जोहार नाथानीं महारणीच्या तोंडीं घातले आहेत. **महारीण हिंडे गांवांत। पाटीलबावा आहेत झोपेंत।** पुढें ती महारीण म्हणते :— **मायबाप जोहार। मी सांगते तें ऐका साचार। तुमची नगरी करा हुषार। आतां येतील यमाजी हुद्देदार॥** जोहारांत सर्वत्र विनोदाची लयलूट असते. त्यामुळे विषय एकच असला तरी वाचक कंटाळून जात नाहीं.

अर्ज, आशिर्वादपत्र, विनंतीपत्र, अभयपत्र, ताकीदपत्र इत्यादि नाथांनीं लिहिलेल्या पत्रांत वेदांताचाच उपदेश केला आहे. **चिरंजीव जीवाजीपंत ठाणेदार यासी। वास्तव्य देहपूर। आत्मारामपंत याचा आशिर्वाद** हा आशिर्वादपत्राचा आरंभ. कऊल पत्रांत नाथ म्हणतात :— **चिरंजीव जिवाजीपंत ठाणेदार। यासी आत्मारामपंत कमावीसदार। कसबे ब्रह्मपुरी। आशिर्वाद उपरी॥** एकूण काय, चौकट निराळी, पण चौकटींतलें चित्र एकच. पत्ररूपानेहि वेदांताचा उपदेश.

एकाद्या अफाट, असीम सागरासारखें हे नाथांचें वाङ्मय. त्याचें थोडें फार दिग्दर्शन करूं म्हटलें तरी तीही कामगिरी अगदीं अल्पस्वल्प, सोपी नव्हे. मागें सांगितल्याप्रमाणे भागवत, भावार्थरामायण, अभंग, पदें, भारुडें इत्यादि नाथांच्या अनेकविध वाङमयाचा अभ्यास करणाऱ्या वाचकाला नाथांच्या पवित्र, पुण्यशील मूर्तीचें दर्शन घडते. विषय कोणचा का असेना, एकनाथ त्या विषयाला अध्यात्माचें रूप देऊन नंतरच तो वाचकापुढें मांडतात. रुक्मिणीस्वयंवर हें जीवाशिवाचें लग्न, श्रीकृष्ण पर-

मात्मा, तर रुक्मिणी त्याची चिच्छक्ति. राम म्हणजे आत्मतत्त्व, दशरथाचे चार पुत्र म्हणजे चार मोक्ष, शिवधनुर्भंग म्हणजे आत्मज्ञानानें होणारा मायेचा नाश – सर्वत्र नाथांचें वाङमय अध्यात्मपर रूपकांनीं आणि उपमांनीं व्यापलेलें आहे.

एका महनीय ग्रन्थकारानें म्हटलें आहे कीं रूपकांवर स्वामित्व असणें हें लेखकाच्या स्वयंस्फूर्त प्रतिमेचें लक्षण होय. दुसऱ्या एका ग्रन्थकाराचें म्हणणें असें कीं जेवढी भाषेची व्याप्ति तेवढीच रूपकाची. जेथें भाषा तेथें रूपक आणि रूपक तेथें भाषा असें समीकरण आपण बसविलें तरी हरकत नाहीं. एकनाथांच्या रूपकांचा विचार केला म्हणजे वर उल्लेख केलेल्या ग्रन्थकाराचें म्हणणें आपल्याला पटतें.

रुक्मिणीस्वयंवरांत श्रीकृष्णांनीं आपल्या सोयऱ्यांना ( भक्त, योगी ज्ञानी यांना ) वाहनें दिलीं. त्याचें वर्णन करतांना नाथ म्हणतात. : **एका सलोकतेचा वारू । एका समीपतारहंवरू । एका स्वरूपता कुंजरू महाथोर भद्रजाती** हें एक अध्यात्मपर रूपकाचें उदाहरण. श्रीकृष्णाच्या एकावळीच्या वर्णनांत एकनाथांनीं अशाच एका अध्यात्मपर रूपकाची योजना केली आहे– **ज्ञानवैराग्य शुक्तिसंपुटीं । निपजलीं मुक्तमोतियें गोमटीं । तेचि एकावळी कंठीं । श्रीकृष्णाचे शोभत ॥** अध्यात्मपर रूपका प्रमाणें नाथ वेळोवेळीं प्रापंचिक, व्यावहारिक रूपकेंहि वापरतात. **मस्तकींचें नील कुंतल । तेचि नभ अति सुनीळ । तळीं मुखचंद्र निर्मळ । भीमकीं मुखीं उगवला** हें अशा परिचित रूपकांचें एक उदाहरण. **एडका मदन । तो केवळ पंचानन । धडक मारिली शंकरा । केला ब्रम्ह्याचा मातेरा ।** हें दुसरें.

अध्यात्मपर आणि व्यावहारिक, परिचित रूपकें नाथ वापरतात, त्याचप्रमाणें ते योग्यप्रसंगीं अध्यात्मपर आणि व्यावहारिक, प्रापंचिक उपमांचाहि उपयोग करतात. रुक्मिणीच्या चार भावांनीं रुक्मिणीला श्रीकृष्णा-

---

1 But the greatest thing of all by far is to be a master of metaphor, it is the one thing that cannot be learned from others and it is also a sign of original genius. ARISTOTLE

2 Metaphor is as ultimate as speech itself, and speech as ultimate as thought. MIDDLETON MURRY

समोर आणली. त्याप्रसंगाचें नाथ कसें वर्णन करतात तें पाहा. **जैसी साधनचतुष्टयसंपत्ती। परमात्मया सन्मुख करी वृत्ती। तैसे चौघे बंधू घेउनि येती। कृष्णासन्मुख रुक्मिणी॥** हें अध्यात्मपर उपमेचें उदाहरण. खालील ओवींत प्रापंचिक उपमेचें उदाहरण सांपडेल. **भीमकें देखिले कृष्णासी। दृष्टि जडली त्या रूपासी। साखरेवरूनि नुठे माशी। तेवीं रायासी जाहलें॥** आपली निंदा करणारा आपल्याहून निराळा नाहीं. कुणी कुणावर रागावयाचें? **आपली जिव्हा आपुले दांतीं। रगडिली होय अवचितीं। तथा कोपाची अति प्राप्ति। कोणाप्रती करावी॥** हें आणखी एक व्यावहारिक उपमेचें उदाहरण.

नाथांच्या शब्दसंपत्तीचा विचार मनांत आला म्हणजे खाण्डववन दहनानंतर अर्जुनाला अग्नीनें दिलेल्या अक्षय्य भात्याची आठवण होते. येथेंहि अध्यात्माची परिभाषा आणि नित्याचे व्यावहारिक शब्द यांची सारखीच गर्दी उसळलेली दिसून येईल. अहंकार, अविद्या, श्रद्धा, विवेक वैराग्य, चारी पुरुषार्थ, चारी मुक्ति, निजबोध, आत्मस्थिति वगैरे शब्द नाथांच्या वाङमयांत प्रतिक्षणीं आपल्याला भेटतात. ही अध्यात्माची परिभाषा. तशीच निरनिराळ्या प्रसंगीं विचारांना आणि भावनांना अनुरूप अशा व्यवहारांतील शब्दांची योजना करण्यांत नाथांचा हातखंडा आहे. श्रीकृष्णाचें वर्णन ऐकून रुक्मिणीला मूर्च्छा आली. त्यावेळीं कोणी म्हणालें; **हे सुंदरा कृष्णकीर्तनें झडपली.** नटून थटून जात असतां राधा कशी दिसली, त्याचें वर्णन पहा. **वारियानें कुंडल हालें। डोळे मोडित राधा चाले.** कृष्णाच्या मुरलीचे स्वर ऐकतांच यमुनेची जी असहाय्य अवस्था झाली तिचें वर्णन करताना नाथ म्हणतात :- **भुलविलें वेणुनादें। वेणु वाजविली गोविंदें। पांगुळली यमुना.** या तीन ओव्यांतील झडपली, मोडित, पांगुळली या शब्दांचें आपण कौतुक करूं तेवढें थोडेंच होईल.

नाथांच्या वाङ्मयांत सर्वत्र आपल्याला त्यांच्या व्यक्तिमत्त्वाची प्रचीति येते हें आपण मागे पाहिलेंच आहे. त्यांच्या जीवनांत प्रपंचाची आणि परमार्थाची एकात्मता झाली होती, म्हणूनच त्यांच्या वाङ्मयांतहि प्रपंचपरमार्थाच्या एकात्मतेचा प्रत्यय आपल्याला येतो. नाथांच्या व्यक्तिमत्त्वाला परिसाची उपमा शोभेल. ज्या ज्या विषयाला या व्यक्तिमत्त्वाचा

स्पर्श होतो त्या त्या विषयाचें या व्यक्तिमत्त्वाच्या स्पर्शानें अस्सल, शंभर नंबरी सुवर्ण बनतें.

नाथांच्या सच्चरिताचें हें सामर्थ्य. एका जगद्विख्यात कवीनें म्हटलें आहे कीं जर आपण सुंदर काव्याची निर्मिती करावी असें आपल्याला वाटत असेल तर आपलें सर्व चरित्रच एक सुंदर काव्य होईल अशी दक्षता आपण बाळगावयास हवी. नाथांच्या वंदनीय, पुण्यश्लोक व्यक्तिमत्त्वाला उद्देशूनच जणूं काय प्रस्तुत कवीनें वर दिलेलें वाक्य लिहिलें असे आपल्याला वाटतें. डोळे दिपवून टाकणाऱ्या, मन स्तब्ध करणाऱ्या ज्ञानदेवींच्या भाषा-वैभवाचे मूळ ज्ञानदेवांच्या निरुपम व्यक्तिमत्त्वांतच सांठविलेलें आहे, नव्हे का? **संचारिणी दीपशिखेव** अशी आचार्यांची भाषाशैली. आचार्यांच्या प्रखर व्यक्तिमत्त्वातून निघालेली ती दीपकळी. सभोंवार पसरलेल्या अज्ञानांध-काराचा नाश करावयाची कामगिरी तिनें यशस्वी रीतीने पार पाडली. नाथांच्या भाषाशैलीसंबंधानेंहि आपल्याला हेंच विधान करता येईल. सभों-वार पसरलेल्या अज्ञानांधकाराचा तिनें नाश केला. तेजोमयी, दीप्तिमती असेंच नाथांच्या भाषाशैलीचें वर्णन करायला पाहिजे.

येथें असा कोणी प्रश्न विचारील कीं, नाथांच्या भाषाशैलीत तुम्हांला कांहीं दोष दिसून आले नाहींत का? याचें उत्तर हेंच कीं दोष आहेतच. भवभूतीनें ज्या सवित्याचें **कल्याणानां त्वमसि महसां भाजनं विश्वमूर्ते** असें वर्णन केलें आहे त्या सवित्याच्या तेजस्वी मुखमंडळावरहि काळे डाग आहेत. तसेंच नाथांच्या भाषासमुद्रांतहि पुनरुक्ति, पाल्हाळ गद्यप्राय पद्यपंक्ती, रचनाशैथिल्य, स्त्रियाविषयींची अनुदारता इत्यादि सुसर, मगर वगैरे हिंस्र प्राण्यांनीं आपला प्रवेश करून घेतला आहे आणि ठिकठिकाणीं हे प्राणी आपलीं डोकीं वर काढून वाचकांना भेडसावतात. नाथांची भाषाशैली नेहमींच कल्पनाशक्तीच्या दिव्यप्रभेनें न्हालेली नसते,

---

1. He who would not be frustrate of his hopes to write well hereafter in laudable things, ought himself to be a poem. Milton

2. The very source and fount of Day
Is dash'd with wandering isles of night. Tennyson.

आणि नाथांच्या तत्त्वज्ञानाचा आपल्या विसाव्या शतकाच्या विचारप्रणालीशीं मेळ घालता येणार नाहीं. सध्यांचीं आपलीं जीवनाचीं मूल्यें निराळीं, आणि नाथाचीं ध्येयें निराळीं. सर्वाभूतीं समता, दया, क्षमा, शान्ति, परोपकार इत्यादि कल्पनाचें आपण विसाव्या शतकातहि आनंदानें स्वागत करतो. पण दुर्लभ नरदेहाची प्राप्ति झाल्यावर, वैराग्याचा आश्रय करून भगवद्भक्तीच्या मार्गानें मोक्षाची साधना करायची हें एकनाथाचें तत्त्वज्ञान सध्या आपल्याला सर्वांनाच मान्य होईल असें नाहीं. तरी पण प्राचीन कवींच्या ग्रंथाचें मूल्यमापन करताना ज्या युगात कवि जन्मला त्या युगाचीं ध्येयें आणि त्या काळच्या समजुती याचा विचार करणें अवश्य होय. नाहींतर आपण त्या प्राचीन कवींच्यावर फार मोठा अन्याय केल्यासारखे होईल. वाङ्मयात शाश्वत मूल्यें असणारच, आणि या दृष्टीनें आपण श्रेष्ठ कनिष्ठ, तर तम असा भेदभाव करतो. इथें आपल्याला जगा या वाङ्मयाचा विचार करता येणार नाहीं. तथापि सर्व विश्व प्रकाशमय करून सोडणाऱ्या ज्ञानदेवाच्या भाषाशैलीला सूर्याची उपमा देणें योग्य होईल असें आपल्याला वाटलें, म्हणजे नाथांच्या भाषाशैलीची अमृतकिरणांचा वर्षाव करणाऱ्या चन्द्राशीं तुलना करणें हेहि वस्तुस्थितीला धरूनच होईल.

---

# एकनाथांचें हस्ताक्षर असेंच असेल काय?

श्री दत्तो वामन पोतदार, पुणें.

तसें पाहिलें तर श्रीएकनाथाचे चरित्राविषयीं अगदीं विश्वसनीय अशी कितीशी माहिती आपणांस या क्षणापावेतों उपलब्ध झाली आहे? त्यांचें कुळ, त्यांची वंशावळ, त्याचे ग्रंथ, कांहीं ग्रंथाचे काल, त्यांचा प्रयाण-शक त्यांचे गुरु, कांहीं शिष्य, अशा अगदीं मोजक्या गोष्टी निश्चित म्हणून म्हणतां येतील. पण त्यांचा जन्मशक, त्यांची गुरुसेवा, शिक्षण, विवाह, तीर्थयात्रा वगैरे ज्या गोष्टी त्यांच्या चरित्रांत आढळतात त्यांत भक्तिभावानें लिहिलेल्या कथांचीच रेलचेल आहे. मग नाथाचें हस्ताक्षर आपणांस अद्यापि मिळालें नाहीं यांत नवल नाही.

काही वर्षांमागें पैठणास श्रीशिवदिनकेसरीमठांतील गळाठा व संग्रह पहात असतां त्यांत प्रत्यक्ष एकनाथांच्या नातवाच्या हातचा लिहिलेली एक पोथी आढळली. ही संस्कृत भाषेंत लिहिलेली अंत्येष्टि विषयाची पोथी आहे. शेवटच्या पानावर आहिताग्निमरणविधि आलेला आहे. ज्या पक्षीं एकनाथाच्या नातवानें ही पोथी आपल्या हातानें उतरून घेतली आहे त्या अर्थीं तिचा उपयोग पडेल असा उद्योग हा नातू करीत असला पाहिजे. नाथांच्या इतक्या निकट संबंधीयाचें हस्ताक्षर असें हेच आणि प्रथमच पुढें येत आहे.

या पोथींतील शेवटच्या पानाची समाकारी प्रतिमाच आम्ही सोबत जोडिली आहे. त्यामुळें नाथाच्या नातवाचें हस्ताक्षर प्रत्यक्ष आपणांस पाहता येईल. या पानातील पुढील महत्त्वाच्या उल्लेखाकडे वाचकांनी लक्ष पुरवावें........

**॥ इत्याहिताग्निमरणविधिः ॥**

**शके १५६८ व्ययसंवत्सरे आषाढ कृष्णैकादश्यां सोमवासरे**

**प्रतिष्ठान निवासि**

**नाएकनाथपौत्रेण हरिपंडितानां पुत्रेण रघुनाथेन इदं अंत्येष्टि पुस्तकं स्वहस्तेनैव स्वार्थं परार्थेच लिखितं ॥ शु भ म स्तु ॥छ॥छ॥छ॥**

नाथांचे नातू रघुनाथ हरि यांचे हस्ताक्षर

न्या निपात्राणि यथा कामं योजयेत् । कर्म शेषं समाप्य कर्त्ता परि कर्मिणः प्रेष्यति
युगपदग्नीन्प्रज्वळयेत् । ततः कर्म शेषं समापयेत् । आहवनीयस्य प्रथमं प्रेत
संबंधे प्रेतस्य स्वर्ग प्राप्तिः तत्पुत्रस्य लक्ष्मी वृद्धि फळं । गार्हपत्यस्य प्रथमं प्रेतसंब
धे प्रेतस्य अंतरिक्ष लोक प्राप्तिः । दक्षिणाग्नेः प्रथमं प्रेतसंबंधे प्रेतस्य मनु
ष्य लोकं प्राप्तिः । उभयत्र तत्पुत्र ऋद्धि फळं प्रथमाह्निकादि पिंडदानानि दाद
शाहांतं यथा विधि समापयेत् ॥ ॥ इत्याहिताग्निमरण विधिः ॥ छ ॥ ॥ छ ॥

६२

शके १५६८ व्यय संवत्सरे आषाढ कृष्णैकादश्यां सोमवासरे प्रतिष्ठाननिवासि
ना एकनाथ पौत्रेण हरि पंडितानां पुत्रेण रघुनाथेन इदं अंत्येष्टि पुस्तकं
स्व हस्तेनेव स्वार्थं परार्थं च लिखितं ॥ शुभमस्तु ॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥

: श्रीनाथ मठ — पैठण — क्र. दत्तो वामन पोतदार, पुणे :
एकनाथांचे नातू, हरिपंडितांचे पुत्र रघुनाथांचे हस्ताक्षर

(म. म. दत्तो वामन पोतदार याचे कृपेने)

यांतील उल्लेख अगदीं स्पष्ट आहे. हें शेवटचें ६२ वें पृष्ठ आहे. त्यांत नाथांचा नातू रघुनाथ यानें 'स्वहस्तेन'—आपल्याच हातानें—ही पोथी आपण उतरून घेतली असें स्वच्छच त्यानें सांगितलें आहे. शिवाय आपण कोण ही ओळख सांगतांना आपले वडील 'हरिपंडित' आणि आपले आजोबा 'एकनाथ' या दोघांचा निर्देश त्यानें अभिमानानें केला आहे. इतका स्पष्ट निर्देश त्यानें केला असल्यानेंच आपण आज निःशंक-पणें निर्णय म्हणून सांगूं शकतों कीं ही पोथी 'प्रतिष्ठान'चा म्हणजे पैठ-णचा रहिवासी, एकनाथांचा "पौत्र", 'हरिपंडितां'चा पुत्र रघुनाथ याणें आपल्या हातानें शके १५६८ त लिहिली.

पोथीलेखनाची शकमिति नोंदली आहे ती खरे-जंत्रीवरून तपासतां अगदीं बरोबर येते. शके १५६८ व्ययसंवत्सरी आषाढी दुसरी एकादशी, सोमवार, या दिवशीं ही पोथी रघुनाथ हरिपंडित यानें लिहून संपविली. १५६८ च्या आषाढ वद्य ११ ला सोमवार येतो. या दिवसाची इंग्रजी तारीख २९ जून इ. स. १६४६ आणि मुसलमानी तारीख २५ जमादिल-अव्वल सुहुर सबा अर्बैन व अलफ अशा येतात.

हें हस्ताक्षर पाहिल्यापासून मनांत कल्पना येऊन बसली आहे कीं, न जाणों एकनाथांच्या अक्षराचें हेंच वळण असेल काय? पुष्कळदां असें पाहण्यांत येतें कीं एका घरात अक्षराचें एकादे वळण वंशपरंपरेनें चालत येतें. चिटणीस घराण्याची तशीच प्रसिद्धि आहे. समर्थभक्त शंकर-राव देव आणि त्यांचे चिरंजीव कै. आबा, किंवा कै. न. चिं. केळकर आणि त्यांचे चिरंजीव श्री. अण्णा अथवा बापू यांच्यांत अक्षराच्या वळणाचें फार साम्य आहे. बापाचें अक्षर चांगलें असलें म्हणजे पूर्वींच्या काळीं रोज सकाळीं खडर्यावर अक्षर घटविण्यासाठीं बसतांना तोच कित्ता घालून मिळे व तो गिरवावा लागे! अशा वेळीं बापलेकांची अक्षरें एका छापाचीं, अगदीं प्रतिमा म्हणावी तशीं उतरत असतात हा अनुभव सार्वत्रिक आहे. नाथांच्या घरांत असेंच घडलें असेल काय? असेल तर रघुनाथाचें अक्षर नाथांच्या अक्षराचीच प्रतिमा असूं शकेल. असें साम्य वळणांत गृहीत धरणें ही एक कल्पना आहे. हा कांहीं निश्चित पुरावा नव्हे. पण कल्पना असली तरी संभाव्य व सुसंगतपणा तींत आहे. एवढें तरी निदान म्हणतां

येईल कीं नाथाचें अक्षर असें असूं शकेल. आहे असें तर म्हणतां याव-याचेंच नाहीं; पण तितकेंच नाहीं असेंहि म्हणता यावयाचें नाहीं.

रघुनाथ असें ज्याने आपलें नांव स्वहस्तानें पोथींत लिहिलें आहे त्यालाच उद्देशून 'राघोबा' असे नाथचरित्रकार म्हणतात हेंहि ग्राह्य होण्यासारखें आहे. हा राघोबा हरिपंडितांचा सर्वांत धाकटा मुलगा. परंपरा अशी कीं हरिपंडित नाथांशी न पटून काशीस निघून गेले. तिकडे त्यांनीं आपलीं दोन वडील मुलेंहि बरोबर नेलीं; तिसरा 'राघव' नाथांजवळ राहिला. तो नाथाचे मागे कीर्तनांत उभा राहून धृपद धरीत असे. पुढें नाथांनीं काशीस जाऊन हरिपंडितांची समजावीस करून त्यास परत घरीं आणिलें.

या परंपरेचा अर्थ असा होतो कीं नाथनिर्याणाचे वेळीं राघोबा निदान १५।२० वर्षांहून लहान नसावा. हा राघोबा शके १५६८ त बिनकांपरें सुरेख वळणदार अक्षर ज्या अर्थी काढतो, त्या अर्थी राघोबाचा जन्म शके १५०० च्या फार मागें नेतां येणार नाहीं. हरिपंडिताचा हा तिसरा मुलगा म्हणून हरिपंडिताचा जन्म १४७० चा तरी धरणें प्रशस्त होईल. आणि हरिपंडित नाथांस मुलींच्या पाठीवर झाला तेव्हां नाथांचा जन्म १४५० च्या नंतर मानणे चुकीचें ठरेल.

बरे, इतके सगळें मानिलेंच तर मग नाथ १२ व्या वर्षी पळून गेले, मग जनार्दनस्वामींची सेवा करून गुरुप्रसाद त्यांनी मिळविला, मग ते उत्तरदक्षिण तीर्थयात्रा करून आले, मग त्यांनीं विवाह केला हा सर्व कथाभाग वीस वर्षांत कोंबावा लागतो. पण कोंबणार कसा? कोंबला तर सातआठ वर्षांत गुरुसेवा, युद्ध, हिशेबाची चूक, तीर्थयात्रा, वैराग्य, विवाह आणि पुत्रप्राप्ति एवढें सर्व सुसंगतपणें बसल्यासारखें वाटतें काय? त्या काळचा विचार केला तर नाथाचें लग्न अकराव्या बाराव्या वर्षीच झालें असावें. ते पळून देवगिरीस गेले असतील तर लग्न झाल्यावर! लग्न मागाहून केलें ही कथा मग टाकावी लागेल.

जें काय नाथांचे चरित्र बसवावयाचे तें पुढील पक्के ठरलेले काळ-निर्णय समोर ठेवूनच बसविलें पाहिजे. रुक्मिणीस्वयंवर शके १४९३ त आणि शके १४९५ त भागवत. भागवताच्या वेळीं काशीस सुमारें दोन

वर्षे मुक्काम. शके १५२१ त नाथाचें निर्याण आणि आज नवें कळतें कीं नाथाचा अवलादी नातू रघुनाथ अथवा राघव यानें १५६८ त अंत्येष्टि पोथी लिहून घेतली.

परंपरेतून आलेल्या कथाचा गाथा एकत्र केला तर पटील गोष्टी बडल्याचें गृहीत धरण्यास अडचण येऊं नये.

(१) नाथांनीं देवगिरीच्या जनार्दनस्वामींचा गुरूपदेश घेतला.

(२) नाथ एक आदर्श गृहस्थाश्रमी होते.

(३) नाथांना गिरिजाबाईपासून प्रथम एक मुलगी (गोदा-लीला) नंतर मुलगा हरिपंडित आणि नंतर एक मुलगी गंगा—मुलींची नांवें व संख्या नीट ठरविली पाहिजे. एका मुलीचा वंश कर्नाटकांत—एकीचा मुलगा प्रसिद्ध मुक्तेश्वर.

(४) नाथांनीं रुक्मिणीस्वयंवर रचिलें शके १४९३
„ भागवत एकाकारटीका रचिली शके १४९५
„ भागवतटीका प्रारंभ पैठण, संपूर्ण वाराणसी.
याबरून नाथ वाराणशीं १४९४ ते ९५ असले पाहिजेत.

(५) नाथांचा मुलगा हरिपंडित हा शास्त्री होता. याला तीन मुलें नाथांच्या ह्यातींतच झालीं. यावरून तो चांगला वयस्कर असला पाहिजे. कांहीं वर्षे तरी तो काशींत होता. तेथें त्यानें घरहि केलें असावें. पुढें नाथांच्या आग्रहावरून काशीहून पैठणास परत आला.

(६) नाथांकडून ज्ञानेश्वरी - शोधन शके १५०६

(७) नाथांचें निर्याण शके १५२१ अखेर झालें.

एखादा काल्पनिक पण सुसंगत वाटणारा नाथचरित्रक्रमाचा आराखडा बसवावयाचा तर वरील गोष्टी प्रमाण धरून असा बसूं शकेल व तो शोभूनहि जाईल. पण कल्पनेवर पोसलेला, हें मोठेंच वैगुण्य.

नाथजन्म शके १४४०

नाथविवाह शके १४५२ कदाचित एक प्रथम स्त्री मेली असावी. मग वैराग्य. पण विवाहाला ही वेळ कल्पनेनें टाकावी, उचित दिसण्यासारखी आहे.

देवगिरीप्रयाण - सेवा, गुरुप्रसाद - शके १४५२ - १४६०
विवाह दुसरा कल्पिला तर तो शके १४६० ला कल्पावा.

हरिपंडित जन्म शके १४६५

यास तीन मुलगे-नंतर काशीस प्रयाण शके १४८५ ते १४९५
- नाथ हरिपंडिताची समजूत घालण्यासाठीं काशीस जातात, राहतात, हरिपंडितास परत आणतात.

१४९६ - १५०५ - प्रचार, ज्ञानेश्वरीसंशोधन.

१५०६ - —— - ज्ञानेश्वरीसंशोधन पूर्ण.

१५०७ - १५२१ - भावार्थरामायणरचना - गृहस्थाश्रम पुढें चालू हरिभक्ति प्रचार - निर्याण.

१५६८ - नातू रघुनाथ पैठणास पोथीलेखन करतो.

निश्चित ज्या घटना व काळवर्षे आहेत त्या खुंट्या आधीं मारून मग त्यांत चरित्राचा सुसंगत व विश्वसनीय आराखडा बसविला पाहिजे.

प्रत्यक्ष पैठणांत जर मला १५६८ चें प्रस्तुतचें पान मिळालें तर अशीं मोलाचीं साधनें पैठण देवगिरी भागांत आणखी पुष्कळ कां मिळण्याचा संभव नाहीं ? प्रत्यक्ष पैठणकरांच्या घराण्याचे भाऊबंदकीचे वादाचे कागद, भोगवट्याचे कागद, तीर्थोपाध्यायांना दिलेले लेख, शरीरसंबंध जुडलेलीं घराणीं, त्यांचे तसेच लेख, देव, दैवतें, कुळाचार, कुळधर्म, समकालीनांचे ग्रंथ, समकालीन वंशांचे इतिहास, पुणें पेशवेदप्तराची झडती, निजामी दप्तरखान्याची झडती, काशी, आळंदी, पंढरपूर, वगैरे संबद्ध स्थळीं कसून संशोधन, शिष्यप्रशिष्यांचें घरीं - मठीं तपास, आप्तेष्टांचा शोध व तेथें साधनसंशोधन इत्यादि सर्वांगीण प्रयत्नांची योजना होऊन जेव्हां माहिती हातीं येईल तेव्हां बऱ्याच संशयांचा उच्छेद होईल आणि वास्तव नाथचरित्र हातीं येईल म्हणून **आधीं नाथसंशोधन** आणि **मग तेव्हांच** खरें **नाथदर्शन** हा क्रम ध्यानांत ठेवून सर्वांनीं यत्न करावा.

---

# नाथांच्या काव्याची बैठक व त्याचा उठाव

श्री. डॉ. के. ना. वाटवे, पुणें.

मराठी संतवाङ्मयाला 'काव्य' म्हणतांना तसें म्हणणाऱ्यानें विशेष दक्षता घेणें आवश्यक आहे. कारण ज्या हेतूनें प्रेरित होऊन संतांनीं ही रचना केली, त्यांत जे विषय आणले, व त्याच्या वाचनाचे जे परिणाम त्यांनीं मनांत भाविले त्यांवरून संस्कृत साहित्यशास्त्रांत ज्याला साहित्य किंवा काव्य म्हणतात तसल्याच स्वरूपाचें सर्व मराठी वाङ्मय नाहीं. मराठी वाङ्मय ही निव्वळ संस्कृत साहित्याची शाखा नसून ती संस्कृत अध्यात्मपर वाङ्मयाची शाखा आहे. अध्यात्म, ईशभक्ति, वैराग्य व सर्वसामान्यपणें धार्मिकता हीं त्यांतील मुख्य प्रतिपाद्यें आहेत. व त्यांच्या अनुषंगानेंच रामायण, महाभारत व भागवत यांतील कथाभाग रंगविण्यांत आलेले आहेत. संतकवींनीं त्यांतल्या त्यांत अध्यात्मावर व कलाकवि आख्यानकवि किंवा पंडितकवि यांनीं त्यांतल्या त्यांत आख्यानांवर भर दिलेला आहे. तरी हें सर्व वाङ्मय धार्मिक आहे. लौकिक नव्हे. त्याची दृष्टि बोधप्रधान आहे. तें निव्वळ रंजनासाठीं नाहीं. क्रिया पालटण्यासाठीं आहे. म्हणून नाथांनीं संस्कृत पद्धतीच्या विदग्ध आणि लौकिक काव्यरचनेला 'काव्यनाटक अलंकार' या सदरांत घालून लौकिक ध्येयानें प्रेरित होऊन काव्य करणाऱ्या कवीश्वरांच्या छंदाला 'कवितापिसें' म्हणजे काव्याचें शुद्ध वेड म्हटले आहे. (ए. भा. १४-६६-६७). ज्ञानेश्वरसुद्धां साध्या काव्याला 'काव्यनाटक' असा जोड शब्द वापरून त्याची निराळी म्हणजे खालची पायरी दर्शवितात. ( ज्ञा. १ - ७ व १३-८३२ ). लौकिक काव्य हें या दोघांच्याहि मतें काव्य नाटकादि केवळ चातुर्ययुक्त रचनेच्या जोडीस बसवितां येण्यासारखें असतें. त्यांना असलें काव्य काव्य म्हणून संमत नव्हतें.

याचा अर्थ काव्यांतलीं कलाकुसर, रसवत्ता, अलंकार हे त्यांना नको होते असें नाहीं. पण त्यांचा पहिला कटाक्ष होता तो अध्यात्मावर. अध्यात्म, भक्ति, वैराग्य वगैरे प्रतिपादन करील तें काव्य. मोक्ष हें त्याचें

प्रयोजन, साधुता, सात्त्विकता व मनःप्रसाद हा त्याचा परिणाम. व परमेश्वराचा प्रसाद किंवा गुरूचा अनुग्रह हें तसलें काव्य निष्पन्न होण्याचे जनक कारण. इतर गोष्टी विद्वत्ता, कला, ज्ञान वगैरे साधतील तशा व साधतील तेवढया ग्राह्य हें धोरण स्पष्ट करणारीं नाथग्रंथातील पुढील वचने पहावीं. म्हणजे त्यांच्या काव्याची बैठक थोडीबहुत स्पष्ट होईल :—

हे जनार्दन कवितावाडी । ब्रह्मरसें रसाळ गाढी ।
जे जनार्दनें लाविली गोडी । ते चवी न सोडी ग्रंथार्थं

(ए - भा २९ - १०३४)

तो हा एकादशा ऐसा ग्रंथ । येथ ठाक ठोक परमार्थ ।
येणें महाकवि समस्त । निज हितार्थ पावले ।
तेवीं महाकवींच्या अनुभवांत । प्राकृतीं परमार्थ मीहि लाभे ।

(ए - भा. २९ - १०३६ - १०४९)

यालागीं करतां गुरुभक्ती । प्राप्त होइजे भागवतार्थी ।
तेथ काव्यादि व्युत्पत्ती । नाना युक्ती किमर्थ ?

(ए भा १६ - १३ - १४)

महाकवि वर्णिता कृष्णकीर्ति । पावले परम सभाग्य स्थिति ।
कवीश्वरा नवरसिकू । नवरंगडा श्रीकृष्ण एकू ।
श्रीकृष्ण कीर्ति पवाडे । ज्याची वाणी अबद्ध पडे ।
ते वाचा वानिजे चंद्रचूडें । त्याच्या पायांपडे यम काळ
कवीश्वरांची कृष्णकीर्ति । ऐकतां वाढे श्रद्धाप्रीति ।
तेणें थोरावे कृष्णभक्ति । ते कविताशक्ति अगाध ।

(ए भा ३०.३६ - ४२)

गगनीं उगवला अंशुमाळी । जेवि विकासिजे नवकमळीं ।
तेवीं जनार्दन कृपांमेळी । कवित्व - नवाळी विलासे ।

(ए भा. १६ - ७२)

शास्त्र श्रवण पुराणस्थिती । पाहिजे पंचमी सप्तमी व्युत्पत्ती ।
पढता अबद्ध नाम कीर्ति । भगवत्प्राप्ति प्रापक ।
देवासि प्रेमाचें पढिये कोड । न पाहे व्युत्पत्तीचे काबाड ।
भावार्थ भाविकांचा गोड । तेणें भक्ताची भीड नुलंघी देवो ।

(ए भा. २७.३४५ - ४८)

[ तसेंच ए. भा. ११.१८ व ५२४.५३५ – ५५२ पहा ]

एकनाथीभागवत हा ग्रंथ बोलून चालून परमार्थपर म्हणून त्यांत वरील उद्गार शोभतात, असें कोणी म्हणेल यासाठीं भावार्थरामायण व रुक्मिणीस्वयंवर हे जे काव्यानुकूल आख्यानात्रील ग्रंथ त्यांतीलहि याच अर्थाचे उतारे पुढें देतों.

अफाट न करावा ग्रंथ । ग्रंथीं बोलावा मुख्यार्थ ।
परी दावावा परमार्थ । हा निजस्वार्थ कवनाचा ।

( भा. रा. १.११८ )

ग्रंथीं राखोनिया गुह्यार्थ । मुख्यत्वें दावावा परमार्थ ।
हाचि कवित्वांचा निजस्वार्थ । येणें रघुनाथ संतुष्ट ।

( भा. रा. २७ - ९५ )

ये ग्रंथीचें निरूपण । जीव शिवा होतसे लग्न ।
अर्थ पाहतां सावधान । समाधान सात्त्विकां ।

( रु. स्वयं. १८ - ७२ - ७५ - ७६ )

एका जनार्दना शरण । प्रकृति – पुरुषां पाणिग्रहण ।
श्रीरामसीतेचें लग्न । समाधान जीवशिवा ॥

( भा. रा. बाल. २१ - ७३ )

हे कृष्ण कथा अलौकिक । महादोषांसी दाहक ।
भवरोगांसी छेदक । अर्धमात्रा सेविलिया ।
हे मुमुक्षूंची कुळदेवता । मुक्तांची तरी नित्य कथा ।
येरां संसारियां सर्वथा । निर्वविती नवरसें ॥

( रु. स्व. १८ - ७५ - ७६ )

इतके उतारे पुरे आहेत. यांवरून नाथांचें काव्यलक्षण, काव्यविषय, काव्यप्रयोजन व काव्यकारण यांचा बोध स्पष्टपणें होण्यासारखा आहे. नाथांचा लेखनविस्तार प्रचंड आहे. तो अर्धा पाऊण लाख भरेल. १ एकनाथी भागवत वीस हजार. २ भावार्थरामायण चाळीस हजार. [त्यांत नाथांचे निदान पंचवीस हजार व उरलेले पंधरा हजार गावबांचे.] ३ चतुःश्लोकीभागवत एक हजार. ४ रुक्मिणीस्वयंवर १७१२. ५ 'हस्तामलक', 'शुकाष्टक', 'आनंदलहरी', 'स्वात्मसुख', 'गीतासार', 'चिरंजीवपद',

'गीतामहिमा' इत्यादि स्फुट प्रकरणें चार हजार. ६ तुलसीमाहात्म्य, रुक्मांगदकथा, कृष्णदान, ज्ञानदेवादिकांचीं चरित्रें इत्यादि पौराणिक आख्यानें व संतचरित्रें अजमासें दोन अडीच हजार. व ७ पदें, अभंग, रूपकें, भारुडें इत्यादि रचना सुमारें चार साडेचार हजार.

नाथांचा वरील सर्वच लेखनसंभार काव्यरूप नाहीं. त्यांतील बराच भाग अकाव्यरूप म्हणजे अध्यात्म नीति, आचार इत्यादि शास्त्रांच्या कक्षेंत येणारा आहे. शास्त्ररूप वाङ्मय व काव्यरूप वाङ्मय यांतील महत्त्वाचा भेद असा असतो कीं शास्त्ररूप वाङ्मय वस्तुनिष्ठ (Objective) व काव्य-रूप वाङ्मय आत्मनिष्ठ (Subjective) असतें. वस्तु आहे तशी – म्हणजे कोणालाहि त्याच स्वरूपांत दिसेल अशी – केवळ तटस्थपणें वर्णिलेली असणें हें वस्तुनिष्ठतेचें लक्षण असून तीच वस्तु एका विशिष्ट व्यक्तीला तिच्या विशिष्ट मनोधर्माप्रमाणें – जशी दिसेल तशी वर्णिलेली असणें हें आत्मनिष्ठेचें लक्षण होय. विशिष्ट व्यक्तीचा विशिष्ट मनोधर्म तिच्या लिखाणांत प्रगट झाला आहे कीं नाहीं हें अजमावून पाहण्याचें मुख्य साधन म्हणजे त्या लिखाणांत तिच्या भावना व कल्पना तिच्या जीवनविषयक विशिष्ट दृष्टि-कोणांतून व्यक्त झाल्या आहेत कीं नाहीं हें पाहणें. यालाच व्यक्तिमत्व (Personality) म्हणतात. शुद्ध ज्ञानात्मक वाङ्मय वस्तुनिष्ठ (Impersonal) असतें; तर काव्यवाङ्मय किंवा ललितवाङ्मय आत्म-निष्ठ (Personal) असतें. वेदान्तसूत्रें, सदुपदेश, स्मृति इत्यादि वाङ्मय शुद्ध ज्ञानप्रधान आहे; नीरस म्हणजे रस विरहित आहे. व त्याचें कथन त्याच्या मूळस्वरूपांत कोणीहि केलें तरी त्यांत फरक पडत नाहीं. मराठी संत आपल्या सर्वच लिखाणाला 'कवित्व' आणि सर्व लेखकांना कवि म्हणत असले तरी त्यांचें सर्वच लिखाण काव्यरूप नाहीं. वामनपंडितांची 'यथार्थ दीपिका', रामदासांचा 'दासबोध', नाथांचें एकनाथीभागवत व मराठी योगवासिष्ठ हीं काव्यें नव्हत. चतुर्विध पुरुषार्थ व त्यांचीं साधनें यांचीं शास्त्रीय व सोपपत्तिक चर्चा करणारे ते थोर धर्मग्रंथ आहेत.

काव्य व अकाव्य यांतील फरक केवळ वर्ण्यविषयानें पडतो असें मात्र नाहीं. तो वर्णनपद्धतीनें पडतो. संतवाङ्मयाचा विषय अध्यात्म आहे,

ईश्वर आहे, नीति आहे, भवबंधविमोचन आहे म्हणून तें वाङ्मय अकाव्य असें नव्हे. तर तें लिहिणाराची वृति अकाव्य वाङ्मयानुकूल आहे म्हणून तें अकाव्य आहे. मिल्टन कवीचें 'पॅरडॉइज् लॉस्ट' व 'पॅरडॉइज् रीगेन्ड', जॉन् बन्यन्चे 'पिलिग्रिम्स् प्रोग्रेस्' कार्डिनल् न्यूमचें 'Lead kindly light, व वर्डस्वर्थची 'Tintern abbey' व 'Ode on the intimationr of immortality' इत्यादि पाश्चात्य काव्यांचे विषय धार्मिक, तत्त्वज्ञानात्मक असूनहि तीं काव्यें म्हणूनच ओळखलीं जातात. पद्यात लिहिलेलें असणें किंवा उपमादृष्टान्तादि अलंकारयुक्त असणे हेंहि काव्याचे खरे लक्षण नव्हे. कारण नैय्यायिकानीं उपमान हें एक ज्ञानप्रमाण मानलें असून शास्त्रीय व साधा व्यवहार यात साम्य, विरोध, कार्यकारण-भावस्थल व काल यांच्या दृष्टींनीं प्रसंगांत असणारे सामीप्य हे चार साहचर्यनियम कोणीहि माणूस वापरतो. लेखकाच्या सौंदर्यात्मक साक्षात्कारांतून, त्याच्या खास अनुभूतीतून आणि त्याच्या व्यक्तिमत्वाच्या रंगांत रंगून बाहेर पडलेला भावगर्भ, कल्पनाप्रचुर आणि प्रतिभायुक्त मनोगताविष्कार म्हणजे काव्य. बहुतेक संतांची भूमिका अध्यात्मोपदेशकाची, उद्देश जड व संसारबद्ध जीवांचा उद्धार, विषय संस्कृतांतील ज्ञान, भक्ति, वैराग्य याबद्दलचे विचार, लिखाणाचें स्वरूप (Form) प्रवचन, टीका, भाष्य अशासारखें. आणि वृत्ति बव्हंशीं तटस्थतेची व वस्तुनिष्ठतेची. त्यामुळें त्यांच्या लिखाणाला काव्य म्हणण्यापेक्षां तत्त्वज्ञान, धर्मप्रवचन किंवा मोक्षोपदेश म्हणणें अधिक बरें.

खुद्द संतांनासुद्धां कवित्वापेक्षां संतत्वच अधिक मोलाचें वाटे. ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, तुकाराम इत्यादि संतांची योग्यता ते तत्त्वज्ञ, संत धर्मप्रवर्तक व साक्षात्कारी थोर पुरुष म्हणूनच त्यांच्या भक्तांनासुद्धां अधिक वाटते. कवित्वाची कसोटी त्यांच्या मतें गौणपणाची आहे. आणि ही गोष्ट योग्यच आहे. ज्ञानेश्वरादि कांहीं संत प्रतिभावान् होते. त्यांचे ठायीं कवित्व होतें. पण त्यांनीं हे कविगुण प्रधान न मानतां आपल्या अध्यात्मप्रवचनांना स्थलविशेषीं उपकारक म्हणून त्यांचा वापर केला. म्हणून त्यांची

प्रवचनें, टीका किंवा भाष्यें रोचक झालीं. रूक्ष झालीं नाहींत. ज्ञानेश्वरींत सुद्धा जीं काव्यस्थलें आहेत तीं ज्ञानेश्वरमहाराजांच्या खास अनुभूतीचीं, खऱ्या जिव्हाळ्याचीं व जेथें मानवी भावनांचा स्पर्श होतो अशींच आहेत. इतर वस्तुनिष्ठ टीका आहे. कृष्णार्जुनांचा स्नेह, गुरुभक्ति, श्रोत्यांची विनवणी, आदर्श पुरुषवर्णन इत्यादि स्थलीं ज्ञानेशांचें खरें व्यक्तिमत्त्व प्रगट होतें. तेथें त्यांची भावना व कल्पनाशक्ति तरारून जाते. तीं स्थलें म्हणजेच त्यांच्या तत्त्वदर्शी मनाचा खरा सौंदर्यसाक्षात्कार होय. इतर बराच भाग त्यांनीं विस्तारून व केवळ मूळ विषय सुगम व्हावा म्हणून उपमादृष्टान्तांनीं फुलवून मांडलेला आहे. तुकाराममहाराजांच्या उद्गारांनासुद्धां व्यक्तिमत्त्वाचा लेप फार मोठया प्रमाणांत असल्यानें त्यांचा भावनाविष्कार काव्यात्म आहे. तळमळ, तीव्रता व तडफ यांच्यामुळें त्यांच्या प्रेमळ व साध्या वाणीला उपनिषदांचा प्रसाद लाभला आहे. त्यांचे बहुतेक बोल आत्मनिष्ठ व आत्मनिवेदनपर आहेत. पण नाथांचे तसें नाहीं. रुक्मिणीस्वयंवर व भावार्थरामायण व कांहीं इतर स्थलें सोडून दिलीं तर त्यांची दृष्टि वस्तुनिष्ठ आहे. त्यांची भूमिका उपदेशकाची आहे. आत्मनिवेदकाची नाहीं. वास्तविक पाहिलें तर आख्यान-काव्यसुद्धा आत्मनिवेदनाला संपूर्णपणें उपकारक नाहीं. तथापि त्यांत आत्मानुभव, आपल्या भावना कल्पना इत्यादि व्यक्त करावयास अधिक वाव असतो. आणि त्याचा उपयोग नाथांनीं जास्तींत जास्त करून घेतला आहे. त्यामुळें नाथांच्या काव्याचा उठाव या दोन काव्यांतूनच समजावून घेतला पाहिजे.

नाथकाव्यांत पहिली गोष्ट आढळते ती ही कीं ज्ञानेश्वर, नरेन्द्र किंवा मुक्तेश्वर यांना लाभलें एवढें प्रतिभेचें देणें नाथांना लाभलेलें दिसत नाहीं. त्यामुळें त्यांच्या उपमा, रूपकें, दृष्टान्त, व्यतिरेक, उत्प्रेक्षा इत्यादि अलंकारांत लोकोत्तरता भासत नाहीं. त्यांच्या कल्पकतेनें एकदम आस्मान गांठलेलें क्वचितच पहावयास मिळतें. ज्ञानेश्वर व मुक्तेश्वर हा चमत्कार वारंवार दाखवतात. तसेंच 'रुक्मिणीस्वयंवर' व 'भावार्थरामायण' यांतील व्यक्तिचित्रें व प्रसंग रंगवितांना नाथ त्यांवर शेवटीं एक अध्यात्माचा हात फिरवीत असतात. किंवा ह्या दोन्ही कथा त्यांनीं अध्यात्माचें सोदाहरण

विवेचन करण्यासाठींच वर्णिल्या आहेत असें म्हणणें अधिक युक्त होय. कारण वरील कथांतील प्रमुख व्यक्तींना व प्रसंगांनां त्यांनीं आध्यात्मिक रूपकांतील उपमेयें म्हणून योजनापूर्वकच वापरलें आहे. रामकृष्णादिकांच्या कथा, देवांच्या कथा म्हणून वर्णावयाच्या असल्या तरी त्यात सामान्य वाचकांना मुख्य विलोभनीय भाग कोणता असेल तर तो मानवी अंशच (Hunan element). फार झालें तर तो मानवी अंश उदात्त व आदर्श असला तरी चालेल. पण तो अत्यंत अतिमानुष दाखवणें किंवा उठल्यासुटल्या प्रसंग व पात्रें यांना प्रकृतिपुरुष, ब्रह्ममाया व जीवशिव यांच्या चौकटींत बसवून दाखविणें हे वाचकांना अध्यात्मप्रवण करण्याच्या दृष्टीनें योग्य असलें तरी काव्यत्वाची हानि करणारे आहे. यामुळें पात्रांच्या विशिष्ट स्वभावांचीं अणकुचीदार अग्रे झडून जाऊन तीं एकरूप गुळगुळीत गोट्यासारखीं होतात व मूळ प्रसंगांतील औत्सुक्यविवर्धक भाग व जिवंतपणा लुप्त होतो. रुक्मिणीचा भाऊ रुक्मी याला प्रथम 'विकल्प' म्हणून आध्यात्मिकरूपकाच्या चौकटींत बसविलें आहे. तो कृष्णनिंदा करीत असतां त्याच्या तोंडीं नाथांनीं उघड उघड व्याजस्तुति म्हणजे वरून निंदा पण पर्यवसानीं स्तुति घातलेली आहे हें त्याच्या मूळस्वभावाला विसंगत आहे.

रुक्मी म्हणतो कृष्णानें 'अहं मामा' मारला (म्हणजे कंसवध केला), तो 'चहूं वाचा (म्हणजे परा, पश्यन्ती, मध्यमा व वैखरी या चार प्रकारच्या वाणीला) अतीत' आहे. त्यामुळें **तेथ वाग्निश्चयो घडे कैसा?** तसेंच कृष्णाचे मत्स्य, कच्छ, वराह, नारसिंह, वामन, राम, मोहिनी हे अवतार थोड्या तुच्छतेनेंच कां होईना – तो वर्णतो. व कृष्णविरोध करतां करतां म्हणतो कीं **शरीर संबंधाचें कारण। घटित आहे मज आधीन। प्रकृतिपुरुषां पाणिग्रहण। माझेनि जाण होतसे॥** यांत अध्यात्म ठीक बसतें. पण ही विरोधाची भूमिका मूळ स्वभावपरिपोषाला बाधक म्हणून रसापकर्षक वाटते. भावार्थरामायणांतील मारीच राक्षसमुद्रां आपलें तीव्र वैर विसरून रामाच्या हातून मरण पत्करतो. राम आपल्यास मारणार हें निश्चित असल्यानें त्यान रावणाची भीड मान्य केली व मायामृग होण्याचें

पत्करलें. कां? तर **श्रीरामाच्या बाणघातीं। दासी होती च्यारी मुक्ती। अनायासें ब्रह्मप्राप्ती। श्रीराममूर्ति देखिलिया॥** केवळ मारीचच काय? इतर राक्षससुद्धां मरतांना रामहस्तें मृत्यू मिळाल्यानें स्वतांस धन्य मानतात व रामसुद्धां राक्षसांना मुक्ति देण्यासाठींच त्यांना मारण्याची कृपा करतो!

कृष्णानें रुक्मिणीचें हरण केल्यावर यादव व शिशुपालादि रुक्मि-पक्षपाती राजे यांचें युद्ध झालें त्यांत मेलेल्या योद्धयांचा हेतु कृष्णदर्शनानें मुक्ति मिळावी हाच होता असें नाथ सांगतात. इतकेंच नव्हे तर रुक्मिणीशीं विवाह करण्यांत अधिकारी योद्धयांना मुक्ति मिळवून देण्याचा खुद्द श्रीकृष्णा-चाहि हेतु होता असें त्यांचें म्हणणें आहे. **अधिकारिया मोक्ष भावो। द्यावया लागीं कृष्ण देवो। मिष भीमकीचा विवाहो। रणीं निर्वाहो मोक्षाचा।** ( ६. स्व. १०.९९ ) सबंध रुक्मिणीस्वयंवर हे एक सांग आध्यात्मिकरूपक आहे. तें जीवशिवाचें लग्न आहे. रामायणांतील दशरथ, कौसल्या, राम, सीता, भरत व रावण हीं ऐतिहासिक पात्रें नाथांच्या लेखी सांग आध्यात्मिक रूपकाचीं विविध उपमेयें आहेत. **ज्येष्ठ कौसल्या ते सद्विद्या। सुमित्रा ते शुद्ध मेधा। कैकेयी ते अविद्या। मंथरा कुविद्या तीपाशीं।** [ बालकाण्ड १.३८ ते ४६; ५.१६ - १९ ] असल्या प्रका-रांनीं अध्यात्मप्रचार होतो; पण कथावस्तूची मूळ पकड सुटते. राम-कृष्णादिकांच्या तेजस्वी चरित्रांतील कणखर संदेश बोथटतो व राम कृष्ण हे नुसते भक्तीचे विषय आहेत, अनुकरणाचे आदर्श नव्हत अशी वाचकांची समजूत होते. वामनपंडितादि इतर कांहीं मराठी कवींनीं हेंच आध्यात्मिक रूपकांचें धोरण पुढें चालविलें; व रामायण - महाभारतासारख्या तेजस्वी, प्रवृत्तिपर आणि चतुर्विधपुरुषार्थसाधक राष्ट्रीय महाकाव्याची मूळ वास्तव बैठक बदलून त्यांना केवळ भक्तीचीं व अध्यात्माचीं साधनें बनविलीं.

नाथांची काव्यप्रतिभा अगदीं ज्ञानेश्वरांच्या प्रतिभेच्या तोलाची नाहीं व नाथ आपल्या बुद्धिपुरःसर ठरविलेल्या आध्यात्मिक धोरणास अनुसरून ऐतिहासिक व मानवी भावनांनीं फुलून गेलेल्या तेजस्वी कथांवर आध्या-त्मिक रूपकाचें प्रावरण घालून त्यांना कांहीं प्रमाणांत गुदमरून टाकतात एवढ्या दोन गोष्टी वगळल्यास त्यांचा इतर काव्यप्रपंच मोठा मनोरम

आहे. त्याचा पहिला विशेष म्हणजे त्यांत प्रतिबिंबित झालेली नाथांची उच्च विनोदशीलता. नाथांची विनोदी वृत्ति म्हणजे त्यांच्यासारख्या गृहस्थाश्रमी तत्त्वज्ञाच्या समतोल व आनंदी मनाचा गोड आविष्कार आहे. ते तिखट, उपरोध ओरखडे काढणारी विटंबना किंवा टवाळी करीत नाहींत. तर मोठ्या हळुवारपणें व केवळ सत्यदर्शनलालसेनें मानवी मनांतील विसंगति व प्रसंगांतील गमतीचे विशेष उघड करून दाखवतात. याबाबतींत नाथांचा हात धरणारा दुसरा एकहि संतकवि नाहीं. मात्र नाथांच्या विनोदाची गोडी आधुनिक अभिरुचीच्या वाचकानें चाखावयाची असेल तर नाथकालीन देवदेवताविषयक भक्ति व नाथांनीं स्वकालच्या श्रोत्यांची आपल्या मनाशीं कल्पलेली अभिरुचि आणि रसिकता यांच्याशीं समरस व्हावयास पाहिजे. कारण काव्याचें खरें मूल्यमापन तत्कालीन अभिरुचीच्या मानानेंच करावयास हवें. नाथांच्या विनोदाचे कांहीं नमुने, अगदीं संक्षिप्त उल्लेखरूपानें दाखवितों.

१ एकादें वऱ्हाड लग्नासाठीं परगांवीं चाललें असतां त्यांतील सर्व मंडळींची (विशेषतः स्त्रियांची) सुप्त इच्छा अशी असते कीं आपल्या वैभवानें, संपन्नतेनें व सौंदर्यप्रदर्शनानें दुसऱ्या पक्षास चकित करावें. पण होतें काय कीं कोणी कुरूप, कंगाल, म्हातारीं किंवा वेडीविद्रीं माणसें नातेवाईक म्हणून, वऱ्हाडांत ऐनवेळीं सामील होतात. त्यावेळीं सौंदर्यदृष्टीच्या तरुण स्त्रीपुरुषांना त्यांचा मनांतून राग येतो. त्यांतून ही वेडीविद्रीमंडळी पुढें पुढें करणारी असली तर मग आपली सर्व प्रतिष्ठा गेली असें तरुणांस वाटतें. या नाजूक भावनेचा विनोदी आविष्कार नाथांनीं केला आहे. श्रीकृष्णाकडील वऱ्हाड विदर्भाला चाललें असतां त्यांत चांमुडा, वाराही, चंडी इत्यादी आठ कुरूप व भेसुर माता विचित्र वाहनांवर बसून जेव्हां सगळ्यांच्या पुढें जाऊं लागल्या तेव्हां कृष्णाच्या वऱ्हाडांतील नाजूक साजूक मंडळींना वाटलें 'हीं सोंगें आपली अप्रतिष्ठा करणार'

**कोण बोलाविली वऱ्हाडें। सर्वांपुढें निघालीं॥ व्याही हांसती रोकडे यांसि रहावा मागिलेकडे। वऱ्हाड पुढें चालों द्या।** रु. स्व. ४१।५५।७५

यांत अष्टमातांबद्दल भक्ति कायम ठेवून विनोदाची उभारणी केलेली आहे.

२. शिशुपाल रुक्मिणीहरणानें खिन्न होऊन मूर्च्छित झाल्यावर त्याची आई शोक करते. त्यात स्वभावनिष्ठ विनोदाची छटा आहे. भोळी-भाबडी बाई शोक करीत असतांनासुद्धां आपलें खरें मन उघड करतें. ती म्हणते ' या अनर्थानें माझें वरमायपण वाया गेलें; सुनमुख राहिलें व लग्नसोहळा बुडाला. हा अनर्थ झाला याचें कारण रुक्मीनें लग्नाला चांगला मुहूर्त पाहिला नाहीं. तेंच कृष्णाचें पहा बरें. तो मोठा चतुर. त्यानें उत्तम मुहूर्त पाहिला. म्हणून त्याचा कार्यभाग झाला.' कृष्णाच्या पराक्रमाची ही भोळी मीमांसा मोठी मनोरंजक आहे. ( रु. स्व. १२।६-१० ).

३ सासूबाईंनीं कृष्णाच्या हातांवर दही व मध घातले. त्यावेळीं तें मेहुण्यादेखत चांखावयास जांवईबुवा लाजूं लागले ! त्यावर त्यांना मेहुणे खोंचून विचारतात. **गोकुळीं चोरोनि दधि खातां । तुम्हांसि लाज नाहीं सर्वथा । आम्ही निजभावें अर्पितां । कां लाजतां निज चोरा ॥** ( रु. स्व. १५।१५०-५३ ).

४ गर्दीमध्यें एका संन्याशीबुवास एका वेश्येचा चुकून स्पर्श झाला त्यावेळीं सोंवळे 'श्रीपाद' रागावले. त्यावर ती वेश्या त्यांचा पुढीलप्रमाणें उपहास करते **अजुन क्रोध न सांडी पोटीं । विटंबिली दंड कासोटी । आत्मदृष्टि तुम्हां नाहीं ॥** ( रु. स्व. १८।२६-३० ) स्वकालीन कर्मठपणावर व दांभिकतेवर असे उपहासाचे नाजूक कोरडे – याच प्रसंगाची पुनरावृत्ति आपल्या भावार्थरामायणांत करून नाथांनीं ओढले आहेत. (बाल. २७४४-४८) अशाच गोष्टींवर तिखट शब्दांनीं उघड उघड मर्मभेद करणारे तुकाराम महाराज व वक्रोक्तीनें स्वाभिप्राय सुचविणारे नाथ यांतील फरक ध्यानांत घेण्यासारखा आहे. नाथांच्या कांहीं रूपकांत व भारुडांत असाच उपरोध आहे.

५ भावार्थरामायणांत ( सुंदर. अ. १।४८-६२ व ७०-११० ) एक सुंदर विनोदस्थल आहे. हनुमंत लंकेमध्यें सीतेचा शोध करीत असतां तेथें त्याला कांहीं ब्रह्मराक्षस आढळले. त्यांतहि कांहीं रुद्राक्षमाळाधारी शैव, त्रिपुंड्र लावणारे भक्त, तपस्वी, संन्यासी व अग्निहोत्री होते ! हे सर्व सात्त्विक आत्मे मनुष्य दृष्टीस पडल्याबरोबर मोठ्या साक्षेपानें त्यास सबंध

गिळत असत, पण वर आचमन व अघमर्षण करावयास मात्र विसरत नसत !! याच ठिकाणीं नाथांनीं आपल्या काळच्या चाटे, सोनार, कासार, सावकार, तेली, तांबोळी, साळी, शिंपी इत्यादि धंदेवाल्यांची मोठी नाजूक थट्टा केली आहे.

नाथांना संस्कृत काव्यनाटकांचा चांगला मार्मिक परिचय होता; व त्यांनीं आपल्या काव्यांतील स्थलें संस्कृत काव्यसरणीस अनुसरूनच सजविलीं आहेत. रामाचें व कृष्णाचें विस्तृत रूपवर्णन अस्सल संस्कृत थाटाचें असून त्यात उत्प्रेक्षा, व्यतिरेक अनन्वय, श्लेष, उपमा, दृष्टांत, अपन्हुति इत्यादि अलंकारांची रेलचेल आहे. (रु.स्व. १–१०,–८६ व भा. रा. बा. काण्ड ६–६–६३) रूपक हा अलंकार तर नाथांच्या विशेष आवडीचा असून त्यांनीं सांग, निरंग व परंपरित रूपकें शेंकडो ठिकाणीं मुक्त हस्तांनीं पेरून दिलीं आहेत. नाथांनीं आपल्या वरील दोन कथ लिहितांना मुख्यतः भागवत व रामायण हे संस्कृत ग्रंथ आधारास घेतले असले तरी ते स्थलविशेषीं सजावटीसाठीं हरिवंश व संस्कृत काव्यनाट-कांतील सुंदर स्थलें यांचा साक्षेपानें उपयोग करून घेतात. त्यामुळेंच भाग-वतांतील मूळ १४४ श्लोकांच्या कृष्णरुक्मिणीस्वयंवराचा १७१२ ओव्यांत विस्तार झाला. रुक्मीनें केलेल्या कृष्णनिंदेच्या मागें कालिदासाच्या कुमार-संभवांतील जटिलकृत शिवनिंदेचा नमुना आहे आणि रुक्मिणीकृष्ण व रामसीता यांच्या मिरवणुकी पहावयास येणाऱ्या मंडळींच्या वर्णनामागें पुन्हां कालिदास उभा आहेच. रामायणांत तर नाथांनीं **हनुमन्नाटक, प्रसन्नराघव** इत्यादि संस्कृत नाटकांतील **'कमठपृष्ठकठोरमिदंधनुः' सौमित्रेननु सेव्यतां तरुतलं' 'ब्रह्मन्नध्ययनस्य नैषसमयः' तातस्त्वं निजतेजसैव गमितः स्वर्गं** इत्यादि श्लोक जसेच्या तसेच अनुवादले आहेत. पण या सर्व वर्णनांत संस्कृत कवींची दृष्टि त्यांतल्या त्यांत लौकिक व नाथांची मात्र आध्यात्मिक असा फरक आहे. संस्कृत कवि रामकृष्णादिकांच्या लोकोत्तर चरित्रांतील मानवी अंश दाखवीत होते तर नाथ मानवी तनू धारण करणाऱ्या व्यक्तींचें परब्रह्मरूप प्रगट करीत होते. त्यामुळें लौकिक दृष्टीच्या वाचकांची तहान पहिल्या प्रकारानें व अध्यात्मप्रवण वाचकांची तहान दुसऱ्या

प्रकारानें भागली. किंवा नाथ म्हणतात त्याप्रमाणें त्याचें काव्य ‘येरा संसारिया’ नवरसात्मक व मुमुक्षूंना कुलदेवतारूप झालें.

मुख्य व्यक्तींच्या रूपवर्णनाप्रमाणें त्यांच्या सूक्ष्म मानसिक हालचालीकडेहि नाथाचें लक्ष आहे. सीतेनें मुद्रिकेला उद्देशून काढलेले उद्गार याची साक्ष पटवील. (सुंदर काण्ड–११-३०-८३) त्याचीं स्थलांचीं वर्णनेंहि आकर्षक असून प्राण्याच्या विशिष्ट क्रिया वर्णून त्यानीं स्वभावोक्ति अलंकारहि जागोजागीं साधले आहेत. मारीचाचें मायावी हरणरूप (अरण्यकांड. १४·१२·१७) व मारुतीच्या आनंदप्रदर्शनांत त्याचे वानरजातिविशिष्ट व्यापार (सुं. काण्ड. ७·५-१९) हीं स्थलें या दृष्टीनें लक्षणीय आहेत. रस हा तर काव्याचा आत्मा आहे. त्या दृष्टीनें पाहिलें तरी नाथांचीं काव्यें नवरसमंडित आहेत व नाथाच्या रसपरिपोषाचा विशेष असा आहे कीं संस्कृत साहित्यशास्त्रानें न मानलेला जो भक्तिरस त्यावरच त्यांनीं नवरसांची उभारणी व त्यातच त्याचें पर्यवसानहि करून दाखविलें आहे. नाथांचा मुख्य भर त्यातल्या त्यांत भक्तीबरोबर शान्तरसावरहि आहे. याप्रमाणेंच नाथांची भाषाशैली, ध्वनिकौशल्य, त्याचें सूक्ष्मावलोकन इत्यादि अनेक काव्यविशेष सांगतां येण्यासारखे आहेत पण विस्तारभयास्तव तसें करतां येत नाहीं. पण नाथांच्या वस्तुनिष्ठ व आत्मनिष्ठ अशा काव्याचें मुख्य लक्ष्य जें जनहित, व तें साधण्यासाठीं अहोरात्र तळमळणारें त्यांचें उदार मन–त्याचें विशाल व्यक्तिमत्व त्याबद्दल दोन शब्द लिहिले पाहिजेत.

नाथांचा मूळ पिंडच हरिभक्तींत वाढला आणि जनार्दनस्वामीसारख्या साक्षात्कारी संताच्या कृपादृष्टींत पोसला. नारद, प्रल्हाद, उद्धव हे त्यांचे आदर्श होते. ज्ञानदेव हे त्याचे प्रेरक. त्यांतून तपस्येनें त्यांना श्रीदत्ताचा सगुण साक्षात्कार झालेला. पैठण व काशी अशा क्षेत्रीं वास आणि या सर्व सात्त्विक गुणसंपदेची कसोटी पाहणारी अति विषम अशी भोंवतालची भीषण परिस्थिति. विधर्मी व क्रूर मुसलमानी अम्मल जारी सुरू. पारतंत्र्यानें जखडलेले, नीति व धर्म यांना पारखे झालेले, दारिद्र्यानें गांजलेले असे अज्ञाणी स्वधर्मबांधव अधोगतीकडे धांव घेताहेत ही अवस्था. अशा

परिस्थितींत समाजोद्धार करण्यासाठीं निघालेल्या परम कारुणिक व उदार हृदयाचे बोल म्हणजे नाथांचें वाङ्मय होय. अशा कवीचा काव्यहेतु नुसता कलाविलास असणें शक्यच नाहीं. सत्यनिष्ठा, पातिव्रत्य, एकी, संघटन, चारित्र्यशुद्धि, जाति, वर्ण वंश यांच्या अतीत अशी गुणनिष्ठ दृष्टि, सात्त्विकपणा इत्यादि ऐहिक जीवनाची सामग्री व ज्ञान, भक्ति व वैराग्य ही पारलौकिक जीवनाची शिदोरी यांची सिद्धता करणें यांत त्यांच्या काव्याची इतिकर्तव्यता असणें हें परिस्थितिप्राप्तच होतें. त्यामुळें नाथासारखा क्रियावान् साधु जर कोणत्या सरस्वतीला काव्यरचनेसाठीं वंदन करील तर तो 'प्रमत्त मयूर पिच्छाच्या सुबक सिंहासनावर' बसलेल्या सरस्वतीला नव्हे, तर शुभ्र हंसवाहिनी सरस्वतीलाच. पण नाथांना हा रूढ झालेला नुसता 'हंसवाहिनी' शब्दसुद्धां अपुराच वाटतो. त्यांची सरस्वती 'परमहंसीं आरूढ' आहे. सत्त्वातीत शुद्धतेमुळें तिचा वर्ण शुभ्र आहे. ती ओंकारवीणेचे झंकार 'त्रिमात्रे'च्या तारांतून काढीत आहे. व तिच्या हातांत वेदोपनिषद पुस्तक आहे. [बालकाण्ड १–७–११] अशा सरस्वतीच्या प्रेरणेनें जन्मलेलें नाथासारख्या ब्रह्मनिष्ठांचें मराठी काव्य ज्या मराठी भाषेंत झालें तिचें भाग्य थोर यांत संशय नाहीं.

---

# कानडी लिपींत नाथ भागवत

श्री. न. शे. पोहनेरकर

श्रीएकनाथदर्शनासाठीं महाराष्ट्रांतील अभ्यासकांशीं पत्रव्यवहार चालू असतांना सुप्रसिद्ध संशोधक डॉ. अ. का. प्रियोळकर यांनाहि पत्र पाठविलें. मुक्तेश्वराच्या आदिपर्वसंशोधनाचें कार्य त्यांनीं चालू केलें असल्यानें 'दर्शनांत' प्रत्यक्ष लेखनाची असमर्थता त्यांनीं दर्शविली. परंतु आपल्या दिनांक २१-४-४९ च्या घाईनें लिहिलेल्या पत्रांत, मुक्तेश्वराच्या हस्तलिखितांची मराठवाडयांत चौकशी करीत असतांना 'एकनाथी भागवताची एक **कानडी लिपींत** लिहिलेली प्रत माझ्या संग्रहीं आहे. त्रुटित असावी. एकनाथी भागवताचें संशोधन झालें पाहिजे.' अशी बातमी त्यांनीं कळविली. नाथांच्या भागवतानें कानडी लिपींत अवतार घेतला ही गोष्ट कल्पनेंतहि नव्हती परंतु ती वस्तुस्थिति ठरली. मनाला वाटलें, साहजीकच आहे. पंढरीच्या विठ्ठलाचें कानडेपण उजळणाऱ्या श्रीभानुदासांच्या पणतवाची रचना कानडी लिपींत आपल्या मराठीपणानें रूपांतरित व्हावी यांतहि आश्चर्यकारक काय आहे?

कानडी लिपींतील नाथभागवताची दर्शनाच्या वाचकांना ओळख व्हावी, ही उत्कंठा वाटून, मुद्रणास आरंभ करावयाच्या पूर्वीं डॉक्टर साहेबांना पत्र पाठविलें. त्यांनीं विनंती मान्य केली आणि उत्तरीं प्रस्तुत पोथीचा ८ वा अध्याय पांठवूनहि दिला. पोथीसोबतच्या आपल्या पत्रांत ते लिहितात 'आज कानडी लिपींतील एकनाथी भागवताचा एक अध्याय सोबत पाठवीत आहे. त्यांतील जरूर तो भाग आपण फोटो घेऊन छापावा. ही प्रत गोमांतकमध्यें रा. विठ्ठल कोरडे नांवाच्या सद्गृहस्थाकडे सांपडली. गोमांतकांतील जुने मराठी ग्रंथ व दप्तरें कानडी लिपींत सांपडतात. ही लिपी अलीकडच्या लोकांना वाचतां येत नाहीं.' प्रस्तुतची पोथी कशी आणि कुठे सांपडली आहे याचा डॉक्टरसाहेबांनी खुलासा केला आहेच.

भाषा एकच असली तरी कालमानानुसार लिपींत किती तरी अंतर पडलेलें असतें. प्रत्येक भाषेंत हा प्रकार असतो. अर्थात कानडी लिपींतहि आजचें वळण आणि जुनें वळण यांत अंतर आहेच. '**हळ्ळ कन्नडी**' या नांवानें ही जुनी लिपी आज ओळखिली जाते. सामान्य सुशिक्षितांना ती वाचणें जमत नाहीं. आम्हांलाहि हा अनुभव आलाच. परंतु श्री. प्रा. वि. पां. देऊळगांवकर, व श्री. प्रा. हेमंत कुलकर्णी यांच्या चिकाटीनें ती गोष्ट अशक्य राहिली नाहीं. त्यानीं मराठी नाथभागवताच्या तुलनेनें प्रस्तुतच्या अध्यायाचें संपूर्ण वाचन व टांचण तयार केलें.

पोथीचा आकार साडेसहा × साडेचार इंच असा आहे. कागद अगदीं जुना नसला तरी दौलताबादी आहे. लेखन त्या मानांत जुनें असें वाटत नाहीं. सुवाच्य आणि डौलदार अशा स्पष्ट अक्षरांत काळ्या घोटीव शाईनें ती लिहिलेली आहे. पहिलें ग्रंथाच्या नांवाचें आणि शेवटचें समाप्तीचें अशीं दोन्हीं पृष्ठें कोरीं असून मध्यंतरी २० पृष्ठें म्हणजे ४० पानें पाठपोट संपूर्ण आठवा अध्याय ओवीचे चरण तोडून, संख्या देऊन सुवाच्य लिहिलेला आहे. प्रत्येक पृष्ठांत १२ ओळी आणि सुमारें ८।९ ओव्या आहेत.

अध्यायाच्या आरंभीं **श्रीगणेशायनमः। श्रीशांता दुर्गा महालक्ष्मीयनमः। श्रीरामनाथायनमः। श्रीवेदव्यासायनमः। ॐ नमो श्रीगुरु यतिगे॥** असें लिहून मग लेखनास आरंभ केलेला आहे. तुलनेसाठीं १९११ सालची रा. द्रविड यांनीं 'आर्यभूषण' मध्यें छापविलेली मराठी प्रत घेतली होती. बऱ्याचशा ओव्या मागेंपुढें तर क्वचित् एखादी मुळांतच गाळलेली असा प्रकार आढळला. मराठी अध्यायांत ओवीसंख्या ३३१ तर या प्रतींत ती ३२१ अशी दिलेली आहे. कानडी भाषिकांनें ही प्रत लिहिलेली असल्यामुळें किती तरी शब्दांचीं रूपें कचित् बदललेलीं दिसतात. मूद (मुख) उपरमोनि (उपरमुनु) मुष्टि (दृष्टि) परी (पर) सर्वथा (तत्त्वता) आंहारू (हारू) आसक्ति (आरक्ति) मुहुर्त (मूर्त) स्वभावे (सभावे) ओवी (होवी) अशा फरकानें शब्द लिहिलेले सांपड-

तात. सारांश हस्तदोष आणि भाषाविशेष यांचा विचार करूनहि पाठभेदाच्या दृष्टीने प्रस्तुतची पोथी महत्त्वाची आहे हें सहज सिद्ध आहे.

अध्याय समाप्त होतांना **प्रतिमा लिहु (न) पूर्ण जाहाली असी। चित्रभान संवछर चैत्र बहुळ ७ मिं मंगळवारीं गोमांतकिं । लिहुणार। वैद्य बाळकृष्ण विठ्ठ (ल) सेणवी केळोसिका (वा) र । श्री कृष्णार्पण मस्तु** ॥ असा उल्लेख आहे.

प्रस्तुतच्या उल्लेखांत शकाची संख्या दिलली नाहीं. चित्रभानु या नांवाप्रमाणें पहातां शके १८०४ असा शक येतो. परंतु चैत्र व. ७ ला त्यांत सोमवार आहे.शके १७४४ च्या चित्रभानु संवत्सरासहि चैत्र व. ७ स रविवार येतो. अर्थात पंचागातील प्रांतविशिष्ट पद्धतीनें एखाद्या तिथी व वाराचा फरक असूं शकेलहि. परंतु दोन दिवसाचें अंतर असेल असें म्हणतां येत नाहीं. शिवाय पोथीचा कागद आणि लेखनकामाठीहि शंभर वर्षांपेक्षां जुनी म्हणतां येत नाहीं. म्हणजे शके १८०४ च्याच चित्रभानु संवत्सरात ही पोथी लिहिली गेली आहे हें उघड दिसतें. ७० वर्षांचें जुनें हें हस्तलिखित आहे.

प्रस्तुतच्या पोथीची वाचकांना कल्पना यावी म्हणून शेवटाच्या एका पृष्ठाचें छायाचित्र दर्शनांत वेगळें छापविलेलें आहे. लिपी कानडी पण भाषा मात्र मराठी असा हा थाट कांहीं अपूर्व आहे.

ज्या पृष्ठाचा फोटो प्रस्तुत ग्रंथांत दिला आहे त्याचें मराठीतील वाचन असें आहे, **निज सुखासि पावली ॥३२३॥ या लागी काया वाचा चिते ॥ उपासावे निराशेते ॥ या परते परमार्थें ॥ साधन येथे दिसेना ॥३२४॥ इतर जितुकी साधने ॥ तितुकी आशा निराशा करणे ॥ ती निराशा साधिली जेणे ॥ परमार्थ तेणे लुट्टिला ॥३२५॥ कृपा उपजली अवधुतासी ॥ यदृशि धरोनी पोट्टासी ॥ निराशा तिरो पेसि ॥ अवश्य तीची साधावी ॥३२६॥ यका जन्नार्जना शरण । त्याची कृपा परिपूर्ण । तोची आशापास छेदन । समाधान पावली ॥३२७॥ यितिश्रि माहा पुराणे यकादस्कदे ॥ यकाकार टिकायां ॥ अष्टमोध्याया संपुर्ण मस्तु ॥**

**प्रतिमां लिहुन पूर्ण जाहाली असि ॥ चित्रभान संवछर । चैत्र बहुळ ७ मी मंगळवारी गोमांतकी ॥ लिहुणार ॥ वैद्य । बाळकृष्ण शेणवी केळो-सिकार ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥**

प्रस्तुत हस्तलिखिताचा आठवा अध्याय पोस्टानें पाठवून त्याचें छायाचित्र घेण्याची अनुमति दिली याबद्दल मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय आणि त्याच्या संशोधन शाखेचे प्रमुख श्री. अ. का. प्रियोळकर यांचे आम्ही अंतःकरणपूर्वक आभारी आहों.

---

पृष्ठाचे वाचन येथील उस्मानिया विद्यापीठाचे कानडी प्राध्यापक श्री. आर. जी. पटवारी यांनी केले याबद्दल मंडळ त्याचे आभारी आहे.

चिटणीस

नाथांचा

# जी-व-न-सं-दे-श

धर्माची वाट मोडे। अधर्माची शीग चढे।
तैं आम्हां येणें घडे। संसारस्थिती ॥१॥
आम्हां का संसारा येणें। हरिभक्ति नामस्मरणें।
जडजीव उद्धरणें। नामस्मरणें करुनी ॥२॥
सर्वकर्म ब्रह्मस्थिती। प्रतिपादाव्या वेदोक्ती।
हेंचि एक निश्चिती। करणें आम्हा ॥३॥
नाना मतें पाषांड। कर्मठता अतिबंड।
तयाचें ठेचणें तोंड। हरिभजनें ॥४॥
विश्वरूप सृष्टि। अर्जुना दाविली दृष्टी।
भिन्न भेदाची गोष्टी। बोलूं नये ॥५॥
एकाजनार्दनीं। धरितां भेद मनीं।
दुन्हावले येथुनी। निंदक जन ॥६॥

---

# लोकसाहित्यकार नाथ • • •

श्री. प्रा. शं. गो. तुळपुळे एम्. ए. पी. एच्. डी.

संत बहिणाबाईंचा एक अभंग आहे. त्यांत भागवतधर्माच्या परंपरेचें मोठे रेखीव असें चित्र त्यानीं काढलें आहे. ज्ञानदेवांनीं ज्याचा पाया रचला, नामदेवांनीं ज्याभोंवतीं आवार उभारलें, एकनाथानीं ज्यास आधार दिला, तुकाराम ज्याचे कळस झाले आणि बहिणी ज्यावर ध्वजारूपानें फडकत आहे असें हें भागवतधर्ममंदिर, बहिणाबाई म्हणतात, केवळ संतांच्या कृपेनेंच फळास आलें. वरील अभंगांत एकनाथाच्या कामगिरीचा उल्लेख मोठ्या मार्मिकपणाने केला गेला आहे.

**जनार्दनी एकनाथ। खांब दिला भागवत** या बहिणाबाईंच्या वचनांतील 'भागवत' हे पद उघडच श्लिष्ट आहे. भागवतांतील एकादशस्कंधावर टीका रचून नाथांनीं भागवतधर्माची शास्त्रोक्त प्रतिष्ठापना केली असा त्या वचनाचा साधा अर्थ आहे. पण मला त्यांत थोडा अधिक अभिप्राय दिसतो. तो असा. भागवत म्हणजे भागवतधर्माचें अनुयायी, भक्त, वैष्णव अशांचा मेळावा जमवून त्या बहुजनसमाजाचा आधार भागवतधर्मास देणें हें नाथांचें मुख्य कार्य होय. इतका खोल अभिप्राय या कवयित्रीच्या मनांत असावा. कारण, नाथांनीं आपली भागवतधर्मविषयक चळवळ कांहीं एक विशिष्ट दृष्टि ठेवून चालविलेली दिसून येते. जनताजनार्दनाचा पाठिंबा हा कोणत्याहि संप्रदायाचा वा धर्माचा आत्मा होय हें तत्व त्यांनीं सतत मनांत वागविलें असलें पाहिजे. किंबहुना नाथांचें एकंदर चारित्र्य पाहतां ज्यायोगें सबंध समाजाची धारणा केली जाते तो धर्म अशी व्याख्याच त्यानीं आपल्या मनाशीं बांधून टाकलेली दिसते. ज्ञानदेवादि इतर संतांनींहि आपापल्या परीनें भागवतधर्माचा प्रसार केला, व या बाबतींत नामदेवाची पंजाबांतील कामगिरी तर केवळ अविस्मरणीय अशी झाली हें सर्व खरें. निळोबाराय म्हणतात त्याप्रमाणें संत हे दयानिधि असल्यानें ते सर्वच '**मार्ग दावून**' गेले यांत कांहींच शंका नाहीं. याच अभि-

प्रायानें साधुसंत हे वेगळाले दिसले तरी ते **अवघे मिळून एकच** होत असें रामदासांनींहि म्हटलें आहे. अर्थात संत तितुका एक या न्यायास नाथ अपवाद होऊं शकत नाहींत. परंतु अंतरंग एकच असलें तरी बाह्यांगात फरक पडूं शकतो. गंगा ही उगमीं, प्रवाही आणि संगमीं एक गंगारूपानेंच वहात असली तरी तिचीं हीं त्रिविध रूपें आपण तशीं मानतो ना! तद्वत् नाथांची इतर संतांशीं आंतून सोयरीक असली तरी बाहेरून थोडी वेगळीक आहे. ज्ञानदेवादि संतांनीं समतेच्या तत्त्वांचा गौरव करून तें तत्त्व प्रत्यक्ष आचरणांतहि आणलेलें असलें तरी त्याच्या तपशिलांत ते शिरलेले दिसत नाहींत. आधीं ज्ञानदेवांच्या एकंदर चरित्राचा अवधीच मुळांत वीसएक वर्षांचा त्यांतून ते अशा कांहीं तात्विक उंचीवरून बोलतात, कीं तपशिलांत शिरण्यास त्याना वावच मिळत नाहीं. अमृतानुभवासारख्या शुद्ध तत्त्वज्ञानात्मक ग्रंथाची गोष्ट दूर ठेवली तरी ज्ञानेश्वरीहि कोठें प्रपंच आणि परमार्थ यांचा समन्वय करण्याच्या भरीस पडलेली दिसत नाहीं. ज्ञानदेव हे ज्ञानियांचे राजे खरे, पण त्यांचें चरित्र आम्हां प्राकृतांना थोडें आंवाक्या-बाहेरचेच वाटतें. महाराष्ट्रांतील भागवतधर्माच्या या आद्याचार्यांचें स्वरूप पाहून त्याविषयीं एक प्रकारची 'भयभक्ति'च सामान्यांच्या मनांत उत्पन्न होते. येथें कांहीं धिटाई किंवा सलगी करण्यास मन घेतच नाहीं. कारण ज्ञानदेवांचें चरित्र सर्वच दृष्टींनीं असामान्य आहे. नामदेव हे वैष्णवांच्या मेळ्यांत उभे राहून नाचत असले तरी एक तर त्यांचें विश्वसनीय चरित्र असावें तितकें उपलब्ध नाहीं. दुसरें असें, कीं त्यांचें धर्मविषयक कार्य मुख्यतः उत्तरेकडे झाल्यानें महाराष्ट्रास नामदेवांचा लाभ मिळावा तितका मिळालेला नाहीं तुकाराम तर बोलून चालून निवृत्त आणि निःसंग त्यांची एकांतप्रियता चिंतनीय असून लोकान्तांत त्यांचा विशेष वावर झालेला नाहीं. रामदासांची प्रवृत्ति समाजोन्मुख असली तरी ते भागवत संप्रदायांतील नव्हत. शिवाय त्यांचा कर्मयोग हा नाथांनीं लावलेल्या सामाजिक बीजा-चाच एक प्रकारें परिपाक होय. असो. तात्पर्य, एकनाथांची समाजोन्मुखता ही भागवतधर्माच्या इतिहासांत तरी अपूर्व आहे. इतर साक्षात्कारी संता-प्रमाणेंच त्यांच्याहि ठिकाणीं सर्वात्मभाव हा आहेच. तो तपशिलवार

मांडून दाखविणें हें मात्र नाथांचें अनन्य साधारण असें वैशिष्ट्य असून त्यांचें सामाजिक मन जागृत असल्याची ही एक खूण होय.

या दृष्टीनें पाहतां नाथ हे लोकसाहित्यकार ठरतात. लोकांच्या म्हणजे बहुजनांच्या भावना ध्यानांत घेऊन मुख्यतः त्यांच्यासाठीं साहित्य रचणारा तो लोकसाहित्यकार. एकनाथांची ग्रंथरचना पाहिल्यास त्यांची प्रत्येक कृति वरील हेतूनें प्रेरित झाल्याचें दिसून येईल. त्यांची ग्रंथरचनाहि विविध व वैचित्र्यपूर्ण आहे. रुक्मिणीस्वयंवरासारखीं आख्यानें, एकादशस्कंधावरील विस्तृत टीका, रामायणीय महाकाव्य, चिरंजीवपदासारखी स्फुट प्रकरणें, संतांचीं चरित्रें, पदें, भारुडें, अभंग याप्रमाणें बहुविध रत्नांनीं नाथांचें साहित्यभांडार खचून भरलेलें आहे. त्यांची एकूण कविता पाऊण लाखाच्या घरांत जावी. इतकी प्रचंड, प्रसन्न आणि विविध ग्रंथरचना करणारा कवि दुसरा नसेल. ही सर्व रचना समाजास कांहीं सांगावें, शिकवावें या बुद्धींतून जन्मलेली आहे. नाथकालीन समाज हा ज्ञानेश्वरकालीन समाजाप्रमाणें सुखसंपन्न नसून तो दुःखदारिद्र्यानें पिचून गेलेला असा होता. यादवकालीन वैभवाचा मागमूसहि नाथकालांत दिसत नाहीं. उलट उण्यापुऱ्या तीनशें वर्षांच्या इस्लामच्या आक्रमणानें एकनाथकालीन समाज हा सर्व बाजूंनीं विकलांग होऊन गेला होता. एका राजकीय पारतंत्र्याचें अनेक दुष्परिणाम त्या समाजास भोगावे लागले व त्यांतील ब्राह्म आणि क्षात्र अशीं दोन्हीं तेजें लोपून त्याची संस्कृतीहि नामशेष होणाच्या पंथास लागली होती.जीवन्मृतावस्थेत काळ कंठणाऱ्या या स्वकालीन समाजाचीं कांहीं चित्रें नाथांनीं काढलेलीं असून तीं अति विदारक वठलीं आहेत. सामाजिक सुखदुःखांविषयीं आस्था बाळगणाऱ्या या संतकवीची सहानुभूति विशाल होती, पाहणें बारीक होतें, समाजोद्धाराची तळमळ जिवंत होती आणि त्याच्या अभिप्रायांत एक प्रकारचा मार्मिकपणा होता. नाथांच्या लेखणींतून उतरलेलीं हीं शब्दचित्रें पाहिल्यास त्यांवरून तत्कालीन समाजाची स्थितिगति आपोआप कळून येईल. या बहुविध, बहुरंगी आणि बहुछंदी समाजास एका भागवतधर्माच्या सूत्रांत गोवून त्यास एकरूप

---

१ एकनाथी गाथा, अभंग २५७४ ते २७००.

करून टाकणें हें नाथांचें महत्कृत्य होय. त्यांची कामगिरी मुख्यतः धार्मिक दिसली तरी त्यांना समाजोद्धाराच्या इतर अंगांची जाणीव नव्हती असें मात्र नव्हे. उलट राजकीय पारतंत्र्य हें सर्व प्रकारच्या सामाजिक दुरवस्थेचें मूळ होय, हे तत्त्व त्यांच्या चतुरस्र दृष्टींतून सुटणें शक्यच नव्हतें. हें मूळ पुढें शिवसमर्थांनी मिळून उपटून टाकलें तेव्हां समाजावर आलेली तीनशें वर्षांची जुनी अवकळा धुतली जाऊन तो पुनः सतेज दिसूं लागला. तत्पूर्वीच्या परतंत्र व म्हणून अवनत अशा महाराष्ट्राचें धार्मिक पुढारपण नाथांनीं स्वतःकडे घेतलें व त्यास स्वातंत्र्योन्मुख करून भविष्य कालाकडें निरोधिलें. त्यांची धर्मसेवा हीच एक प्रकारें राष्ट्रसेवाहि झाली, व त्यासाठीं लोकसाहित्य हे साधन त्यांनीं वापरलें.

नाथांची दृष्टि लोकसहित्यकाराची कशी होती हें एकादशस्कंधावरील त्यांच्या टीकेचा पहिला प्रास्तविक अध्याय जरी वांचला तरी सहज कळून येईल. **एकांतीं आणि लोकांतीं । थोर साक्षेप केला संतीं ।** याप्रमाणें ज्यांच्या सांगण्यावरून आपण ही ग्रंथरचना करण्यास प्रवृत्त झालों त्या संतजनांस वंदन करतांना प्रथमध्यायांत नाथ म्हणतात,

**आतां वंदूं ते सज्जन । जे कां आनंदचिद्घन ।**
**वर्षताती स्वानंदजीवन । संततजन निववावया ॥**
**कीं ते भूतदयार्णव । कीं माहेरी आली कणव । ......**
**ते भोगावरी न विटती । त्यागावरी न उठती ।**
**आपुलिये सहजस्थिति । स्वयें वर्णिती सर्वदा ॥**
**ते ज्ञातेपणा न मिरविती । पिसेंपण न दाविती ।**
**स्वरूप फुंजविस्मृति । गिळूनि वर्तती निजांगें ॥**
**प्रेमा आंगींचि जिराला । विस्मयों येवोंचि विसरला ।**
**प्रपंचु परमार्थु एकु जाहला । हाहि ठेला विभागु ॥**

—( भागवत १×३५ ते ५८ ).

वरील ओंव्यांतील संतवर्णन लक्षणीय आहे. नाथांचा संत हा **भूतदयार्णव** असून तो भोगांना विटत नाहीं कीं त्यागावर उठत नाहीं. उलट जगांत पिसेंपण न दाखवितां प्रपंच परमार्थ हीं दोहीं तो ऐक्यभावानें पहातो. नाथांचें हे मत ज्ञानेश्वराच्या अमानित्वावरील व्याख्यानाशीं तोलून

पहाण्याजोगें आहे. (ज्ञा० १३×१८५-२००). या प्रास्ताविक अध्यायांत नाथांनीं गणेश, सरस्वती, श्रीकृष्ण, श्रीदत्त, सद्गुरु श्रीजनार्दन, ज्ञानदेवादि संत, व्यासवाल्मीकादि महाकवी, शंकरादि आचार्य, भानुदासादि पूर्वज, कुलदैवत, किंबहुना **अशेख भूतमात्र** याप्रमाणे सर्वांना वंदन केलें आहे.नमनाचे हे विविध विषय नाथांच्या व्यापक दृष्टीचे व सर्वसंग्राहक बुद्धीचे द्योतक होत.त्यातील कांहीं नमनें साभिप्राय आहेत.उदा० गणेशवंदन पहा.

**तुजमाजीं वासु चराचरा । म्हणोनि बोलिजे लंबोदरा ।**
**यालागीं सकळांचा सोयरा । साचोकारा तूं होसी ॥**

( भा. १×३ )

श्रीजनार्दनस्वामीचे वर्णन **जनीं विजनीं समानु** अशा शब्दांत आलें आहे. श्रीकृष्णनमनांत हें वैशिष्ट्य अधिकच दिसतें. उपजतांच मायेवेगळा होऊन पुढें आपण माती खाऊन मायेस विश्वरूप दाखविणारा, स्वतः बाळपणाबाहेर तिळभरहि न निघतां जगादेखत अचाट कृत्यें करणारा, अधर्मानें धर्म व भोगानें त्याग वाढविणारा, भुक्तिमुक्तींना एका पंक्तींत आणून निजबोधाचा **पुरा पवाडा** करणारा याप्रमाणें कृष्णावतारींचा नवलाव नाथांनीं वर्णिला आहे ( भा.१×८७ ते ९६ ). ते म्हणतात त्याप्रमाणें ही कृष्णकथा कान भीतरीं नेऊन, निजमन कानीं देऊन व अवधानास सावधान करूनच ऐकली पाहिजे. भागवताच्या समारोपांतहि कृष्णचरित्राकडे पाहण्याचा हा वैशिष्ट्यपूर्ण दृष्टिकोण दिसून येतो. तेथें नाथ म्हणतात,की ज्याच्या संगतीनें गवळी उद्धरले,गायी वेधल्या,इतकेंच काय पण वृंदावनीचे तृणपाषाणहि तरले असा श्रीकृष्ण हा पूर्णावतार असून त्याच्या ज्ञानप्रधान लीलाचा नवलाव कांहीं निराळा आहे. कृष्णाचा जन्मापासून जो जो **देहाडा** म्ह. देहाचा व्यापार तो तो नित्यनवा पवाडा असून त्यानें ब्रह्मसुखाचा रोकडा सुकाळ केला यांत कांहीं शंका नाहीं.

पांडवास पक्षपातानें, कौरवास शस्त्रघातानें, भक्तांस भजनभावानें वैरियांस द्वेषभावानें, गोपींस संगानुभवानें, गायींना संरक्षण देऊन, मयूरांना मोरपिशीं बांधून, लतावृक्षांना त्यांच्या पुष्पमाला गळ्यांत घालून याप्रमाणें अखिल चराचरसृष्टीस मोक्ष देणारा जो कृष्ण त्याचें सारेंच चरित्र नवल-

पूर्ण म्हटलें पाहिजे. नाथ म्हणतात, कीं उपजल्या दिवसापासून प्रतिदिनीं चढतीवाढती कीर्ति करून दाखविणारा कृष्ण हा खास **दीनजनां**चा समुद्धर्ता होय. कारण त्याच्या ठायीं यश, श्री, औदार्य, ज्ञान, शांति आणि वैराग्य, हे षड्गुण गुप्त रूपानें नव्हे तर उघड प्रकाशत आहेत ( भा. ३१×३३१–३८९ ). कृष्णचरित्राकडे पाहण्याची ही दृष्टि उघडउघड समाजोन्मुख आहे. तसेंच सर्वांभूतीं भगवद्भाव ठेवण्यावरहि नाथांचा कटाक्ष असून भागवताचा समारोप करतांना त्यांनीं हेंच ध्येय समोर ठेवलेलें दिसतें. भागवतग्रंथावर महाक्षेत्राचें सुप्रसिद्ध रूपक रचून नाथ पुढें म्हणतात, **सर्वां भूतीं भगवद्भजन** जोंवर घडणार नाहीं तोंवर एकादशाची खरी ओळख होणें शक्य नाहीं. तो विश्वात्मक भाव उपजेल तर मात्र या ग्रंथाच्या श्रवणपठनमननानें संपूर्ण अर्थविबोध होऊन नेणतेहि जाणते होतील. **सर्व भूतीं मजचि पाहणें** हें मला श्रीजनार्दनांनीं शिकविलें व त्यांच्याच कृपेनें या ग्रंथांत अर्थ परमार्थ हे एक होऊन गेले. जिच्या श्रवणानें भाळेभोळे असे विषयी जनहि हरिभक्त होऊन सन्मार्गी लागतील अशी ही टीका जरीं मराठी असली तरी ज्ञानदानाच्या कामांत ती **लाठी** होईल असें कृपाशीर्वचन बोलून त्यांनीं मला धन्य केलें ही सद्गुरुची केवढी कृपा ! ( भा. ४५८-५३९ ) **जन नोहे अवघा जनार्दन** असें एक नाथांचें वचन आहे. त्यांतील श्लेष स्पष्ट असून आपले गुरु श्रीजनार्दन यांचा याप्रमाणें द्व्यर्थी उल्लेख करण्याची संधि नाथ सहसा दवडीत नाहींत. भागवताच्या समारोपात तर या सद्गुरुशिवाय आणखी शिष्य हा संवादगुरु, निंदक हा परमगुरु, किंबहुना सकल भूतें हींहि गुरुच याप्रमाणें गुरुत्वाविषयीं विश्वव्यापी भावना त्यांनीं बोलून दाखविली आहे. ग्रंथाची फलश्रुति सांगतांनाहि नाथांची ही सर्वसंग्राहक वृत्ति प्रकट झाली आहे. एकादशावरील ही टीका श्रवणादि साधनांनीं तर फलदायी होईलच; पण या ग्रंथाचें दान, संग्रह, पूजन, किंवा स्मरण हींहि फलदायी ठरतील असें नाथांचें सर्वांना आश्वासन आहे. **अवचटें कार्यांतरीं । दृष्टि पडे एकादशावरी । तैं पातकें होती रान भरी** असें म्हणण्यांत अतिशयोक्ति असली तरी ती सहेतुक आहे. बहुजनसमाजानें या ग्रंथाकडे वळावें व

आपापल्या कुवतीप्रमाणें प्रत्येकानें भागवतधर्माची सेवा करावी अशी गर्भित सूचना वरील वचनांत असावी. तात्पर्य, एकनाथीभागवताची बैठक आणि त्याचा उठाव कवीच्या लोकोन्मुख वृत्तींतून झाला आहे याची साक्ष देण्यास या ग्रंथाचे आद्यन्तीचे केवळ दोन अध्यायहि पुरेसे आहेत.

भावार्थरामायण हा नाथांचा दुसरा महान् ग्रंथ घेतला तरी त्यांतहि लोकसाहित्यकाराचीच भूमिका कवीने घेतलेली दिसून येते. नाथांनीं कांहींहि लिहिलें तरी त्यांची अध्यात्मदृष्टि त्यांना सोडून जात नाहीं व त्यामुळें या प्रचंड रामकथेंतहि अध्यात्माचें सूत्र त्यांनीं येथून तेथवर सांभाळलें आहे, ही गोष्ट खरी. पण एवढेंच करून नाथ स्वस्थ बसलेले नाहींत. स्वकालीन परिस्थितीचें अवलोकन त्यांनीं नीटपणें केलें होतें. आणि काय घडत आहे व काय घडावें याची त्यांना स्पष्ट कल्पना होती. साहजीकच रामकथा वर्णितांना कित्येकदां त्यांना रामायणकालावरून स्वकालावर उतरावें लागलें आहे. सोलीव सुखाचें सुखच असें तें श्रीमुख त्यांना अतिप्रिय होतें यांत शंकाच नाहीं. परंतु कित्येक प्रसंगीं तें न्याहाळीत असतांना त्यांनीं थोडें आसपासहि पाहिलें आहे. स्पष्टपणें बोलावयाचें तर नाथांच्या या रामायणांत थोडें राजकारण किंवा समाजकारणहि असून तें त्यांच्या सामाजिक किंवा लौकिक मनाची साक्ष देत आहे. असें म्हणतात, कीं जीवंत मनाचा कवि हा समाजाच्या मूक भावनांना वाचा फोडतो. अयोध्याकांडांत रावणाच्या बंदीवासांत पडलेल्या देवांच्या दुर्दशेचीं वर्णनें नाथ करतात तेव्हां यावनी सत्तेखालीं भरडून निघणाऱ्या स्वकालीन समाजाच्या हाल अपेष्टांचेंच चित्र त्यांना रंगवावयाचें आहे हें स्पष्ट दिसतें. परिस्थितीमुळें कदाचित् जें उघडपणें बोलतां आलें नाहीं तें सामाजिक दुःख नाथ येथें अप्रत्यक्षपणें सुचवीत आहेत. तीनशें वर्षांच्या मुसलमानी राजवटींत हिंदूंचा समाजचा-समाज कसा सर्व बाजूंनीं विकलांग झाला तें नाथांना दिसत होतें. यावनी सत्तेच्या धक्क्यानें हादरून गेलेल्या भारतीय संस्कृतीची जाणीव त्यांना

१ भावार्थरामायण, अयोध्याकांड, ३×४ ते १४; ८×५५ ते ६४)

चांगली होती. हिंदु समाजाच्या सर्व थरांतून एकच अधःपात झालेला त्यांची सामाजिक दृष्टि पहात होती. **वर्णानां गुरु** असा ब्राह्मणवर्ग इकडे नीचाची सेवा करून तिकडे कोणी न मागताहि आशीर्वचन देत होता. अशाच एका पोटभरू पण अहंमन्य ब्राह्मणाचें चित्र नाथांनीं सीतास्वयं-वराच्या प्रसंगानें रंगविलें आहे. स्वयंवर आटोपून रामचंद्र अयोध्येस परतले तेव्हां त्यांच्या दर्शनार्थ पुरजनांनीं जी एकच गर्दी केली. त्यांत समाजांतील सर्व जाती समाविष्ट झाल्या होत्या. फक्त कर्माहंकारीं गुंतलेलें कर्मठ ब्राह्मण मात्र त्यांत नव्हते. कां ? तर रामदर्शनदोषाच्या भयानें ! उलट एक वेश्या श्रीमुख पहात असतांना तहानभूक विसरून गेली होती. अशी ही **नाथाघरची उलटी खूण** आहे. अशी ही झाली ब्राह्मणाची अवस्था. क्षत्रि-यांची अवस्थाहि कांहीं निराळी नव्हती. उसनें शौर्य दाखवून पोटांत मरणभय धरणाऱ्या स्वकालीन क्षत्रियाना नाथानीं नपुंसक म्हटलें आहे. वैश्य बोलूनचालून लोभी. **वैश्याचें कृपण मन । कवडी कवडी सांच-विलें धन ॥** समाजाची धुरा वाळगणाऱ्या श्रेष्ठ अशा त्रैवर्णिकांची ही दशा, मग शूद्रांची काय असेल त्याची कल्पनाच करावी. हीं सारीं चित्रें रामायणकालीन नसून नाथकालीन आहेत. नाथानीं स्वकालीन समाजाचें केलेलें निरीक्षण मोठे सूक्ष्म आणि व्यापक आहे. खोटे करणारे चाटे, ठकविणारे सोनार, लोभाच्या कातरीनें गुप्त चोरी करणारे शिंपी, लांडी-लबाडी करणारे सावकार अशी अनेक धंदेवाइकांचीं चित्रें त्यानीं रेखा-टलीं आहेत. सुंदरकांडाच्या प्रथमाध्यायांत समाजाच्या निकृष्टावस्थेचेंच वर्णन आहे. यावनी राज्यांत हिंदु स्त्रियांची अब्रू सुरक्षित नव्हती याचेंहि प्रत्यंतर नाथांच्या रामायणांत मिळतें. सेतु ओलांडून रामचंद्र लंकेंत ससैन्य उतरले हें पाहून चिंताक्रांत झालेल्या रावणास त्याचा पुत्र अतिकाय हा निस्पृहपणानें म्हणतो, " राजेंद्रा, परदाराहरण करणारा **खतेला पापी** तूं ! तेव्हां तुझें **कुळनिर्दळण** च होणार. कारण,

**जिकडे नित्य पापाचें आचरण । अकीर्ति अपेश अकल्याण ।**
**अतिनिंद्यत्वें पावे मरण । सत्य जाण लंकेशा ॥**

( सुंदरकांड अ० ४२ ).

हे अतिकायाचे किंवा

> **राजका उन्माद कामासक्ति । तोहि काम अधर्मरती ।**
> **त्याचीं राष्ट्रं पुरें नासती । राज्यसंपत्तिसमवेत ॥**
>
> ( सुदरकांड अ० ८ ).

हे सीतेचे उद्गार म्हणजे खरोखर नाथांनीं समाजास बोलून दाखविलेले स्वतःचें मनोगत आहे. **परदारपरद्रव्यहरण । या पापें बुडाला रावण ।** या भूमिकेवरून घडत आहे काय आणि घडणार आहे काय हें त्यांना येथें सुचवावयाचे आहे. कित्येकदा रामायणकालीन विवेचन ते अशा रीतीनें करतात, कीं नाथकालास तें शब्दशः लागूं पडावें. कुंभकर्णाच्या भीतीनें वानरसेना सैरावैरा पळूं लागली तेव्हां तिला वीर देतांना नाथांचा अंगद म्हणतो—

> **रणीं मारूं दशानन । श्रीरामापासीं बोलां गर्जोन ।**
> **तें तुम्ही न करितां रण । केवि पळोनी जातसां ॥**
> **पळोनि आतां गांवासी । स्त्रिया निर्भर्त्सिती तुम्हांसी ।**
> **पाठी दिधली संग्रामासी । श्याममुखेंसी आलेती ॥**
> **स्त्रिया म्हणती काळतोंडे । पळोनि आलीं माकडें ।**
> **मरणाहूनिया गाढें । दुःख रोकडें पावाल ॥**
> **जळो तुमचें काळें वदन । नपुंसकाहूनि हीनदीन ।**
> **रणीं सांडोनि रघुनंदन । केवि पळोनि आलेती ॥ ......**
> **धरोनि देहलोभाचा स्वार्थ । रणीं सांडितां रघुनाथ ।**
> **पदोपदीं नरकपात । आकल्पान्त पावाल ॥**
>
> —( युद्धकांड, २५×७७ ते ८४ ).

कविहृदयांत कांहीं खळबळ होत असल्याशिवाय असली ओजस्वी वाणी त्यांतून निघणार नाहीं. मृतालाहि चैतन्य देणारी ही वाणी वदणारे नाथ ऐहिकाविषयीं उदासीन होते असें कोण म्हणेल? सारी रामकथा त्यांनीं या दृष्टीनें गायिली आहे. रावणानें बंदिवासांत घातलेल्या देवांची त्यांतून मुक्तता करणें हा रामावताराचा एकमेव हेतु असल्याचें ते जागोजाग सांगतात. रामाच्या वेळीं गरोदर असलेल्या कौसल्येस तिचे डोहाळे पुसण्यासाठीं आलेल्या दशरथाच्या तोंडून 'रावण' हा शब्द ऐकतांच ती त्ववताळून काय बोलते तें ऐका. ती म्हणते—

पाचारा वनींचे वनचर । मुकुटकुंडलें द्या अलंकार ।
राज्य देवोनि धरा छत्र । वानरभार चालवा ॥
केउता गेला रे हनुमंत । अंगद सुग्रीव जांबवंत ।
अजूनि रावणाची मात । जगा आंत उरलीसे ॥
अहो वज्रदेही निजगडा । पुच्छें घालोनिया वेढा ।
लंका जाळा रे भडभडा । पाडा तडतडा राक्षस ॥......
राक्षसांच्या शिरकमळीं । खेळूं लंकेपुढें चेंडूफळी ।
साजुक रुधिरांच्या कल्लोळीं । तृप्त कंकाळी करूं आजि ॥
तोडा नवग्रहांची बेडी । सोडा देवांची बांधवडी ।
उभारा रामराज्याची गुढी । आज्ञा धडफुडी तिहीं लोकीं ॥
नासा रे जगाचीं दुःखें । त्रैलोक्य भरा रे हरिखें ।
दुमदुमित विश्वसुखें । परम पुरुषें श्रीरामें ॥

—(बालकांड, ५ × ११ ते २१).

वरील उद्‌गारांतून नाथांच्या रामकथेचे रहस्य स्पष्ट होत आहे. देवांचें बंधविमोचन करून रामराज्याची गुढी उभारावी, स्वधर्माला आलेली ग्लानि दूर करून त्याचें पुनरुत्थापन करावें, दुष्टांचें निर्दळण करून गोब्राह्मणांचें संरक्षण करावे, देवद्रोही, विश्वद्रोही आणि ब्रह्मद्रोही अशा रावणाला निवटून रामराज्य स्थापावे, अशा अर्थाचे विचार या रामायणात नाथांनीं कमींत कमी पन्नास वेळा व्यक्त केले आहेत. ते इतके स्पष्ट आणि रोकडे आहेत, कीं ते वाचतांना रामदासांच्या पावलांची चाहूल कोणासहि लागावी. किंबहुना असेंहि वाटतें, कीं पुढें पन्नास वर्षांनीं शिव–समर्थ एक होऊन ज्या स्वराज्याची संस्थापना करणार त्याचीं सुखस्वप्नें नाथांना हें रामायण रचीत असतांना पडत असावीं. नाथासारखा चतुरस्र बुद्धीचा पुरुष स्वकालीन परिस्थितीविषयीं उदासीन राहील हें संभवत नाहीं. त्यांनीं रामकथेचा केलेला उलगडा त्यांच्या सामाजिक मनाची साक्ष देण्यास पुरेसा आहे. 'अधर्माची नाहीं वार्ता' असलें रामराज्य उभारावें ही नाथांची मनीषा आणि तीच त्यांनीं येथें बोलून दाखविली आहे; इतकेंच नव्हे, तर द्रष्टे-पणानें तिला थोडा आकारहि दिला आहे. राष्ट्राचा तीनशें वर्षांचा बंदि-वास संपत आल्याचें आणि लौकरच येणाऱ्या समर्थ युगाचें दिव्य दर्शन या महापुरुषास घडलें व तेंच त्यानें रामकथेच्या रूपानें बोलून दाखविलें.

प्रपंच परमार्थीं सावधान करणें हा रामावतारीचा हेतु असल्याचें नाथ सांगतात. त्यांचें हें रामायण म्हणजे तेव्हांच्या महाराष्ट्राचा प्रापंचिक व पारमार्थिक उष:कालच होय असें म्हणतां येईल. एका साक्षात्कारी लोक-साहित्यकाराचें द्रष्टेपण त्यांत सांठविलेलें आहे.

परंतु एकनाथ म्हटलें, कीं एकनाथी भारुडें डोळ्यांपुढें प्रामुख्यानें उभीं राहतात व या काव्यप्रकारांत कवीच्या लोकोन्मुख वृत्तीची साक्ष पुरेपूर मिळते. भारूड म्हटलें, कीं नाथाचें नाव पुढें यावें याचें कारण म्हणजे एकनाथी भारुडाचीं संख्या, त्याचें वैचित्र्य, व्यापकत्व, ठसठशीत-पणा, त्यांतील रूपकाची, विनोदाची आणि 'अध्यात्मबोधाची' बहार, व समाजाच्या सर्व थरांतून झालेला त्याचा प्रसार. कै. पांगारकरांनीं 'बहुरूढ म्हणजे लोकप्रिय असें जें गीत तें भारूड यापमाणे हा शब्द व्युत्पादिला आहे. समाजांतील बहुजनांचें मनोरंजन करीत करीत त्यांना कांहीं सांगणारा, कांहीं शिकविणारा असा एक फार मोठा वर्ग महाराष्ट्रांत अति पुरातन काळापासून नांदत आला आहे. या वर्गांत गोंधळी, भराडी, वाघे, भुत्ये, वासुदेव, बाळसंतोष, जोशी, जागल्ये, कोल्हाटी, डोंबारी, फकीर, गारुडी, पांगुळ, इत्यादि विविध जातींचा समावेश होतो. आणि सुशिक्षितांना समाजाचा हा थर विशेष परिचयाचा नसला तरी खेडयापाडयांतून तो अजूनहि जीव धरून आहे. या लोकांची वाणी, त्यांचीं गाणीं, त्यांचे वेष, वाद्यें, विचार आचार व प्रचार यांत एक तऱ्हेचा अशिष्ट असा खेडवळपणा असतो हें खरें. पण त्यांतहि कांहीं काव्य आढळतें व त्याच दृष्टीनें नाथांनीं हें लोकवाङमय (Folk-lore) लोकशिक्षणाच्या कामीं योजिलें. समाजाचा हा तळचा वर्ग त्याच्या आवडीनिवडी, त्याचे रागलोभ, त्याचीं सुखदु:खें हीं सारीं नाथांनीं नीटपणें न्याहाळलीं असून त्यांच्याशीं ते पूर्णपणें समरस झाले आहेत. 'आदिमाये' वरील आपल्या सुप्रसिद्ध भारुडांत त्यांनी त्या विश्वोद्धारक शक्तीला म्हण-जेच जगदंबेला जें आवाहन केलें आहे; त्यांतहि त्यांची सामाजिक बुद्धिच दिसून येते. राष्ट्रांतील दुर्गुणांचा आणि दुर्वृत्तींचा, अनाचरांचा आणि अज्ञानाचा संहार करून धर्मप्रतिष्ठा करण्याचें सामर्थ्य अंगीं असणाऱ्या आदिमायेच्या दारावर नाथ या भारुडांत ठोठावीत आहेत. धर्मसंस्थापने-

साठीं म्हणून केलेलें हें ईशकृपेचें आवाहन शिवसमर्थांच्या रूपानें पुढें लौकरच सफळ झाल्याचा प्रत्यय सर्वांना आला. या जगदंबेचे नाथांनीं कांहीं गोंधळ घातले असून तिला '**फुलवरा**' बांधून तिच्या नांवानें 'जोगवा' हि मागितला आहे. आदिमायेवरील या सर्व भारुडांतील सामाजिक रूपकभाव स्पष्टच आहे. शिवाय त्यांतून नाथांना शक्ति व भागवत हे दोहीं संप्रदाय तत्त्वत: एकच आहेत असेंहि सांगावयाचें आहे.

**उदो म्हणा उदो पांडुरंग माउलीचा वो ।**
**तुझियेनि नामे गोंधळ घालिन सत्वाचा वो ॥ ध्रु० ॥**
**आषाढीं कार्तिकीं तुझ्या गोंधळाची दाटी वो ।**
**पुंडलीक दिवटा शोभे वाळुवंटीं वो ।**
**एकाजनार्दनीं अंबा उभी कर ठेवुनि कटी वो ॥**

वरील कवनांत हरिहरैक्य, किंबहुना सर्व धर्मैक्य अभिप्रेत आहे. जी आदिमाया भवानी तोच पंढरपूरचा विठ्ठल असें म्हणतांना नाथांची सर्व-संग्राहक बुद्धि स्पष्ट होत आहे. शाक्तांसाठीं म्हणून त्यांच्या भाषेंत पण '**विष्णुमय जग**' हा वैष्णवांचा धर्म ते सांगत आहेत. वाघ्ये आणि मुरळ्या हे खंडोबाचे उपासकहि त्यांच्या चतुरस्र दृष्टींतून सुटलेले नाहींत. गळ्यांत भक्तीची '**भांडारी**' बांधून, हातीं भावाचा '**कोटंबा**' घेऊन, संताच्या '**चौंघा**' वर म्हणजे चव्हाट्यावर विवेकाची '**वारी**' मागणारी व मनाचें घुंगरूं छुनछुन वाजवीत जेजुरीस नाचत जाणारी नाथांची '**नि:संग**' मुरळी एकवार पाहण्यासारखी आहे. भैरवाचे किंवा बहिरोबाचे भक्त जे भराडी त्यांच्या धर्तीवर नाथांनीं एक '**डौर**' रचिला असून त्यांतील डौरकाराचे बोल हे विचारानें '**खोलच खोल**' आहेत. तसेंच कुडमुड्या जोशी, बाळसंतोष व वासुदेव हीं तुम्हां आम्हां सुशिक्षितांना अपरिचित पण खेडवळांना रोज भेटणारीं तीन सोंगें नाथांनीं मोठ्या कौशल्यानें वठविलीं आहेत.

**कर जोडुनिया सांगतों तुम्हां ।**
**तुम्हीं वासुदेव वासुदेव म्हणा ॥**

असें साऱ्यांना विनविणारा '**वासुदेव**' च कधीं '**बाळसंतोषा**' चें सोंग घेऊन येतो व दुसऱ्याचें जीवपण घेऊन त्याला शिवपण देतो;

तर कधीं तो '**वेडापिसा**' बनतो '**राम राम**' म्हणून सदा रडत '**जै जै देवे**' त्याच्या पायां पडतो आणि वर **शून्याहि वरील** गोष्टी सांगतो. आंधळा, बहिरा, मुका आणि पांगुळे याहि भूमिका नाथ चांगल्या वठवितात. त्यांच्या **जागल्या** ची हांक तर अशी आहे, कीं ती ऐकून प्रत्यक्ष कुंभकर्णहि झोंपेंतून खडबडून उठावा. नाथ परमार्थांतील **गारुडी** हि असून **सुनो संतसज्जन भाई** याप्रमाणें बड्या बड्या महाजनांना आपल्या अस्सल हिंदी जबानींत पुकारून त्यांना भक्तीचा **अजब तमाशा** दाखविण्यांत ते पटाईत आहेत. अद्वैतानुभवाच्या अभावीं स्वधर्मविषयक कल्पनांचा संकोच होत जाऊन धर्माभिमानास दुरभिमानाचें स्वरूप कसें येतें तें नाथांच्या **हिंदुतुर्कसंवादां** त पहावयास मिळतें. ज्याची **प्राप्ति एक पण भजनें विरुद्ध** अशा दोन धर्मांतील हा संवाद नाथकालीनच आहे असें नाहीं. कारण धर्मविषयक दुराग्रह हा सर्वकाळीं व सर्वस्थळीं दिसून येतो. हें भारुड नाथकालास विशेषत्वानें लागू पडतें इतकें मात्र खरें. नाथांना सरकारदरबारचे रीतिरिवाजहि माहित होते असें दिसतें. देहगांवचे ऊर्फ शरीराबादचे सुभेदार जिवाजीपंत व ब्रह्मपुरीचे सरकार आत्मारामपंत या दोघांतील अभयपत्रें, ताकीदपत्रें, अर्जदास्ती, जाबचिठ्ठया, कौलनामे वगैरे नाथांनीं लिहिलीं असून त्यांवरून तत्कालीन समाजाच्या घडणीची बरी कल्पना येते. नाथांनीं रचिलेले **जोहार** तर समाजाच्या थेट तळच्या थरापर्यंत जाऊन पोंचले आहेत. धन्यास जोहार करणाऱ्या महाराची काकुळती नाथांनींहि तशीच वठविली आहे. मात्र भाषा काकुळतीची असली तरी वाणी अधिकाराची आहे. तसेंच हा संतकवि सर्वसामान्यांच्या प्रापंचिक हास्यविनोदालाहि पारखा झालेला नाहीं. उलट प्रपंच्याकडे निरंग दृष्टीनें पाहिल्यामुळें नाथांनीं काढलेलीं सांसारिक धडपडींचीं चित्रें सहजच विनोदी वठलीं आहेत. एक ममत्व सोडलें तर नाना प्रकारच्या विरोधांनीं खचून भरलेल्या या मानवी प्रपंचांतील खांचाखोंचा मार्मिक दृष्टीस दिसूं शकतात व त्यायोगें हास्यविनोदास भरपूर वाव मिळतो. एकनाथांपाशीं ही मार्मिक दृष्टि आहे, व त्यामुळें स्वार्थादि विकाराच्या पायीं रडकुंडीस येणाऱ्या तुम्हांआम्हां सांसारिकांच्या (रड) कथा ते रंगवितात तेव्हां हास्य-

रसाचे पूर लोटतात. पण या हास्यरसाच्या ओघांत नाथ आपल्या श्रोत्यांना उगीच वारेमाप वाहूं देत नाहींत. श्रोते हास्यविनोदांत वाहत आहेत असें पाहून हा **एकाजनार्दन** मध्येंच उडी घालतो आणि उपदेशाचा हात देऊन त्यांना भक्तीच्या वाटेस लावतो. दर आठा दिवसांनीं पुरणाची पोळी खाणारी आणि दादल्यास मात्र फक्त दिवाळीदसऱ्यास न्हाण घालून आपण मात्र दर शनिवारीं बुधवारीं गाडगाभर लोणी व सहा हंडे पाणी घेऊन न्हाणारी नाथांची **भोळी** ही विनोदी तर खरीच; पण तीहि शेवटीं आपला **भाव भोळा आणि कृष्ण चरणीं डोळा** असल्याचें सांगते हें विशेष होय. तसेंच आपल्या पतीस **तुम्ही वेगळे निघा नि वेगळे निघून संसार करा** असें सांगणारी भारुडांतील ती जहांबाज बायको खरोखर स्वार्थानें बोलत नसून परमार्थानें बोलत आहे हें जाणते ओळखतात. इतरांस तो केवळ विनोद होय. सासू, सासरा, जावा, नणंदा हीं सगळीं जाऊन **एकटीच राहुं दे मला** या बुद्धीनें भवानीआईस **रोडगा** वाहणाऱ्या त्या भरल्या घरातील सुनेच्या ओठीं स्वार्थ असला तरी पोटीं परमार्थ आहे. तसेंच वेणीफणी, काजळकुंकू इत्यादि **टामकटिका** करून आलागेला न म्हणतां उघडया माथ्यानें हिंडणारी त्यांची **सौरी** ही सुद्धा खरोखर स्वैरी नव्हे. तात्पर्य, या सर्व कवनांतून पारमार्थिक बोध हा एकच विषय आहे. मात्र तो उघड नसून गर्भित आहे, विनोदाच्या बुरख्याखालीं झांकलेला आहे. हीं परोपरीचीं रूपकें मांडून नाथ लोकसमुदायाशीं खेळत आहेत. हास्यरसाचें आवाहन नेहमींच अतिव्यापक असतें हें ओळखून लोकसाहित्यकाराची भूमिका घेणाऱ्या या संतानें या रसाचा परमार्थप्रसारासाठीं सपाटून उपयोग करून घेतला आहे. हास्यरसाचे पाझर जसे नाथवाणींतून स्रवतात तसे आणि तितके अन्य प्राचीन कवींच्या वाणींतून स्रवतांना आढळणार नाहींत. हास्यविनोद भरपूर निर्माण करून तो लोकसंग्रहार्थ राबविणें हें लोकसाहित्याचें एक गमक होय व तें एकनाथांत आढळतें. याचा अर्थ असा नव्हे, कीं या भारुडांतून क्वचित् कोठें आढळणारा हलका विनोद किंवा त्यांत आलेलीं मरीआई सटवाई किंवा खंडोबा यासारखीं हलकीं दैवतें नाथांना मान्य होतीं. नाथांची सांस्कृतिक पातळी

केव्हांहि उंचच होती, त्यांचा भाव एकविधच होता. पण समाजाच्या सर्व थरांतून भागवतधर्माचा प्रसार करणें हें त्यांनीं आपलें जीवितकार्य मानल्यामुळें तत्सिध्द्यर्थ वरील प्रकार त्यांना करावे लागले. एकदां प्रचारकाची किंवा लोकसाहित्यकाराची भूमिका घ्यावयाची असें ठरलें म्हणजे मग समाजाच्या कलानें घ्यावें लागतें, त्याच्या चालीनें चालावें लागतें, त्याचें मनोगत बोलावें लागतें. दृष्टि व्यापक व अवलोकन सर्वांगीण असल्यानें नाथ हें करूं शकले व तें केल्यानें उलट त्याच्या दृष्टींतील व्यापकपण वाढलें. कीर्तनप्रसंगानें त्यांच्या परिसरांत अनेक जातींची, अनेक व्यवसायांची व वृत्तींची मंडळी येत, व त्या सर्वांना ओळखीचीं वाटावीं अशीं भारुडें ते रचीत. वैचित्र्य हें या भारुडांचें बाह्यांग असून आत्मीयता हें त्यांचें अंतरंग आहे. स्वतःची ज्ञानी भक्ताची बैठक कायम ठेवून प्रापंचिकांच्या इतर कितीतरी भूमिका नाथांनीं भारुडांतून वठविल्या आहेत. कधीं शकुन सांगणारा कुडमुडया जोशी, तर कधीं अंबेचा उदोउदो करणारा गोंधळी, कधीं फकीर तर कधीं जोगी, कधीं मुरळी तर कधीं सौरी, कधीं जोहार करणारा महार तर कधीं अर्जदास्त देणारा बंदा याप्रमाणें अनंतरूपांनीं व अनंतवेषांनीं ते प्रकट झाले आहेत. खरोखर, नाथासारखे बहुरूपी नाथच ! पण या बहुरूप्याला आत्मरूपाचा विसर मात्र कधींहि पडत नाहीं. तें तें सोंग, ती ती भूमिका वठवून झाल्यावर मूळचा एका जनार्दन प्रकट होतो, आणि भारुड ऐकणारा आपल्या स्वभावाप्रमाणें त्या त्या प्रापंचिक कथेंत रमला असतांना हळूच त्याला एक परमार्थाचा घुटका पाजतो. कोणत्याहि जातीचा, वृत्तीचा, व्यवसायाचा, आश्रमाचा, पेशाचा किंवा वेषाचा यत्किंचितहि अधिक्षेप न करतां नाथ या सर्वांना आत्मैक्यभावानें पहात आहेत. वेडयाला वेडा न म्हणतां, वेडयांच्याच भाषेंत त्याला शहाणपण शिकविणें हें लोकसाहित्याचें वैशिष्टय असून तें या भारुडांत स्पष्ट दिसतें. श्रोत्यांनीं आपल्या मगदुराप्रमाणें या नाथवाणीचा अर्थ घ्यावा. जो जें वांछील तें त्यास येथें लाभेल.

एकनाथाची ही लोकोन्मुख वृत्ति त्यांच्या रचनापद्धतींत व भाषासरणींतहि प्रत्ययास येते. विषय पिंजूनपिंजून इतका विरल करावा, कीं

तो समाजाच्या थेट तळच्या वर्गासहि सुगम झाला पाहिजे ही दृष्टि नाथांनी सर्वत्र ठेवलेली दिसते. त्याच्या ग्रंथांतील विस्ताराचें व पुनरुक्तीचें बीज या प्रवृत्तींत आहे. एकनाथीभागवत ही ज्ञानेश्वरीची सोपी करून वाढविलेली आवृत्ति आहे. असें म्हणतात तें याच अभिप्रायानें. ज्ञानेश्वरींत कांहींसे गूढ किंवा अस्पष्ट राहिलेले सिद्धान्त एकनाथी भागवतांत विशद झाले आहेत. पहिल्या ग्रंथाच्या ओव्या नऊ हजार तर दुसऱ्याच्या वीस हजार आहेत. स्वतः ज्ञानेश्वर आपल्या ओवीस **आबालसुबोध** म्हणत असले तरी ज्ञानेश्वरी खरोखरच तशी आहे असें वाटत नाहीं. एकनाथीभागवतास मात्र **आबाल सुबोध** हें विशेषण शोभून दिसावें. ज्ञानेश्वर कित्येकदां आपला अभिप्राय सूचित करतात तर एकनाथ तो उघड करून दाखवितात. एकाचा भर ध्वनीवर किंवा व्यंजनेवर तर दुसऱ्याचा स्पष्टतेवर. एकास संक्षेप अति प्रिय, तर दुसऱ्यास त्याचें वावडे. ज्ञानेश्वरी व नाथभागवत या दोन ग्रंथांचे हृदय एक असले किंवा त्या दोघांत एक प्रकारचा बिंबप्रतिबिंब भाव असला तरी ग्रंथकारांच्या भिन्न प्रकृतीमुळें त्यांच्या काव्यकृतीच्या बाह्यांगांत पडलेला फरक स्पष्टपणें जाणवतो. या दोघांहि संतांनीं संस्कृतातील ज्ञानभांडार मराठीच्या माळावर आणून सर्वांकडून लुटविलें व त्यामुळें विचारसरणी, भाषासरणी, अलंकारयोजना, विनययुक्त आत्मप्रत्यय किंवा स्वानुभावाचा रंग इत्यादि बाबतींत दोघांचे ग्रंथ अगदीं एकरूप वाटतात, हें खरें. किंबहुना या दोन ग्रंथांतून ओवीस ओवी काढून देतां येईल यांतहि कांहीं शंका नाहीं. पण याचा अर्थ एकनाथांना स्वतंत्र प्रज्ञा नाहीं असा मात्र नव्हे. त्यांचें हृदय ज्ञानेश्वरीच्या हृदयाशीं किती समरस झालें होतें याचा हा फार तर पुरावा म्हणता येईल पण हृदय एक झालें असलें तरी दोघांच्या बाह्यांगांतील द्वैत मोडलेलें नाहीं हें पाहण्यासारखें आहे नाथाची भूमिका लोकसाहित्यकारांची असल्यानें आपलें हें निराळेंपण त्यांना राखतां आलें. ज्ञानेश्वरांचे ग्रंथ हे बहुश्रुतांसाठीं आहेत. नाथांचे भोळ्याभोळ्यासाठीं आहेत एकांत अंतर्मुखता आहे, तर दुसऱ्यांत लोकोन्मुखता आहे. नाथ गृहस्थाश्रमी असल्यानेंहि त्यांच्या ग्रंथाच्या बाह्यांगांत थोडा फरक दिसतो. ज्ञानेश्वरांच्या मानानें त्यांचें लिहिणें अधिक

ऐसपैस आणि व्यावहारिक असतें. नाथांची भूमिका कीर्तनकाराची किंवा हरिदासाची आहे व तात्त्विक स्वरूपाची प्रथरचना करतांनाहि या भूमिकेचा विसर त्यांना पडत नाहीं. बोधरूपानें बोध करणें हा ज्ञानेश्वरांचा स्वभाव. भाष्यकारांना वाट पुसत स्वतंत्र भाष्य लिहावें किंवा **अमृतानुभवा सारखें शुद्ध रसायन** निर्माण करावें हा ज्ञानेश्वरांच्या हातचा मळ होता. नाथांची प्रकृति निराळी आहे. या कीर्तनकारास कथा प्रिय आहेत, व कथारूपानें बोध करण्याचें कसब त्यांत आहे. नाथांच्या ग्रंथ-रचनेचे नुसते विषय डोळ्यापुढें आणले असता ही गोष्ट स्पष्ट होईल. रुक्मिणीस्वयंवर, कृष्णदान, हळदुली, कदर्यु—आख्यान हीं सर्व नावें काय सुचवितात ? विशेषत: कृष्णचरिताशीं झालेली नाथांची तन्मयता अपूर्व आहे. त्यांचीं पदें, बाळक्रीडेवरील अभंग, गौळणी, रूपकें इत्यादि वाङ्मय त्यांच्या कृष्णभक्तींतून व कीर्तनरंगातून स्फुरलें आहे. निर्गुणाचा बोध व सगुणाचें प्रेम हीं दोन्हीं एकच अनुभविणारे संत एक नाथच होत. ही **मुक्तीवरील प्रेमभक्ति** त्यांनीं गायिलेल्या कृष्णचरितावरील अभंगांतून जणूं कांहीं ओसंडत आहे. या सर्व साहित्यांतून रूपकाचा धागा त्यांनीं मोठया कौशल्यानें अखंडपणें ओंवून दिला आहे. कृष्णकथेचा पट येथून तेथवर एका अध्यात्मतंतूनें विणण्याचे कसब सामान्य नव्हे. कृष्णाच्या वेळीं देवकीस चित्प्रकाशाचे सोहळे अनुभविण्याचे डोहाळे कसे लागले, पोट न दुखतां आणि वेणा न येतांच ती कृष्णास कशी प्रसवली, कृष्णाच्या विश्वात्मकतेचा विसर पडून तिनें आपल्या मायेचें पांघरूण त्यावर कसें घातलें, कंसभयानें कृष्णास घेऊन यमुनापार होतांना वसुदेव हातींचा कृष्ण' विसरून अन्य देवदेवतांस रक्षणार्थ कसें प्रार्थूं लागला, इत्यादि बाळलीला नाथांनीं वर्णिल्या आहेत. त्या वर्णितांना ते परंपरेच्या आहारीं गेले नसून उलट परंपराच त्यांनी आपल्या आहारीं आणिली आहे. **आवरीं आवरीं आपुला हरि** असें म्हणत यशोदेकडे येणाऱ्या गौळणींचीं गाऱ्हाणीं गातांना नाथां-च्या अध्यात्मवाणीस जसा कांहीं बहर आला आहे. या गौळणींची तक्रार अशी **यशोदे या कृष्णानें माझें भ्रांतीचें कवाड उघडलें, मायेचें कुलुप फोडलें, अविद्येचें शिंकें तोडलें, दंभाचा डेरा फोडला, त्रिगुणतिवचा**

**ठावच नाहींसा केला, आणि ताकाचा हा प्रपंच सडा घातला, असला हा तुझा अचपळ पोर !** (गाथा, १०१) वरील भाषा प्रापंचिकांसाठीं आहे हें उघड दिसतें. याप्रमाणेंच विटीदांडू, लपंडाई, एकीबेकी, झोंबी इत्यादि खेळांवर रूपकें रचून नाथांनीं प्रापंचिकांना त्यांच्या भाषेंत परमार्थ शिकविला आहे. या पदांचा व गौळणींचा थाट सांसारिक असला तरी त्यांचा गाभा भक्तीचा आहे. हीं पदें नाथ कीर्तनांतून गात असावे. कीर्तनास येणाऱ्या बहुविध छंदांच्या जनांस त्यांचें चित्त वेधून घेईल असें एखादें बहारीचें ध्रुवपद ते लावून देत,व त्या पदाच्या शृंगारांत श्रोते गुंगले म्हणजे शेवटीं हळूंच एक भक्तिरसाचा घुटका हा **एकाजनार्दन** त्यांना पाजी. शृंगार, अद्भुत, वत्सल इत्यादि नवरसांपैकीं एकानें प्रारंभ करून हा **जनार्दनाचा एका** त्या सर्व रसांच्या पलीकडे केव्हां आणि कसा गेला हें ध्यानांतहि येऊं नये इतक्या बेतानें हीं पदें श्रोत्यांना प्रपंचांतून परमार्थांकडे नेतात. असो. तर कथा सांगण्यांत आणि तद्द्वारां बोध करण्यांत नाथांची वाणी रमते. या वाणीस **रुक्मिणीस्वयंवरा** सारख्या उघडउघड आख्यानपर अशा काव्यांत पल्लव फुटावे यांत मुळींच आश्चर्य नाहीं. पण नवल हें, कीं कथादृष्ट्या नीरस असा एकादशस्कंधहि तिनें आपल्या सहज विलासानें सरस करून दाखविला आहे. एकनाथीभागवताच्या विस्ताराचें व सौंदर्याचें मर्म कवीच्या या निवेदनकौशल्यांत आहे. मूळांत कांहींशीं संक्षिप्त असणारीं आख्यानें नाथांनीं आपल्या रसाळ वाणीनें पल्लवित करून सोडलीं आहेत. या दृष्टीनें नाथभागवतांतील चोवीस गुरूंचें रहस्य उकलून दाखविणारे तीन अध्याय वाचनीय आहेत. किंबहुना ही संख्या चोवीसच न मानतां परमार्थाच्या दृष्टीनें सारें जगच गुरु होय असें म्हणण्यांत नाथांचा विश्वात्मभाव व सर्वसंग्राहक दृष्टिकोण स्पष्ट होतो. [1]

एकनाथांची भाषाविषयक भूमिका व त्यांची भाषाशैली लोकसाहित्यकारास साजेशीच आहे. जो बहुजनांसाठीं लिहितो त्यास बहुजनांच्या भाषेचा पुरस्कार करावा लागतो, व तसा तो नाथांनीं केला आहे. त्यांच्या वेळीं महाराष्ट्राची एकमेव भाषा जी मराठी ती निदान साहित्याच्या क्षेत्रांत

---

१. एकनाथीभागवत अ. ७, ८, ९.

तरी एकीकडून फारसीचा जुलुम व दुसरीकडून संस्कृताचा दुराग्रह अशा दुहेरी कात्रींत सांपडली होती. इस्लामी आक्रमणाचा घाला केवळ राजकीय स्वातंत्र्यावर आला असें नसून महाराष्ट्राचा धर्म, भाषा व संस्कृति हीं सर्वच त्या आक्रमणाच्या सपाट्यांत सांपडून निस्तेज होऊन गेलीं होतीं. स्वातंत्र्य जाऊन पारतंत्र्य आलें म्हणजे जितांना आपलें तें सर्व हीन वाटून जेत्यांचें सारें कांहीं प्रिय व्हावें हा मनुष्यस्वभाव आहे. त्यांतून मुसलमानी राजसत्तेनें तर आपला धर्म, भाषा आणि संस्कृति यांचा सक्तीनें प्रसार करण्याचा विडाच उचलला होता. साहजिकच मराठ्यांच्या धर्माप्रमाणें त्यांच्या भाषेंतहि इस्लामचा शिरकाव झाला व तिचें 'मऱ्हाटपण' फारसीनें गढूळ होऊन गेलें. मराठी भाषेच्या तत्कालीन घेडगुजरी स्वरूपाचें दर्शन 'महाराष्ट्र-सारस्वत'[२] कारांनीं यथार्थपणें घडवून दिलें आहे. नाथकालीन ऐतिहासिक कागदपत्रें पाहिलीं असतांहि मराठीवरील फारसीच्या छायेची ओळख चांगली पटते. स्वतः एकनाथांच्या मराठींत फारसीचा शिरकाव झालेला असून **जोहार** किंवा **अर्जदास्त** यांसारख्या त्यांच्या स्फुटांतून तर फारसी शब्दांचा खच पडलेला दिसतो. नाथांचें भाषाविषयक धोरण व्यापक दिसतें. फारसीच्या आक्रमणास विरोध न करतां परकीय भाषेचें हें लोण त्यांनीं स्वभाषेंत जिरवून टाकलें. मराठीप्रमाणेंच त्यांचें फारसीवरहि प्रभुत्व होतें व तें त्यांनीं स्वभाषा समृद्ध करण्याकडे योजिलें. फारसीभाषा नाथांना प्रिय होती असें नव्हे; तर काळाच्या प्रवाहास व्यर्थ विरोध न करतां त्याचा एक पाट काढून तो स्वभाषेचें क्षेत्र संपन्न करण्याचें कामीं लावण्यांत ते निष्णात होते. त्यांची भाषाशुद्धिविषयक दृष्टि संकुचित नसून विशाल होती. त्यांच्या ठिकाणीं मातृभाषेचा अभिमान होता, दुरभिमान मात्र नव्हता. भाषाशुद्धीचें नांव पुढें करून आपली कविता सोवळी राखण्याचें महत्कृत्य त्यांना करतां आलें असतें. पण त्यांनीं तसें केलें नाही. भूमिका लोकसाहित्यकाराची असल्यानें आपलें बोलणें सर्वांना समजावें ही दृष्टि त्यांनीं मनांत निरंतर वागविलेली दिसते. साहजिकच मराठींत रूढ झालेल्या फारसी शब्दांवर बहिष्कार घालून त्याच्यां जागीं बोजड आणि

२. महाराष्ट्र-सारस्वत, पृ. ९२.

दुर्गम असे देशी खांब उभे करण्याच्या खटाटोपांत ते पडले नाहींत. उलट या रूढ परकीय शब्दांना साहित्यांत स्थान देऊन एकनाथांनी त्यांना चिरंजीव केलें. स्वभाषेचा अभिमान धरूनहि नाथ कोठें फारसीविरुद्ध भांडल्याचें दिसत नाहीं याचें मुख्य कारण हें होय. संस्कृताकडे पाहण्याची त्यांची दृष्टि थोडी निराळी होती. गीर्वाणवाणी त्यांना वंद्य असली तरी ती केव्हांच मृतभाषांच्या वर्गांत जमा झालेली आहे हें नाथ ओळखून होते. साहजिकच स्वतःस सुसंस्कृत म्हणविणाऱ्या कांहीं दुरभिमानी पंडितांनीं मराठीसारख्या जिवंत भाषेस विरोध करावा हें त्यांना पटलें नाहीं व त्यामुळें मराठीचा कैवार त्यांना घ्यावा लागला. ज्या पैठणांत नाथ वावरले तें पैठण म्हणजे संस्कृतविद्येचें माहेरघर असून वेदशास्त्रपुराणांच्या त्या आगरांत दुराग्रही कर्मठांचा भरणा फार मोठा होता. त्यांचा विरोध एकनाथांसारख्या सुधारक संतकवीस होणार हेंहि स्पष्ट होतें. हा विरोध नाथांना काशीक्षेत्रीं भागवतावर मराठी टीका रचतांना चांगलाच जाणवला पण त्यास तोंड देऊन त्यानीं आपलें कार्य पुढें रेटलें. जाणते आणि नेणते यांच्यामध्यें उभी असलेली संस्कृत भाषेची अभेद्य भिंत त्यांना दिसत होती. परंतु नाथ हे पाडापाडी किंवा मोडतोड करणारे सुधारक नव्हते. ही जुनी भिंत न पाडतां तिला मधूनमधून मातृभाषेचे झरोके ठेवल्यास ज्ञानाचें वारें खेळतें राहील व सर्वांचेंच समाधान होईल अशी त्यांची कल्पना होती. त्याप्रमाणें या उद्योगास ते झटून लागले व सांस्कृतिकांस न दुखवितां मराठीचा पुरस्कार करतां आला तितका त्यांनीं केला. तो करतांना मराठीची वकिली त्यांना पदोपदीं करावी लागली आहे. नाथांचें म्हणणें थोडक्यांत असें "संस्कृत ग्रंथकर्ते जर महाकवि तर प्राकृत कवींनींच काय पाप केलें आहे? कपिलेचें तेवढें क्षीर आणि इतर गायींचें काय नीर? संस्कृतवाणी तेवढी देवानें केली आणि प्राकृत काय चोरापासून झाली? नेव्हां ही 'अभिमानभुली' आतां पुरे. ज्या मोत्यासाठीं समुद्रांत बुडया घ्याव्या लागतात तें मोतीं घरबसल्या मिळालें म्हणून त्याचा अव्हेर करणारा मूर्खच म्हणावयाचा! तसेंच संस्कृत भाषेचे कष्ट न पडतां साध्या सोप्या मराठीनें परमार्थाची भेट करून दिली

तर काय तिची उपेक्षा करावयाची? कालचाच सूर्य आज उगवला म्हणून तो जसा शिळा होत नाहीं, त्याप्रमाणें सनातन असें ज्ञान केवळ मराठींत मांडल्यानें सदोष होणें शक्य नाहीं. त्यांतून माझी मराठी भाषा श्रीजनार्दनस्वामींच्या कृपेनें निःशब्दाच्या गोष्टी सांगून चिन्मात्रीं मिठी घालण्यांत प्रवीण आहे. अशीं ही परब्रह्मफळांनीं लहडलेली मराठी आपण त्याज्य कां मानतां?" (भागवत, अ. १, ९, १३, १४, २९,). याप्रमाणें अनेक ठिकाणीं पुनरुक्तीचा दोष पतकरूनहि कर्मठ सांस्कृतिकांची समजूत घालण्याचा प्रयत्न नाथांनीं केला आहे. यापूर्वीं तीनशें वर्षामागें ज्ञानेश्वरांनीं मराठीचा महिमा गायिला होता हें खरें. पण त्यांचे ते आणि नाथांचे हे उद्गार शेजारीं ठेवून पाहिल्यास दोघांतील फरक ध्यानांत येईल. ज्ञानेश्वर मराठी भाषेचा केवळ जयजयकार करतात. तिची वकिली ते करीत नाहींत. उलट नाथ मराठीच्या जयजयकारापेक्षां तिची वकिलीच अधिक करतात, प्रतिपक्षाची समजूत घालूं पाहतात, आणि प्रमाणांचा व दृष्टांतांचा पाऊस पाडून स्वमताचें समर्थन करतात. कदाचित् ज्ञानेश्वरांना मराठी-विरोधाची झळ प्रत्यक्ष अशी लागलीच नसेल. हा विरोधाग्नि तेव्हां नुसता धुमसत असेल आणि भावी विरोधास तोंड देण्याची ज्ञानेश्वर आधींच तयारी करून ठेवीत असतील. यावर तीनशें वर्षें गेलीं, मराठी भाषा स्थिरस्थावर झाली. साहजिकच मराठीचें चढतें वाढतें वैभव पाहून सांस्कृतिकांचा पित्तप्रकोप होऊं लागला, त्याची जाणीवहि ते नाथांसारख्या सत्कवीस देऊं लागले. एकनाथीभागवताच्या पहिल्या पंचाध्यायीवर केवळ भाषा मराठी म्हणून अवघे काशीक्षेत्र कसें तुटून पडलें आणि त्यामुळेंच नाथांनीं आपला ग्रंथ मणिकर्णिकेच्या तीरीं कसा संपविला इत्यादि वृत्त सर्वश्रुत आहे. चतुःश्लोकी भागवताची रचना चालूं असतांनाहि पैठणकर कर्मठांनीं त्यांना ते संस्कृतांतील वेदान्त मराठींत आणतात म्हणून वाळींत टाकलें होतें. पण आश्चर्य हें, कीं नाथांच्या तोंडून दासोपंतांप्रमाणें 'ऐसियां मूर्खांसि मुंडणें किती आतां!' अशा प्रकारची कडक भाषा या कर्मठांना उद्देशून कधींहि निघाली नाहीं. उलट संस्कृताभिमान्यांचा बोल सोसून, त्यांना न दुखवितां, त्यांची समजूत घालून, काशीक्षेत्रांत म्हणजे

संस्कृत विद्येच्या आगरांत त्यांनीं मराठी भाषेचा जयजयकार केला व विरोधकांचा विरोध साफ मोडून काढला हा नाथांचा पराक्रम फार मोठा आहे. मराठीचेहि ते नाथ झाले! बहुजनांच्या भाषेचा इतका गौरव करणारा लेखक विरळा. तो नाथांनीं केला व लोकभाषेस एक प्रकारची प्रतिष्ठा मिळवून दिली.

नाथांची भाषाशैलीहि त्यांच्या वरील भूमिकेस अनुरूप आहे. त्यांचा भर संक्षेपावर किंवा शद्बांच्या मितव्ययावर नसून आपलें लिहिणें सुबोध कसें होईल इकडे त्यांचें लक्ष असतें. ज्ञानेश्वरांचे अभिप्राय कांहींसे गुढ किंवा अस्पष्ट वाटतात याचें कारण त्यांच्या शब्दयोजनेंतील मितव्यय. वेंचक शब्दांत विपुल अर्थ सांगण्याची कला ज्ञानेश्वरांत आहे व त्यामुळें त्यांच्या ग्रंथाचें बाह्यांग मोठें नीटस, रेखीव आणि प्रमाणबद्ध वाटतें हें खरें. पण त्याबरोबरच शब्दाचा हा मितव्यय स्पष्टतेच्या किंवा अर्थव्यक्तीच्या थोडा आड येतो हेंहि नाकारून चालणार नाहीं. त्या मानानें नाथांचें लिहिणें मोठें ऐसपैस व प्रशस्त असतें. मनांतील पूर्णार्थ स्पष्टपणें व खुलासेवार रीतीनें व्यक्त करावा हा त्यांचा भाव. त्यांची चार आणि क्वचित् साडेचार चरणीओवी ज्ञानेश्वरांच्या साडेतीन चरणी ओवीच्या मानानें काव्यांत थोडी अवजड वाटते हें खरें; पण मनास ती चटकन् उमगते. म्हणूनच कदाचित् बोजडपणाचा दोष पत्करून नाथांनीं या दीर्घ ओवीचा अवलंब केला असावा. त्यामुळें आपल्या काव्याचें बाह्यांग रेखीवपणास मुकतें हें त्यांना मान्य असलें तरी बाह्यांगासाठीं दुर्बोधता पतकरण्यास ते तयार नाहींत. कारण त्यांचें लिहिणें चार सुशिक्षितांसाठीं नसून तें सर्वांसाठीं आहे. तसेंच आपलें म्हणणें शक्य तों प्रापंचिकांच्या नित्याच्या भाषेंत सांगण्याकडे त्यांचा कल दिसतो. मानवी संसारांतील सुखदुःखें, प्रसंग, दाखले, चित्रें यांवर त्यांचा भर फार. त्यामुळें त्यांचे लिहिणें वाचकास ओळखीचें वाटतें, भागवतांत एका ठिकाणीं भक्ताच्या अंतःकरणाला त्यांनीं ठेव्यावर लोभ धरणाऱ्या कृपणाचा, पोटांतील गर्भावर माया करणाऱ्या गर्भवतीचा, जांवयास प्राणासमान जपणाऱ्या सासूचा, उल्हासानें बीज पेरणाऱ्या शेतकऱ्याचा, आणि पतीसाठीं तळमळ-

णाऱ्या कांतेचा असे पांच दृष्टांत दिले आहेत. प्रापंचिकांकरितां प्रपंचाच्या भाषेंत परमार्थ शिकविणें हें नाथांचें वैशिष्टय होय. असें करतांना क्वचित् कोठें ते सभ्यतेची मर्यादा ओलांडीत आहेत असाहि भास होतो. परंतु तो नुसता भासच. कारण त्यांचें लक्ष परमार्थावर असतें, व दृष्टांत टाकून ते चट्‌दिशीं सिद्धान्ताकडे वळतात. नाथांच्या रूपकयोजनेचें मर्म त्यांच्या वरील स्वभावांत असावें. रूपक हा साम्याधिष्ठित अलंकारांपैकीं एक असून त्यांत वक्ता व श्रोता हे एकमेकांच्या अति निकट येतात. इतके कीं, रूप-कांतील उपमेयउपमानांप्रमाणें त्यांच्यांतहि एक प्रकारचा अभेद उत्पन्न होतो. श्रोत्याशीं त्याच्या ओळखीच्या शब्दांत बोलण्याचें एक साधन या दृष्टीनें रूपकाची बरोबरी दुसरा कोणताहि अर्थालंकार करूं शकणार नाहीं. कारण रूपक हें द्वैताच्या नव्हे तर अद्वैताच्या भाषेंत बोलणें असतें. 'जग ही एक रंगभूमि आहे' हें साधें वाक्य उच्चारल्याबरोबर वक्ता आणि श्रोता कसे एकरूप होतात याचा अनुभव कोणास नाहीं? तर रूपक हा एक समाजाशीं त्या समाजाच्या भाषेंत बोलण्याचा प्रकार आहे. या दृष्टीनें पाहिल्यास एकनाथांनीं रूपकांची योजना इतक्या मोठया प्रमाणावर कां केली त्याचा उलगडा होईल. दृष्टांत जसा ज्ञानेश्वरांनीं द्यावा त्याप्रमाणें रूपक हें नाथानींच योजावें अशी असामान्य प्रभुता त्यांची या अलंकारा-वर आहे. सविस्तर परंपरित रूपकें साधण्यांत त्यांचा हात धरणारा दुसरा कोणी नाहीं किंबहुना रूपकाखेरीज त्यांचें पाऊलच पुढें पडत नाहीं. या दृष्टीनें भागवतांतील व भावार्थरामायणांतील रूपकें पाहण्यासारखीं आहेत.

नाथांचें भारुड हा तर रूपकसृष्टींतील एक मोठाच विजय आहे. भारुडांत दिसून येणारा वक्ता आणि श्रोता, उपमेय आणि उपमान जग आणि रंगभूमि, प्रपंच आणि परमार्थ यांतील अभेदभाव लक्षणीय आहे. एका सद्‌गुरूवर नाथांनीं पारमार्थिक ज्योतिषी, धन्वंतरी, क्षीरसागर, महामेरु, चित्समुद्र याप्रमाणें अनेक रूपकें रचिलीं असून ती त्यांच्या सर्व संग्राहक बुद्धीची साक्षच होय. रुक्मिणीस्वयंवर हें त्यांचें प्रसिद्ध काव्य म्हणजे तर एक समग्र रूपककथाच आहे. इतकें व्यापक आणि सर्वांग-

सुंदर रूपक मराठींत दुसरें नाहीं. हीं सारीं एकनाथी रूपकें आणि त्यांचा विस्तार पाहिला म्हणजे अतिसूक्ष्म अशा बीजांतून फोफावणाऱ्या प्रचंड वटवृक्षाची आठवण होते. रूपक आणि वटवृक्ष दोघेहि आपापल्या परीनें बहुजनांसी शांतिसमाधान देण्याचें कार्य करीत असतात. वटवृक्षांत जो एक सामाजिक भाव आहे तोच एकनाथी रूपकांतहि आहे. असो. नाथांनीं योजिलेल्या मराठी भाषेचें मराठपणहि अनन्यसाधारण असून त्यांत लेखकाची लोकोन्मुखता स्पष्ट दिसते. मराठीचा पुरस्कार करतांना त्यानीं संस्कृत किंवा फारसी भाषेस चुकूनहि अन्याय केलेला नाहीं. उलट स्वभाव सर्वसंग्राहक असल्यामुळें संस्कृत, मराठी व फारसी अशा तीनहि भाषांचे ओघ त्यांनीं आपल्या लेखनशैलींत एकवटून टाकले. त्याबरोबरच लौकिक मराठींतील कांहीं वाक्प्रचार त्यांनीं अशा कांहीं धोरणानें योजिले, कीं ते वाचतांना नाथांच्या मराठीचें मऱ्हाठपण चटदिशीं डोळ्यांत भरावें. त्यांच्या स्फुट काव्यांत आणि विशेषतः भारूडांत लोकांची बोलभाषा इतकी हुबेहूब वठली आहे, कीं तिची योजना करताना नाथाच्या दृष्टीसमोर बहुजन समाजच असावा यांत मुळीच शंका उरत नाहीं. कै. पांगारकर म्हणतात त्याप्रमाणें नाथांची भाषा घराऊ आहे. ते लोकात वावरत व लोकांच्या बोलींतच लिहीत. 'मुलांच्या चालीनें चालावे व मुलाचें मनोगत बोलावे' हा पुढें रामदासानीं केलेला उपदेश एकनाथानी आधीच आचरणांत आणला होता. समाजोद्धारासाठीं ते समाजाच्या आखाड्यांत उतरले व तेथील भाषा बोलूं लागले. ती सदर्थानेंच ग्राम्य आहे. कै. पागारकरांनीं टिपलेल्या नाथांच्या घराऊ भाषेच्या उदाहरणांतून काहीं पुढें देतो

(१) वेणीफणी कांजळ कुंकू केला टाकमाटीक्का ।
(२) कन्यापुत्र पोट पिकेल । दारचा वेल मांडवा जाईल ॥
(३) हातीं भोपळा घ्यावा । भिकेसि हा उपाय बरवा ॥
(४) भूत जबरं मोठे गडे बाई । झाली झडपण करुं गत काई ॥
(५) नाथाघरची उलटी खूण । पाण्याला लागली तहान ॥
(६) अशी कशी थट्टा । भल्याभल्यांसी लाविला बट्टा ॥
(७) मिगाचें मिगुंलें खांद्यावरी आंगुलें ॥

(८) जन झोडी जगझोडी । नांव ठेविलें लाडी ॥
(९) जोहार मायबाप जोहार । तुमच्या महाराचा मी महार ॥
(१०) फट गाढवाच्या लेका । संसार केला फुका ॥

नाथाच्यावाणींत रूढ व लोकप्रिय असे कितीतरी वाक्प्रचार (idioms) आढळतात. पींक पिकलें प्रेमाचें, कृपेचें पोसणें, अर्धपोटी स्वार्थ, वळचणीचें पाणी आढ्या गेले, मांडीला घराचार, मुखीं बैसे दांतखीळ, उभ्या बाजारा फजिती, गोमटीं गोजिरीं पाऊलें साजिरी, बुरगुंडा व्हईल तुला बुरगुंडा व्हईल,झडतो नामाचा चौघडा हे त्यांपैकीं काहीं होत. नाथांच्या मराठीचा कै. पांगारकरांनीं दाखविलेला दुसरा एक विशेष म्हणजे त्यांच्या भारुडांची भाषा- हीं भारुडें जरी अध्यात्मतंतूनें विणलेलीं असलीं तरी त्यांची भाषा त्या विषयास पूर्णपणें अनुरूप अशी आहे.भारुडांतील त्या सोंगाचें वैशिष्टय त्याच्या भाषेंत उमटलेलें आहे. उदाहरणार्थ भूल्या म्हटला, कीं तो आपले चवंडक वाद्य, परडी, संबळ, पोत घेऊन उभा. मल्हारी देवाचे सेवक 'वाघ्या व मुरळी' म्हटले, कीं त्यांच्या वर्णनांत त्यांची दिवटी,बुधली, कोटंबा, भंडार, तुणतुण, घुंगरी, जेजुरीची वारी हे प्रकार येणारच.

तात्पर्य लोकांच्या भावना त्यांच्या भाषेंत व त्यांच्यासाठीं बोलून दाखविणारे एकनाथ हे पहिले साहित्यकार होत. आज ज्या लोकसाहित्याचा मंत्र वारंवार घोषित केला जातो तें लोकसाहित्य प्रथम निर्माण करण्याचा मान नाथांकडे जातो किंवा जावा. एकान्तीं मिळवून लोकांतीं वाटणारे नाथ हे पहिले संतकवि होत. त्यांचें मन जिवंत अतएव संवेदनक्षम असून काळाच्या उत्तरास प्रत्युत्तर देण्याचें सामर्थ्य त्यांत आहे. ही भूमिका एका महान कर्मयोगी अशा संताची आहे. इतकेंच कीं एकनाथांत ती बीजरूपानें दिसतें तर रामदासांत तिचें सम्यग्दर्शन घडतें. पण एकानें प्रतिपादिलेला प्रपंचपरमार्थयोगच पुढें दुसऱ्यांत कर्मयोगरूपानें प्रकट झाला यांत संशय नाहीं. नाथांचा भागवतधर्म हा समर्थांच्या महाराष्ट्रधर्माचा पूर्वजच आहे. एकास आनंदवनभुवनाचें स्वप्न, नव्हे साक्षात्कार घडला तर दुसऱ्यानें तो प्रत्यक्षांत आणला. दोन कर्मयोगी संत अंतरीं एक आहेत. एकाचें नाथपण ही दुसऱ्याच्या रामदास्याची गुरुकिल्ली असून लोकसाहित्याचीं उपासना ही दोघांना समान अशी साधना आहे.

---